प्रकरण पहिले–

# वर्णलिपिमालेचा आद्यन्त 'अ' आणि 'ह'

### वर्णलिपिमालेची उत्पत्ति

वर्णलिपिमालेची उत्पत्ति कशी झाली या विषयी स्पष्ट रूपाने विवरण तंत्र शास्त्राचे ग्रंथातून मिळते, त्यानुसार प्राप्त होणारी मूळ लिपि कोणती आणि आज भारतवर्षात प्रचलित असणाऱ्या मुख्य प्रादेशिक लिपींशी तिचा सम्बन्ध काय हा प्रस्तुत ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय आहे.

### मौलिक एकरूपता

यापुढे योग्य त्या ठिकाणी योग्य त्या मुद्याचा, विस्तार केलेलाच आहे. सुरुवातीस वर्णलिपिमालेचे पहिले अक्षर "अ" आणि शेवटचें अक्षर "ह" यांची मौलिक उत्पत्ति व त्यांचा मुख्य प्रादेशिक लिपींशी सम्बन्ध, तसेंच मौलिक एकरूपता पाहूं. मौलिक म्हणजें "**मूले भवं**" अर्थात मूळ ठिकाणी उद्भवणारे. चित्रांच्या भागातील आकृति १, २, ३, ४, ५, ६ पहा.

### शिव शक्तींची सिसृक्षा

आकृति १ मध्ये– "**बिन्दु**" दाखविला आहे. हा शिव आणि शक्ति यांचें सर्वदा संयुक्त असे स्वरूप दाखवितो. यास "**समष्टिबिन्दु**" अथवा "**कामेश्वर बिन्दु**" असेंही म्हणतात. आकृति २ मध्ये शिव आणि शक्तींचें सिसृक्षेमुळें म्हणजे त्यांना "जगत् उत्पन्न करण्याची इच्छा" झाल्यामुळें त्यांच्या सर्वदा संयुक्त स्वरूपापासून दोन वेगळाले अंश-बिंदु झाले, ते दाखविले अ,हेत. त्यांना "**व्यष्टिबिन्दु**" अथवा "**विसर्ग**" असे म्हणतात. हे दोन व्यष्टिबिंदु स्थूल शून्याकार होऊन एकमेकाम चिकटतात हेच आकृति ३ मध्यें दाखविले आहे. या आकृति ३ च लंबवत् म्हणजे उभे विभाजन होऊन त्या पासून आ. ५ व आ. ६ हे दोन अर्ध बनतात. या विभाजनाची समजूत आ. ४ मध्ये दाखवली आहे.

### बिन्दुस्फोटन

आ. ५ व आ. ६ या दोघास मिळून "**बिन्दुस्फोटन अथवा हार्द्धकला**" म्हणतात. कामबिंदु, विसर्ग आणि हार्द्धकला यांपैकी पहिल्या शद्वांतील "**काम**" आणि शेवटच्या शद्वांतील "**कला**" असे शद्व घेऊन प्रत्याहाराने "**कामकला**" शद्व बनतो. कामकला या शद्वाने तिघांचा सामुदायिक निर्देश केला जातो. या बिंदुस्फोटनमूलामधून सर्व वर्ण बनतात असें नन्दिकेश्वरकृत काशिकेंत उद्धृत केलेल्या महामंत्रतत्त्वप्रकाशिनीचें वचनात सांगितले आहे.

### संपूर्ण वर्णलिपिमाला

**उच्छूनकाले बिन्द्वात्मा तस्मादक्षरसंभव: । बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भव: ।। "मध्यबिन्दुविसर्गान्तः समास्थानमयें परे । कुटिला रूपके तस्या प्रतिरूपे वियत्कले ।। (योगिनी हृदय २/२१)**

याचा अर्थ करतांना 'वरिवस्यारहस्य' अध्याय २ श्लोक ६७/६८ च्या व्याख्येत भास्करराय "**परे चरमेऽकार हकाररूपेऽक्षरे मातृकाणां क्रमेण पाठे चरमत्वाद्धकारस्य, व्युत्क्रमेण पाठे त्वकारस्य चरमत्वात्** असा करतात **वरिवस्यारहस्यात अहकारौ शिवशक्ती शून्याकारौ परस्परा-श्लिष्टौ**" (२/६९) यांत व याचें पूर्वसंदर्भात आणि **अभिनवगुप्ताचार्यविरचित तन्त्रालोकांत** हा सर्व विषय आला आहे. तन्त्रालोकाच्या **जयरथ-कृत टीकेंत**–

**" अकारश्च हकारश्च द्वावेतौ युगपत्स्थितौ । विभक्तिर्नानयोरस्ति मारुताम्बरयोरिव ।"**

**"......अनयो: परस्परोन्मुख्यात्मकं यामलं रूपं स्यात्तदा विश्वसर्ग : । (जयरथ टीका तन्त्रालोक ३।६७)**

या प्रमाणें सामान्यरूपानें बिन्दुस्फोटनविभाग अ ह् रूप आहे असें सांगितले आहे. या सर्वांचें मूळ "**अ: इति ब्रह्म तत्रागतमहमिति**" या ऐतरेयारण्यक वाक्यांत आहे. (**अ. ३ ख ८**) चित्रांच्या भागातील आकृति ५, १४, ६, १९, १५, १६, १७, १८ पहा.

### बिन्दुस्फोटन व वर्णोद्धार तन्त्र

आ. ५ या बिन्दुस्फोटनाचे अर्धभागापासून आ. १४ हा 'अशोकलिपि' 'अ' बनतो. अशोकलिपि म्हणजे सम्राट अशोकाच्या अनेंक उपलब्ध असणाऱ्या शिलालेखामध्ये आढळणारा लिपिप्रकार. अशोकाचें शिलालेखांत दोन लिपी आढळतात. ब्राह्मी आणि खरोष्ठी. अशोकाचें शिलालेखात प्राचुर्यानें आढळणाऱ्या लिपीस आधुनिक लिपिचिंतक ब्राह्मी नांवाने उल्लेखितात. त्या लिपीसच सर्वत्र "अशोकलिपि" या नावानें प्रस्तुत ग्रंथात उल्लेखिले आहे. ब्राह्मी नांव कां नाही याचें विवरण ग्रंथाचें उत्तरार्धांत नांव ब्राह्मी कां देवनागरी ' या प्रकरणात येणारच आहे. आ. ६ पासून देवनागरीचा आ. १९ हा 'अ' बनतो, आणि आ, ५ पासून १४ हा अशोकलिपि 'अ' बनतो. या दोन्ही 'अ' मध्ये आ. १९ व आ. १४ मध्ये अनुक्रमे आ. ६ व आ. ५ पेक्षा जास्त असणारी उजवीकडील लहान आडवी रेषा व उभी रेषा "**वर्णोद्धार तन्त्राचे**" कथना-नुसार दिली जाते.

**दक्षतः कुण्डली भूत्वा कुञ्चिता वामतो गता । ततोर्ध्वसङगता रेखा दक्षोर्ध्वा तासु शङ्करः" ॥**

**(शब्दकल्पद्रुमात उद्धृत वर्णोद्धारतंत्रवचन)**

अर्थ-बिन्दुस्फोटनांत (प्रथम) उजवीकडे कुण्डलाकार होऊन कुञ्चित होऊन डावीकडे (रेषा) जाते, तिला "संगत रेषा" (म्हणजे उजवीकडे लहान आडवी रेषा) देऊन दक्षोर्ध्वा (म्हणजे उजवीकडील उभी) रेषा काढल्यावर (अकार होतो) वर्णोद्धार तंत्राच्या सर्व श्लोकांचा अर्थ करीत असतांना प्रत्येक वेळी " बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णांना च समुद्भवः " या परिभाषेस अनुसरून बिन्दुस्फोटनांत असे सर्वत्र जोडून घेणे आहे.

या श्लोकाचें पूर्वार्धाचें अर्थावरून डावीकडील वृत्तार्धद्वय वरखाली जोडून आ. ५ व उजवीकडील वृत्तार्धद्वय वरखाली जोडून लिहिण्याचें दिग्दर्शन होते. उत्तरार्धाचा अर्थ घेऊन श्लोकावरून संपूर्ण 'अ' कसा लिहावा हे स्पष्ट होते. हे लक्षणवाक्य अशोकलिपि व देवनागरी या दोहोंसही लागू पडते. हे आकृतीवरून स्पष्ट आहे. आ. १४ मध्ये अशोकलिपि 'अ' लिहिला आहे. आ. १५ ते आ. १८ अखेर अशोक लिपीतील उपलब्ध 'अ' चें अनेक प्रकार मिळून येतात.

**घृष्टलेखन**

यावरून एकाच काळीं एकाच अक्षराचें अनेक प्रकार प्रचलित असल्याचें दिसते. तात्पर्य एतद्विषयी उत्क्रान्ति वा पौर्वापर्याचा नियम निश्चित करता येत नाही. असे प्रकारभेद होण्याचें कारण "घृष्टलेखन" हे आहे. मूळ अक्षर कसे असावे हे निश्चित आहे. वेगवेगळ्या व्यक्तींचें हाती लिहिता लिहिता लवकर लिहिण्यासाठी वा सोयीसांठी वा हस्तवैशिष्ट्य म्हणून त्या त्या व्यक्तींचें वैयक्तिक आवडीनिवडीनुसार मूळ-स्वरूप अबाधित ठेवून काही फेरफार घडून येतात. उदाहरणार्थ डॉक्टरांचें प्रिस्क्रिप्शन, कारकुनो पावत्या वगैरे, जगात सर्वत्र असें आढळते. अशा तऱ्हेच्या वेगळ्या वळणास वा स्वरूपास संस्कृतमध्ये 'घृष्टलेखन' व हिंदीमध्ये 'घसीट' म्हणतात. या विस्तृत अर्थानें यापुढे '**घृष्टलेखन**' हा शब्द या ग्रंथात सर्वत्र वापरला आहे. पुढे उत्तरार्धात "**लेखनप्रकार**" या प्रकरणात घृष्टलेखनाविषयी विस्तारानें विचार केला आहे. आता विवरण पाहूं.

**कन्नड व तेलगु प्रक्रिया**

चित्रांच्या भागातील आकृति ३, ९. १०, ११, १२, १३, ५, ७, १२, ६, ८, १३ पहा.

आकृति ३ यास अधिक आश्लेषयोग्य केल्यावर म्हणजे शून्यांचे व्यास हेच संधिरेषा केल्यावर आ. ९ मधील शून्याकार होतात. ते एकत्रित केल्यावर आ. १० बनते. आ. १० ची आ. ११ मध्यें दाखविल्याप्रमाणें लम्बवत् विभागणी केल्यावर आ. १२ व आ. १३ बनतात. अथवा आ. ५ कोणयुक्त लिहिल्यावर आ. ७, आ. ८ मधील दोन भाग जोडून लिहिल्यावर आ. १३ बनते. यावरून आ, ५ = आ. ७ = आ. १२ आणि आ. ६ = आ. ८ = आ. १३ असें दिसते. अर्थात आ. ५ हीच आ. १२ चें स्वरूपात व ही आ. १३ चे स्वरूपात लिहिली गेली आहे.

चित्रांच्या भागातील आकृति १२, १८, २८, २९, ३०(अ) ३०(ब) पहा.

आ. १२ ला संगतरेषा व ऊर्ध्वरेषा वर्णोद्धारतंत्रवचनानुसार दिल्यावर आ. १८ होते. आ. १८ मध्ये आ. २८ येथे टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असता आ. २९ होते. आ. २९ मध्ये आ. ३० (अ) येथें टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असता आ. ३० (ब) होते. आ. २९ व आ. ३० (ब) हे दोन्ही 'कन्नड व तेलगु' 'अ' आहेत; हे दोन्ही 'अ' अशोकलिपि गटाचें आहेत. त्याचें आ. १८ शी गर्भितत्त्व स्पष्टपणे दिसतच आहे. कन्नड व तेलगु या दोन्ही लिपींत एकाच प्रकारचा 'अ' लिहिला जातो.

चित्रांच्या भागातील आकृति १९, २०, २१, २२, २३, २४, २५ अ, २५ ब, २५ ड, २५ इ, २५ फ, २५ क्ष, पहा.

**हिन्दी व (काश्मीर) शारदा–अ**

आ. १९ ते आ. २५ मध्ये देवनागरी अ चें अनेक प्रकार दाखविले आहेत. हे सर्व आजही लेखनांत दिसतात. आ. २५ (ड) असाही 'अ' हिन्दी मध्यें लेखनात आढळतो. आ. १९ या देवनागरी 'अ' चें आ. २५ (अ) (ब) (क) या पद्धतीने **घृष्टलेखन** होउन आ. २५(ड) बनली आहे. आ. १९ व आ. २५ (ड) हे दोन्हींही आज प्रचलित आहेत. आ. २५ (इ) व आ. २५ (फ) व (क्ष) यामध्ये काश्मीर 'अ' ची प्रक्रिया दाखवली आहे. आ. २५ (क्ष) आजचा प्रचलित काश्मीरलिपि 'अ' आहे. तो आ. २५ (ड) पासून बनतो. आ. २५ (इ) हा **भारतीय प्राचीन लिपिमाला** या पं. **गौरीशङ्कर हिराचंद ओझा** यांचें ग्रंथात काश्मीर 'अ' म्हणून दिला आहे. आ. २५ (क्ष) हा मद्रास गव्हर्मेंट म्युझियम बुलेटिनमधून घेतलेला काश्मीर 'अ' आहे. व आ (क्ष) हे आ. २५ (ड) मधील तीन आडव्या रेषा थोड्या दूरदूर लिहून बनलेले असल्याचें दिसते आहे.

चित्रांच्या भागातील आकृति २२, ३९, ४०, २३, ४१, ४२, २३, ४३, ४४ पहा.

**तमिळमल्याळम् प्रक्रिया**

आ. २२ मध्ये आ. ३९ मध्ये टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असतां आ. ४० हा मल्ल्याळम् 'अ' होतो. आ. **२३** मध्ये आ. **४१** प्रमाणें टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असता आ. ४२ हा '**तमिळ लोकलिपि**' 'अ' होतो. तमिळ लोकलिपीत संस्कृतांतील सर्व वर्ण

नाहीत म्हणून संस्कृत ग्रंथ लिहिण्यासाठी '**तमिळ ग्रंथ लिपि**' ही स्वतंत्र लिपि म्हणून वापरली जाते. तिच्यात सर्व वर्ण आहेत. आ. २३ मध्ये आ. ४३ प्रमाणें टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असतां आ. ४४ हा '**तमिळ ग्रंथ लिपि**' 'अ' होतो.

चित्रांच्या भागातील आकृति २४, ३५, ३६, २४, ३७, ३८, पहा.

### गुजराती, उडिया–अ

आ. ३५ मध्यें आ. २४ पासून '**गुजराती**' 'अ' बनण्याची प्रक्रिया दाखविली आहे. आ. २४ मधील वरच्या भागाचें दोन तुकडे करावयाचे व उजवीकडील तुकडा सोडून द्यावयाचा आ. २४ मधील संगतरेषा डावीकडील रेषेस जोडून घ्यावयाची आणि एवढे करून आ· ३५ मध्यें टिंबांनी दाखविल्याप्रमाणें रेषा करावयाच्या, म्हणजे आ. ३६ हा '**गुजराती**' 'अ' होतो गुजराती मध्ये प्राय: अक्षराचें उर्ध्वरेषेचे खालचें टोक वर वळवून लिहिण्याची पद्धत आहे. आ. २४ मध्ये आ. ३७ प्रमाणें टिंबांनी दाखविलेली रेषा केल्यावर आ. ३८ हा '**उडिया**' 'अ' होतो. आ. २४ मध्ये संगतरेषा हात उचलून लिहावी लागते. ती 'गुजराती' व 'उडिया' लिपीत अविच्छिन्नपणें हात न उचलता लिहिता येते.

चित्रांच्या भागातील आकृति २४, ४५, ४६ पहा.

### गुरुमुखी प्रक्रिया

आ २४ मधील आ. ४५ मध्ये टिबांनी दाखविलेला भाग काढून टाकल्यावर आणि उरलेला भाग कोणयुक्त लिहिल्यावर आ. ४६ हा '**गुरुमुखी**' 'अ' होतो. यावरून असें दिसून येते की या सर्व लिपि देवनागरी गटाच्याच आहेत. देवनागरीच्या प्रकारातच समाविष्ट आहेत.

चित्रांच्या भागातील आकृति ४७, ६६, ६७, ६८ ६६, ६९, ७०, ७१ पहा.

### कन्नड व तेलगु–ह

आ. ४७ ला घड्याळाचें काटयाचें दिशेने फिरवून भूमिसमांतर केल्यावर आ. ६६ होते. आ. ६६ मध्ये आ. ६७ येथे टिंबांनी दाखविलेला भाग वाढविला असता आ. ६८ हा '**कन्नड**' 'ह' होतो. आ. ६८ (अ) मध्ये डावीकडील मोकळचा सोडलेल्या टोकाकडून लिहिणारे इंग्रजी आठ आडवा पुरा करून मध्य बिन्दूशी आल्यावर सरळ वर जातांना एक रेषा अधिक लिहिली जाते हाही एक प्रकार आहे.

आ. ६६ मधील पहिले अर्धकुण्डल लहान व दुसरे मोठे करून आडवी रेषा उजवीकडे सरकावली असतां आ. ६९ होते. आ. ६९ मध्ये आ. ७० येथे टिबांनी दाखविलेला भाग वाढवून जोडून लिहिल्यावर आ. ७१ होते. आ. ७१ हाच '**तेलगु**' 'ह' आहे. "**कन्नड लिपिय उगमम्तु विकास**" या **डॉ. ए. व्ही. नरसिंह मूर्ति** यांच्या पुस्तकात पृ. ९९ वर ह्याच 'ह' चें घृष्टलेखन दाखविले आहे. पूर्वी कन्नड तेलगु अक्षरे सरमिसळ लिहिली जात असत.

### अवस्थान भेदाची उपपत्ति

याप्रमाणें वेगवेगळ्या लिपि लिहिण्याची पद्धत (अवस्थानभेद) वाचकाच्या वाचण्याचा वेगवेगळ्या दिशांनुसार (दिग्भेद) ध्यानी घेऊ शकते. एखादे पत्र चारलोक एकाचवेळीं चार वेगवेगळया दिशांनी वाचू लागल्यास एकच अक्षर प्रत्येकास त्याच्या वाचण्याच्या दिशेनुसार (दिग्भेदानुसार) वेगवेगळे (अवस्थानभेदयुक्त) दिसते. लिपीमधील अवस्थानभेदाविषयी, तंत्रशास्त्रातील वर्णांच्या उपपत्तीनुसार **डॉ. भानुशङ्कर मेहता** "**भारतीय लिपियोंका तांत्रिक आधार**" या त्यांच्या दि. ३ जून १९७३ चें वाराणसीहून प्रकाशित होणाऱ्या "आज" या साप्ताहिकांतील लेखांत प्रस्तुत विषयाचे समर्थन करीत असता विस्ताराने विवरण केले आहे. छापण्याचे खिळे, फोटोंची निगेटिव्ह, चित्रकला हे या अवस्थान भेदा विषयी व्यावहारिक असें सार्वत्रिक परिचयाचें दृष्टान्त आहेत. एवढेच नव्हे तर आधुनिक विज्ञानातील "**रिलेटिव्हिटी थियरी**" मध्येही या अवस्थानभेदाचें वर्णन व उपपत्ति मिळते.

चित्रांच्या भागातील आकृति ५२, ७२, ७३, ७४, ७५, ७६, ७७, ७८, ७९, ९० पहा.

### मल्याळम् आणि तमिळ ग्रंथलिपि 'ह'

आ. ५२ चें कुंचन काढून टाकून तीन भाग करून आ. ७२ मध्ये लिहिले आहेत. आ. ७२ घड्याळाचें काटयाचें दिशेनें फिरवून भूमिसमांतर केल्यावर आ. ७३ होते. आ. ७३ मधील आडवी रेषा संक्षिप्त करून थोडी वर सरकावून दोन अर्धकुण्डले जोडून घेतल्यावर आ. ७४ हा "**मल्याळम्**" "ह" होतो. त्यामधील पहिले अर्धकुण्डल लहान व दुसरे मोठे असणें आवश्यक आहे, तामिळ लोकलिपीत "ह" नाही. "ह" चें काम 'क' वापरून केले जाते. उदा. महात्मा = मकात्मा तामिळ ग्रंथलिपीत 'ह' आहे. आ. ७५ मध्ये मल्याळम् "ह" लिहून त्याचें पुढें अधिक चिन्ह करून जोडावयाचा भाग दाखविला आहे. हा जोडावयाचा भाग आ. ५२ घड्याळाचे काटयाचे दिशेने फिरवून भूमिसमान्तर करून उजव्या कुशीवर वळवून होणारी आकृति आहे. या दोघांमध्ये समान असणारे कुण्डल एकशेष करण्याची प्रक्रिया टिंबांचे सहाय्यानें आ. ७६ मध्ये दाखविली आहे ती केल्यावर आ. ७७ होते. आ. ७७ मध्ये आ. ७८ येथे टिंबांनी दाखविलेला भाग वाढविल्यावर आ. ७९ हा "**तामिळ ग्रंथलिपि**" "ह" होतो.

### रहस्यमय बंगाली – अ

आता बंगाली लिपि मधील 'अ' पहा. मोठा रहस्यमय व गूढ आहे.

चित्रांच्या भागातील आकृति १८, २६, २३, २७ पहा.

या करिता आ. १८ चें बंगाली धर्तीने लेखन केल्यावर आ. २६ होते आणि आ. २३ बंगाली धर्तीने लिहिल्यावर आ. २७ होते.

चित्रांच्या भागातील आकृति २६, ३१, ३२ पहा.

बंगाली मधील 'अ' अशोक लिपीचे गटापासून तयार व्हावयाचा असल्यास त्यासाठी आ. ३६ मध्ये अधिक जोडावयाच्या रेषा आ. ३१ मध्ये टिंबांनी दाखविल्या आहेत. आ. ३२ हा त्यानुसार होणारा बंगाली 'अ' आ. २७ ला, आ. ३३ प्रमाणें वाढवून त्यानुसार होणारी आ. ३४ आहे. पुढे बंगाली "ह" चे विवरणावरून आ. १८ पासूनच आ. २६, ३१, ३२ प्रमाणें बंगाली 'अ' बनणें युक्तिसंगत आहे. हे बंगाली 'ह' कार विवरणांत स्पष्ट होईल. तो पर्यंत हे रहस्य राहील. याप्रमाणे बंगाली लिपीत केवळ अकार हकार एवढेच अशोक लिपिगटातून येतात. इतर सर्व अक्षरे प्रायः देवनागरी गटांतूनच येतात. एवढेच नव्हे तर अशोकलिपि हा देवनागरी लिपीचाच एकदेश आहे. असे पुढे स्वतंत्र प्रकरणात दाखविले आहे. 'अ' कार व 'ह' कार यांचे मुद्धां परस्पराश्लिष्ट बिंदूनें म्हणजे एकटचा आ. ३ चे. विभागापासून क्रमव्युत्क्रमानें बनणें हे तंत्रात सागितले असल्याचे आरंभीच नमूद केले आहे.

चित्रांच्या भागातील आकृति ६, ४७, ५, ५२ पहा.

### वर्णलिपिमालेचे शेवटचे अक्षर "ह"

आ. ६ पासून आ. ४७ हा अशोक लिपीचा 'ह' बनतो, आ. ५२ हा देवनागरी मौलिक 'ह' बनतो. असा 'ह' देवनागरीच्या मराठी मोडी लिपीत आजही आढळतो. आ. ४७ मधील डावीकडील उभी रेषा व उजवीकडील उभी रेषा वर्णोद्धारतंत्राच्या खालील वचनांवरून दिली जाते. **"उर्ध्वादाकुञ्चितामध्ये कुंडलीत्वं गतात्वधः । पुनरुर्ध्व गता सैव तासु ब्रह्मादय : क्रमात् ।। "**

अर्थ–बिन्दुस्फोटनांत वरून सुरवात करून मध्यभागी कुञ्चित होऊन खाली कुण्डलाकार असणारी रेषा पुनरपि वर नेल्यावर ( ह कार होतो) याप्रमाणें श्लोकाचे पूर्वार्धाचे अर्थावरून असे स्पष्ट होते की, आ. ५ अथवा आ. ६ प्रथम लिहावयाची असून तिचा अधोभाग ऊर्ध्वरेषेचे स्वरूपात वर वाढविण्यास श्लोकाचे उत्तरार्धाचा अर्थ सांगत आहे.

चित्रांच्या भागातील आकृति ४७, ४८, ४९, ५०, ५१ पहा.

### अशोक लिपि "ह"

आ. ४७ हा अशोकलिपी 'ह' आहे. आ ४८ ने आ. ५१ अखेर त्या अशोकलिपि 'ह' चे काही प्रकार दाखविले आहेत. हे सर्व आ. ४७ पासून घृष्टलेखनानें बनलेले आहेत. अशी अनेक रूपे अशोकाचे शिलालेखातून आढळतात.

चित्रांच्या भागातील आकृति ५२, ५३, ५४ (अ), ५४ (ब), ५४ (क), ५५, ५६ पहा.

### नागरी 'ह'

आ. ५ मध्ये वर्णोद्धारतंत्रवचनानुसार उभी रेघ दिली असतां आ. ५२ हा देवनागरी 'ह' होतो. अशा तऱ्हेचा 'ह' आजही देवनागरीच्या मराठी मोडी लिपीत लिहिला जातो. हाच मोडी 'ह' घडयाळाचे काटयांचे दिशेने फिरवून भूमिसमांतर करून उजव्या कुशीवर वळवून घेतलेल्या स्वरूपात तामिळ ग्रंथ लिपींत सुरक्षित आहे. त्याचा विचार पुढे आ. ७५ ते आ. ७९ मध्ये येईलच.

आ. ५२ मधील उजवीकडील उभ्या रेषेच्या काही भागाचा लोप करावयाचा आहे. तो भाग आ. ५३ मध्ये टिबांनी दाखविला आहे. असा लोप करून आकृतीमधील दोन भाग एकमेकास मिळवून लिहिल्यावर आ. ५४ ( अ ) हा आज सर्वसाधारण देवनागरी लिपींत लिहिला जाणारा 'ह' होतो.

### वर्णोद्धारतन्त्राची लाघवयुक्तता

प्राचीन शिलालेख वगैरेचे आधारे कांही आधुनिक लिपिसमालोचकांचे असें म्हणणें आहे की अशोकलिपि 'ह' काराचे घृष्टलेखन होत असतां त्यामध्यें कांही ऱ्हास कांही वृद्धि होऊन आज प्रचलित देवनागरी लिपींत लिहिला जाणारा 'ह' बनला आहे. जसें आ. ५१ घडयाळाचे काटयाचे दिशेने फिरवून उभी करून आ. ५४ (क), ५४ (ब), या प्रक्रियेनें नागरी 'ह' होतो. परंतु वर्णोद्धारतंत्रवचनानुसार तो कसा बनतो हे वर दाखविले आहे तें अधिक युक्तियुक्त व लाघवपूर्ण आहे.

तसेच जो ज्या मूळापासून 'अ' बनवितो तो त्याच मूळापासून 'ह' पूर्वोक्त नियमानुसार बनवूं शकत नाही. येथील लिपिविचारात हेच वैलक्षण्य आहे, तंत्रोक्त प्रमाणाचा व आधुनिकांचे विचार प्रणालीचा परामर्श पुढे घेतलाच आहे.

### काश्मीरी (शारदा)–गुजराती गुरुमुखी

आ. ५२ मधील उभी रेषा काढून टाकली कीं आ. ५५ होते. देवनागरीमध्यें आज देखील कोणीं कोणीं असा 'ह' लिहितात. आ. ५५ मधील आ. ५४ (ब) येथे टिंबांनी दाखविलेल्या भागाचा लोप होऊन आ. ५४ (क) हा "**काश्मीर**" 'ह' बनतो. आ. ५५ पासून आ. ५६ हा "**गुजराती**" 'ह' बनतो.

चित्रांच्या भागातील आकृति २५, ५७, ५८ पहा.

आ. ५२ मधील आ. ५७ येथे टिंबांनी दाखविलेल्या भागाचा लोप केला असतां आ. ५८ हा '**गुरुमुखी**' 'ह' बनतो.

चित्रांच्या भागातील आकृति ४७, ६१, ५२, ६२, ५०, ५९, ६०, ६१, ६२, ६३, ६४, ६५ पहा.

### बंगाली 'ह' प्रक्रिया

आ. ४७ चे एका प्रकारचे लेखन आ. ६१ मध्यें आणि आ. ५२ चें त्याच धर्तीवर केलेले लेखन आ. ६२ मध्यें दाखविले आहे. आ. ४७ हा अशोक लिपि 'ह' आहे. व आ. ५२ मौलिक देवनागरी 'ह' आहे. आ. ६१ च्या आ. ६० मध्ये टिंबांनी मध्यें दाखविलेल्या भागाचा लोप केला असता आ. ५९ हा बंगाली 'ह' होतो.

आ. ६२ च्या आ. ६३ मध्ये टिंबांनी दाखविलेल्या भागाचा लोप केला असता आ ६४चे होते. आ. ६४ उजव्या कुशीवर पलटून टाकली असता आ. ६५ '**बंगाली**' 'ह' होतो. याप्रमाणे अशोकलिपि 'ह' पासून व देवनागरी "ह" पासून बंगाली 'ह' बनणे दोन प्रकारांनी शक्य आहे देवनागरी पासून बनण्याचा दुसऱ्या प्रकारांत पहिल्यापेक्षा एक प्रक्रिया जास्त आहे. म्हणून बंगाली 'ह' अशोकलिपि 'ह' पासून अर्थात पहिल्या प्रकारानेच बनणें लाधवयुक्त व योग्य होय यावरून आ. ५ पासून बंगाली 'अ' बनणें युक्तिसंगत असल्याचें स्पष्ट होते: येथे मागे 'अ' काराचे विवेचनांत न उलगडलेल्या रहस्याचा उलगडा होतो.

मल्लयाळम आणि तामिळ ग्रन्थलिपि 'ह' च्या पूर्वी नमूद केलेल्या प्रक्रियेत मल्लयाळम् 'ह' आणि बिन्दुस्फोटनप्राप्त 'ह' यांच्या संयोगाने तामिळ ग्रन्थलिपि 'ह' सिद्ध केला आहे. यावर असा आक्षेप येणे शक्य आहे आहे की दोन 'ह' असल्याने "हह" असे द्विदार उच्चारण व्हावयास पाहिजे वास्तवात तसे होत नाही असा अनुभव आहे, म्हणूनच हा आक्षेप वृथा आहे. लिपिभेदासाठी एकाक्षर संयोगजन्य द्वित्व झाले तरी उच्चारण एकवारच होते हे इंग्लिश स्मॉल 'ई' व कॅपिटल 'ई' वरून दिसते. चित्रांच्या भागातील आकृति ८० पहा. त्या वरून इंग्लिश कॅपिटल 'ई' दोन स्मॉल 'ई' एकमेकांवर ठेवून बनत असल्याचे दिसते. तसेच येथे मल्लयाळम् आधी कीं तामिळ आधी हा विषय नाही, तसे कांही सुचवावयाचेही नाही म्हणून तसा निष्कर्ष प्रक्रियेवरून काढू नये

अथवा खालील प्रक्रियेनें तामिळ ग्रंथलिपि "ह" बनतो असें मानिले तरी चालेल.

### ग्रंथलिपि ह दुसरी प्रक्रिया

चित्रांच्या भागातील आकृति ५२, ५२ (अ), ५२ (ब), ७९ पहा.

आ. ५२ पूर्ववर्णित रितीनेच फिरवून घेऊन आ. ५२ (अ) मध्यें घेतली आहे. व सुरवातीस जोडावयाचा कुंडल भाग अधिक चिन्हानें दाखविला आहे. या प्रमाणें जोडून व आ. ५२ (ब) येथे टिंबांनी दाखविलेला रेषा भाग वाढविल्यावर आ. ७९ हा तामिळ ग्रंथलिपि 'ह' होतो. या प्रक्रियेत मल्लयाळम्चा संबंध नाही व दोनदा ह चे उच्चारणाचाही संबंध नाही अथवा तामिळ ग्रंथ लिपीनेंच आ. ७५ मधील दोन भाग स्वतः केले व त्यातील पहिला मल्ल्याळमने स्वीकारला असे म्हटले तरी हरकत नाही.

५२, ८१ (अ), ८१ (ब)

### उडिया ह

आ. ५२ मधील ऊर्ध्वरेषा वेगळी केल्यावर आणि दोन अर्धकुण्डलापैकी खालचे अर्धकुण्डल कोणयुक्त करून खालची रेषा वाढविल्यावर आ. ८१ (अ) हा 'उडिया' 'ह' होतो या लिपीत आ. ८१ (ब) मध्ये दाखविल्याप्रमाणें शिरोरेषेचे स्वरुपात टोपी काढणें आज प्रचारात आहे. इतर कांहीं लिपींतही अक्षरांचे डोक्यावर शिरोरेषा देतात ही रेषा वर्णोद्धारतंत्र सांगत नसून ती ऐच्छिक आहे. सौष्ठवार्थ स्वीकारली गेली आहे. मात्र पद्मपुराणांत तिचा उल्लेख आहे.

### तन्त्रोक्त स्वरूपाचे अनिर्वायत्व

ज्या ज्या लिपींचा तन्त्रशास्त्रांत सांगितलेल्या, विशिष्ट हेतुसिद्धयर्थ असणाऱ्या यंत्रलेखनांत उपयोग केला जातो. ह्या त्या लिपि तन्त्रोक्त अथवा तन्त्रोक्त स्वरूपमिश्रित वा अन्तर्निहित असणाऱ्याच असणें अनिवार्य आहे. अन्यथा त्यांचा तन्त्रात सांगितलेल्या यन्त्रलेखनात वापर मीमांसान्यायसम्मत होणार नाही. याकरिताच वर्णोद्धारतन्त्र वगैरेमध्ये लिपिरेखाविन्यास सांगितला आहे.

### मीमांसेचें यववराहाधिकरण

मीमांसेच्या यववराहाधिकरणामध्यें या विषयास आवश्यक व उपकारक असा न्याय सांगितला आहे तो असा – कोणत्याही शास्त्रीय विधानामध्ये एखादी वस्तु अंग म्हणून सांगितली असेल, तेथें ती वस्तु त्याच शास्त्रीत व्याख्या केलेली असल्यास, त्या व्याख्येनुरूपच असली पाहिजे. लोकव्यवहारांत प्रसिद्ध असलेली अन्य वस्तु चालणार नाही. याच संदर्भात जैमिनीनें पूर्व मीमांसेमध्यें **'शास्त्रस्था वा तन्निमित्तत्वात्'** या सूत्रानें केला आहे.

" **यवमयश्चरुर्भमति** " म्हणजे यवाचा चरु होतो (करा) असें विधिवाक्य म्हणजे करावयाची गोष्ट सांगणारे वाक्य आहे. येथे 'यव' या शद्वानें कोणती वस्तु घ्यावयाची ? अवैदिक लोकांत 'यव' म्हणून प्रसिद्ध असणारे 'कंगुनी' नांवाचे धान्य घेतां येईल का? असे प्रश्न उपस्थित होतात. याचे उत्तर व स्पष्टीकरण वाक्यशेष भागांत मिळते– " **यदान्या ओषधयो म्लायन्ते । अथैते मोदमाना इवोत्तिष्ठन्ति** " । असे वाक्य विधिनन्तर वेदात आले आहे त्याचा अर्थ – ' हिवाळचामध्यें जेंव्हा इतर सर्व वनस्पतींचीं पानें झडून जाऊन त्या मरगळतात तेव्हा हे जोमदारपणें फुललेले असते. ' यावरून याप्रमाणें लक्षण असणारें " दीर्घशूक " अथवा 'जव' हे धान्य चरु करण्यांकरितां वरील विधींत घ्यायचे आहे. अवैदिक लोकांत 'यव' म्हणून प्रसिद्ध असणारे ' कंगुनीं ' हे धान्य चालणार नाही.

### भारतीय लिपीचें मूळ 'तन्त्रोक्त'

यावरूनच घेतलेला नियम कायद्यांतही प्रचलित आहे. एखाद्या कायद्यामध्यें व्याख्या केलेल्या एकाद्या शद्वाचा अर्थ त्या कायद्याचा विचार करीत असताना तोच घ्यावा लागतो. इतर कोणताही घेऊन चालणार नाहीं. (चालत नाही) हाच साधारण नियम ' आयुर्वेद ' विज्ञान वगैरेत सर्वत्र आहे. या नियमानुसार न चालल्यास त्या त्या शद्वानुसार अभीष्ट असणारे कार्य होणार नाहीं. म्हणूनच तंत्रोक्त लिपिरेषा प्रचलित भारतीय सर्व लिपींत गर्भित असल्यानें, त्या त्या लिपींचा यंन्त्रलेखनात वापर करून सफलता मिळते. त्याप्रमाणे मीमांसान्यायसम्मत न केल्यास सफलता कशी मिळेल ? ही गोष्ट इच्छा नसली तरी स्वीकारणें भागच पडते कारण कोणताही भारतीय त्याचे सर्वच पूर्वज तन्त्र किंवा मीमांसान्याय न जाणता त्यांचा लिपिव्यवहार अज्ञानीपणें किंवा स्वैर कल्पनेनें तान्त्रिक कार्यात करीत होते असे म्हणणार नाही या साठी किमान पक्षी संपूर्ण भारतात तरी प्रचलित लिपींचे मूळ तन्त्रोक्त असणें अनिवार्य आहे.

रेषा कमी जास्त केल्यानें मूळ स्वरूप बदलूं शकत नाही. कारण चित्रकला, शिल्पकला वगैरेमध्ये असाच नियम आहे, या अनुरोधानें शेकडो कमी प्रचारात असलेल्या भारतीय लिपीमधील मौलिक एकरूपता देखील विद्वान जाणू शकतील. प्रस्तुत ग्रंथात प्रमुख भारतीय लिपी संबंधी दिग्दर्शन मात्र केले आहे.

आर्थर ॲव्हलॉन अथवा सर जॉन वुड्रॉफ सारख्या पाश्चात्य विद्वानासही तान्त्रिक प्रयोगांचा प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळे तन्त्र शास्त्राचे मर्म आणि वास्तविकता मान्य होती आगमानुसंधानसमिती कलकत्ता द्वारा त्याने प्रकाशित केलेल्या तांत्रिक टेक्स्ट्स् सीरीजमधील तन्त्र ग्रंथाच्या प्रस्तावना व संपादन सर्व जाणतातच तन्त्रशास्त्राचे महान् आचार्य श्रीमद् अभिनवगुप्ताचार्य यांनी त्यांच्या तन्त्रालोक ग्रंथाच्या तिसऱ्या आह्निका वर्णाचे उत्पत्तीचे संदर्भात ऐतरेयारण्यकाचे विस्तृत प्रमाण देऊन तन्त्राचे वेदमूलकत्व विस्तारपूर्वक प्रतिपादिलें आहे. प्रसंगोपात्त लिपिचर्याक्रमाचाही उल्लेख केला आहे. परशुरामकल्पसूत्र टीकेतही तन्त्रप्रामाण्याचा विस्तृत विचार आहे. या प्रमाणे शाङ्खायण, तैत्तिरीयाआ-रण्यक, सौंदर्य लहरी लक्ष्मीधर व्याख्या वगैरेतही तन्त्रसंबंधी विषय प्रतिपादित आहे.

प्रस्तुत ग्रंथात तन्त्रशास्त्र विवेचन करावयाचे नसून तन्त्रोक्त लिपीचा विचार करावयाचा असल्याने त्याचा संक्षेपानेच परामर्श घेतला आहे. तन्त्रशास्त्र ग्रंथाचा विचार सर्वतन्त्रस्वतंत्र **श्रीमद्‌भास्कररायांनी 'नित्याषोडशिकार्णव–सेतुबंध टीकेत केला आहे.** ती मध्ये तन्त्रशास्त्राचे मूळ ग्रंथ शिवानें पार्वतीस सर्व प्रथम उपदेशिले व तदुपरान्त ते भूलोकी प्रचारांत आल्याचे सांगितले आहे.

### पिण्डाण्ड व ब्रह्माण्ड

सर्व प्राणिमात्रांच्या सूक्ष्म शरीराचे मुळाशी **'षट्चक्रे'** आहेत व सर्व सृष्टीचे मुळाशी **'श्रीचक्र'** आहे या चक्रात आकाशात चमकणाऱ्या विजेप्रमाणे अपंचीकृत तेजोरेषांनी बनवलेली बीजाक्षरे लिपिरूपात अंकित आहेत हे भास्कररायांनी त्यांच्या नित्यषोडशिकार्णवावरील सेतुबंध टीकेत सिद्ध केलेच आहे. हे नैसर्गिक रूप तन्त्रोक्त लिपिरेखाविन्यासाचा मूलाधार आहे. यास प्रत्यक्ष करण्याकरिता शास्त्राभ्यास, योगाभ्यास वगैरेचे अवलंबनाने सूक्ष्मता प्राप्त करून घेतलेल्या मनाची आवश्यकता असल्याचे शास्त्रग्रंथातील प्रतिपादन भास्कररायांनी नमूद केले आहे. अर्थात् योगसिद्धांस हें सर्व प्रत्यक्ष दिसू शकते. शरीरातील स्वतंत्र व परतंत्र स्नायूमधील रेषा, सामुद्रिक शास्त्रातील शंख चक्रादि रेषा यांचे प्रमाणेंच या चक्रस्थ ध्वनी व अर्थ विशेषांविषयी संकेत असलेल्या स्वाभाविक अपंचीकृत तेजोरेषा आहेत हे सूक्ष्म शरीरातील प्राकृतिक सत्य आहे.

पहा सर्व सूक्ष्म विचार व सिद्धांत नजरेसमोर आणल्यावर भारतीय लिपिलेखन हें मनःकल्पित आहे. अथवा परदेशांतून आलें असून रस्पर असंबद्ध स्वरूपाचे आहे वगैरे विचार पूर्णतता निराधार व भ्रांतिमूलक असल्याचे स्पष्टपणें समजून येतें.

**प्रथमलिपि ' ईश्वरोपदिष्ट**

' **न्यायकुसुमांजलि** मध्यें **उदयनाचार्यांनी** प्रथमलिपि ईश्वरोपादिष्टच असल्याचे प्रबळ तर्कांनी सिद्ध केले आहे. **नित्याषोडशिकार्णवसेतु टीकेंत** भास्कररायांनी यवनानी लिपी (ग्रीक लिपि) यांनाही तंत्रावरून जाणता येणाऱ्या लिपींमध्येच समाविष्ट केले आहे. "**यवनाल्लिप्याम्**" कात्यायन वर्तिकांत ग्रीक लिपीस '**यवनानी**' या संस्कृत नावानेच उल्लेखिले आहे. याप्रमाणे भारताबाहेरील लिपींविषयी असले तरी प्रथमतः प्रस्तुत ग्रंथात प्रमुख भारतीय लिपींचाच म्हणजे काश्मीरी, गुरुमुखी, देवनागरी संस्कृत (हिन्दी व मराठी) बंगाली, उडिया, तेलगु, तामिळ, (लोकलिपि व ग्रंथलिपि), मल्याळम्, कन्नड व गुजराती या प्रचलितांचाच विचार करावयाचा आहे. अप्रचलितांतील अशोक लिपींचा विचार करावयाचा आहे.

याप्रमाणें थोडक्यात तन्त्रांमध्ये असणारे प्रमुख भारतीय लिपींचे मौलिक एकरूप दाखविले आहे. बऱ्याच काळापासून विसरलेल्या प्राचीन सिद्धांताचे येथें स्मरण करून दिले आहे. याप्रमाणें इतरही अक्षरांचे विवरण क्रमाने पुढील प्रकरणांत येणारच आहे.

---

प्रकरण दुसरे–

# बिन्दुस्फोटन व चन्द्रकोरी

प्रथम प्रकरणांत बिन्दुस्फोटन म्हणजे काय हें सांगितलें आहे व प्रमाणादाखल महामन्त्रतत्त्वप्रकाशिनीचें वचन दिलें आहे. आधुनिक लिपिसमालोचकांपैकीं **श्री. ए. बी. वालावलकर** हे तन्त्रोक्त प्रतिपादनाचें बरेंच जवळ गेले आहेत व वेगळ्या शब्दांत त्यांनी कल्पना त्यांनी मांडली आहे. तिचा या प्रकरणांत थोडक्यांत परामर्श घेतला आहे.

**' टायपोग्राफी ऑफ देवनागरी ' व्हॉल्यूम I** या **श्री. बी. एस. नाईक** यांच्या ग्रंथांत **' ओरिजिन ऑफ ब्राह्मी स्क्रिप्ट '** या प्रकरणांत श्री. वालावलकर यांचें मताचा विस्तृत परामर्श घेतला आहे. त्यानुसार वालावलकर यांचें मत खालीलप्रमाणें आहे.

" माहेश्वरी सूत्रे ब्राह्मी लिपी सांगतात, त्यांत चन्द्रकोरींच्या क्रमानें वर्णांचा निर्देश आहे. कांहीं अक्षरांत एक चन्द्रकोर आढळते, कांहींत दोन तर कांहींत तीन चन्द्रकोरी आढळतात. या चन्द्रकोरींचा उच्चारण—वैशिष्ट्यांशीं संबंध आहे. ख्रिस्तपूर्व एक हजार वर्षे भारतीय लिपी पूर्णत्वास पोंचली असावी. चन्द्रकोरींचें या चिन्हसंकेतांवरून ब्राह्मी लिपी बनली असावी.

श्री. वालावलकरांनीं त्याकरिता देवनागरी लिपींतील अक्षरे घेऊन त्यांचेमधील आढळणाऱ्या चन्द्रकोरींची संख्या व त्यांचे संभाव्य कल्पित रेखाटन दाखविणारा तक्ता तयार केला आहे, तो खालीलप्रमाणें—

**अक्षरांतील चन्द्रकोरींची संख्या**

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | इ | उ | ऋ | ऌ | ए | ओ | क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ |
| २ | ३ | १ | ४ | ५ | ३ | ३ | १ | २ | २ | ३ | १+० | १ | २ | २ | ३ | १+० |
| ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | न | प | फ | ब | भ | म | | |
| १ | २ | २ | ३ | १+० | १ | २ | २ | ३ | १+० | १ | २ | २ | २ | १+० | | |
| य | र | ल | व | श | ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ | | | | | | |
| २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | ३ | ३+० | | | | | | |

श्री. वालावलकरांचा विचार अत्यंत प्रशंसनीय आहे, कारण त्यांची दृष्टि चन्द्रकोरींसारख्या रेषांपर्यंत पोंचून तें वस्तुस्थितीच्या फार जवळ पोंचलें आहेत. परंतु माहेश्वर सूत्रांपासून ब्राह्मी हा त्यांचा निर्देश युक्तिसंगत वाटत नाहीं, कारण वैयाकरणांनीं कोंठेही अशी गोष्ट माहेश्वर सूत्रांबाबत सांगितलेली आढळत नाहीं. माहेश्वर सूत्र प्रत्याहार निर्माणासाठीं उपयुक्त आहे. ब्रह्मसृष्ट वर्णलिपिमालेचा 'अ' पासून 'ह' पर्यंत असणारा क्रमच वैयाकरणांना मान्य आहे. वर्णलिपिमालेंतील चन्द्रकोरी तन्त्रोक्त बिन्दुस्फोटनापासून वर्ण उत्पन्न होत असल्यामुळे तन्त्रापासून प्राप्त आहेत. बिन्दुस्फोटन चार चन्द्रकोरींचें बनलेले आहे. यापैकीं एक, दोन, तीन वा सर्व चन्द्रकोरींचा वापर वर्णोद्धारतन्त्रोक्त रीतीनें करून अकारापासून हकारापर्यंत सर्व वर्ण बनतात. याचा पडताळा देवनागरी लिपीविषयीं जेवढा मिळतो तेंवढा ब्राह्मीविषयी ( = अशोकलिपीविषयीं ) मिळत नाहीं. वर्णोद्धारतन्त्रांत सांगितल्याप्रमाणें चन्द्रकोरींची संख्या प्राय: खालीलप्रमाणें––

**वर्णोद्धार तंत्रानुसार अक्षरांतील बिन्दुस्फोटन चन्द्रकोरींची संख्या**

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | इ | उ | ए | ओ | औ | क | ख | ग | घ | ङ |
| २ | २ | ३ | ३ | ४ | २ | २ | ४ | ४ | ४ | ४ |
| च | छ | ज | झ | ञ | ट | ठ | ड | ढ | ण | |
| ३ | ३❋ | ४ | ३ | ४ | १□ | ३ | ३ | ३ | २ | |
| त | थ | द | ध | न | प | फ | ब | भ | म | |
| ४ | ४ | ३ | ४ | ३ | १ | २ | ३ | ४ | ४ | |
| य | र | ल | व | श | ष | स | ह | | | |
| ३ | ४ | २ | ३ | ४ | १ | ४ | २ | | | |

गजाकार ( ॐ )
अथवा ४
❋ अथवा ४
□ अथवा ४

वर्णोद्धारतन्त्राचें श्लोक व त्यांचा देवनागरीलिपीशीं समन्वय तृतीय व चतुर्थ प्रकरणांत विस्तारानें येणारच आहे म्हणून येथें श्लोक उद्धृत करीत नाहीं. (उक्तरेखाटन चित्रांच्या विभागात पहावें.)

'बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भवः ' या महामन्त्रतत्त्वप्रकाशिनीचें वचनानुसार सर्व वर्ण वर्णोद्धारतंत्राचें आधारें बनतात. ही प्रक्रिया चित्रांच्या विभागात आकृत्यांनीं दाखविली आहे. तिचें विशेष विवरण पुढें येईलच. वरील तक्त्यांत बहुतेक स्थळी मात्रा रेषा दोन चन्द्रकोरींची बनलेली समजावी. अशोकलिपींतील ( ब्राह्मींतील ) कांहीं अक्षरांशी याचा एकदेश दिसतो म्हणून बालावलकर यांनी देवनागरी उदाहरणांस घेतली असावी.

" All the short bar letters in the Devnagari like ट, ठ, ड, ढ, द etc still retain the crescents. The inherent अ takes the form of the small bar joining the crescent to the head like vertical joint to the head like line has developed into a full vertical bar (kana) on the right in the other letters like च, त, प. " (Shri. A. B. Walawalkar as quoted by Late Shri. B. S. Naik in " Typography Devnagari " of Vol. I Chapter 3 Page 97 )

हें श्री. वालावलकर यांचें म्हणणे येथें दिसत आहे. त्यांचें प्रतिपादन मनःकल्पित असून विकासवाद स्वीकारून केलेले आहे. आम्ही देवनागरीविषयक आमच्या प्रतिपादनास तंत्राचें प्रमाण दिले आहे. पुढे सर्व भारतीय लिपींमध्ये याची संगति कशी आहे तें विस्तारानें सांगितलेंच आहे.

वरील त्यांच्या कल्पनेनुसार ख्रिस्तपूर्व एक हजार वर्षे श्री. वालावलकर भारतीय लिपि पूर्णत्वास गेल्याचें मानतात. जर त्यांनीं तन्त्रापर्यंत मजल मारली असती तर तें चक्रसृष्टीपर्यंत पोंचून आमच्याप्रमाणेंच त्यांनीं सृष्ट्यारंभापासून मूळ लिपीची उत्पत्ति व तिचें ब्रह्मसृष्टत्व सांगितलें असतें. कसेंही असलें तरी अन्य आधुनिक लिपिसमालोचकांपेक्षां त्यांची दृष्टि सूक्ष्म असून तें चन्द्रकोरींपर्यंत पोचल्यानें सर्वतया धन्यवादास पात्र आहेत. त्यांचेमुळें आधुनिक लिपिसमालोचकांसमोर ' बिन्दुस्फोटनाचा ' सिद्धांत मांडून प्रमुख भारतीय लिपींचें मौलिक एकरूपत्व दाखविण्यास आम्हाला अवसर मिळत आहे. त्यायोगे तन्त्रोक्त लिपिरेखाविन्यास आधुनिक समजून घेतील व पाश्चात्यांचें मताचे परीक्षणाखेरीज अनुकरण करण्यापासून यथासंभव दूर होतील अशी आम्ही आशा करितो.

---

॥ कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥

उपोद्घातः

# वेदे देवनागरी लिपिः

**अणुर्बृहत् कृशः स्थूलो यो यो भावः प्रसिध्यति। सर्वोऽप्युभयसंयुक्तः प्रकृत्या पुरुषेण च ॥**

(भा. स्क. ११–२४–१६)

इति भगवान् श्रीकृष्णः उद्धवं प्रत्युपदिदेश। ततश्च जड चेतनतत्त्वात्मकं विश्वमिति प्रमीयते। दृश्यतेच। मूलभूतं चेतनतत्त्वं ब्रह्म "शिवंशान्तमद्वैतमित्यादीनामभिर्व्यवह्रियते। मूलतो जडतत्त्वं "अव्ययमव्याकृतं शक्ति" रित्यादिनामभिः। वेदतन्त्रपुराणादिषु प्रमिणुमो यदनयोस्तत्त्वयोः शिवशक्त्योरेकीकृत्य लेखव्यवहारे एको बिन्दुःसङ्केतः। अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमिति चतुर्विधपरिमाणराहित्य व्यवहारस्य ब्रह्म-बिन्द्वोः समानत्वम्। तयोरेवांशतः पृथग्भूतयोः सङ्केतः बिन्दुद्वयं विसर्ग इति। तादृश विसर्गबिन्द्वोः स्थूलशून्याकारौ भूत्वा परस्पराश्लिष्टयोः बीजाङ्कुरन्यायेन लम्बवत्स्फुटितयोः स्वरूपं बिन्दुस्फोटनमिति। तत्र बिन्दुस्फोटनरेखायां वर्णोद्धारतन्त्रोक्तरेखाविन्यासे कृते अकारादि हकारान्त वर्ण-लिपि-माला मौलिकोत्पत्त्या आगतेति वेदे प्रमीयत इति। अत्र सङ्क्षेपेण प्रमाणानां सङ्ग्रहो यथा–

### प्रमाणसङ्ग्रहः

१) "अः इति ब्रह्म। तत्रागतमहमिति" (ऐतरेयारण्यक २–३–८).

२) उच्छूनकाले बिन्द्वात्मा तस्मादक्षरसम्भवः। बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भवः ॥ (महामन्त्रतत्त्वप्रकाशिनी नन्दिकेश्वरकृत काशिकाटीकोध्दृता).

३) अहकारौ शिवशक्ती शून्याकारौ परस्पराश्लिष्टौ। (वरिवस्यारहस्ये अ. २–६९ विविधतन्त्रार्थसङ्ग्रह ः।)

४) वर्णोद्धारतन्त्रम्। शब्दकल्पद्रुमादुध्दृतम्) इति।

अर्थः :– ब्रह्मशक्त्या युक्तः शिवः कामेश्वर बिन्दुनाम्ना लेखव्यवहारे यस्य सङ्केतः। १) समष्टिबिन्दुरेकः। २) "अः इति" स विसर्गो भवतीत्युच्यते। विश्वसिसृक्षावशतः स शिवशक्ति बिन्द्वात्मा स्वांशसङ्केताभ्यां बिन्दुभ्यां विसर्गरूपं धत्त इत्यर्थः। तत्र विसर्गरूपे ३) आगतमहमिति अकारादि–हकारान्त–वर्ण–लिपि–माला–स्वरूपमिति वाक्यार्थः। इत्येतावत् वेदे वर्णलिपिसूत्रमिदम्। वेदे संहितायां नासदीयसूक्तेऽपि काम विसृष्टिपदैरयमर्थः दर्शितः।

### उच्छूनकाले बिन्द्वात्मा

अथ तत्र कथमागतमिति प्रश्ने प्रक्रियामाह–उच्छूनेति। बिन्द्वात्मा विसर्गः उच्छूनकाले स्थूलताकाले बिन्दुस्फोटनरूपे पर्यवस्यति। तस्माद् बिन्दुस्फोटनमात्रेण अक्षरसम्भवः वर्णानांच समुद्भवः। च कारेण शब्द–लिपिरूपयोः अक्षर–वर्णयोः समुच्चयः। यद्यपि अत्र वेदवाक्ये शब्दमयी, अर्थमयी, चक्रमयी, देहमयीति सर्वब्रह्माण्डसृष्टिरुक्ता तथापि प्रकृते निबन्धे वर्णलिपि–विषयस्यैव प्रस्तुतत्त्वात् स एव विशेषतः परामृश्यते। विस्तरस्तु – **विसर्गशक्तिविश्वस्य कारणं च निरूपिता। ऐतरेयारण्यवेदान्ते परमेशेन विस्तरात् ॥**

इति च तन्त्रालोके– ( आ– ३ श्लो– २२६) इत्यादौ द्रष्टव्यः।

### स्थूलशून्याकारौ परस्पराश्लिष्टौ

तत्र विसर्गः बिन्दुस्फोटनरूपः कथं भवतीति प्रश्ने (३) विविधतन्त्रसङ्गृहीतार्थमुत्तरम्। अहकारावित्यादि। विसर्गबिन्दू अंशतः शिवशक्ती उच्छूनकाले स्थूलशून्याकारौ परस्पराश्लिष्टौ भूत्वा बीजाङ्कुरन्यायेन स्फुटतः। तत्र लम्बवत्, स्फुटिते अर्ध्दः अकारः अपरोऽर्ध्दः हकारः इत्यकार हकारौ भवतः इति। अहमित्यत्र अश्च हश्च तयोः समाहारः अहमिति प्रत्याहारन्यायेन सर्व-वर्णलिपिपरो द्वन्द्वः। अहकारा–वित्यत्रापि सोऽर्थोगर्भितः। एवमयं समुदितार्थः। (१), (२), (३) वचनेभ्यः सुव्यक्तः।

### शब्दकल्पद्रुमे वर्णोद्धारतन्त्रम्

अथ तत्रापि सर्ववर्णलिपिस्वरूपम् कथमागतमिति न सुव्यक्तमिति चेत् (४) वर्णोद्धारतन्त्रमिति प्रमाणमुक्तम्। बिन्दुस्फोटने तत्रोक्तरेखाविन्यासो लिपिरेखाभिव्यक्तये इतिकर्तव्यतेति। अत एव शब्द-कल्पद्रुमे प्रत्यक्षरमुक्तम् "अस्य च लेखनप्रकारो यथा वर्णोद्धारतन्त्रे इति। एवं च तत्रागतमिति श्रुतसूत्रे तत्र बिन्दुस्फोटनस्वरूपे विसर्गे बिन्द्वात्मनि अहमित्यस्यागतये वर्णोद्धारतन्त्रोक्त रेखाविन्यास

इतिकर्तव्यतेत्यर्थः । ततश्च अर्थात् सिध्यति यत् वर्णोद्धारतन्त्रवचनेषु सर्वत्र तत्रेति (बिन्दुस्फोटने) इति सम्बध्यत इति बोध्यम् । इति । एवंच बिन्दुस्फोटने तत्तद्वर्णलिपिस्वरूपमागतमिति फलितम् । अत एवाग्रे कानिचिद् वचनानि "बिन्दुस्फोटने" इति पदसाकाङ्क्षाण्येव शिवेन प्रोक्तानीति सङ्गच्छते । तत्र विना तत्पदस्यान्वयं शिववाक्यात् निराकाङ्क्षबोधो नैव भवतीति अग्रेस्फुटीभवति ।

**ब्राह्मी एव देवनागरी**

एवमुत्पन्ना प्रथमलिपि "धात्राक्षराणि सृष्टानीत्यादिस्मृतिभिः बृहस्पति–नारद–शुक्रादिभिः – ब्रह्मणः आगता, सम्भूता तेन सृष्टेति वा ब्राह्मीति नाम्ना, तथा "देवानांपूरयोध्येति" "संहार्यनगरंतव" इत्यादि श्रुतिषुश्रुते श्रीचक्रे - देवनगरे भवा इति व्युत्पन्न" देवनागरीति नाम्ना शिवभागवतः पितृ–पैतामहमित्यादिवदुत्तरपदमात्रबुद्ध्या विज्ञायते । श्रीभास्कररायोल्लिखिता साम्प्रदायिक नागरी नाम (अशोकलिपिः) तथा पुराणलेखने प्रस्ताविता शिवपुराणोक्ता नन्दिनागरी नाम च लिपिः इत्यादयः अस्या एव घृष्टलेखनेन प्रसूयन्ते । शब्दकल्पद्रुमे तु स्ववाक्ये वङ्गाक्षरे यथेति कथनमवयुत्यानुवादमात्रम् । नेतरवारकम् इति वक्ष्यते ।

अकारादि हकारान्तैवेयं वर्णमाला क्ष, ज्ञ, त्र इत्यादीनां संयुक्ताक्षरत्वात् इत्यादि

| 1 | 2 | 3 |
|---|---|---|
| समष्टिबिन्दुः | व्यष्टिबिन्दु | बिन्दुस्फोटनम् |
| शबलब्रह्मरूपः | अःइतिविसर्गः | तत्रागतमहमिति |
| कामाख्यबिन्दुः | (शिवशक्ती) | हार्द्धकला |
| | कामकला | |
| १ | २ | ३ |
| शून्याकारी | परस्पराश्लिष्टौ | अहकारी |

चित्राणि चित्रभागे द्रष्टव्यानि ।

# देवनागरी लिपि आणि वर्णोद्धारतन्त्र

या प्रकरणामध्ये **राजा राधाकान्त देव** संपादित **शब्दकल्पद्रुम** या कोशग्रन्थांत उद्धृत केलेल्या **वर्णोद्धार** तन्त्राचे वचनांवरून देवनागरी लिपि कशी बनते याचा आक्षेपपरिहारपूर्वक विचार केला आहे. यामध्ये बराचसा भाग शास्त्रार्थ स्वरूपाचा असून तो संस्कृतमध्ये प्रथम देऊन लगेच त्यावरील संक्षिप्त मराठी विवरण परिचायक म्हणून दिले आहे. जटिल विषय फारसा न वाढवतां मराठी विवरणांत संक्षेपानें यथाशक्य सुबोध करून मांडला आहे. अर्थात् प्रामाण्य या दृष्टीनें मूळ संस्कृत प्रतिपादन अत्यंत महत्त्वाचें आहे, हें वाचकांनीं ध्यानीं ध्यावें.

**बिन्दु स्फोटन विवरणम्**

शब्द कल्पद्रुमोद्धृतानां वर्णोद्धारतन्त्रवचनानां देवनागरीलिपि रेखाविन्यासे समन्वय प्रदर्शनम् ।

आंग्लांकानि महाराष्ट्रभाषांकानि चित्रविभागें द्रष्टव्यानि । ( सर्व वर्णलिपिमूलम् )

1 2 3

तत्रादौ सर्व वर्णलिपिसाधारणं वेद–तन्त्रोक्तं मूलं यथा १, २, ३ इति । अत्र 1 शिवशक्त्योरेकीभूतः (शबलब्रह्मरूपः) समष्टिबिन्दुः, 2 तयोरेवसिसृक्षया अंशतः पृथग्भूतयोः व्यष्टिबिन्दुद्वयम् (विसर्गरूपम्) 3 तयोरेव बिन्द्वोः स्थूलशून्याकारेण भूत्वा परस्पराश्लिष्टयोः सतोः बिन्दुस्फोटनम् (अहंरूपम्) तत्र प्रक्रिया –

(१) (२) (३)

यथा (१) एवं स्थूलशून्याकारेण भूत्वा (२) इत्थं परस्पराश्लिष्टौ द्वौ व्यष्टिबिन्दू ययोः (३) अनेन प्रकारेण लम्बरेखास्थाने स्फोटने सम्पन्नं ३ बिन्दुस्फोटनम् । एतावन्मूलं सर्ववर्णानामिति **वरिवस्यारहस्ये "अ ह कारौ शिवशक्ती शून्याकारौ परस्पराश्लिष्टौ"** इति; "एवंच (1) **कामाख्योबिन्दुः** (2) **विसर्गो** (3) **हार्द्धकला** चेति त्र्यवयवक एकः पदार्थोऽणादि प्रत्याहारवत् कामकला इत्युच्यते । इदमेव च समस्त सृष्टिबीजम् । अत एवाकारहकारयोर्मध्ये सर्ववर्णपाठः ।" इति च । द्वितीयांशे ६९ श्लोकार्धे तत्पूर्वटीकासंदर्भेच "एवं अकार हकारैकरूपा कामकला ......... **तयोर्मध्ये सूक्ष्मरूपेणान्येषां वर्णानामर्थसृष्टेश्चावस्थानं** सिध्यति " इति च तत्रैव संदर्भे सर्वतन्त्रेभ्यो निष्कृष्य निरूपितम् एवमेव श्रीमदभिनवगुप्तपादाचार्य विरचिते तन्त्रालोकेऽपि एते सर्वे विषयाः विस्तरतो द्रष्टव्याः । तदीय जयरथटीकायां **"अकारश्च हकारश्च द्वावेतौ युगपत्स्थितौ । विभक्तिर्नानयोरस्ति मारुताम्बरयोरिव ॥** ...... अनयोः परस्परौन्मुख्यात्मकं यामलं रूपं स्यात्तदा विश्वसर्गः" तन्त्रालोके तृतीयान्हिके श्लोक ६७ इत्यादिश्च । वैदिकप्रमाणानि च तत्रागतानि भूरिशः । ततः प्रकृते संगृहीतार्थमिदं वेदवाक्यम् अःइति **ब्रह्म तत्रागतमहमिति**" (ऐतरेयारण्यक अ. ३ ख. ८) 1 ब्रह्म, 2 अः इति तत्रागतं 3 अहमिति । अर्थात 1 समष्टि बिन्दुःकामाख्यः शबलब्रह्म । सिसृक्षया स्वस्वांशाभ्यां व्यष्टिबिन्दुभ्यां विसर्गः अः इति शिवशक्ती भवतः । तत्रागतमकारहकारैकरूपं हार्द्धकला बिन्दुस्फोटनं 3 दर्शितरीत्या भवतीत्यर्थ–संक्षेपः । अत्र स्थूल सूक्ष्म सूक्ष्मतर सूक्ष्मतमादि भेदानां निराकारतुरीयस्य च विस्तरस्तत्र द्रष्टव्यः नेह प्रपञ्च्यते । अत्र तु 1, 2, 3 इति त्रिषु मध्ये पूर्व पूर्वरूपे परपररूपस्याव्यक्ता स्थितिः । परपररूपे पूर्वपूर्वरूपस्यान्तर्निहितत्वं चेति । बीजे वृक्षस्य, वृक्षस्येव च ध्रुवा स्थितिः

प्रतिपादिता द्रष्टव्या । तान्त्रिकाणां सत्कार्यवादित्वात् । "उच्छूनकाले बिन्द्वात्मा तस्मादक्षरसम्भवः बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भवः ।" इति नन्दिकेश्वर कृतकाशिकायाटीकायामुपमन्युकृतटीकायामुद्धृता महामन्त्रतत्त्वप्रकाशिनी च वचनानुसारेण कण्ठत एव बिन्दुस्फोटने सर्ववर्णसमुद्भवमाह । तथाच सर्वत्र वक्ष्यमाणलक्षणवाक्येषु ' बिन्दुस्फोटने ' इत्यादिर्बोध्यः ।

### प्रकारान्तरेण लिपिसमुद्भवपरत्वम्

अत्र प्रकारान्तरेणापि लिपिसमुद्भवपरत्वम् श्रोत्रग्राह्यत्वेन शब्दरूपाणां वर्णानां यथा बिन्दुस्फोटनपदार्थं समुद्भव इति विज्ञायते तथैव बिन्दुस्फोटनस्याङ्कितरेखाविन्यासेन. 3 इत्यत्र दर्शितेन वर्णानां यथावर्णोद्धारतन्त्रमङ्कितलिपिरेखाविन्यासानां समुद्भव इत्यपि सिध्यति । यतो हि यथा घट इत्यर्थः, शब्दः, ज्ञानं, लेखः इत्यादि विदग्धव्यवहारो लोके, तथैव 'अ' इति वर्णः लेखः, लिपिरित्यादिरपि व्यवहारोऽभेदमध्यवस्य प्रवर्तत एव विदग्धानाम् । अत बिन्दुस्फोटनेति तदङ्कितरेखाविन्यासः । वर्णेति च लिपिरेखाविन्यास इति च तत्र वचने एवं न्यायादपि गृह्येते । अतस्तथा 3 बिन्दुस्फोटनरेखातः लिपिरेखासमुद्भवोनाम बिन्दुस्फोटनरेखाविन्यासगतानां वृत्तानां मध्ये एकस्य द्वयोस्त्रयाणां चतुर्णामप्येव वा यथासम्भवमुपयोगेन. वर्णोद्धारतन्त्रोक्तलिपिरेखाविन्यासनिष्पत्तिरेव । एवं सति मूले निष्पन्नं रूपं, मूलेभवं मौलिकमिति व्युत्पत्त्या लिपिरूपं मौलिकं भवति । दृश्यते प्रदर्श्यते चास्यार्थस्य यथा समन्वयस्तथा देवनागरलिपिषु । तथाहि–

# मराठी सारांश

### समष्टिबिन्दु – व्यष्टिबिन्दू – बिन्दुस्फोटन

1, 2, 3 या आकृति (आकृत्या व चित्रांचा भाग पहा) सर्व वर्णांचे तन्त्रात सांगितलेले मूळ स्वरूप आहे. 1 या आकृतींत असणारा बिन्दु हा शिव आणि शक्तीचे एकवटलेले स्वरूप दाखविणारा बिन्दु आहे. यालाच **समष्टिबिन्दु** असे म्हणतात. 2 या आकृतीत शिव आणि शक्ति या दोघांना सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाल्यावर ( = सिसृक्षेने ) वेगवेगळे झालेले त्यांचे दोन अंशबिन्दु आहेत. या दोघांना **व्यष्टि बिन्दू** असे म्हणतात. 3 या आकृती मध्ये 2 मधील बिन्दू स्थूलशून्याकार होऊन परस्परांस चिकटून असतां त्यांचे उभे ( = लम्बवत् ) विभाजन ( स्फोटन ) झाल्यावर होणारे विभाजित रूप दाखविले आहे. यालाच **बिन्दुस्फोटन** असे शास्त्रीय परिभाषेत म्हणतात. (स्पष्टीकरण प्रकरण १ मध्ये पहावें )

### सर्व तन्त्रांचा निष्कर्ष

चैतन्य तत्वाच्या मूळरूपास शिव आणि जडतत्वाच्या मूळरूपास शक्ति म्हणतात. अमर्याद ब्रह्मांड याच्या मध्येच समाविष्ट आहे. असे असल्याने यथार्थपणें हे आकृतीने कागदावर दाखविता येत नाही. बिन्दु व स्थूलशून्याकार वगैरे हे सर्व समजूत करण्याकरितां दाखविलेल्या आकृति तन्त्रोक्त आहेत. 1, 2, 3 या आकृति सर्व वर्णांचे मूळ आहेत. हे सर्व वरिवस्यारहस्यांत सर्व तन्त्रांचा निष्कर्ष म्हणून सांगितले आहे.

### कामबिन्दु – विसर्ग – हार्द्धकला

श्रीमदभिनवगुप्ताचार्यांनीं तन्त्रालोक तृतीयान्हिकांत हेच अनेक वैदिक प्रमाणे देऊन सांगितले आहे व त्याचा विस्तार जयरथकृत टीकेंतही आहे, या तिघांपैकी 1 यास **कामबिन्दु**, 2 यास **विसर्ग** व ३ यास **हार्द्धकला** असे म्हणतात. या तिघांना मिळून 'अणादि प्रत्याहारवत्' या नियमानुसार '**कामकला**' या नावाने संबोधिले जाते.

### बीज आणि वृक्ष

यांचे स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम वगैरे प्रकार आहेत, ते मूळ ग्रंथांतून पहावेत. बीजामध्ये नंतर होणारा वृक्ष व वृक्षामध्ये त्याचे बीज समाविष्ट ( अन्तर्लीन ) असते, त्याचप्रमाणें या तिघांचे आहे 1 मध्ये 2 चा अव्यक्त रूपाने समावेश आहे व 2 मध्ये 1 अन्तर्निहित आहे. असेच 2 व 3 यांचे विषयीही आहे. हे तांत्रिकांचे सत्कार्यवादानुसारच आहे. " **उच्छूनकाले बिन्द्वात्मा तस्मादक्षरसम्भवः । बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भवः ॥**" या महामन्त्रतत्वप्रकाशिनीचे वचनानुसार बिन्दुस्फोटनापासून सर्व वर्ण उद्भवतात.

### वर्ण म्हणजे काय ?

बिन्दुस्फोटनापासून वर्ण बनतात, यामध्ये वर्णांची ध्वनिरूपाने म्हणजे कानांनी ऐकू येणाऱ्या वर्णांच्या आवाजाचे रूपाने उत्पत्ति सांगितली आहे, लिपींच्या रेषांची नव्हे अर्थात कानाने ऐकू येणारा वर्णांचा आवाज एवढ्या स्वरूपातच वर्णोत्पत्ति सांगितली आहे. असा आक्षेप येणे शक्य आहे. परंतु ते तसे असू शकत नाही. कारण जसा 'घट' शब्दाने घागरीचे आकाराचा पदार्थ, असेंच ज्ञान, घागरींचे आकाराची रेषाकृति, घट हा ध्वनि म्हणजे ऐकू येणारे पद आणि घट असें लिपिलेखन एवढ्या सर्व गोष्टी दाखविल्या जातात, असा

लोकांचा व्यवहार दिसून येतो. त्याप्रमाणेंच बिन्दुस्फोटन रेषांनीं लिहून दाखविले जात असल्याने त्या रेखाटनापासून लिपिरेखाविन्यास ( = वर्णांच्या लिपिरेषा लिहिण्याचा प्रकार ) ही सांगितला जातो.

### वर्णोत्पत्ति मौलिक रूप

याचा अर्थ 3 या बिन्दुस्फोटनातील १, २, ३ वा सर्व अर्धवृत्तांचा उपयोग करून वर्णोद्धारतन्त्रोक्त रीतीने अकारादि सर्व वर्णांची लिपि होते. तात्पर्य बिन्दुस्फोटन मूळांत वर्णोद्धार तन्त्रोक्त रीतीनें वर्णोत्पत्ति होते. 'मूले भवं मौलिकं' मुळांत बनणारे ते मौलिक ही मौलिक शद्वाची व्युत्पत्ति आहे. या अनुरोधाने पुढे अन्य वर्णांचा देवनागरी लिपि बाबत विचार करावयाचा आहे प्रथम स्वर व नंतर व्यञ्जने.

## स्वरेषु – 'अ'

4, 5(क), 5(ख)

१ २ ३ ४

**दक्षतः कुण्डली भूत्वा, कुञ्चिता, वामतो गता । ततोर्ध्वसङ्गता रेखा, दक्षोर्ध्वा तासु शङ्करः ॥**

**विधिर्नारायणश्चैव सन्तिष्ठेत्क्रमतः सदा । अर्धमात्रा शक्तिरूपा ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

अत्र यथाक्रमं वर्णलिपीनां लक्ष्यत्वं लक्षणवाक्योक्तरेखास्वरूपाणां लक्षणत्वं सर्वत्र बोध्यम् । तथा च दक्षत इति बिन्दुस्फोटने दक्षतः कुण्डली भूत्वा, कुञ्चिता, वामतो गता, ततोर्ध्वसङ्गता, दक्षोर्ध्वा रेखा अकारलिपिरिति स्वरूपलक्षणम् । अत्र 4 चित्रं बिन्दुस्फोटने मूले 'अ' समुद्भवस्य मौलिकस्य प्रदर्शनार्थम् । एवमेवाग्रेऽपि तत्र तत्र स्वयं ज्ञेयम् । सर्वत्र सङ्ख्या संख्येयपरा बोध्या । 5 (क), 5 (ख) ततः पृथग्लिखितः 'अ' । सर्वत्र चित्रे वचने च समसंख्याकस्य भागस्य साध्यसाधकभावो बोध्य : । अत्रकुण्डली = अर्धकुण्डली बिन्दुस्फोटनात् । शेषांशस्य हकारार्थत्वात् दक्षतः वामतः = दक्षं वाममभिमुखीकृत्येत्यर्थ 'ल्यब्लोपे पञ्चमी' त्यनुसृत्य । एवं मर्यादाभिविधि तथाऽन्येपि यथायोग्यमर्था अनुसंधेयाः । क्वचित्सार्वविभक्तिकस्त्वसिल् इत्यादि । ततोर्ध्वसंगतेति सन्धिरार्ष : । ५ रेखा ह्रस्वाकारस्य मात्राऽग्रे बहुशस्तयोल्लेखात् । तासु शङ्कर इत्यादि तु देवता प्रदर्शनार्थम् । तदर्थकुञ्चनं न पृथग्गणितम् । सोंऽशःलिपिनिष्पत्तावनपेक्षितः । अतोऽस्माभिर्न सर्वत्र विव्रियते ।

3 बिन्दु स्फोटने परस्पराश्लिष्टस्य भागद्वयं यद्भवति तत्र वामार्धभागेनाकारस्य निष्पादने दक्षार्धेन हकारस्य, दक्षार्धेन अकारस्य निष्पादने वामार्धेन हकारस्य निष्पादनमिति पक्षद्वयं " समास्थानमये परे " इति योगिनीहृदयवाक्यं–

मध्यबिन्दुविसर्गान्तः समास्थानमये परे । कुटिलारूपके तस्याः प्रतिरूपे वियत्कले ॥ ( यो. हृ. २–२१ )

**" परे चरमेऽकारहकाररूपेऽक्षरे मातृकाणां क्रमेण पाठेचरमत्वाद्धकारस्य, व्युत्क्रमेण पाठेत्वकारस्य चरमत्वात्** " इति,

विवृणता वरिवस्यारहस्यकारेण दर्शितम् । तयोर्मध्ये द्वितीयपक्षमनुसृत्येह समन्वयप्रदर्शनं कृतम् । प्रथमपक्षे तु तत्रैव 4चित्रे दक्षार्धलोपेन शेष यथा-संयोजनेन निष्पादनं बोध्यं 4यथा 5 (ख) इति[ अनयोः केचन पृष्टलिखित प्रकाराः प्रथम प्रकरणे द्रष्टव्याः । अशोकलिपिषु 5(ख) एवमकारः । ४ ऊर्ध्वसंगत ५ दक्षोर्ध्वरेखयोस्तु पक्षद्वयेऽपि समानत्वमिति । यद्यपि अनयो रेखयोः वर्णोद्धारतन्त्रप्राप्तत्वेऽपि बिन्दुस्फोटनरेखापेक्षया अधिकत्वात् " **बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भव** " इति वचनं न संगच्छत इति भासते तथापि नेह इतरव्यवच्छेदार्थकं मात्रपदं किन्तु सामान्यार्थकं बोध्यम् । यथा मनुष्यमात्रस्य मरणधर्मत्वमित्युक्तौ मनुष्य सामान्यस्येत्येवार्थः नेतरव्यवच्छेदः । तथेह बिन्दुस्फोटनसामान्येन वर्णानां समुद्भव इत्यर्थान्नासङ्गतिः ।

**तत्र टीका ।**

मध्यबिन्दुः कामबिन्दुः तस्य तुरीय बिन्दुविसर्गमध्यपातित्वात् समष्टेर्व्यष्टिमध्यएवान्तर्गतत्वाच्च । विसर्गो व्यष्टिरूपं तयोरन्तर्मध्ये [सम्यक् चतन्यात्मनावस्थानम् । तन्मये तत्प्रधाने]। परे..... चरमत्वात् किंच इमे अक्षरे कुटिला रूपके । कुटिले अकुलकुले कुण्डलिन्यो तयोः रूपान्तरे। तावता काम विसर्गयोः किमायातमित्यत आह – तस्या इति । तयोः कुण्डलिन्योरित्यर्थः । वियत्पदेन शून्याकारस्वात्कामः प्रतिपाद्यते । कला पदेनैच हार्द्धकलावत्त्वाद्विसर्गः । यतःकामविसर्गयोः कुण्डलिनी प्रतिबिम्बरूपत्वं तत] कुण्डलिन्याभिन्नाकार हकाररूपत्वं सम्भवतीति भावः । इति ।

# मराठी–सारांश

4 या आकृतींत बिन्दुस्फोटनामध्ये 'अ' कसा होतो हे दाखविले आहे. वर्णोद्धारतन्त्राचे वचनानुसार लहान आडवी रेषा (= संगतरेखा) आणि उभी सरळरेषा (= दक्षोर्ध्वा) देण्यात येते. उभी सरळ रेषा ही ह्रस्व–अकाराची मात्रा आहे. हिचा मात्रा म्हणून उल्लेख पुढे पुष्कळदा आला आहे. लक्षण श्लोकाचा अर्थ खालील प्रमाणें–

" बिन्दुस्फोटनामध्ये उजवीकडे वळून (= दक्षतः) कुण्डलाकार होऊन (= कुण्डलीभूत्वा,) वक्र होऊन (= कुञ्चिता) डावीकडे रेषा जाते उजवीकडे एक लहान आडवी रेषा (= संगतरेखा) देऊन तिचे उजवीकडे एक उभी सरळ रेषा (= दक्षोर्ध्वा) दिल्यावर 'अ' बनतो".

तासु शङ्करः ....... वगैरेने त्या त्या भागांच्या देवता सांगितल्या आहेत. तो भाग येथे तन्त्राचार प्रक्रिया सांगावयाची नसल्याने वर्णन करणार नाही, कारण येथें केवळ लिपिविषयक भागाचाच परामर्श घ्यावयाचा आहे. श्लोकामध्ये व आकृतीमध्ये मराठी आंकडे दिले आहेत. श्लोकाच्या अंक दिलेल्या भागापासून आकृतीतला तोच अंक दिलेला भाग सांगितला जातो असे समजावे असेच अन्य स्वर व व्यञ्जनांचे विवरणांत सर्वत्र समजावे.

या ठिकाणीं बिन्दुस्फोटनांतील उजव्या बाजूच्या वृत्तार्धापासून 'अ' बनविला आहे. म्हणून डावीकडील वृत्तार्धापासून 'ह' बनतो. उजवीकडील वृत्तार्धापासून 'ह' बनविल्यास डावीकडील वृत्तार्धापासून 'अ' बनतो. असाच नियम आहे. हेंच वरिवस्यारहस्यांत सांगितले आहे. यापैकीं दुसऱ्या प्रकारानें 5 (ख) येथे दाखविल्या प्रमाणे अशोकलिपीचा 'अ' बनतो. '**उर्ध्वसंगता**' या श्लोकातील पदानें सांगितलेली, लहान आडवी रेषा व '**दक्षोर्ध्वा**' या पदानें सांगितलेली, तिचे उजवीकडील उभी रेषा देवनागरी व अशोकलिपि या दोहोंत सारखीच आहे. अशोक-लिपीतही डावीकडे गति आरंभीं दिसते तरी पुढे उजवीकडेच वळून कुण्डलाकार होऊन, कुञ्चित होऊन डावीकडे रेषा जात असल्यानें तेथेही **लक्षणसमन्वय**' आहे म्हणजे श्लोकांत दिलेली रेखाटनपद्धति जुळते. '**बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानांच समुद्भवः**' या वचनांतील '**मात्र**' शद्बामुळें वर्णोद्धारतन्त्र वर्णलिपि रेखाटनाकरितां घेण्यात 'असंगति' आहे असा आक्षेप येथे घेतला जाईल. परंतु ते तसे नाहीं, कारण 'मात्र' हें पद इष्ट पदार्थास इतर पदार्थांपासून दूर करणारे (= इतरव्यवच्छेदक) नसून सर्वसाधारण (= सामान्यार्थक) आहे. जसे 'मनुष्यमात्राचा मरण हा धर्म आहे' यावरून 'केवळ माणसेच मरतात, बाकीचे जिवंत प्राणी मरत नाहीत,' असें होत नाही. तसेच येथेही आहे. म्हणून 'असंगति' नाही.

हे दोन्ही 'अ' कार वर्णांची जन्मभूमि असणाऱ्या बिन्दुस्फोटनाचे स्वरूप कसें आहे आणि ते दोघे त्यामध्ये कसें उत्पन्न होतात याची साक्ष देणारे आहेत. याप्रमाणे सर्वच लिपि साक्ष देतात त्यांचे अनुसंधान करावे.

# स्वरेषु– 'आ'
9

१ २
**अकाररूपमासाद्य दक्षक्रोडायता त्वधः । ब्रह्मादयस्तथा शक्तिस्तासु तिष्ठन्ति नित्यशः ॥**

अकाररूपेति–बिन्दुस्फोटने 'अकाररूपमासाद्य', 'अधः', 'दक्षक्रोडायता रेखा' आकार इत्यन्वयः । दक्षक्रोडेत्यत्र '**न ना क्रोड भुजान्तरं**' इति कोशे सत्यपि दक्षेति विशेषणानुरोधात्क्रोडपदमन्तरमात्रार्थकम् । विशिष्टवाचकानां पदानां स्ववाच्यघटकविशेषणांशे अविवक्षितत्वनिर्णायक पृथग्विशेषणपदसमवधाने विशेष्यमात्रपरत्वमिति न्यायात् । पुण्डरीकं सिताम्भोजमिति कोशे सत्यपि रक्तं पुण्डरीकमिति अयोगे रक्तमिती पृथक्-विशेषणानुरोधात्पुण्डरीकमम्भोजमात्रार्थकमितिवत् । 'दक्षक्रोडायतात्वध' इत्यत्र कथं विग्रहः ? कोऽवान्वयार्थः ? इति चेद्दक्षमन्तरं दक्षक्रोड पदार्थःकृतः । तत्र अधः दक्षक्रोडे सति आयता इति विग्रहे चित्रविभागे यथा दर्शित इत्येवं लेखः प्राप्नोति । तत्र प्रथमे सम्पूर्णस्य द्वितीये अधस्त-नार्धस्य दक्षक्रोड पदार्थस्य रेखाध आगतत्वात्समन्वयः परन्तु एतत्पक्षे अधस्पदस्य समासानिविष्टस्य नियताकाङ्क्षाया विना एक देशे क्रोडे अन्वयः कृतः । स च न व्युत्पन्नः। दक्षक्रोडस्याध आयतेत्यन्वये दक्षक्रोडपदेन समं आयत पदस्य समासानुपपत्तिः, असमर्थत्वात् । दक्षक्रोडाथ आयतेति पाठ अश्रुतः कल्पनीयः स्यात् इति । तथापि प्रथमपक्षो नैव सिध्येत् चित्रविभागे यथा दर्शित इत्यपि सिध्येत् । अथ अधः दक्षक्रोडं यस्याः सेति बहुव्रीहि कृत्वा ततः तथा सती आयतेति पृथक्पदत्वे कर्मधारयेणैकपदत्वे वा पूर्वदोषे सत्येव बहुव्रीहि–लक्षणाप्यतो ऽधिका । अधः दक्षं क्रोडं यथा भवति तथा आयतेति अव्ययीभावोत्तरं समासे अव्ययीभावस्याव्ययत्वात् परिगणितेतराव्ययत्वेन तेन समं समासस्याव्युत्पन्नत्वमप्यधिकम् । तथाप्यसमासे दक्षक्रोडमायतेति पाठे स्थितपाठासिद्धिः । अक्षराधिक्यं च उक्ता वक्ष्यमाण सर्वपक्षसमुच्चयेन अक्षरस्याप्यध आयतेति पक्षे पूर्वोक्ताः सर्वे क्लेशाः अक्षरस्येत्यध्याहारक्लेशश्चेति दक्षक्रोडे आयतेत्यन्वयः स्वीकृतो देवनागरीलिपिपक्षे प्रथमः । अतः दक्षक्रोडे अधआयतेति अधस्पदस्य वशेषणान्वयं स्वीकृत्य 'आ' इति लेखनपक्षः अधिकं व्युत्पत्तिनियमानुसारी ( According to the rules of interpretation )

रेखाटनात मात्र पूर्ण 'ल' घेता हे कसे? याचे समाधान असें की ब्रह्मसृष्ट वर्णमालेचे रेखाटन सांगणारे वर्णोद्धारतन्त्र सर्व व्यञ्जनांचे पूर्ण रेखाटनच सांगते, अर्ध रेखाटन कसे करावे हे त्यात नाही. (तेथे उपदेष्ट रेखाटनालाच घेऊन चालणे असल्याने, वर्णोद्धारतन्त्रोक्त जे रेखाटन ते तसेच घ्यावे लागते. नंतर व्याकरण उच्चारण काळनिर्धारण करीत असल्याने प्रस्तुतात तो अर्ध 'ल्' च ठरतो. रेखाटन पूर्ण 'ल' चे असले तरी या विस्तृत अभिप्रायाला लक्षूनच संस्कृत व्याख्येत ' योग्यतया लकार रेखाधः ' असे म्हटले आहे) सम्पादक.

### एकमात्रा उच्चारणकाळ – दन्त्यत्व

या 'ऌ' स्वरात 'कुण्डलीवक्रा' या पदाने सांगितलेली २, ३ ने 24 मध्ये दाखविलेली ऋकाराचे मात्रेप्रमाणे दिसणारी रेषा, ही तशी दसली तरी ऋकारमात्रा नाही, कारण ती तशी मानल्यास हलन्त ल्+ऋ स्वर याप्रमाणें दीड मात्रे वा उच्चारणकाळ ऌस्वराचा मानावा लागेल. वस्तुस्थितीत ऌ स्वराचा उच्चारण काळ एकमात्रा आहे. त्या मध्ये केवळ दाताला जीभ लावून उच्चारण ( = दन्त्य उच्चारण) सगळीकडे सांगितले आहे. त्याच्यांत टाळूला जीभ लावून उच्चारण ( = मूर्धन्य उच्चारण) असल्याविषयी प्रमाण नाही.

### संपूर्ण वर्णरेषा हीच मात्रा

या प्रमाणे लिहिल्या जाणाऱ्या संपूर्ण वर्णरेषेस 'ऌ' स्वर म्हणतात. तीच वर्णरेषा संपूर्ण मात्राही आहे. स्वरांतील मात्रा म्हणून सांगितलेले भाग घेऊनच व्यञ्जनांच्या सोळाखड्या बनत असतात. ऌ स्वर, ऋऌक्, ऌत् इत्यादि ठिकाणी स्वर म्हणून व आप्ॢ, क्ॢप्ति वगैरे ठिकाणी मात्रा म्हणून, अशा दोन्हीही प्रकाराने ऌ चा वापर होत असलेला आढळतो.

### ऋकारमात्रेशी फरक

यावरून लकाररेषेसहितच जसा स्वर तशी मात्रा ' ऌ ' मध्ये होत असल्याचे वरील उदाहरणात दिसून येते. तेथे कृष्ण, कृति वगैरे मधल्या प्रमाणे ऋकारमात्रा म्हणून वक्रकुण्डली आलेली नाही. हा फरक महत्वाचा आहे.

### स्वरभक्तिवेष्टित हलन्त

ऌ स्वरांतील लकार स्वरभक्तिवेष्टित असून, अशा ऌ स्वराचा एकमात्रा उच्चारण काल आहे. (१।४ स्वरभक्ति + १।२ ल् + १।४ स्वरभक्ति = १) येथे १।४ स्वरभक्ति म्हणजे, प्रथमोपस्थितत्वात् 'अ' चाच १।४ घेणे न्याय्य आहे. लकाराचे सोळाखडीत येणाऱ्या 'ऌ' मध्ये मात्र असे नाही. तेथे ल्+ऋ = ऌ असें असून त्याचा दीडमात्रा उच्चारणकाळ आहे [ल् (१/२) + ऋ स्वर = (१) = १॥ [ या दोन्ही ऌ करिता लिपिरेषा वेगळी नाही, ऌ स्वरातील अर्धकुण्डली मात्रारूप नसून संपूर्ण लिपिरेषाच मात्रारूप आहे. एवढाच या दोघात फरक आहे.

### केवळ दन्त्य उच्चारण

लकार रेखासहित वक्रकुण्डलीचे 'ऌ' स्वरातील उच्चारण केवळ दन्त्य आहे व कृष्ण, ऌट यातील वक्रकुण्डलीचे उच्चारण मूर्धन्यहीं आहे. कोणी क्+ऌ यामध्ये टाळूला जीभ लावून ऋमिश्र उच्चारण करितात, ते वैदिक प्रातिशाख्य व व्याकरणास संमत नाही. क्+ऌ वगैरेत स्वरभक्तिवेष्टित हलन्त 'ल्' एवढेच मात्रारूप आहे. ऌट्, ऌङ् इत्यादिकांत मूर्धन्यांश आला तरी तो उच्चार करण्याचाच आहे. कारण येथें लकार रेषा स्वरघटक म्हणून आलेली नसून ल्+ऋ = ऌ असे असल्याने उच्चारणकाळ दीड मात्रेचा आहे. स्वरभक्तिवेष्टित ऌ स्वराचा उच्चारण काळ एकमात्रेचा आहे.

या प्रमाणे दोघातील फरक व्याकरणमहाभाष्यांत सांगितला आहे. ऋ, ॠ, ऌ, 'ॡ' ( दीर्घ ) हे स्वर लोकोत्तर असून, वेद व देवांचे व्यवहारापासून येथें आले आहेत, ते संस्कृत या देवभाषेतच उपयोगी असून अन्य भाषात त्यांचा वापर स्वतंत्रपणें नाही.

### ऋकारमात्रेचे अशुद्ध लेखन

मात्रारूपानें 'ऋ' आला असता सोळाखडीचे नियमानुसार निरृतिः, उच्चैरृचा, पुनरृषिः असे लिहिणे आवश्यक आहे. तरीही त्याची उपेक्षा करून कोणी कोणी निर्ऋतिः, उच्चैर्ऋचा, पुनर्ऋषिः असे लिहीत असतात. ऋकारांत मात्रा वेगळेपणानें सांगितली असल्यानें असे दोन प्रकारांनी लिहिणें तरी संभवतें.

### लिपीतील फरक

ऌ स्वरांत तसें नसल्यानें दोन प्रकारांनीं लिहिणें संभवतच नाहीं. म्हणून स्वरघटक म्हणून 'ल्' नसलेल्या व स्वरघटक म्हणून असलेल्या या दोन प्रकारच्या 'ऌ', रेखाटनातील लिपीसाठी देवनागरीत वर्णोद्धारतन्त्र वेगळेपणा सांगत नाहीं हलादि ऌ येथें लकार स्वरघटक म्हणून नसल्यानें त्याला संपूर्णतया स्वर-मात्रा-रूपता नाहीं, लकार स्वरघटक म्हणून असतांना मात्र त्याला स्वरमात्ररूपता असते. एवढ्यावरूनच लिपि एकच असताना दोन प्रकारच्या ऌ त फरक करणें जाणत्याला सुलभ होतें.

ज्या रीतीनें ३ मात्रेचा 'र व' आणि दीडमात्रेचा 'ख' मध्यें फरक केला जातो, त्याच रीतीने उच्चारण कालावरू 'ऌ' रेखाटनांत फरक करावयाचा असतो. 'ऌ' रेखाटनांत, या दोन प्रकारांकरितां फरक कल्पिला जावा असें कांहीं म्हणतात. वेगवेगळ्या लेखन प्रकारांत असा फरक केलेला असून दिसून येतो. (संस्कृत विवरणांतील तक्ता पहा.) हा फरक पृष्ठलेखन प्रक्रियेनें करून घेतलेला आहे.

### तात्पर्यलिङ्गावरून निर्णय

असें वेगळेंपण करणाऱ्या लोकांचे लिपींतही, अन्य ठिकाणीं तात्पर्यलिङ्गावरून निर्णय करणें स्वीकारावें लागतेंच. जसें हकार औरस्य व हकार–कण्ठ्य या करितां व मात्राकालभेदाकरितां लिपिभेद त्या त्या लिपींतही नाहीं. उदाहरणार्थ– ब्रह्म मध्याह्न वगैरेंत 'ह' कार औरस्य म्हणजे छातींतून उच्चारण्याचा आहे आणि हरि, हृदय, हर्ष वगैरेंत कण्ठ्य म्हणजे गळ्यांतून उच्चारण्याचा आहे, पण त्या करितां लिपिभेद नाहीं–

**टिप्पणी–**

१) **हकारं पञ्चमैर्युक्तमन्तःस्थाभिश्च संयुक्तम् । औरस्यं तं विजानीयात्कण्ठ्यमाहुरसंयुतम् ॥**

ङ, ञ, ण, न, म अथवा य, र, ल,व यापैकीं कोणीं 'ह' चें पुढें आल्यास त्या हकाराचा उच्चार छातींतून केला पाहिजे. ( म्हणजे ह औरस्य आहे) या नवांपैकीं कोणीं ह चे पुढें नसेल तर त्याचा उच्चार गळ्यांतून केला पाहिजें (म्हणजे हा कण्ठ्य आहे)

२) '**व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य**' । (**पाणिनीसूत्र**)

व आणि य वापरून अत्यंत लघुप्रयत्नानें उच्चारण शाकटायनानें सांगितलें आहे. उदाहरणार्थ– 'भोःअच्युत' येथें 'भोयच्युत' असें संधीनें म्हटलें जातें.

३) '**ह्रस्वं लघुसंयोगे गुरु**'

ह्रस्वाक्षर लघु असतें. त्यापुढें जोडाक्षर आल्यास मात्र तें गुरु होतें. उदा.- अत्यंत, उद्यतः वगैरे मध्यें 'अ' व 'उ' गुरु आहेत, अत्यन्तं, इत्याह वगैरेमध्यें ह्रस्व स्वरास गुरुत्व असूनही त्यास घेऊन लघुपेक्षां लिपिभेद केला जात नाहीं.

४) '¹ऋति ²ऋ्वा ³ऌति ⁴ॡवा' (वार्तिक)

या दोन्हीं ठिकाणीं २ व ४ हें विधेय वर्णद्वय दोन मात्रेचे आहेत. २ मध्यें रेफ (र्) आहेत, त्याचीं प्रत्येकीं अर्धी अशी एकून एक मात्रा आणि अच्भक्ति एक मात्रा अशा दोन मात्रा होतात. ४ मध्यें दोन लकार (ल्) आहेत, त्यांची प्रत्येकीं अर्धी अशी एकूण एक मात्रा आणि अच् भक्ति एक मात्रा अशा दोन मात्रा होतात. या दोहोंत मागें पुढें स्वरभक्ति आहे. हा हिशेब सिद्धान्त कौमुदीनें दिला आहे. त्याची समजूत खालील प्रमाणें–

| स्वरभक्ति | + | दोनहलन्त | + | स्वरभक्ति | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | र् + र् | | | | |
| ½ | + | ½ + ½ | + | ½ | = | ऋ २ मात्रा |
| | | ल् + ल् | | | | |
| ½ | + | ½ + ½ | + | ½ | = | ॡ २ मात्रा |

वरील वार्तिकांतील २, ४ इतक्यांचाच हा हिशेब आहे, बाकीच्यांचा नाहीं, गोष्ट विसरूं नये. ज्याप्रमाणें वरील ४ मध्यें दिलेल्या वार्तिकांत ३ एकमात्राकाळ व ४ दोनमात्राकाळ असूनही लिपिभेद कोणीं करीत नाहीं; त्याप्रमाणेंच वर्णोद्धारतन्त्रही एकमात्रा काळ ऌ स्वर व सार्धमात्राकाळ ऌ सोळाखडींतील या ऌकारांत लिपिभेद करीत नाहीं, अर्थात् भेदनिर्णय तात्पर्यलिङ्गावरूनच करावा.

यावर असा आक्षेप येईल कीं तात्पर्यलिङ्गावरून कोठें कोठें निर्णय करावा लागतो, हें ठीक, परंतु जितका लिपिभेद करणें अन्य लेखन प्रकारांत झालें आहे, तितका देखील भेद वर्णोद्धारतन्त्रोपदेशक शिवानें देवनागरी 'ऌ' त केलेला नाहीं, असें कां ? याचें कारण असें कीं– शिवानें स्वःतचे इच्छेनें कोणती तरी लिपि, कल्पना करून उपदेशिली नसून ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेली, प्रकृतिस्थ लिपीच उपदेशिली, त्यामध्यें निर्मूलक कल्पना (empirical approach) नाहीं, ब्रह्मदेवही प्रकृतिस्थ पूर्वप्राप्तरूपच उत्पन्न करतो: या विषयीं उदयनाचार्यानीं त्यांचे न्यायकुसुमाञ्जलि ग्रंथांत गर्भितार्थविचारानें सांगितलें आहे. ब्रह्मसृष्ट लिपीचें उदाहरण समोर ठेवून माणसें आपापल्या कल्पनेनुसार व गरजे-नुसार, ब्रह्मसृष्ट लिपीचे आदर्शानें अन्यान्य लिपि करतात. अशारीतीच्या सर्वांस व्यष्टि, समष्टि, नाहीं तर आदर्शाभास म्हणतात.

### स्थितस्य गतिर्हि चिन्तनीया

वर्णोद्धारतन्त्रोक्त 'ऌ' चें लक्षण श्लोकांतील पदांचा 'रेखाधःकुण्डली वक्रा दक्षतः (दक्षमभिगम्य) वामतः (वाममभिगता)' असा अर्थ घेऊन 'लु' असा 'ऌ' स्वरकरून ल्+ऋ शीं अर्ध्यामात्रेचा फरक करण्यास काय हरकत आहे ? या प्रमाणें स्वीकारल्यास या नवीन रूपाचा उकार मात्रेशीं घोंटाळा होतो. यावर असें म्हटलें जाईल कीं दोन्हीं प्रकारांत घोंटाळा होणें आहेच, मग हा वेगळा प्रकार कां घेऊं नये ? हा न घेण्याचें कारण त्यामुळें आज सुस्थापित असलेल्या गोष्टीची व्यवस्था लागत नाहीं. नवीन घोंटाळा स्वीकारून काय लाभ ? प्रत्युत प्राचीन

पुरातत्त्व लेखवाचनांत त्यानें विभ्रम मात्र उत्पन्न केला जाईल म्हणून सुस्थापित, परंपराप्राप्त शिष्टसंमत रीतीनेंच शास्त्रार्थतात्पर्य ध्यावयाचें असतें– 'स्थितस्य गतिर्हि चिन्तनीया'

वेगवेगळ्या लेखप्रकार करणारांनीही, त्यांचे त्यांचे प्रकारांत पूर्वप्राप्त 'ऌ' स्वराचा अंश घेऊनच, तो तो प्रकार केला आहे. पूर्वप्राप्त मौलिक स्वरूपांत, नवीन श्लोकार्थकल्पना करणें युक्त नाही--कारण त्या योगें पूर्व प्राप्ताचें मौलिकत्व राहणार नाही.

पुढें श, स–यांचा लक्षणश्लोक एक असूनही लिहिण्याच्या प्रकारांत फरक करून देवनागरी लिपींत श, स बनतांना दिसतात. तसेंच तेलगु व कानडी वगैरेंत स्वर ऌ चा एवढातरी फरक केला आहे, (चित्रविभाग पहा) मग तसा देवनागरींत कां केला नाही? असा प्रश्न उपस्थित केल्यास त्याचें उत्तर असें––

श–स, भ–म या मध्यें, तन्त्रोक्त लक्षण समबल असल्यानें रेखासंयोजनांत फरक करून, देवनागरींत व्यवस्था केली आहे. या ठिकाणीं ऌ स्वरामध्यें श्लोकावरून येणारा लिपि प्रकार व सोळखडीचे नियमाला अनुसरून येणारा ल्+ऋ = ऌ हा प्रकार या दोहोंत उक्त फरक करण्यानें वैषम्य येतें कारण श्रुत गोष्टीत ( = लक्षण श्लोकानें येणाऱ्या ऌ आकृतींत), सोळाखडीचे नियमाला घेऊन ( = लिङ्गामुळें) बदल करावा लागतो. 'न हि श्रुतं लिङ्गेनान्यथानीयते' असा न्याय आहे. व तो असा बदल करण्यास विरोधी आहे. यावर, सोळाखडींतील रूपांत बदल करावा असें म्हणून करावयास गेलें तर क पासून ह पर्यंत जो एकजिनसीपणा खोळाखडींत दिसतो त्या बहुमान्यतेस विरोध होईल. या करितां असा कांहीं भेद न करितां 'ऌ' मध्ये, तात्पर्यलिङ्गावरूनच निर्णय करणें योग्य आहे. (यावरून लक्षांत येतें कीं देवनागरी इतकी मूळ रक्षणाची काळजी घृष्टलेखनांत घेतली अन्यत्र कोठेही गेली नाहीं.) सम्पादक–

स्वर ऌ मात्रा (सोळाखडींत उपयोगाकरितां) ऌ, आणि ल्+ऋ = ऌ (लच्या सोळाखडींत येणारा) यांची परस्पराशीं अथवा 'ऌ'शीं संयोगानें होणारी रूपें यांचा आतां प्रारंभीं ऋकार निर्देश पूर्वक थोडा विचार करूं. सोळाखडीचे नियमानुसार ह्रस्व अकारमात्रा लिहून वेगवेगळीं मात्रारूपें लिहावीं लागतात त्यानुसार कृ, गृ, वगैरे रूपें रकारांत ऱ्, र्+दीर्घऋ ही लिपिरूपें बनतात असें न लिहितां अक्षररूपानें लिहिणें हें साहस आहे. निरृतिः येथें नि+र्+ऋ+ति असें आहे. मागें 'ऋ' चें विवरणांत सांगितल्याप्रमाणें ½ स्वरभक्ति+र् ½+½ स्वरभक्ति असा 'ऋ' आहे. यावरून निरृतिः याच्यांत 'र्' नंतर स्वरभक्ति येते–म्हणजेच 'रृ' हें जोडाक्षर नसल्याने 'नि' गुरु नाहीं व्यञ्जनोत्तर स्वर आल्यास व्यञ्जनांतील अकारमात्रा (वेगळी वा अन्तर्गत) लिहून स्वर लिहावा असा सोळाखडीचा नियम आहे. त्याचें उल्लंघन करून 'निर्ऋतिः' असेंही लिहिलें जातें. तेथेंही नि+र्+ऋ+तिः असेंच असल्यानें वरील प्रतिपादनानुसारच नि गुरु नाहीं. लेखनांत मात्र फरक दिसतो. 'ऌ' चें बाबत मात्र संधि आल्यास गोंधळ होतो. उदाहरणादाखल दोन वाक्यें घेऊं–– १) अल् ऌतमन्तर्भावयति (येथें 'ऌ' स्वर आहे). २) अल् लृटं नान्तर्भावयति (येथें ल्+ऋ = ऌ आहे) आता १) मध्यें सोळाखडी नियम पाळून संधि केल्यास (चित्र विभाग पहा) असें आणि २) मध्यें (चित्र विभाग पहा) असें होतें. सोळाखडी नियम न पाळतां संधि केल्यास (१) मध्यें (चित्र विभाग पहा) असें होईल आणि ऌ स्वर आहे कीं (ल्+ऋ = ऌ) आहे या विषयीं भ्रम होईल. ऌ स्वर असतां 'अ' गुरु होणार नाहीं व ल्+ऋ = ऌ असतांना तो गुरु होईल. अर्थात सोळाखडी नियम सोडून येथें वागल्यास गोंधळ होतो व दिसण्यांतही फरक दिसत नाहीं. या उलट निरृतिः वा निर्ऋतिः कसेंही लिहिलें तरी 'नि' गुरु म्हटला जात नाहीं; – 'हलोऽनन्तरा संयोगः', तेथें नाहीं व दिसण्यामध्यें साफ फरक राहतो.

### लिपिभेद अनावश्यक

ऌ मध्यें मात्रा वेगळी सांगितली नसल्यानें मात्रा म्हणून संपूर्णाक्षरच :क्ऌ, ग्ऌ वगैरेमध्यें लिहिलें जातें, सोळाखडीचे नियमानुसार अकारमात्रेनंतर 'ऌ' लिहिला जात असल्यानें तो मात्रा रूप स्वरच होतो. यावरून कॢ, गॢ वगैरे प्रकारचें लेखनांत तें लेखन वरील नियमानुसार केलेलें असल्यास 'ऌ' मात्रारूप नाहीं ल्+ऋ = ऌ अच् आहे हें समजून येतें म्हणून भ्रम होण्याचा प्रसंग टळतो. असें असलें तरी नियमाविरुद्ध अक्षररूपानें लिहित असतांना वेगळेपणा यावरून सर्वांना समजत नाहीं. तो मात्रा-काळावरून ठरवावें लागतें. दीडमात्राकाळ सांगणारें तात्पर्यलिङ्ग नसल्यास 'ऌ' स्वर समजावा हा या सर्व चर्चेचा निष्कर्ष आहे. हें तात्पर्यलिङ्ग व्याकरणावरून समजावें. यावरून भ्रमवारण करतां येतें. क्ऌ येथें हलन्त क्+ऌ (एक मात्रा) स्वर असा एकूण १।। मात्रेचा पूर्ण हिशेब आहे. येथें दोन हलन्तांचा संयोग नसल्यानें जोडाक्षर नाहीं. क्ॢ येथें हलन्त क्+हलन्त ल्+स्वर ऋ असा एकूण दोन मात्रांचा पूर्ण हिशेब आहे. हें जोडाक्षर आहे. या समजुती प्रमाणें विचार करून फरक करावा, लिपिभेदाची आवश्यकता नाही.

### सूक्ष्म विचारानें वैलक्षण्य स्पष्ट

सूक्ष्म विचार केल्यास स्पष्ट वैलक्षण्य सांगितलेले कळतें. ऋकाराचें लक्षण श्लोकांत 'पुनस्त्वधो दक्षगता मात्रा' असें आहे. त्यानुसार खालीं उजवीकडे जाणारी (तु पुनरधोदक्षगता) असा अन्वयार्थाचा विचार केल्यास चित्रांत ❋ दाखविल्याप्रमाणें टोंक उजवीकडे किंचित् बाहेर जाणारी मात्रा काढावी लागते. अशीच मात्रा सोळाखडींत वापरली पाहिजे. हें केल्यावर ऌ स्वर लक्षण श्लोकाप्रमाणें व ल्+ऋ = ऌ, उपर्युक्त रीतीनें काढतां येऊन आपोआप फरक होतो. श्लोकाप्रमाणें असा फरक करून लिहिणें प्राप्त आहे.

## 'ॡ'

26

तत्क्रोडतुल्यरूपा च रेखा सा वैष्णवी स्मृता ।
तासु वन्द्याः सुरेशानि ! दुर्गा वाणी सरस्वती ॥

तत्क्रोडेति । तस्य पूर्वोपस्थित ऌकारस्य, क्रोडे भुजान्तरे, रेखाधः कुण्डली वक्रा दक्षतो वामतो गतेत्युपस्थिता या अधः वक्रकुण्डली तया तुल्यरूपा च सा (भवति तथा सति) = (दीर्घ ऌकार) इत्यर्थः। तुल्यत्वस्य भेदघटितत्त्वात् चेति समुच्चयात् रेखाध इति भुजान्तरे स्थानविशेषसिद्धेः ऊर्ध्वाधः क्रमेण ॡकारे वक्रकुण्डलीद्वयं प्राप्तम् । इत्येव ॡकारस्तन्मात्रा चेति फलितम् । मात्राया पृथगनुक्तेरिति पूर्वेण समानम् । इत्थं चात्रापि ऌकाररेखासहितस्यैव मात्रात्वमित्यादि पूर्ववत् । तासु पूर्वप्राप्तरेखासु । अत्रोक्तायाः "वैष्णवी स्मृते" त्युक्तेः । दीर्घॡकारस्तान्त्रिकाणां प्रसिद्ध इति ।

## मराठी सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**- पूर्वीचे श्लोकानें सांगितल्याप्रमाणें ऌकार काढून, त्याचे खालीं त्यामध्यें खालीं असल्याप्रमाणेंच आणखी एक वक्रकुण्डली, तिचेच खालीं काढल्यावर ॡकार होतो.

'**तत्क्रोडतुल्यरूपा**' या श्लोकांतील पदापैकीं 'तत्' शब्दानें पूर्वोपस्थित ऌकाराचें ग्रहण होतें. त्याचें '**क्रोड**' म्हणजे '**भुजान्तर**'– त्या पूर्वोपस्थित ऌकाराचें भुजान्तरांत असणारी '**तुल्यरूपा**' रेषा '**तत्क्रोडतुल्यरूपा**' पदानें सांगितली आहे. ही '**तुल्यरूपा**' रेषा कशी तें '**रेखा सा**' या पदांनीं सांगतात. '**सा**' म्हणजे पूर्वोपस्थित ऌकारांतील '**रेखाधः कुण्डली वक्रा**' या पदांनीं त्याचे श्लोकांत सांगितलेली रेषा. यावर असा आक्षेप येईल कीं, ऌ कारांत ही रेषा एक आहेच, मग येथें विशेष काय सांगितलें ? येथें '**तुल्यरूपा**' म्हणून ऌकारांतील वक्रकुण्डलीसारखीच आणखी एक रेषा काढावयास सांगितली आहे. कारण सारखेपणा हा दोघांना घेऊन सांगितला जातो. ही रेषा ऌकार लिहून, त्यांच्यातील वक्रकुण्डलीचें खालच्या अंगास लिहिणें '**क्रोड**' पदानें प्राप्त होतें. तसेंच ऌकार प्रथम लिहिणें असल्यानें त्याची समाप्ति जेथें होते तेथें सुरू करण्यांत लाघव असल्यानेंही ती रेषा तेथेंच प्राप्त होते. याप्रमाणें ॡकारांत दोन वक्रकुण्डल्या प्राप्त होतात. मात्रा वेगळी सांगितली नसल्यानें ही संपूर्ण आकृतीच मात्रा आहे. तान्त्रिकांत दीर्घ ॡकार प्रसिद्ध आहे.

## 'ए'

27, 27 (ख), 27 (क), 28 (क), 29, 27 (ग), 28 (ख)

१ २ ३ ४
कुञ्चिता वामतो रेखा दक्षकोणा ऽऽयता त्वधः । पुनर्वामगता सैव तासु बह्मेशवायवः ॥

कुञ्चितेति । बिन्दुस्फोटने १ वामतः ( = वाममारभ्य = वामारम्भमात्रंकृत्वा) कुञ्चितारेखा, २ दक्षकोणा, आयतात्वधः (27 क, खयया) सैव पुनर्वामगता = एकार इत्येकः अन्वयार्थप्रकारः ।

अत्रैवं १, २, ३, तिसृणां रेखाविभक्तीनां बिन्दुस्फोटने सम्भवः उपरिवामार्द्ध दशार्द्धवृत्तप्रदर्शितरीत्या उपरि १, २ तिर्यग्रेखया योजितयोरेव सम्भवतीति स्फुटम् । यदि तथा तिर्यग्रेखा न वचने विवक्षितेत्युच्यते; सा ऐच्छिकी शिरोरेखैव क्रियत इति मन्यते तदा "कुञ्चिता वामतो रेखेति" = उपरिवामार्द्धत्तवृत्तमात्र वचनानुदितमिति ग्राह्यं स्यात्, तथा सति एकारमात्रा वचने नोपदिष्टेति स्यात् । अत्र "कुञ्चिता वामतो रेखा" एकारमात्रा; तत्पदेन अग्रे ऐकारवचनें तां धृत्वा पूर्वा मात्रेति सूचनात् । किंच "दक्षकोणा ऽऽयतात्वधः । पुनर्वामगता सैव ।" इति वचनांशश्च नियमेन न युज्येत, ऐच्छिकरेखाया अनियतत्वात् । यदि तथा तिर्यग्रेखा वचने तात्पर्येण गृह्यते तदा नियमेन १, २, ३ तिसृणामपि सम्भवात् सुसङ्गतिः ।

अत्र अस्मिन्नन्वयार्थ प्रकारे १, २, ३ इत्येतावतीनामेव तिसृणां रेखाणां वर्णोद्धारे विवक्षितत्त्वं चेन्मन्यते तदा अधिकांशः देवनागर्यां लिख्यमानः ४, ५ बिन्दुस्फोटनात् आयोजितः केवलमिति भवति; तदनुरोधात प्रथमक्रमाश्च उपरि वृत्तार्द्धाभ्यामेव एकारवर्णोद्धारः कृतः । तत्रापि १ एकारमात्रा प्रत्यक्षैव । किंच १, २, ३ एतावत्यंशे एकारस्य कोणत्रयोद्भवत्वं च भवत्येव ।

तथापि "पुनर्वामगतासैव" इत्यनुरोधात् देवनागरी पक्षे द्वितीयः अन्वयार्थ प्रकारः । यथा "कुञ्चिता वामतः" इत्यत्र वामतः = वाममभिगम्येत्यर्थः क्रियते । तदा ४, ५ अपि वर्णोद्धारात् तात्पर्येणैव अनूद्यायोजिते भवतः । यथा 21 चित्रे-वामतः १ वाममभिगम्य कुञ्चिता रेखा

(अग्रे तथैव अधोनीता) ४ = २ दक्षकोणा सती (दक्ष पार्श्वे ४ संयोगेन कोणवतीं सती) आयता त्वधः ५ इति । सैव पुनर्वामगतेति तु १ वामतः कुञ्चिता तिर्यग्रेखैव उच्यते, पुनरित्युक्तेः । सकृद्वामगता सैव (अर्थात् बिन्दुस्फोटने अवशिष्टं दक्षोपरिवृत्तार्द्धं प्रविश्य) ३) पुनर्वामगता भवतीति । एकार इति शेषः । तस्याः सकृद्वामगतायाः पुनर्वामगतत्वम् अस्मिन् अर्थप्रकारे एव सम्भवति । इत्थमेव समन्वयेन तात्पर्यं सर्वं सामञ्जस्यम् । तथा च वर्णोद्धारोक्ते एव ४, ५ रेखे अपीति देवनागरीपक्षः एव निष्कृष्टः साधीयान् । अतः तत्र न मनःकल्पितं किमपि । 28 (ख) तदनुसारं पूर्वमुक्तं दर्शितम् ।

अशोक लिप्यां तु 27 (क) तः ५ परित्यज्य शेषांशमात्रं लिख्यते तदा रूढ्या त्रिकोणाकारत्वमपि भवतीति 27 (ग) मध्ये प्रदर्शितम् । परं तथापि ६ अंशः बिन्दुस्फोटनादायातित एव । तद्विषयीकृत्यैव सेतुबन्ध "नागरलिप्यां साम्प्रदायिकैरेकारस्य त्रिकोणाकारतयैव लेखनादिति भास्करराय: । ततो ज्ञायते यत् यत्र त्रिकोणाकारतयैव एकारः लिख्यते सा साम्प्रदायिकनागरीत्येव स मनुते स्मेति; न ब्राह्मी नाम नागरीतः पृथक् कापीति, यथा आधुनिका व्यवहरन्ति ।

यदत्र केचित्—नागरसमाजस्येयं लिपिरित्यतः नागरीति नामेति कल्पयन्ति तत् श्रीचक्रस्य "देवानां पूः" देवनगरम् इत्यादि वेदोक्तनामानि अजानानानां वल्गनमात्रं, न प्रामाणिकम् । अधिकारिविशेषानुक्तौ शास्त्रोक्तं सर्वं सर्वस्येति सिद्धान्तात् ।

**यदेकादशमाधारं बीजं कोणत्रयोद्भवम् । ब्रह्माण्डादिकटाहान्तं जगदद्यापि दृश्यते ।।६।।** (वामकेश्वरतन्त्रे विश्राम १ श्लोक ६)
इत्येवं कोणत्रयोद्भवत्वं तु त्र्यश्रत्वं केवलमुच्यते एकारस्य न त्रिकोणैकाकारत्वम् । त्र्यश्रत्वं तु सर्वेषां समानमेव । अधिकं पूर्वमुक्तमेव । 27 बिन्दुस्फोटने मूले मात्रासमुद्भवप्रदर्शनार्थम् । 27 (ख) एकान्वयार्थप्रकारे एकाररूपरेखा प्रदर्शनार्थम् । ततः 27 (क) उपरि अर्द्धवृत्तद्वयं अधःकोटौ परस्परं योजयित्वा ४ अर्धवृत्तं केवलमेकं परित्यज्य लिखितुं दर्शयितुम् । एवं 28 (क) अधस्तनवृत्तार्द्धं ४ केवलं परित्यज्य लिखितं यत्र उपरि अर्द्धवृत्तद्वये अधःकोटिद्वयं परस्परमसंसृष्टं स्थाप्यते । अग्रेतनं 29 = 28 (ख) इति द्वयं उक्तमेवेति ।

## 'ए'

**लक्षण श्लोकाचा अर्थ**—बिन्दुस्फोटनामध्यें डावीकडून सुरुवात करून (डावीकडून फक्त सुरुवात मात्र करून) कुञ्चित होणारी रेषा **१**, दक्षकोणा (उजवीकडे कोण असणारी रेषा). २, आणि तिचे खालील बाजूस असणारी रेषा (आयतात्वधः) काढून [27 (क), 27, (ख): येथें दाखल्या प्रमाणें] ती पुनः डावीकडे नेली असतां 'ए' कार होतो. हा अन्वयाचा एक प्रकार आहे.

### संयोजक रेषा आवश्यक

येथें **१**, २, ३ या रेषा बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील व डावीकडील वरच्या वृत्तार्धांस घेऊन बनतात हें स्पष्ट आहे. १, २ या संयोजक रेषेनें दोन्हींत वृत्तार्धे एकमेकांस संलग्न केली आहेत. अशा प्रकारें दोन्हीं वृत्तार्धे एकमेकांस जोडणें वचनांत सांगितलें नसून तें शिरोरेषेप्रमाणें ऐच्छिक आहे.

### एकार मात्रा विचार

असें म्हटलें तर "कुञ्चिता वामतो रेखा" यानें केवळ डावीकडील वरच्या वृत्तार्धाचें ग्रहण होऊन, एकाराची मात्रा वचनांत उपदिष्ट नाहीं असें होईल. येथें "कुञ्चिता वामतो रेखा" हा भाग एकारमात्रा सांगणारा आहे कारण पुढें ऐकाराचें लक्षणश्लोकांत "तत्" पदानें त्याचें ग्रहण केले आहे. तसेंच "दक्षकोणायता त्वधः" "पुनर्वामगता सैव" हे एकारलक्षण ऐच्छिकरेखा अनियत असल्यानें संपन्न होणार नाहीं; कारण या दोहोंत सांगितलेल्या रेषांना उभयवृत्तार्धसंयोजक रेषेची नियमानें आकाङक्षा आहे. म्हणून ही संयोजक रेषा तात्पर्यानें १, २, ३ यथोक्त होणें सुसंगत ठरतें.

### कोणत्रयोद्भवत्व

या अन्वयार्थप्रकारांत १, २, ३ या तीनच रेषा वर्णोद्धारतंत्र सांगते असें असून देवनागरींत असणारा जादा भाग (४ व ५ या रेषा) बिन्दुस्फोटनांतून घेतला गेला आहे असे सूचित होते. अर्थात् बिन्दुस्फोटनांतील वरची दोन अर्धे घेऊन वर्णोद्धारतन्त्र एकार प्रतिपादन करतें. तेथें १ नें एकारमात्रा प्रत्यक्ष दिसतच आहे आणि १, २, ३ या रेषाभागांनीं एकाराचें "कोणत्रयोद्भवत्व" ही होतच आहे.

### दुसऱ्या प्रकारानें अन्वय

परंतु "पुनर्वामगता सैव" याला घेऊन देवनागरी लेखनप्रकार दुसऱ्या एका प्रकारानें अन्वय केल्यावर येतो.

### दोन वेळा वामगतत्व

यामध्यें "कुञ्चिता वामतः" येथें डावीकडून कुञ्चित होणारी रेषा असा अर्थ केला आहे. आणि ४, ५ रेषा तात्पर्यानें संग्रह केल्या आहेत. २१ आकृतींत डावीकडून सुरुवात करून डावीकडें कुञ्चित होणारी १ ही रेषा, (तीच पुढें खालीं नेल्यावर) ४ = २ उजवीकडे

कोणयुक्त होणारी (दक्षकोणा) होऊन पुन्हां खालीं जाणारी (आयता त्वधः) ५ ही रेषा आहे. "सैव पुनर्वामगत." यामधील "सैव" शद्वानें १ चे ग्रहण होऊन ती "वामगता" करावयाची असल्यानें वरच्या वृत्तार्धातील संयोजक रेषेद्वारा, अवशिष्ट उजव्या वरच्या वृत्तार्धास घेऊन "वामगत" होते— डावीकडे जाते. हा भाग ३ नें दाखविला आहे. या अन्वयार्थात एकदां वामगत असणाऱ्या रेषेस पुनरपि वामगतत्व आहे.

याप्रमाणें समन्वयानें तात्पर्य आहे देवनागरी लेखनप्रकार ४, ५ या बिन्दुस्फोटनगत रेषांनाच घेऊन होत असल्यानें तेथें मनःकल्पित कांहीं नाहीं याप्रमाणें 28 (ख) पूर्वी सांगितल्यानुसार आहे.

**अशोकलिपि एकार**

अशोकलिपींत 27 (क) येथें दाखविलेली ५ ही रेषा सोडून लिहिलें जातें म्हणून "रूढचा त्रिकोणाकारत्व" होते. ते 27 (ग) मध्यें दाखविलें आहे. तेथेही ६ नें दर्शित अंश बिन्दुस्फोटनांतूनच येतो.

**(साम्प्रदायिक त्रिकोणाकार एकारः (भास्कररायः)**

या "त्रिकोणाकारत्वा" विषयी श्रीमद्भास्कररायांनीं "सेतुबंधांत" नागरलिप्या साम्प्रदायिकैरेकारस्य त्रिकोणाकारतयैव लेखनात्–असें म्हटलें आहे. अर्थात् या लेखनास भास्करराय "साम्प्रदायिक नागरी" असेंच म्हणतात ब्राह्मी असें देवनागरीपासून वेगळेपणा दाखविण्यासाठीं आधुनिकांप्रमाणें म्हणत नाहीत हें विशेष महत्त्वाचें आहे. म्हणजे अशोकलिपी हा नागरीचा एक प्रकारच होय. नागरसमाजाची लिपी म्हणून नागरी नसून श्रीचक्रांत उत्पन्न (देवानां पूः इ.) नागरी होय.

**वामकेश्वरतन्त्र**

वामकेश्वरतन्त्रांत "यदेकादशमाधारं बीजं कोणत्रयोद्भवम्। ब्रह्माण्डादिकटाहान्तं जगदद्यापि दृश्यते॥" यानें एकारास "कोणत्रयोद्भवत्व" सांगितलें आहे. त्रिकोणाकारत्वात् "त्र्यस्रत्व" आणि "कोणत्रयोद्भवत्व" आहेच.

27 बिन्दुस्फोटनांत एकार मात्रा दाखविण्यासाठीं आहे, 27 (ख) अन्वयार्थ प्रकार एक प्रमाणें 27 (क) मध्यें वरच्या वृत्तार्धास खालून जोडून एक खालचें वृत्तार्ध त्यागून लिहिले आहे. 29 = 28 (ख) हे अन्वयार्थ प्रकार दुसऱ्याप्रमाणें आहेत.

## 'ऐ'

30 (अ), 30 (ब), 30 (अ), 31 (ब)

१

**एकाररूप-मध्ये तु किञ्चिद्दक्षे तदोर्ध्वतः।**
**चन्द्रेन्द्रभानवस्तासु मात्राशक्तिःक्रमास्स्मृता॥**
**त्रिधाशक्तिमयी पूर्वा दुर्गा वाणी सरस्वती॥**

एकारेति। बिन्दुस्फोटने एकाररूपमध्ये तु किञ्चिद्दक्षे तदोर्ध्वतः = ऐकारः। (अर्थात्सत्यामेवैकारमात्रायां) तदोर्ध्वतःप्रकृतत्वादैकारस्य मात्रेति। तद्+आ+ऊर्ध्वतः इति। अत्र '**कुञ्चिता वामतो रेखा**' इति प्रथमं पूर्वोपस्थित तत्पदार्थः। पूर्वोपस्थितास्वनेकासु सतीषु प्रथमोपस्थितायाः प्रथमं परिग्रहः तस्याः बाधकसद्भावे द्वितीयादेः। अत्र च बाधकाभावात्प्रथमोपस्थिताय कुञ्चिता वामतो रेखा इत्यस्या एव तत्पदेन प्रथमं ग्रहणम्। तावतैव निराकाङ्क्षत्वादितरासां निवृत्तिः। ईषदूर्ध्वत इति शेषार्थः। तथाच एकाररूपमध्ये किञ्चिद्दक्षे तु ईषदूर्ध्वतः सा = पूर्वोपस्थिता एकारमात्रैव ऐकारस्य मात्रेत्यर्थः। तथाच सा+आ+ऊर्ध्वत इति विगृह्य सुप्सुपेति समासः। एवंच एकारे प्राप्तैव "कुञ्चिता वामतो रेखा" तां सेत्युपादाय ईषदूर्ध्वतः पुनःविधीयते प्रथमभक्षविधानवत्तदोर्ध्वत इति समस्तपदार्थविधानेऽपि प्राप्ताऽप्राप्तविवेकेन तत्पदार्थ एव विधिपर्यवसानात्। अतः पुनर्विधानादीषदूर्ध्वत्वरूपस्थानगुणभेदाच्च व्यक्तिभेदसिद्धिः। अथवा तद् ओर्ध्वतः इति च्छेदः। तत्पदेन "कुञ्चिता वामतो रेखा" सामान्ये नपुंसकम्। एकाररूपमध्ये ओर्ध्वतः तत् इति वाक्यार्थः। व्यस्त एव विधीयत इति न कोऽपि क्लेशः। अन्यत्सर्वं समानमिति। इत्थं च एकारमात्राद्वयमैकारमात्रेति फलितम्। तथा च एकारे एका मात्रा अन्तर्गता वर्तत एवेति तत्र ईषदूर्ध्वतः एकया एव मात्रया वर्धितया ऐकारो भवति। कै, गै इत्यादि षोडशमात्रिकासु तु ककारादिष्वन्तर्गताया एकार मात्राया अभावात् मात्राद्वयस्य पृथग्लेखन मित्युपपत्तिः।

## मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**– बिन्दुस्फोटनांत पूर्वीचे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें एकार लिहून, थोडी उजव्या बाजूला, त्याच्या वरच्या अंगास एकाराचे मात्रेप्रमाणें असणारी एक मात्रा लिहिली म्हणजे ऐकार होतो.

### एकारातील रेषेचें ग्रहण

तदोर्ध्वतः या सामासिक पदाचा तत्+आ+ऊर्ध्वतः असा विग्रह आहे. 'तत्' या पदानें पूर्वी एकारलक्षणात सांगितलेली 'कुञ्चिता वामतो रेखा' ही रेषा घ्यावयाची आहे. इतरही आणखी रेषा पूर्वश्लोकांत सांगितल्या असल्या तरी प्रथम सांगितलेली प्रथम घेणेंच योग्य आहे. विशिष्ट निर्देश न करितां पूर्वोपस्थितांचा उल्लेख केलेला असल्यास त्या विधानाच्या अंमलबजावणींत पूर्वोक्तापैकीं प्रथम सांगितलेल्यास अग्रक्रम द्यावयाचा असतो. त्याला कोणीं बाधक असल्यास द्वितीय सांगितलेलें पूर्वोक्त या प्रमाणें घ्यावयाचें असतें. प्रथम सांगितलेल्या पूर्वोक्तास बाधक नसल्यास त्यानें इतर पूर्वोक्त निवृत्त होऊन प्रथम विधान केलेल्या पूर्वोक्तासच घ्यावें लागतें. या नियमाला धरूनच येथें 'कुञ्चिता वामतो रेखा 'पुनर्विधानाचे अंमलबजावणींत घेतली आहे.

### स्थानभेद व पुनर्विधानानें ऐकारमात्रा

आकारानें एकारमात्रेप्रमाणेंच परंतु स्थानभेद व पुनर्विधान येथें केले आहे. म्हणून दोन एकारमात्रा = ऐकारमात्रा. 30(अ), 30(ब) मध्यें ऐकाराचा मौलिक उद्भव व 31 (अ), 31 (ब), मध्यें तो सुटा लिहून दाखविला आहे. ·एकारामध्यें एक मात्रा स्वतः असल्यामुळे वर आणखी एक देऊन दोन होतात, कैं, गैं इत्यादिमध्यें दोन लिहाव्या लागतात.

# ओ

१ ३ २ ४ ५

**वामतः कुण्डलीभूत्वा दक्षान्मध्ये तु कुञ्चिता । किञ्चिद्दक्षगता या तु कुञ्चिता वामतस्त्वधः ॥**

**ब्रह्मेशविष्णवस्तासु मात्रा तु ब्रह्मरूपिणी । शक्तिश्च परमा सैव ध्यानमस्य प्रवक्षते ॥**

वामतइत्यादि । बिन्दुस्फोटने १ वामतः (वाममारभ्य) कुण्डली (बिन्दुस्फोटनादर्धकुण्डली) भूत्वा, ३ दक्षात् (दक्षमारभ्य) कुण्डली (पूर्ववद्बिन्दुस्फोटनात्) भूत्वा, २ मध्ये कुञ्चिता या तु, ४ किञ्चिद्दक्षगता, ५ वामतः (वाममभिमुखीकृत्य) अधः कुञ्चिता ओकारइत्यर्थ वस्तुतस्तु अत्र (१) मध्ये तु कुञ्चिता (३) वामतस्त्वधः कुञ्चिता इति कुञ्चितावाक्यत्रयम्, 'तु' त्रयात् । तत्र किञ्चिद्दक्षगतायां (अर्थात् उपरिदक्षतः) या तु कुञ्चितेत्येवमन्वयाभावे वामतस्त्वधः (कुञ्चिते) त्यत्र तु पाठो व्यर्थ इति स्यात्। व्यावर्त्यपक्षान्तराभावात् इति। तथान्वये तु (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इति कुञ्चितावाक्यत्रयाद् रूपसिद्धिः स्फुटा । पाठक्रमादर्थक्रमो बलीयानित्यनुसृत्य अर्थक्रमेणान्वयः संख्यया सर्वेष्वपि चित्रेषु दर्शनीयः। अत्र मौलिकोद्भवे कयोर्मध्ये कुञ्चिता इत्याकाङ्क्षायां कुण्डलीभूत्वा स्थितयोरित्युपस्थितयोः प्राप्तिः, २ अर्थक्रमेण कुञ्चनस्थानम् । कुञ्चनलेखः तत्रैव तदेव न्याय्यः । पाठक्रमार्थक्रमो बलीयानिति न्यायात् । वङ्गाक्षरे वामतः उपरिअर्धवृत्तं संवेष्ट्य पूर्णकुण्डलीं कुर्वन्ति । द्राविडे तु अधोदक्षवामार्धयोः संयाजनेनेति विशेषः । शुण्डादण्डं अधोलम्बिनं कुर्वन्तीति द्वयोरपि समानमिति । अत्र अर्धचन्द्रौ बिन्दुश्च यद्यधिकं स्थाप्येते तर्हि ॐ लिपिर्भवतीत्यन्यदेतत् । इयंलिपिः गजाकारा इत्युक्ता, तथाच श्रूयते–"ततश्चोमिति ध्वनिरभूत्स वै गजाकारः" (गणेशतापनी ४) अत्र 33 चित्रे १ गजमस्तकाकारभागः २ मुख्यभागः ३ अधरोष्ठभागः. ४+५ शुण्डाभागः । स च मुखोपरिभागसम्बद्ध इत्यनुसंधेयः । एवं गजाकारस्यौकारलिपिविशेषस्य शुण्डाभागादन्या मात्रा रेखा नास्ति । प्रायः अयमेव गजाकारौकारः असन्धिप्रणवे ॐ इति लिख्यते सर्वैःवैष्णवादिभिरपि शिष्टैः । अत्र ३ भागं सम्मुखवामार्धे संयोज्य अधोलम्बिशुण्डाभागं कृत्वा लिख्यते चेत्तमिल ओकारो भवति यथा चित्रे प्रदर्शितमस्ति । तदेतदग्रे तल्लिपिपरामर्शे स्फुटीभविष्यति । ज्ञानेश्वरी ग्रन्थे प्रथमाध्याये इदमेवोङ्कारस्वरूपमेवं वर्णितं--'अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकारु महामण्डल मस्तकाकारे ।।" अत्र वामपार्श्वतः दिग्भेदेन द्रष्टृदृशा एवं वर्णितम् । एतदपि चित्रे प्रदर्शितमस्ति तत्स्फुटीकरणार्थम् । तथाच श्री ज्ञानेश्वर महाराजः दिग्भेदेनाक्षरदर्शनमपि प्रामाणिकमित्यनुमनुतेऽति स्पष्टतरम् । तेन घृष्टलेखने दिग्भेदेनाक्षराणि स्थाप्यन्त इति तदनुमतं सिध्यति ।

अथाऽत्र द्वादशादिमात्रिकाकृते अपेक्षिता (अ) ो इतिमात्रा नैतावता प्राप्ता । सा कुतःकथं प्राप्येतेति प्रश्ने–34 (अ) चित्रे यथा दर्शितं तथापि किञ्चिद्दक्षगतेत्यस्य लेखनं सम्भवति । शुण्डा सादृश्यार्थं ५ एवं ४ + ५ वक्रं लिख्यते । तथाच कदाचिदेवमपि सरलरेखया लिखितेऽपि तत्सादृश्यं सम्भवतीति 34 (ब) चित्रे दर्शितरीत्या परिवर्त्य ऊर्ध्वाधःस्थित्या 'ो' लिखित एव स शुण्डाभागः सर्वत्र द्वादशमात्रिकासु सामान्यतोऽपि ओकारमात्रा स्यादिति दिग्भेदेन कल्पनीयम्। पृथक् द्वादशमात्रिकार्थमपेक्षिताया ओकारमात्रायाः इतरस्वरेषु तत्तन्मात्राणामिव अत्रानुक्तेरिति कस्यचिन्मतं स्यात् । परन्तु नैवं परमार्थतः मन्तव्यम् । "उपायं चिन्तयन्प्राज्ञः तथापायं च चिन्तयेत्"। तथा सति गजाकारस्यौकारस्यैव शुण्डाभाग एव सर्वत्र सामान्यतो द्वादशादिमात्रिकास्वपेक्षितौकारमात्रेति स्यात्तस्याश्च ह्रस्वाकारमात्रामनुलेखने प्रमाणाभावेनाग्रे ओकारनिष्पाद्ये औकारे वक्ष्यमाणायाः 36 चित्रे इव ४ रेखायाः मध्यगताया अनुपपत्तिः । गजाकारे ओकारे तदभावात्। अतः किञ्चिद्दक्षगतेत्यादिना सूत्रमर्यादया अर्थभेदेन सामान्यतः द्वादशमात्रिकार्थमपेक्षिता ओकारमात्रापि शुण्डाभागात्पृथगेवैकतन्त्रेणात्र प्रतिपादितेत्येव मन्तव्यत्वात्। सूत्रेष्वर्थभेदाद्वाक्यभेदस्य गत्यन्तराभावे दोषत्वानङ्गीकारात् । तथाहि—"किञ्चिद्दक्षगता या तु कुञ्चिता वामतस्त्वधः (सती) ३ मात्रा इत्यादेः अर्थक्रमेण १ वामतस्त्वधः कुञ्चिता २ किञ्चिद्दक्षगता ३ मात्रा = (ओकारमात्रारेखा) इत्येवमर्थेऽपि 35 चित्रे दर्शितरीत्या द्वादशादिमात्रिकार्थं सामान्यतोऽपेक्षिताया ओकारमात्रारेखायाः प्रतिपादनेऽपि पृथक्तात्पर्यकल्पनस्यैव सम्यगत्वात् ।

एवमुक्त्वा यदि सामान्यतःद्वादशादिमात्रिकासूपयुक्तमोकारमात्रात्वमप्यस्य शुण्डाभागस्य कल्पयित्वा सर्वत्रास्य ह्रस्वाकारमात्रामनु प्रयोगोऽपि कल्प्येत तर्हि गजाकारे ओकारेऽपि तस्याकारमात्रामनु प्रयोगस्य प्राप्त्यापत्तेः स्थितगतेरनिष्पत्तिः । अतःपृथगेव मात्रेयं प्रतिपाद्यत इति स्वीकार एवोचितः । तथा सति पृथग्भूतायास्तस्या गजाकारे द्वादशादिमात्रिकास्वनन्तर्गते ॐ इति लिपिरूपे प्राप्तभावेन नानिष्टापत्तिः । न हि गजाकार ओकार औकारे प्राप्नोति तत्र मध्यगताया रेखाया असम्भवात् । पृथगोकारमात्राप्रतिपादने तस्या एव द्वादशादिमात्रिकासु प्रयोगाद्वक्ष्यमाणे औकारेऽपि द्वादशादिमात्रिकाषटकस्यौकारस्य तत्र प्राप्तेः सामञ्जस्यात् । अनुपदमेव चेदं स्फुटीभविष्यति । तथा चेयमोकारमात्रा पृथगर्थसिद्धा औकारानुगुण्याय ऊर्ध्वा उत्पद्यते तथा 35, 36 चित्रयोरिति ।

# मराठी–सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ**—बिन्दुस्फोटनांत '**वामतः**' म्हणजे डाव्या बाजूने सुरुवात करून वरच्या डाव्या अर्धवृत्तास घेऊन वक्राकार होणारी रेषा म्हणजे '**कुण्डली**' हे '**वामतःकुण्डलीभूत्वा**' या श्लोकांतील पदांनी सांगितलें असून आकृती 33 मध्यें १ नें दाखविलेला संबंधित रेषाभाग आहे. '**दक्षात्**' म्हणजे उजव्या बाजूने सुरुवात करून, म्हणजे उजव्या खालच्या अर्धवृत्तास घेऊन वक्राकार होणारी रेषा म्हणजे '**कुण्डली**' हें दक्षात् (**दक्षमारभ्य कुण्डलीभूत्वा**) या श्लोकांतील पदांनीं सांगितलें आहे. त्यावरून येणारा रेषाभाग 33 मध्यें ३ नें दाखविला आहे. '**मध्ये कुञ्चिता**' म्हणजे पूर्वोक्त १ व ३ रेषांमध्यें–कुञ्चित रेषा काढण्यास सांगितले आहे. ही रेषा 33 मध्यें २ नें दाखविली आहे. हीच रेषा थोडी उजवीकडे वाढविण्यास '**या तु किञ्चिद्दक्षगता**' या श्लोकांतील पदांनीं सांगितलें आहे. ही 33 मध्यें ४ ने दाखविली आहे. "**वामतःअधःकुञ्चिता**" म्हणजे '**वामतः (वाममभिमुखीकृत्य) अधःकुञ्चिता**' अर्थात् खालींवळून डावीकडे जाणारी रेषा. ही 33 मध्ये ५ नें दाखविली आहे. या प्रमाणें १, २, ३, ४, ५ या रेषांनीं 'ओ' कार होतो. श्लोकांतील पदांना श्लोकांतील क्रमानें न घेतां अक्षर लिहिण्याचे क्रमानें घेऊन अर्थ व संख्याक्रम केला आहे. हे पाठक्रमाहून अर्थक्रम बलवान् असतो–या न्यायानें घेतलें आहे. गजाकार ओकारलिपि अशाप्रमाणें झालेल्या ओकारावर एक अर्धचन्द्र व बिन्दु दिला असता ओंकार लिपि बनते, हे सर्वपरिचित आहे. ही लिपि हत्तीच्या आकाराची असल्याचें गणेशतापनी चवथ्या उपनिषदांत सांगितलें आहे. आ. 39 मध्यें १ नें दाखविलेला भाग हत्तीचें डोकें, २ नें दाखविलेला भाग हत्तीचें तोंड, ३ नें दाखविलेला भाग हत्तीचा खालचा ओंठ आणि ४+५ ने दाखविलेला भाग ही हत्तीची सोंड आहे. हा सोंडेचा भाग तोंडास लागून आहे असें समजावें. या प्रमाणें हत्तीच्या आकाराच्या ओकार लिपींत सोंडेचा भाग वगळतां वेगळी मात्रा रेषा नाहीं. अशा तऱ्हेच्या हत्तीच्या आकाराचाच ओकार संधि सोडून ॐ लिहितांना वैष्णव वगैरे देखील लोक लिहितात. तामिळमधील ओकार आ. 33 मधील ३ नें दाखविलेला भाग, बिन्दुस्फोटनांतील त्याचे समोरच्या भागाशीं जुळवून घेऊन ४+५ नें दाखविलेला सोंडेचा भाग खालीं केल्यांवर तामिळ लिपींतील 'ओ' कार होतो. ही प्रक्रिया चित्रांत दाखविली आहे, ती पहावी. याचा विशेष परामर्श पुढें तामिळ लिपि विचारांत आहे.

### ज्ञानेश्वरी ग्रन्थात ओकार

ज्ञानेश्वरीचे प्रथमाध्यायांत श्रीगणेशाचें ओंकार स्वरूपानें वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी केलें आहे. तेथें डाव्या बाजूनें पाहून खालून वर या क्रमानें दिशाभेदानें ओंकार वर्णिला आहे. यावरून दिग्भेदानें अक्षरदर्शन ज्ञानेश्वरमहाराजांसही संमत असल्याचें दिसते हें चित्रांत दाखविलें आहे.

### सोळाखडीतील ओकारमात्रा

गजाकार ओकारांत बाराखडींत लागणाऱ्या ओकार मात्रेचें प्रतिपादन नाहीं, मग ती कोठून आली ? असा प्रश्न येथें निघतो. त्याचे उत्तर म्हणून लक्षण श्लोकांतील '**किञ्चिद्दक्षगता**' या पदाचा खालींलप्रमाणें अर्थ केला असतां ही मात्रा श्लोकावरून प्रतिपादित होते. आ. 34 (अ) मध्यें दाखविल्याप्रमाणें '**किञ्चिद्दक्षगता**' या पदानें सांगितलेली रेषा लिहितां येते. ही रेषा सरळ ठेवलेल्या हत्तीचे सोंडेप्रमाणेंच आहे. या रेषाभागास उभें करून डाव्या कुशीवर वळवून टाकले असतां आ. 34 (ब) मध्यें दाखविलेली बाराखडींत वापरण्याची ओकारमात्रा होते. याप्रमाणें एकच अर्थ करून गजाकार ओकारांतील सोंड व बाराखडींतील मात्रा मिळते असा कांहींचा पक्ष आहे. "अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकारु महामण्डल । मस्तकाकारें ।।" याप्रमाणें. हा पक्ष ठीक नाहीं कारण तो घेऊन खालील आपत्ति येते—पुढें ओकारामध्यें सांगितलेल्या ज्ञापकसिद्ध नियमानुसार सोळाखडी वा बाराखडींत आकारमात्रा प्रथम लिहून, त्यानंतर स्वरमात्रा लिहावयाची असते. त्यानुसार, वरील पक्ष स्वीकारल्यास आ. 32–33 वगैरेमध्यें ४–५ चे पूर्वी अकारमात्रेची उभी रेषा लिहावी लागेल. व तसें केल्यास गजाकाररूप, श्लोकांत सांगितल्यानुसार होणार नाहीं म्हणून हा अर्थ उपयोगास येत नाहीं. सोळाखडींत लागणाऱ्या मात्रानिष्पादनासाठीं वेगळा अर्थ केला पाहिजे.

### सोळाखडीतील ओकारमात्रेसाठी अर्थभेद

सूत्ररूप पदांचे दोन वेगवेगळे अर्थ करण्यानें दोन अर्थ केल्याचा वाक्यभेद दोष मानतां येत नाहीं. कारण सूत्राचें स्वरूपच 'अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतो मुखम् । . . . . . सूत्रं सूत्रविदो विदुः ।। असें आहे. हा दुसरा अर्थ खालीलप्रमाणें "**किञ्चिद्दक्षगता यातु कुञ्चिता**

**वामतस्त्वधः १ (सती) मात्रा**" असा अन्वय घ्यावयाचा आहे, डावीकडे खालीं जाणारी कुञ्चित रेषा (वामतस्त्वधः कुञ्चिता), हीच थोडी उजवीकडे जाऊन (किञ्चिद्दक्षगता) मात्रा = उभ्या रेषेचे स्वरूपानें ओकारमात्रा होते. आ. 35 मध्यें वामतस्त्वधःकुञ्चिता १, किञ्चिद्दक्षगता २ व मात्रा ३ या प्रमाणें या रेषा दाखविल्या आहेत. या प्रमाणें सोळाखडीस उपयोगीं पडणारी मात्रा रेषा श्लोकावरूनच अर्थभेदानें येते हें योग्यच आहे.

कारण हत्तीच्या सोंडेचे आकाराची मात्रा अकारमात्रेनंतर सोळाखडींत काढण्याविषयीं प्रमाण नाहीं व असा पक्ष घेतल्यास पुढे औकाराचे लक्षण श्लोकांतील 36 मध्यें ४ नें दाखविलेल्या रेषेची उपपत्ति लागत नाहीं. औकारांत गजाकार ओकार दिसतच नाहीं कारण औकारात मध्यें उभी रेघ आहे. या करितां गजाकार ओकार शुण्डामात्रा प्रतिपादिणारा एक अर्थ आणि सोळाखडींतील ओकार, औकार लक्षणास समन्वित करून प्रतिपादिणारा दुसरा अर्थ, अशीच व्यवस्था करणें योग्य आहे. यानुसार आ. 35 व 36 मध्यें दाखविल्यानुसार सोळाखडींत अक्षराचे डोक्यावर मात्रा ह्रस्वाकार मात्रेनंतर वापरणें योग्य ठरतें.

# औ

35, 36

१ २ ३
**ओकारदक्षमध्ये तु गता तूर्ध्वगतायता । किञ्चित्सा वामतो वक्रा तासु ब्रह्मेशविष्णवः ॥**
४
**शक्तिर्मध्यगता रेखा ध्यानमस्य प्रवक्ष्यते ॥**

ओकारेति । बिन्दुस्फोटने ओकारदक्षमध्ये तु गता ऊर्ध्वगतायता सा किञ्चिद्वामतो वक्रा = तथा सति औकारः इत्यन्वयः । द्वादशादिमात्रिकायां य ओकारस्तस्य यो दक्षः (भागःओकारमात्रारूपः) तस्य मध्ये गता या ऊर्ध्वगता सती आयता इत्यर्थः । तत्रैव ४ मध्यगत रेखायाः सम्भवात् । अर्थादोकारमात्रायामध्ये (किञ्चिद्दक्षगता – मात्रयोःसन्धौ) ऊर्ध्वगताऽयता ततः किञ्चिद्वामतो वक्रा औकारमात्रेति सिध्यति । अत्रापि 2 + 3 रेखाया। पूर्वोक्तन्यायेन कुञ्चिता वामतस्त्वध इति प्राप्त सदृश्या [विधानाद्भेदसिद्धिः । तथा च 'ो' इति ओकारमात्रा तत्रैव 'ौ' इत्यौकारमात्रेति फलति । ननु कथमत्रापि मध्यगताया रेखायाः संभवः ? किं प्रमाणमुच्यते–

स्वराणां वर्णलिपिः मात्रारेखा चेति द्विधानिरूपणंवचनेषु प्रोक्तं दर्शितं च सर्वत्र । तत्किमर्थमिति प्रयोजनचिन्तायां क्रियमाणायामिदं सिध्यति यद्वर्णानां यथासंभवं द्वादशादिमात्रिकालिपिकल्पनमेव तत्प्रयोजनमिति । अन्यथा ग, गा, गि, गी······इत्यादि द्वादशमात्रिकार्थे गअ, गआ, गइ, गई इत्यादि लिपिकल्पनं प्रसज्येत । मात्रारेखोपदेशे तु तत्प्रयोजनान्यथानुपपत्त्या तदुपयोगेन पूर्व प्राप्तस्थितद्वादशादिमात्रिकालिपिरेखाः सिद्धिरिति । एवं च सति द्वादशादिमात्रिकालिपिषु संभवन्तीषु सर्वत्र सामान्यतः एव आकारादिमात्राणां विसर्गपर्यन्तानामपि ह्रस्वाकारमात्रोपयोगेनानुप्रयोग इति अत्रत्य मध्यगतरेखेत्यनेन ज्ञाप्यते । ठकारादिष्वपि अन्तर्गता मात्रा मध्यगतेति छत्रिन्यायेन संगृहीता बोध्या । अत एव ग, गा, गि, गी, गु, गू, गे, गै,······इत्यादि लिख्यते कथं नेति समाहितम् ।

अथ यदि पृच्छयते–यावता विना ज्ञापकं नोपपद्यते तावदेव ज्ञापकेन आक्षेप्तव्यम् । तथात्राकारे ओकारमात्ररेखाया अनुप्रयोगाद्य ओकारो भवति तस्य कर्तव्या मध्यगता रेखेत्येतावदेवेह ज्ञापनीयम् । नाधिकं; सर्वत्र द्वादशमात्रिकायां षोडशमात्रिकायां वा आकारादिस्वरमात्राः विसर्गान्ताः ह्रस्वाकारमात्रामनु प्रयोक्तव्या इति । ततश्चात्रैव भवति ज्ञापिता मध्यगता रेखेति चेत् ज्ञापकस्य सामान्यपक्षपातित्वे लाघवाद्बाधकाभावात्तया ज्ञापनमिति । एवमेव प्रकृतिस्थनियमानां वैज्ञानिकानां व्याप्तिग्रहे ( Induction ) गतिः, एवं ज्ञापकद्वारा बोधयन्शिवः अस्य स्वोक्तलिपिशास्त्रार्थस्य प्रकृतिस्थत्वं दर्शयति । अत एवान्तर्गततया वा पृथग्वा दृश्यतयाऽदृश्यतया वा यथाप्राप्तं लिख्यत एव द्वादशादिमात्रिकासु ह्रस्वाकारमात्रानानुप्रयुज्यमामाऽऽ कारादिमात्रा, सर्वत्राकारान्तवर्णपरलिपिघटितस्यैव तासु लेखनात् । यथा ग, गा, गि, गी, ठ, ठा, ठि, ठी......इत्यादौ सर्वत्र आकारादिमात्राणामकारमात्रामनुप्रयुक्तानामेव लेखनम् । इकारमात्रायाः प्रथमं लेखनाच्छत्रिन्याय उक्तः । तत्र तु यथान्यायं सहलेखप्रयोगमात्रम् । एवं सामान्यतयैव ज्ञापितो नियमः । अन्यथा गि, गी, गु, गू,......ठा, ठि, ठी, ठु, ठू इत्यादिलेखनमेव स्यात् । तथाच स्थितस्य गतिर्न सिध्येत् । स्थितस्य गतिर्हि चिन्तनीया । स्थितशिष्टगत्या हि शास्त्रतात्पर्यं पर्यवसातव्यम् । अयं नियमः सर्वैरपि भारतीय लिपिष्वनुस्रियते इति तत्तल्लिपिद्वादशादिमात्रिकालेखनदर्शनादवगम्यते ।

अथैव तर्हि ककारादिहकारान्तानां द्वादशादिमात्रिकावत् अकारस्यापि द्वादशमात्रिकायाः लिपिकल्पनसम्भवात्सापि सिध्येदिति चेत्सत्यं । तत्रेदं विवेचनीयम् । तत्र अ, आ, ओ, औ, अं, अः इत्येतावन्तिषड्रूपाणि तु प्रत्यक्षवचनादेव क्लृप्तानि । 'दक्षतः कुण्डली भूत्वा' इत्यत अकारस्य, 'अकाररूपमासाद्य' इत्यत आकारस्य, 'ओकारदक्षमध्येतु' इत्यनेन ओकारौकारयोः, 'अकाररूपशीर्षेतु' इत्यतः 'अं' इत्यस्य 'अकाररूपदक्षेतु' इत्यनेन 'अः' इत्यस्यश्रुतत्वात् । अतः एतावतां प्रत्यक्षवचनात्सिद्धि। अतो न कल्पनीयत्वम् । इतरेषां अि, अी, अु, अू, अृ, अ् + दीर्घ ॠ,

अ‍ॡ, अ् + दीर्घ ॡ, अे, अै, इत्येतेषां तु सम्भवतामपि दशानां कल्प्यमानत्वे इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, इति यथोक्तंप्रत्यक्षश्रुतरूपवशात्तथारूपकल्पनैव प्रतिरुध्यते। न प्रथममवकल्पते "ऐन्द्रया गार्हपत्यमुपतिष्ठत" इत्यत्रेव। यद्यपेतेषुमध्ये अकारनिष्पन्न ओकारः न प्रत्यक्षश्रुतः गजाकारस्यैव ओकारस्य पूर्वं प्रत्यक्षश्रुतत्वात्। तथापि औकाराकाङ्क्षितस्यश्रुतस्य मध्यगारेषाविशेषस्य असमर्पकेण प्रत्यक्षश्रुतेनापि गजाकारेण ओकारेण निराकाङ्क्षत्वासंभवात्। ओ इत्यस्य क्लृप्तत्वमेव बाधकाभावात् मध्यगता रेखेति सिद्धवन्निर्दिष्टप्रत्यक्षश्रुतैकदेशकृतमुपपद्यते औकारवाक्यार्थे। तत्क्लृप्तत्वं विना निराकाङ्क्षवाक्यार्थबोधो नैव तत्र सम्भवति। इत्थं च षण्णामेतेषां क्लृप्तत्वमेवं प्रथमकल्पविषयाणां घृष्टलेखनेऽपि न्यायगम्यं प्रथमकल्पत्वं न व्याहन्यते। अिकारादीनां तु श्रुतेषु इकारादिष्वनुपपत्तेरभावात्कल्पनं प्रतिरुध्यत एवेति न प्रथमं तत्सिद्धिःप्रामाणिकी। व्यञ्जनया विलम्बेन व्यक्तावपि स नैवभवति मीमांसितो न्याय्यः प्रथमः कल्पः। अतः वैधकर्मसु स नैव समर्थस्य विनियोगार्हः। यथा स्मर्यते "प्रभुः प्रथम-कल्पस्य योऽनुकल्पेन वर्तते। न साम्परायिकं तस्य दुर्मतेर्विद्यते फलम्॥" (मनुस्मृतिः ११/३०) मुख्यानुष्ठाने सम्पन्नस्य आपद्विहितेन प्रतिनिधिनानुष्ठानं यदि स्यात्तदा तस्य पारलौकिकमभ्युदयरूपं प्रत्यवायपरिहारार्थं फलं न भवति इति वचनाभिप्रायः कुल्लूकभट्टटीकायाम्। तस्मात् प्रथमकल्पस्य सम्भवादन्यकल्पस्तु नादरणीय इति। अथ लौकिक व्यवहारेषु चेत् पृच्छ्यते तर्हि तत्रापि सतिसंभवे मीमांसितो न्याय्य एव पक्षः प्रयोगार्ह इति प्रथमः कल्पः। अत एव "राजशासनादौ सुलिप्यनपशब्दोक्तिसम्पूर्णावयवाक्षरम्। शासनं राजदत्तं स्यात्सन्धिविग्रहलेखकैः॥" इत्यादि

# मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ**–ओकारातील उजवीकडील, ओकारमात्रेच्या ( म्हणजे अकारमात्रेच्या उजवीकडील मात्रेच्या) मध्यांतून वरती जाणारी (आयता) आणखी एक रेखा देऊन, तिचें वरचे टोंक डावीकडे थोडें वळविलें असतां औकार होतो. औकारांतील '**मध्यगतारेखा**' म्हणजे मधली रेषा ( =अकारमात्रा) हिची देवता '**शक्ति**' होय. 37 मध्यें वरची रेषा २+३ ने व मध्यगता रेखा ४ नें दाखविली आहे.

### मध्यगता रेखा

लक्षणश्लोकाचा अर्थ करीत असतां गजाकार ओकार घ्यावयाचा नसून, **सोळाखडींतील ओकार** घ्यावयाचा आहे, कारण तसें घेतल्याखेरीज, श्लोकांत '**शक्ति**' देवता असणारी '**मध्यगतारेखा**' म्हणून सांगितलेली, 35 मध्यें ४नें दाखविलेली रेषा येऊं शकत नाहीं '**ओकारदक्षमध्ये**' म्हणजे ओकाराचे उजवीकडे मात्राभागामधून '**उर्ध्वगतायता**' म्हणजे वरच्या बाजूस जाणारी ( =आयत होणारी) रेषा हीच '**किञ्चित्सावामतोवक्रा**' म्हणजे डावीकडे थोडी वाकडी केल्यावर ( =तिचे वरचे टोंक डावीकडे वळविल्यावर) ती औकाराची मात्रा होते.

### सदृशांचें विधान

औकाराचें लक्षणांत, ओकारमात्रेंत वरच्याभागीं असणाऱ्या, एकारमात्रारूप प्राप्त भागाशीं सारख्या असणाऱ्या भागांचें ( =सदृशांचें) विधान केलेलें असल्यानें, २+३ ही 37 मधील रेषा, म्हणजेच दुसरी मात्रा, पूर्वोक्तन्यायानें (दीर्घ ॡ मराठी सारांश पहा) डावीकडे कुब्जित होणारी अशी, त्याच प्रकारची ( =सदृशच) प्राप्त होते आणि त्यामुळेंच ओकार व औकारात फरक होतो, तसेंच 'ो' अशी ओकार मात्रा व 'ौ' अशी औकारमात्रा सिद्ध होते.

### स्वरमात्राविषयक नियम

स्वराक्षराप्रमाणें वेळी स्वरमात्रा सांगितल्या-वरून येणारा नियम-व्यञ्जनानन्तर उच्चारण असणारा स्वर लिहावयाचा असल्यास, तो स्वरमात्रा-रूपानें लिहिला पाहिजे. उदा० 'ग् नंतर अ चें उच्चारण' लिहितांना 'ग्अ' असें न लिहितां '॰ + ा = ग' असे लिहिलें पाहिजे 'व+अ = वअ' असें न लिहितां 'क, = क' असें लिहिलें पाहिजे, इत्यादि. हाच प्रयोजनसिद्ध नियम होय. येथें मग '**मध्यगतारेखा**' मात्रा कशी काय सम्भवते? असा प्रश्न उपस्थित होतो. तिला प्रमाण काय? तें सांगतों

स्वरांचे वर्ण लिपि व मात्रा रेषा अशा दोन प्रकारांनीं श्लोकांत सगळीकडे विधान व निरूपण केले आहे हे कोणत्या कारणानें? असा विचार करतां "सोळाखडी बनविण्यासाठी" असें उत्तर प्राप्त होतें. असें न स्वीकारल्यास ग, गा, गि, गी.........वगैरेंचें ठिकाणीं ग्अ, ग्आ, ग्इ, ग्ई.........असें लिहिण्याचा प्रसंग येईल. सोळाखडी बनविण्यासाठीं दोन प्रकारानें विधान केलें आहे असें मानल्यावर मात्रेचा वापर करून सोळाखडी लिहिणें प्रयोजनसिद्ध होतें, व चालू लेखन प्रकाराशीं विसंगति टळतें—

### ज्ञापकानें सर्वांना साधारण नियम

याप्रमाणें होणाऱ्या सोळाखडीत विसर्गापर्यंत आकारादि मात्रांच्या पूर्वी अकारमात्रेचा वापर केला पाहिजे. हेंच '**मध्यगतारेखा**' या पदानें सुचविलें आहे. म्हणून ग, गा, गि, गी.........वगैरें लिहिलें जातें. ठकारवगैरेंतही अन्तर्गत मात्रा **मध्यगता** असल्याचें छत्रिन्यायानें (छत्र्या घेऊन अनेक माणसांचा जमाव असेल आणि जरी त्यामध्यें एक दोन बिगर छत्रीचे असतील तरीही त्या जमावास छत्रीवाल्यांचा जमाव म्हटलें जातें. यालाच 'छत्रिन्याय' म्हणतात) समजावें. म्हणून ग, गा, ‍ि, ‍ी, ‍ु, ‍ू, ‍े, ‍ै गे.........वगैरें लिहिणे होत नाहीं. आ

पासून विसर्गापर्यंत १५ स्वरांच्या मात्रा व्यञ्जनासह लिहावयाच्या असल्यास, तें तें व्यञ्जन अकारान्त ( = पूर्णाक्षररूप ) लिहिलें पाहिजें उदा० ग्+आ = गा असें न लिहितां 'गा' असें लिहिलें पाहिजे. इत्यादि, हा ज्ञापित नियम येथें सांगितला आहे. औकाराचे लक्षणश्लोकावरून ओकारांतील मध्यगता रेखा असणाऱ्या अकारमात्रेचें ज्ञान होतें.

यावर असें म्हटलें जाईल कीं– हा नियम ओ, औकारा पुरताच करावा, सोळाखडींत सर्वत्र करण्याची जरूर नाहीं तर हें प्रतिपादन ठीक नाहीं. कारण ज्ञापकानें सर्वांना साधारण नियम कल्पिण्यांत लाघव आहे आणि तसें करण्यास बाधक कांहीं. वैज्ञानिक देखील याच प्रकारानें प्रकृतिस्थ नियमांचें ज्ञान (Induction) करून घेत असतात. त्या प्रमाणेंच तान्त्रिक लिपि वैज्ञानिक देखील शिवोक्त उदाहरणावरून प्रकृतिस्थ लिपिनियमांचें ज्ञान करून घेत असतात. तात्पर्य ज्ञापकद्वारा समजूत करून देऊन भगवान् शङ्कर तें सांगत असलेल्या लिपिशास्त्राचें प्रकृतिस्थत्व स्पष्ट सांगतात. म्हणून सोळाखडींत सर्वत्र असें केलें जाईल. असें न केल्यास वर दिल्याप्रमाणें सोळाखडींत रूपे लिहावीं लागून स्थितगति सिद्ध होणार नाहीं. स्थिताची गतीच विचारणीय होय. स्थितशिष्टगतीनेंच शास्त्राचें तात्पर्य जाणावयाचें असतें. हा नियम सर्व भारतीय लिपींत अनुसरला जात असल्याचें त्या त्या लिपींचा विचार करतांना स्पष्ट होईल.

### वचनप्राप्ताचें सर्वाधिक नियामकत्व

यावर असा प्रश्न येईल कीं– क प्रमाणें अ ची सोळाखडी अ, आ, अि, अी, अु, अू, अे, अै, ओ, औ, अं, अः = वगैरें का करूं नये ? याचें समाधान असें कीं–प्रत्यक्ष वचनावरून रूपें येत असतां स्वरमात्रा नियमावरून येणाऱ्या रूपाची प्रथम कल्पना होऊ शकत नाहीं. म्हणून त्यांना प्राधान्य (Priority) नाहीं. औकार वचनावरून ओकारांतील मध्यगता रेषा येते व सोळाखडींतील ओकार बनतो. आणि सोळाखडींतील ओकारास गजाकार ओकाराची आकाङ्क्षा नाहीं. तात्पर्य वचनप्राप्त लेखनप्रकारास अग्रक्रम् आहे. म्हणून वैध कर्मांत तन्त्रोक्त न्याय्य लिपिलेखनाचा अवलंब करणें मीमांसान्यायसिद्ध असल्यानें अनिवार्य आहे. अक्षरारंभ करितांनाही बालकांस तोच प्रकार शिकविला पाहिजे.

### कल्पित लिपिप्रकार केंव्हा वापरावेत ?

यथोक्तरीति शक्य नसल्यास वार्ता, दण्डनीति, राजनैतिक कार्यादिकांत कल्पित लिपिप्रकार वापरण्यास राजनीतिशास्त्राची अनुमति आहे. केवळ यन्त्रपराधीनतेमुळे बदल करणें योग्य नाहीं. यन्त्र आपल्या करितां आहे, आपण यंन्त्रासाठीं नव्हे हें ध्यांनीं घेणें जरूर वाटतें.

इकारादिकांची सोळाखडी होत नसल्यानें शंकासमाधान नाहीं, अनुस्वार व विसर्ग सर्व स्वरांस उपलक्षणानें लागू होतात, तेथेंही सोळाखडी नसल्यानें अकारमात्रा पूर्वी लिहिण्याची गरज नाहीं.

## अं

39
अं, इं इत्यादि—
**अकाररूप शीर्षे तु दक्षिणे बिन्दुरूपिणी । ब्रम्हा विष्णुश्च क्रमशस्तासु तिष्ठति ॥ या तु बिन्दुमयी रेखा सैवाद्या शक्तिरूपिणी ॥**

## मराठी सारांश

अकार लिहून त्याचे उजवीकडे डोक्यावर एक बिन्दू दिला म्हणजे 'अं' कार होतो. 'बिन्दुमयीरेखा' या पदानें बिन्दु सांगितला आहे. हा बिन्दु अनुस्वार या नावाने ओळखला जातो.

## अः

40
अः, इः इत्यादि
**अकाररूपदक्षे तु द्विबिन्दुरध ऊर्ध्वतः ।**
**ब्रह्मेशविष्णवस्तासु मात्राशक्तिः समीरिता ॥ बिन्दुद्वयान्विता रेखा सैवाद्या शक्तिरीरिता ॥**
अत्रोभयत्र अकाररूपेति सर्वेषां स्वराणामुपलक्षणमित्युक्तमेव । इति स्वराः ॥

## मराठी सारांश

अकारामध्यें उजव्या बाजूस खालीवर दोन बिन्दु दिल्यावर अः कार होतो. हे दोन बिन्दु विसर्ग या नांवानें ओळखले जातात.
अनुस्वार आणि विसर्ग यावरून उपलक्षणानें सर्व स्वरांस घ्यावेत हा अभिप्राय असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे.
या प्रमाणें येथें स्वरविषयक शास्त्रार्थ समन्वय संपला.

प्रकरण चवथें

## वर्णोद्धारतन्त्रशास्त्रार्थ – व्यञ्जने

## "क"

बिन्दुस्फोटने–

१) वामरेखा (३ अपेक्षयावामा). २) दक्षिणरेखिका. (३ अपेक्षयैव). ४) मात्रा (संयुक्ते लुप्यते). ५) कुण्डली. ७)सर्वं मिलित्वाङ्कुशाकारा. ६) मध्यशून्यम्. ५) कदम्बगोलकाकार.

41, 42, 43, 44, 45, 46

१ २ ३ ४
वामरेखाभवेद्ब्रह्मा विष्णुर्दक्षिणरेखिका। अधोरेखा भवेद्रुद्रोमात्रा साक्षात्सरस्वती॥
४ ४ ६ ५
कुण्डली चाङ्कुशाकारा मध्यशून्यं सदाशिवः। कदम्बगोलकाकारं ककारं भावयेत्सुधीः॥

वामरेखेति। बिन्दुस्फोटने ३ अधोरेखा (या भवेद्रुद्रः तदपेक्षया) १) वामरेखा (या भवेद्ब्रह्मा) २ दक्षिणरेखिका (या भवेद्विष्णुः तथा योजनीया यथा) इत्येताभ्यामेवककारमात्रा (साक्षात्सरस्वती स्यात्) ४ कुण्डली चाङ्कुशाकारा (स्यात्) ५ मध्यशून्यं (सदाशिवः स्यात्) एवं ४ कदम्ब गोलकाकारं ककारं सुधीः भावयेदित्यन्वयः मन्तव्यः। अकारमात्रा। 'वाक्यं', 'पक्वं' प्रभृतिषु तस्या एवलोपात् पक्वं इत्येवं लेखनेऽपि इत्येताभ्यामेव अकारो मन्तव्यः। सर्वं मिलित्वा अङ्कुशाकारत्वं मध्यशून्यत्वं कदम्बगोलकारत्वं चेति। बिन्दुस्फोटने अधस्तनवृत्तार्धाभ्याम् ककारो भाव्यत इति साक्ष्यं तमिल ककारेण ज्ञाप्यते यतः 41 मध्ये वामोपरितनवृत्तार्धमभिगृहीत्वां तत्र स्वीयं ककारं ते कुर्वन्ति।

## मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ** – बिन्दुस्फोटनांत डावीकडे एक रेषा, उजवीकडे एक रेषा आणि या दोहोंचे मध्यें एक खालीं जाणारी रेषा दिली असतां 'क' होतो. हा लक्षण श्लोकाचा सरलार्थ आहे.

### आकृत्यांचे स्पष्टीकरण

आ–41 मध्ये बिन्दुस्फोटनांत 'क' कसा होतो हें दाखविलें आहे. आ–42 मध्यें वामरेखा (= डावीकडील–श्लोकांत सांगितलेली रेषा) भूमिसमांतर लिहून खालचीं दोन वृत्तार्धे घेऊनच 'क' बनविला आहे, आ–43 मध्येंही खालची दोन वृत्तार्धे घेऊनच 'क' बनविला आहे, परंतु वामरेखा व दक्षिणरेखा या तिरक्या, वाम अधोवृत्तार्धाचें खालचें टोंक व दक्षाधोवृत्तार्धाचें वरचें टोंक जोडणाऱ्या, अशा लिहिल्या आहेत. १ वामरेखा २ दक्षिणरेखा ३ अधोरेखा ४ कुण्डली. या प्रमाणें आकृतींत दाखविलें आहे.

### कदंबगोल–अङ्कुश–मध्यशून्य

४नें कुण्डलाकार अथवा कदम्बगोलकाकार होतो. ५ नें मध्यशून्य दाखविलें आहे. या प्रमाणें होणारा ककार अङ्कुशाकार, व कदम्बगोलकाकार आहे. आजही प्रचलित ककार लेखनांत हें सर्व दिसून येतें. क्रमांक न दिलेल्या आकृतींत सर्व श्लोकप्रतिपादित भाग आंकडे देऊन दाखविले आहेत. त्या आंकड्यांचा श्लोकांतील आंकड्यांशी संबंध नाही.

### ककार मात्रा विचार

आ. 44 मध्यें ४ ने अकारमात्रा दाखविली आहे. ती मात्रा होय. कारण 'वाक्य' 'पक्व' वगैरे शब्दांत तिचाच लोप होतो. पक्व असें लिहिण्यात चिन्हानें दर्शित भाग वकार दाखवितो. बिन्दुस्फोटनांत खालचीं दोन वृत्तार्धे घेऊन ककार करावा या विषयीं तमिळ ककार साक्ष आहे. 41 मध्यें दाखविल्यानुसार खालचीं दोन वृत्तार्धे आणि डावीकडील वरचें वृत्तार्धही घेऊन तामिळ लोक त्यांचा 'क' बनवितात याचा विस्तार पुढें येईलच.

# 'ख'

47, 48, 49

१ २ ३
**शिवरूपा वामरेखा दक्षरेखा प्रजापतिः। अधोरेखा विष्णुरूपा साक्षाद्ब्रह्मस्वरूपिणी ॥**
४ ५
**वामाद्वामगता रेखा वह्निरूपा च सा स्मृता। मात्रा कुण्डलिनी साक्षात्खकारः पञ्चदैवतः ॥**

शिवरूपेति। बिन्दुस्फोटने १ वामरेखा (शिवरूपा) २ दक्षरेखा (प्रजापतिः) ३ अधोरेखा (विष्णुरूपा) ४ वात्माद्वामगतारेखा (साक्षाद्ब्रह्मस्वरूमिणी) ५ मात्राकुण्डलिनी (सा च वह्निरूपा स्मृता) खकारः (साक्षात्पञ्चदैवतः) इत्यन्वयः।

अत्र 49 चित्रे वामान्मात्रा कुण्डलिनी इत्यप्यन्वयः इति कश्चित् पक्षः बिन्दुद्वारा प्रदर्शितः। स च अशोक लिप्यवयवप्रदर्शनस्य योजकरेखाकल्पनया ऐच्छिकशिरोरेखाद्वारावोपपत्तेर्नातीवापेक्षितः। इह साक्षाद्ब्रह्मरूपिणी इत्यस्य वामाद्वामगता रेखेत्यनेनान्वयः। अधोरेखा विष्णुरूपेत्यत्र देवताकाङ्क्षाया विष्णुना शान्तत्वात्। एवंच वह्नीत्यादि मात्रायामन्वेति। तथाच कुण्डलिनी कुण्डलवतीत्यर्थः पृथग्वह्निदेवतोक्तेः। देवता प्रतिपादनाकाङ्क्षाभावात्। मात्राकुण्डलिनीत्युक्तेर्नारम्भे कुण्डलम्। मात्रास्थानयोः दक्षार्धवृत्तयोः कस्यान्तेऽपि विनिगमकाभावात् मध्ये कुण्डलम्।

अथैवं ख इत्यपेक्षया र व लेखने आकृति वैलक्षण्यं '४ वामात् वामगता रेखा' इत्यनेन 'ख' तथा 'ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा त्रिकोणाधोगता हि सा इत्यनेन 'र' इत्यस्य वचनात्प्राप्तं स्पष्टम्।

अत्र ऊर्ध्वाधः क्रमेण प्रथमप्रतिपादितवशादुपरिवामस्य शिरसो निर्गत्य, अधो वामस्य शिरोगता, स्वस्यैव स्वगतिकर्मत्वपरिहारार्थं वक्रा बाह्यपार्श्वापेक्षया लाघवादन्तर्दक्षपार्श्वं गता = वामाद्वामगता इ. सुधीभिरूह्यम्।

## मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत डावीकडील वरचें वृत्तार्ध म्हणजे '**वामरेखा**' उजवीकडील वरचें वृत्तार्ध म्हणजे '**दक्षरेखा**' आणि खालचीं दोन वृत्तार्धे म्हणजे '**अधोरेखा**', या प्रमाणे '**वामरेखा दक्षरेखा व अधोरेखा**', या पदांचा अर्थ घ्यावयाचा आहे. डावीकडील वरच्या वृत्तार्धाचे वरच्या टोंकापासून डावीकडे जाणारी रेषा काढावयास '**वामाद्वामगता**' या पदानें सांगितले आहे. '**मात्रा कुण्डलिनी**' या पदानें कुण्डल धारण करणारी, उजवीकडील दोन वृत्तार्धांना घेऊन बनणारी मात्रा सांगितली आहे–अर्थात् या दोन वृत्तार्धांचें मधें कुण्डलाकार भाग, त्यांना जोडून काढावयास सांगितला आहे. मात्रारूप जीं दक्षार्धवृत्तें त्या पैकीं कोणाचें शेवटीं या विषयीं स्पष्ट निर्देश श्लोकांत नसल्यानें दोघांचे मधें कुण्डलाकार भाग घेतला आहे. एवढें काढल्यावर 'ख' कार होतो.

### अशोकलिपि ख

आ 47 मध्यें 'ख' चा मौलिक उद्भव दाखविला आहे. तेथें १ वामरेखा, २ दक्षरेखा, ३ अधोरेखा, ४ वामाद्वामगतारेखा, आणि ५ मात्रा कुण्डलिनी, या प्रमाणें भाग दाखविले आहेत. 48 मध्यें मात्रा सरळ रेषेने लिहून ख लिहिला आहे. 49 मध्यें '**वामान्मात्राकुण्डलिनी**' असा अन्वय घेऊन होणारी आकृति टिंबांनी रेषा लिहून दाखविली आहे. अशा प्रकारे ऐच्छिक शिरोरेषा वा योजक रेषा घेऊन होणारी आकृति अशोकलिपींतील एका प्रकारचा खकार होण्यास उपयोगीं आहे.

### खकारमात्रा विचार

ऐच्छिक शिरोरेषा वा योजकरेषा घेऊनच तें होऊं शकत असल्याने असा अन्वय अतीव अपेक्षित नाहीं लक्षण श्लोकांतील '**कुण्डलिनी मात्रा**' याचा अर्थ '**कुण्डलिनी मात्रा**' म्हणजे कुण्डल धारण करणारी मात्रा असा आहे. मात्रेंत कुण्डलाकार भागाचा समावेश नाहीं कारण 'अख्खरिका' वगैरे शब्दांत कुण्डलाचा लोप होत नाही.

### वामाद्वामगता वक्राकारच कां ?

आ. 47 मध्यें ४ नें दाखविलेली '**वामाद्वामगता रेखा**' यथादर्शित वक्राकारच कां लिहावयाची, सरळ कां लिहूं नये ? अशी सरळ लिहिली तर स्वतःच स्वतःकडे जाणें या सारखी स्थिति होईल. कारण सरळ लिहिण्यास डावीकडील वरच्या वृत्तार्धाचें खालच्या टोंकास स्पर्श करून डावीकडील खालच्या वृत्तार्धाच्या वरच्या टोंकास ती मिळेल. गतीचें कर्मत्व कर्त्यांत स्वतःमध्येंच मानणें व्युत्पत्तिविरुद्ध आहे.

## 'ग'

50, 51, 52,

१ २ ३
अध: कुञ्चित रेखा या गाणेशी सा प्रकीर्तिता । ततो दक्षगता या तु कमला तत्र संस्थिता ॥ अधोगता ततो या तु तस्यामीशं सदा वसेत् ॥

अध इति । बिन्दुस्फोटने १ अधःकुञ्चित रेखा (या गाणेशी सा प्रकीर्तिता) २ ततः दक्षगता (या तु कमला तत्र संस्थिता) ३ ततः अधोगता (या तु तस्यामीशः सदावसेत् ) गकार इत्यन्वयः ।

# मराठी–सारांश

### गकारविचार

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत '**अध: कुञ्चित रेखा**' '**ततः दक्षगता**' आणि '**ततः अधोगता**' या तीन रेषा काढल्यावर गकार होतो. "अधः कुञ्चित रेषा" म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचे वृत्तार्ध, योजक रेषा व खालचें वृत्तार्द्ध; "ततो दक्षगता" म्हणजे "अधःकुञ्चित" रेषेच्या वरच्या टोकाकडून उजवीकडें जाणारी रेषा; "ततः अधोगता" म्हणजे दक्षगता रेषेपासून खालीं जाणारी रेषा–ही बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील दोन वृत्तार्द्धांनीं बनतें. आ. 50, 51, व 52 मध्यें '**अधः कुञ्चित रेषा**' १ नें '**ततो दक्षगता**' रेषा २ नें व 'ततो अधोगता' रेषा ३ नें दाखविली आहे. 'अधः कुञ्चित रेखा' म्हणजे स्वतःचे खालचें भागांत कुञ्चित होणारी रेषा. ही रेषा डावीकडील वरचें वृत्तार्ध आणि त्या दोहोंना जोडणारी वक्राकार रेषा या सर्वांची मिळून बनते.

आ. 51 मध्यें, 50 मध्यें २ व ३ नें दाखविलेल्या रेषा सरळ रेषेचें स्वरूपांत लिहिल्या आहेत. आ. 52 मध्यें आजचा प्रचलित लेखनप्रकार दाखविला आहे. त्यामध्यें आ. 50 मधील डावीकडील वरचें वृत्तार्ध सरळ करून लिहिलें आहे.

## 'घ'

53 (अ), 53 (ब), 54 (अ), 54 (ब),

१ २ ३ ४
**सृष्टिरूपा वामरेखा किञ्चिदाकुञ्चिता ततः । कुण्डलीरूपमास्थाय ततोऽधोगत्य दक्षतः ॥**

५ ६
**अतः ऊर्ध्वगता रेखा शम्भुर्नारायणस्तयोः । ब्रह्मस्वरूपिणी देवी मात्रा शक्तिः प्रकीर्तिता ॥**

सृष्टिरूपेति । बिन्दुस्फोटने १ वामरेखा २ ततः किञ्चिदाकुञ्चिता ३ ततः कुण्डलीरूपमास्थाय ४ दक्षतः अधोगत्य ५ अतऊर्ध्वगता ६ मात्रा = घकारः इत्यन्वयः । दक्षत इत्यस्य अधोगत्येत्यनेन सह अन्वये 53 (अ), 53 (ब) स्पष्टमुदाहरणम् । दक्षतऊर्ध्व गतेत्यन्वये 54 (अ), 54 (ब) स्पष्टमुदाहरणम् । 55 दक्षत अधोगत्य एकस्यामेव रेखायां तथैव अत दक्षत एव ऊर्ध्वगतेत्यन्वय उदाहरणम् ।

# मराठी सारांश

### घकारविचार

**लक्षणश्लोकाचा अर्थ**– बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरच्या वृत्तार्धापासून खालच्या टोंकास एक थोडी कुञ्चित रेषा काढून डावीकडील खालच्या वृत्तार्धास जोडून घ्या. त्याच्या खालच्या टोंकापासून उजवीकडे खाली जाणारी रेषा काढा व तीच रेषा वळवून वर न्या व उजवीकडील खालच्या वृत्तार्धाच्या खालच्या टोंकास जोडा. एवढें केल्यावर 'घ' कार होतो. '**वामरेखा**' या श्लोकांतील पदानें बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध घ्यावयाचें आहे; '**ततः किञ्चिदाकुञ्चिता**' या पदानें त्याचेखालीं काढावयाची कुञ्चित रेषा घ्यावयाची आहे.

'कुण्डलीरूपमास्थाय' या पदानें डावीकडील खालचें अर्ध घ्यावयाचें आहे. डावीकडील दोन वृत्तार्धांना जोडणारा कुञ्चनांश आहे. 'ततः दक्षतः अधोगत्य' या श्लोकांतील पदानें डावीकडील खालच्यावृत्तार्धाचें खालच्या टोंकापासून निघून उजवीकडे खालीं जाणारी रेषा सांगितली आहे. 'अतऊर्ध्वंगता' या पदाने हीच रेषा वर नेण्यास सांगितली आहे. या दोन्हीं रेषा 53 (अ), 53 (ब) मध्यें दाखविल्याप्रमाणें छित्वा कुञ्चनाने व 54 (अ), 54 (ब) मध्यें दाखविल्याप्रमाणें अस्पृष्ट्वा कुञ्चनाने अशा दोन प्रकारानें लिहितां येते. 54 (अ) अशोक लिपींतील 'घ' चे प्रतिपादनास उपयोगी पडणारी असल्याने दिली आहे. कोणताही प्रकार स्वीकारला तरी श्लोकाच्या प्रतिपादनास बाध येत नाहीं. 'मात्रा' या पदाने 'अतऊर्ध्वंगता' या रेषेचे वर देण्याची रेषा सांगितली आहे. ती बिन्दुस्फोटनांतील दोन अर्ध घेऊन बनते. 53 (ब) व 54 (ब) मध्यें 'मात्रा ' सरळ रेषेचे स्वरूपांत लिहिली आहे.

आकृतीमध्यें वामरेखा १ नें, ततः किञ्चिदाकुञ्चिता २ नें, कुण्डलीरूपमास्थाय ३ ने, ततो अधोगत्य दक्षतः ४ नें अत ऊर्ध्वंगता ५ नें, व मात्रा ६ नें, दाखविली आहे. आज प्रचलित असणाऱ्या 'घ'कार लेखनांत ४ व ५ एकमेकींत मिळवून टाकून ६ या मात्रेशीं सलगपणें स्पृष्ट्वा कुञ्चनानें लिहिल्या जातात. हें 55 मध्यें दाखविलें आहे.

## ङ

ऊर्ध्वाधःक्रमतो रेखा (१) किञ्चिदाकुञ्चिता (२) ततः । अधोगता कुण्डली (३) तु मात्रा शक्तिस्वरूपिणी ॥ रेखात्रयेषु ब्रह्मेशविष्णवः सन्ति देवताः ॥

56 57(क) 57(ख)

ऊर्ध्वाधइति । बिन्दुस्फोटने १ उर्ध्वाधः क्रमतो रेखा, २ ततः किञ्चिदाकुञ्चिता ३ अधोगता कुण्डली तु मात्रा (इति रेखात्रयमेव) = ङ्‌कार इत्यन्वयः । अधोगता सव्यक्रमात् द्वितीय पंक्तौ वामाधोगता । अत्र १, २, ३ इति तिस्र एव रेखा वचनोक्ता । ४ न वचनोक्ता । तथापि डकारात् स्फुटवैलक्षण्यार्थं दीयते । अत्र ३ अकार मात्रा १ स्याद्योगतेयुक्ता वाङमयमित्यादौ संयुक्ते तस्या एव लोपात् । अत्र मध्यपदं नास्ति अतः वामोपरिवृत्ताध्र्देन १ करणं, तदनुसारेण २, ३ नियोजनं सिध्यति । एवं च दक्षाधोवृत्ताध्र्दस्यावशिष्टस्य ४ 'ऐच्छिक बिन्दुरूपे नियोजनं शक्यम् । एवं क्रम परित्यागे कारणाभावादित्थं रूपस्य सर्वैः स्वीकृतत्वात् "मोडी" "ङकारे" तथा 'गुर्जर' लिप्यां दर्शनाच्च स्थितगत्या विनिगम्यते । एवं च न विपरीतदिगभिमुखत्वम् । इत्थं रूपस्य सर्वैः स्वीकृतत्वदर्शनात् स्थितगत्या विनिगम्यते । वस्तुतस्तु दकारादाविव सर्वानुस्यूत समष्टिबिन्दु व्यटिबिन्दुद्वयावस्थित्यानुगुण्यान्न विपरीतदिगभिमुखत्वम् । तथा च दकारादौ अशोक लिपेः विपरीतदिगभिमुखत्वम् घृष्टमेव ।

मात्रा शक्तिस्वरूपिणीति – पृथक् मात्रादेवतोक्तेः तत इतर रेखात्रये देवत्रयमिति ज्ञायते । तथा च अनेन चतुर्थी रेखापि सूचिता भवति । सा चतुर्थी बिन्दुस्फोटने चेल्लभ्या तर्हि डकाराद्वैक्षण्यार्थं दक्षोपरिवृत्ताध्र्दाद्यथास्थानं दक्षितात्साधिता बिन्दुरूपा भवतु । एवं सति 56, 57(क) चित्रयोर्यथादर्शित ङ्‌कारः प्रसिध्यति । इत्थं रूपस्य 'मोडीलिपि' 'गुर्जरलिपि' प्रभुतिषु दर्शनात्स्थितगत्यविरोधाच्च देवनागर्यामनुमतत्वमेव ।

यदि च सा सूचिता चतुर्थी बिन्दुस्फोटनान्नीत्वोपरि कल्प्या तर्हि एव 57(ख) चित्रे स्थितशिष्टगत्या दर्शित 'बालबोध' ङ्‌कार रूपस्य सिद्धिः । अतः शिरोरेखासहितस्यास्यैव 'तमिळ्' ङ्‌कारोपपादकत्वमुपपद्यतेतरामिति चेत्सैव रेखा चतुर्थीति गणनीयास्तु । अशोक ङ्कारोभयथाप्येकदेशादुपयुज्येतैवेति । द्वितीयमते वैलक्षण्याय बिन्दुरिच्छाकल्प्यः । शोभायै शिरोरेखावत् ।

ऊर्ध्वादध ऊर्ध्वाध इति । विगृह्य ऊर्ध्वादारभ्यारम्भस्थलस्याधोभागं प्राप्य तत्र ईषदाकुञ्चनं तस्यामेव रेखायां कृत्वा सैवाधो नीत्वा कुण्डल्याकारा कृता इति। तत्कुण्डलाकारमेव मात्रा, यस्याः स्वरूपं शक्तिरिति कथ्यते तत्र विशेषणविशेष्यसंबंधो वर्तते न तद्रेखाप्रतिपादकपदमिति स्फुटा निष्पत्तिः पंक्तिद्वयेन भविष्यति, यत्तृतीयपंक्तौ परिगणकशद्वेन रेखात्रेयष्विल्यनेतानुमता वर्तते । अतः त्रिभिरेवरेखाभिः स्वरूपनिष्पादनं न्याय्यं ज्ञायते, अन्यश्लोकेषु सर्वत्र स्वतंत्रपंक्तावसंदिग्धतया देवता प्रतिपादनं वर्तते इति च । तस्माद्यथाधो प्रदर्शितं बिन्दुस्फोटनरेखातः ङ्‌कारनिष्पादनमिति ।

## मराठी–सारांश

1 2 3

'उर्ध्वाध' या लक्षण श्लोकानें ङकार लेखन सांगितलें आहे.

बिन्दुस्फोटनांत १ ही 'ऊर्ध्वाधःक्रमतो रेखा' आहे, २ ही "ततः किञ्चिदाकुञ्चिता रेखा" आहे व ३ ही 'अधोगता कुण्डली' यानें सांगितलेली 'मात्रारेखा' आहे. या प्रमाणे तीन रेषांनी ड.कार होतो. असा लक्षणश्लोकाचा अन्वय आहे.

लक्षण श्लोकाचे दुसऱ्या ओळींत उल्लेखिलेली 'अधोगता......' ही रेषा डावीकडून उजवीकडे = (सव्यक्रमानें) बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालच्या वृत्तार्धास घेऊन बनते. येथें १, २ व ३ या तीनच रेषा सांगितल्या आहेत. ४ नें दाखविलेली रेषा लक्षणश्लोकांत सांगितलेली नाहीं. तरीही डकारापासून वेगळेपणा दाखविण्याकरितां दिली जाते.

येथें ३ नें दाखविलेली रेषा ही मात्रा ( = अकारमात्रा) आहे. ही १ नें दाखविलेल्या रेषेचे सरळ खालीं आहे. वाङमय वगैरे शद्वांत हिचाच लोप होतो.

### स्थितगतींचे विनिगमन

लक्षणश्लोकांत 'मध्यदप' नाहीं म्हणून बिन्दुस्फोटनातील डावीकडील वरचें वृत्तार्ध घेऊन १ ही रेषा करणे आणि २, ३ रेषा त्या प्रमाणे तदनुसार करणें सिद्ध होतें. त्याच प्रमाणें बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरचे वृत्तार्द्ध घेऊन ४ या रेषेनें दर्शित ऐच्छिक बिन्दुनियोजन शक्य आहे. मोडी व गुजराती लिपींत असें ङकाररूप असल्यानें ही स्थितिगति असल्यानें त्या स्थितिगतीस अनुसरणारा हा रेखाक्रम त्यागण्यास कारण नाहीं. या प्रमाणें असें रूप सर्वस्वीकृत असल्यानें स्थितगतीचें विनिगमन आहे.

### अशोक ङकार घृष्टच

वस्तुतः दकाराप्रमाणें समष्टि बिन्दु व दोन व्यष्टिबिन्दु यांचे स्थितीनुसार रेखाटन केल्यास उलट दिशेस तोंड ( = विपरीदिगभिमुखत्व) होत नाहीं. अशोकलिपी दकारांत असलेलें विपरीतदिगभिमुखत्व हें घृष्टच आहे.

### वैलक्षण्यार्थ बिन्दू

मात्रेची देवताशक्ति असा वेगळा उल्लेख असल्यानें इतर तीन रेखांचे ठिकाणीं उल्लिखित तीन देवता आहेत. यानें चवथी रेषाही सूचित होते. ती चवथी रेषा बिन्दुस्फोटनांतूनच यावयाची असल्यास उजवीकडील वरचें वृत्तार्द्ध बिन्दुस्वरूप करून बनतें. त्यामुळे डकाराशीं वेगळेपणा ही साधला जातो. या प्रमाणें 56, 57(क) येथें दाखविलेला ङकार बनतो. हें ड.काररूप 'मोडी', 'गुजराती' इत्यादिकांत दिसत असल्यानें व स्थितगतीस अविरुद्ध असल्यानें देवनागरींत अनुमत आहेच.

### तमिळ ङकाराची उपपत्ति

जर ही सूचित चवथी रेषा बिन्दुस्फोटनांतून घेऊन शिरोभागीं कल्पिल्यास 57(ख) येथें दाखविलेलें बालबोध ड.काररूप होतें. याला घेऊन 'तमिळ्' ड.काराची उपपत्ति असल्यानें तीच रेषा चवथी म्हणावी लागते. अशोकलिपि दोन्हीस घेऊन होते. दुसऱ्या मतानें डकाराशीं भेद करण्यासाठीं बिन्दु 'अकल्प्य' आहे. शिरोरेखेप्रमाणें शोभेसाठीं आहे.

### कुण्डलाकार रेषा हीच मात्रा

'ऊर्ध्वात् अधः ऊर्ध्वाधः' असा समासाचा विग्रह केल्यास वरून सुरुवात करून, जेथून सुरुवात केली त्या स्थळाचे खालच्या अंगास येऊन तेथें त्याच रेषेचें किञ्चित् आकुंचन करून तीच आणखी खालीं नेऊन कुण्डलाकार करणें असा अर्थ आहे. ही कुण्डलाकार रेषाच मात्रा असून तिची देवता 'शक्ति' आहे. येथें मात्रा आणि शक्तिस्वरूपिणी या शब्दांचा विशेषणविशेष्यसंबंध आहे. त्यास रेखाप्रतिपादकत्व नाहीं. असें लक्षणश्लोकाचे दुसऱ्या ओळीवरून दिसतें; तिसऱ्या ओळींत 'रेखात्रयेषु' असा परिगणक शद्व आला आहे. त्यावरूनही यास बळकटी येते.

म्हणून तीनच रेषांनीं ड.कार बनविणें न्याय्य आहे. अन्य श्लोकांत स्वतंत्र ओळींत असंदिग्धपणें देवता सांगितलेल्या आढळतात. म्हणून आकृतींत दाखविल्यानुसार ड.कार करणें इष्ट होय.

1 2 3

## 'च'

58, 59, 60 १ २ ३ ४

वार्ताकुवर्तुलाकार ऊर्ध्वाधः क्रमतो गतः। रेखात्रयेषुचन्द्राग्निसूर्यास्तिष्ठन्ति नित्यशः॥ शक्तिर्मात्रा तु विज्ञेया ध्यानमस्य प्रचक्षते ॥

वार्ताकु इति । बिन्दुस्फोटने ऊर्ध्वाधः क्रमतो रेखात्रयेषु गतः वार्ताकुवर्तुलाकारःच चकारः मात्राच । १, ३ रेखे तथा योजनीये यथा उक्ताकारलक्षणं स्यादिति । रेखात्रयेषु = त्र्यवयवकरेखासु इत्यर्थः । 58, मूले मौलिकम् । 59 मात्रा सरल रेखया स्थिता । 60 चित्रे रेखापि सरलीकृता ।

# मराठी सारांश

### चकारविचार

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत डावीकडील वरच्या अर्धवृत्ताच्या खालच्या अंगाकडून उजवीकडे, उजवीकडील वरच्या अर्धवृत्ताच्या टोंकाकडे जाणारी एक तिरकी रेषा आणि डावीकडील खालच्या अर्धवृत्ताचें खालच्या टोंकाकडून उजवीकडे जाणारी आणखी एक तिरकी रेषा काढल्यावर 'च' कार होतो. आ. 58 मध्यें बिन्दुस्फोटनांत 'च' कसा होतो हें दाखविलें आहे. **'वार्ताकुवर्तुलाकार'** म्हणजे वांग्याप्रमाणे आकार असणारा, असें 'च'काराचें लक्षण श्लोकात सांगितलें आहे.

हा वांग्याचा आकारावरून खालीं क्रमानें असणाऱ्या तीन रेषांनीं होतो. या रेषा म्हणजे 58 मध्ये १ नें दाखविलेली रेषा, बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालच्या अर्धानें होणारीं २नें दाखविलेली रेषा आणि ३नें दाखविलेली रेषा–या तीन रेषा काढून ४ नें दाखविलेली बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील दोन वृत्तार्धांनी बनणारी मात्रा केल्यावर चकार होतो. 59 मध्यें मात्रा सरळ रेषेनें लिहिली आहे. 60 मध्यें आकार असणारा असें 'च' काराचे लक्षण श्लोकांत वांग्यांप्रमाणें १ ही रेषाही सरळ करून लिहिली आहे. हा आज प्रचलित 'च' आहे.

## 'छ'

61 62 63 64

१ २ ३
**ऊर्ध्वादधोगतारेखा कुञ्चिता कुण्डली ततः । पुनश्चाधोगता तासु सन्ति ब्रह्मेशविष्णवः ॥**

ऊर्ध्वेति । बिन्दुस्फोटने १ कुञ्चिता २ ततःकुण्डली ३ पुनश्चाधोगता ४ = छकार इत्यन्वयः ।

अत्र ५ बिन्दुस्फोटनादुपात्तं न वचने दृष्टं केचिन्न लिखन्ति । केचिच्च 63, 64 चित्रयोरिव ४ रेखानाधो बहिरवतारयन्ति । न तेन कोऽपि विरोधः तथैव अशोकलिपिसम्पादनानुगुणम् ।

# मराठी–सारांश

### छकार विचार

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत वरून खालीं जाणारी कुञ्चित होणारी, कुण्डलाकार होणारी व पुनः खालीं जाणारी अशा रेषा काढल्या असतां छकार होतो.

आ. 61 मध्ये बिन्दुस्फोटनांत 'छ' कसा होतो हें दाखविलें आहे, 62 मध्यें तोच वेगळा लिहून दाखविला आहे. **'ऊर्ध्वादधोगता'** म्हणजे वरून खालीं जाणारी रेषा, ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध होय. ही आकृत्यांत १नें दाखविली आहे. 'कुञ्चिता' या पदानें १ नंतर काढावयाची कुञ्चित ( = चोंचदार) रेषा सांगितली असून ती २ नें दाखविली आहे. '**कुण्डलीततः**' या पदानें २ नंतर काढावयाची कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील व उजवीकडील खालची वृत्तार्धे व त्यांना जोडणारा रेषा भाग या सर्वांची मिळून बनते. ही ३नें दाखविली आहे. २ हा कुञ्चित भाग १ व ३ चें मध्यें येतो. '**पुनश्चाधोगता**' या पदानें पुनः खालीं जाणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालच्या अर्धाचे वरच्या टोंकापासून निघून खालीं जाते ही रेषा ४ नें दाखविली आहे. एवढें केल्यावर लक्षणश्लोकानुसार छकार होतो.

• • •

### अशोकलिपि छ

आ. 63 व 64 मध्यें दाखविल्यानुसार **'पुनश्चाधोगता'** ४ ही रेषा कोणीं कोणीं खालीं न उतरतां लिहितात व बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरच्या अर्धानें ५ ही रेषा करतात. याला वचनाचा विरोध नाहीं. **'पुनश्चाधोगता'** रेषाखालीं न उत्तरविणें अशोकलिपीत उपयोगी आहे.

आ. 62, 63, 64 हे प्रचलित देवनागरी छ दाखविले आहेत, पैकीं 64 प्राधान्येंकरून चालू मुद्रणांत वापरला जातो. त्याचे उजवीकडें (६२) (६३) (६४) आकृतींत छकार लेखनाचे कांहीं प्रचलित धृष्टलेखन प्रकार दाखविले आहेत.

## 'ज'

65 (अ), 65 (ब), 66, 67 (अ), 67 (ब)

**उर्ध्वाधः कुञ्चिता रेखा तासु ब्रह्मेशसंविभुः । वाग्देवी कमला नित्या द्विधा मात्रा प्रकीर्तिता ॥**

उर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने उर्ध्वाध १ कुञ्चिता रेखा २. ३ द्विधा मात्रा ४ = जकारः। अधस्तन वृत्तार्धद्वयं द्विधा मात्रा कर्तुं सन्निधाप्यते ।

# मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत वरून खालीं येणारी रेषा, कुञ्चित रेषा व दुहेरी मात्रा दिल्यावर जकार होतो.

65 (अ) मध्यें बिन्दुस्फोटनांत जकाराचा उद्भव दाखविला आहे. 65 (ब) मध्यें तो मांडणीजवळ घेऊन लिहिला असून, लक्षण श्लोकांत सांगितल्यानुसार रेषा दिली आहे.

### जकाराची द्विधा मात्रा

**'ऊर्ध्वाधः'** या पदानें 65 (ब) मधील १ ही रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचे अर्ध होय. 'कुञ्चिता' या पदानें २ व ३ या रेषा सांगितल्या आहेत. **'द्विधा मात्रा'** या पदानें ४नें दाखविलेली दुहेरी रेषा सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचें अर्ध व उजवीकडील दोन्हीं अर्धें घेऊन बनते. 65 (ब) पासून 66 होतो. 66 चें छित्वाकुञ्चनकरून 67 (अ) होतो. 67 (अ) आणि 67 (ब) हा आ प्रचलित असणारा 'ज'कार आहे. तेथें स्पृष्ट्वाकुञ्चन आहे.

## 'झ'

68. 69, 70, 71, 72, 73, 74, (१) (२) (३) (४)

**त्रिकोण कुण्डलीरूपा वामदक्षिणयोगतः । क्रमशस्तासु तिष्ठन्ति चन्द्रसूर्याग्नयः प्रिये ॥**
**तत्र क्रोडगता मात्रा शक्तिर्ब्रह्मस्वरूपिणी । उर्ध्वमात्रा तथेन्द्राणी मध्ये नारायणी स्मृता ॥**

त्रिकोणेति । बिन्दुस्फौटने वामदक्षिणयोगतः त्रिकोणकुण्डलीरूपा, तत्र क्रोडगता मात्रा, ऊर्ध्वमात्रा मध्यें मात्रा च'झकार' इत्यन्वयः । त्रीणि कोणकुण्डलीरूपाणि यत्रेति विग्रहः । उर्ध्वाधः क्रमेण अक्षरक्षेत्रस्य १, २ वामतः कोणयोः कोणकुण्डलीद्वयम् । ३ दक्षिणतः कोणे कुण्डल्येका लघु मध्यमात्रासंगत्या अध एव । अत्र बिन्दुस्फोटने कोणकुण्डली रूपं क्लृप्तम् । त्रिकोणकुण्डलीरूपं तु कल्प्यम् । कुण्डलीपदवैयर्थ्य च अतः त्रिकोणपदमादाय विग्रहः उपेक्षितः । 68.69 चित्रयोः घटकं ३ वृत्तार्धं ह्रस्वाकारमात्रा। यतः "उज्यत" इत्यादौ संयुक्ताक्षरे तदेव वृत्तार्धं लुप्यते । क्रोडमात्रा ४ ऊर्ध्वमात्रा ५ मध्यमात्रा ६ चेत्येता न लुप्यते । अन्तिमे 74 चित्रे दर्शितरीत्या धृष्टलेखनकलया अव्यक्तीकृत्य दिग्भेदेन ऊर्ध्वमात्रांशसहित शिरोरेखा पक्षतः कृत्वा, शेषांशस्य वामतः करणेन तयोरेव दक्षिणवामांशयोः मध्ये दक्षिणरेखांशस्य मात्रारेखात्वं तत्संलग्नोर्ध्वमात्रांशस्य वामदक्षिणयोगरेखात्वं च संकल्प्य महाराष्ट्रेषु प्रायः लिख्यते । तत्र ५ रेखांशमूर्ध्वरेखात्वेन उपरिनीत्वा (१) दर्शितरीत्या (२) त्रिकोणतया ततोऽप्यव्यक्तीकृत्य तथैव (३) इत्यत्रदर्शितवत् वङ्गेषु लिख्यते। 70 तः 73 पर्यन्तं महाराष्ट्रप्रक्रियां परिचयितुम् । 70 चित्रे शिरोरेखामपि योजनीयत्वा प्रदर्शितम् । 68 बिन्दुस्फोटने समुद्भवः । 69 पृथग्लिखितः यथा उत्तरभारते लिख्यते । (१) (२) (३) वङ्गाक्षर प्रक्रियां परिचाययितुम् ।

# मराठी—सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ**--बिन्दुस्फोटनात ज्यामध्यें अक्षरक्षेत्राच्या संदर्भात तीन कोनकुण्डले आहेत अशी रेषा, क्रोडमात्रा, ऊर्ध्वमात्रा व मध्यमात्रा केल्यावर 'झ' कार होतो. आ. 68 मध्यें बिन्दुस्फोटनांत 'झ' कसा होतो हें दाखविलें आहे. आ. 69 मध्यें 'झ' वेगळा लिहून दाखविला आहे. असा 'झ' उत्तरभारतांत लिहिला जातो.

### झकारविचार

'**त्रिकोणकुण्डलीरूपा**' या लक्षण श्लोकांतील पदाचा अर्थ 'ज्या मध्यें तीन कोण कुण्डलें आहेत' अशी रेषा. कोण म्हणजे अक्षराचे दिक्कोण समजावेत. ही तीन कोणकुण्डलें दोन डावीकडील व एक उजवीकडील घेऊन बनतात. हेंच '**वामदक्षिणयोगतः**' या श्लोकांतील पदानें सांगितलें आहे. ही तीन कोणकुण्डले आ. 68, 69 मध्यें १, २, ३ ने दाखविलीं आहेत; ४ नें क्रोडमात्रा, ५ नें ऊर्ध्वमात्रा, ६ नें मध्यमात्रा दाखविली आहे. ३ नें दाखविलेलें वृत्तार्ध ही ह्रस्व अकारमात्रा आहे, कारण जोडाक्षर करितांना तिचा लोप होतो. महाराष्ट्रांत लिहिला जाणारा 'झ' यापासून घृष्टलेखनानें बनतो, ती प्रक्रिया आ. 70 ते 74 मध्यें दाखविली आहे.

### मराठी व बंगाली झ

आ. 69 ला एक शिरोरेषा तिरकी देऊन आणि खालच्या डाव्या कोंपऱ्यांतील भाग स्पृष्टा कुञ्चनानें लिहून आ. 70 होते. आ. 70 मधील खालच्या उजव्या कोंपऱ्यांत कुण्डल पूर्ण लिहून डावीकडे सरकावून लिहिल्यावर आणि ऊर्ध्वमात्रा तोडून एक भाग व शिरोरेखा उजवीकडे सरकावून लिहिल्यावर आ. 71 होते. आ. 71 पासून 72, 73 या क्रमानें आ. 74 हा महाराष्ट्र प्रान्तांत प्रचलित 'झ' बनतो. आ. 73 पासुन (१), (२) व (३) मध्यें दाखविलेल्या प्रक्रियेनें बंगाली 'झ' (३) बनतो. या प्रमाणें तन्त्रोक्त 'झ' च दिग्भेदानें लिहिला जातो.

## 'ञ'

75, 76, 77

(१) (२) (३)

१ २ ३
**कुण्डलीरूपमासाद्य दक्षतो वामतस्तथा । ऋजुश्चाधोगता मात्रा वामतः कुञ्चिता पुनः ॥**

५
**तिष्ठान्ति तासु नित्यासु सूर्येन्द्रवरुणाः सदा। कुण्डली-द्वय-रूपा तु या मात्रा मध्यतः स्थिता॥ महाशक्तिस्वरूपा सा ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

कुण्डलीति । बिन्दुस्फोटने दक्षतः कुण्डलीरूपमासाद्य तथा २ वामतः (कुण्डलीरूपमासाद्य) ३ ऋजुश्चाधोगता मात्रा ४ पुनः (अधोभागे पुनश्चाधोगता) वामतः कुञ्चिता ५ (संयोजनेन सा मात्रा) या तु मध्यतः स्थिता कुण्डलीद्वयरूपा इन्यन्वयः । १ दक्षतः = दक्षमभिमुखीकृत्य २ वामतः = वाममभिमुखीकृत्य । ३ ऋजुश्चाधोगतामात्रा । ४ पुनश्चाधोगता वामतः कुञ्चिता ५ मध्यमात्रयासह कुण्डलीद्वयस्य एकीभूय तद्रूपता ।

# मराठी—सारांश

### ञकारविचार

**लक्षण श्लोकाचा अर्थ**--बिन्दुस्फोटनांत उजवीकडे तोंड करून कुण्डलाकार होऊन, तसेंच डावीकडे तोंड करून कुण्डलाकार होऊन, थोडें खालीं जाऊन, पुनः थोडें खालीं जाऊन डावीकडे कुञ्चित करून मध्यभागीं आडवें जाऊन उजवीकडील दोन कुण्डलांना जोडून घेतल्यावर 'ञ' होतो. '**दक्षतः कुण्डलीरूपमासाद्य**' या श्लोकांतील पदांनीं उजवीकडे तोंड करून असणारी कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध होय. ही आकृत्यांत १ नें दाखविली आहे. '**वामतः (कुण्डलीरूतमासाद्य)**' या पदांनीं डावीकडे तोंड करून असणारी कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचे अर्ध होय. ही २ नें दाखविली आहे. '**ऋजुश्चाधोगता**' या पदानें वरून सुरुवात करून (१ पासून) थोडी खालीं येणारी रेषा सांगितली असून ३ नें दाखविली आहे. '**वामतः कुञ्चिता पुनः**' या पदांनीं ३ हीच रेषा डावीकडे वळविण्यास सांगितली आहे, ही ४ नें दाखविली आहे. ३ व ४ दोन रेषा मिळून मध्यमात्रा होते. ही मध्यमात्रा व ५ नें दाखविलेलें बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील दोन अर्ध तद्रूप केल्यावर म्हणजे आडव्या रेषेनें

जोडल्यावर ञकार होतो. कांहीं लोक ३ व ४ नें दाखविलेला भाग ही सरळ रेषारूपानें लिहितात. 75 मधील १ व २ कवायतींत हात समोर केल्याप्रमाणें केल्यावर 76 होते. व 76 मधील ५ सरळ रेषारूपानें लिहिल्यावर 77 हा आजचा प्रचलित 'ञ' होतो. त्या मध्यें १, ३, ४ व २ एकत्र जुळवून घेतले आहेत व २ थोडी लांब केली आहे. (१), (२) व (३) नें दाखविलेल्या आकृतींत बंगाली 'ञ' ची प्रक्रिया दाखविली आहे. (३) हा **बंगाली** 'ञ' आहे.

## 'ट'

78, 79, 80, 81 (क), 81 (ख), (१), (२), (३), (४)

१ २
ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा कुण्डलीरूतस्त्वधः । तिष्ठन्ति तासु नित्यासु कुबेरयमवायवः ।।
३ ४
**मात्रा कोणगता चोर्ध्वा ततऊर्ध्वगता तु सा । या नित्या परमा शक्तिश्चतुर्वर्गप्रदायिनी ।।**

उर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने १ ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा, २ कुण्डलीरूपतस्त्वधः ३ ततः मात्रा कोणगता चोर्ध्वा ४ तत उर्ध्वगता हि सा = टकारः ।

१, २ सर्वेष्वपि समाने । 80 तेलुगु (आन्ध्र) टः यत्र ३ मात्रा अधिका । 81 कन्नड टः यत्र ४ अपि अधिका । देवनागर्यां पृथग्लेखने ३, ४ न लिख्यते इति सार्वजनीनम् । 78 बिन्दुस्फोटने स्थितं दक्षवृत्तार्धद्वयमेव ३, ४ मात्रात्वेन एकीकृत्य वचने प्रोक्तम् । उपरितनं वामं वृत्तार्धं १ रेखारूपेण सर्वैः सङ्गृह्यते । यथास्थितरूपेणैव वा कैश्चिदिति । वङ्गाक्षरे अक्षरोपरि ४, ५ लिख्यत इति स्फुटीभविष्यति । यथा (१), (२), (३), (४). अन्तिमचित्रेषु दर्शितम् ।

# मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**—बिन्दुफोटनांत वरून खालीं येणारी एक रेषा, तिचे खालीं कुण्डलाकार एक रेषा तिचे नंतर कोंपऱ्यांत जाऊन वर जाणारी एक रेषा आणि तिचे वर आणखी एक वर जाणारी रेषा काढल्यावर 'ट' कार होतो. या शेवटच्या दोन रेषा मात्रा होत.

### देवनागरी ट

**'उर्ध्वाधः क्रमतो रेखा'** या श्लोकांतील पदांनीं वरून खालीं येणारी रेषा सांगितली असून 78, 79 मध्यें १ नें दाखविली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरच्या अर्धाला घेऊन देवनागरींत बनविली जाऊं शकते **'कुण्डलीरूपतस्त्वधः'** या पदानें १ या रेषेखाली काढावयाची कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. ही रेषा आ. 78, 79 मध्यें २ नें दाखविली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावी-कडील खालचें अर्ध होय. देवनगरींत आज प्रचलित असणारा 'ट' एवढ्या दोन रेषांनींच बनतो.

### कन्नड–तेलगु–बंगाली ट

**'मात्रा कोणगता चोर्ध्वा'** या पदांनीं २ या रेषेनंतर, 80 मध्यें दाखविल्याप्रमाणें, तिला जोडून घेऊन काढावयाची, वर जाणारी रेषा सांगितली असून ३ नें दाखविली आहे. ही रेषा कोंपऱ्यांत अथवा कोनात जाणारी असल्यानें तिला कोणगता म्हटले आहे. **'ततउर्ध्वगता'** या पदांनीं ३ हीच रेषा आणखी वर न्यावयास सांगितली असून 81 मध्यें ४ नें दाखविली आहे. ३ ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालचें व ४ ही रेषा उजवीकडील वरचें अर्ध आहे. 80 हा तेलगु 'ट' आहे, त्यामध्यें आकृतींत दाखविल्याप्रमाणें १ ही रेषा उजवीकडे गांठ घेऊन छित्वाकुञ्चनानें लिहिली जाते. हा लक्षणश्लोक प्रतिपादित चार रेषां पैकीं तीन रेषा घेऊन बनत आहे. 81 हा कन्नड 'ट' आहे, तो तेलगु 'ट' मध्यें ४ ही रेषा जास्त देऊन बनतो.

त्यामध्यें लक्षणश्लोकप्रतिपादित चारीही रेषांचा समावेश आहे. बंगाली 'ट' मध्यें ३ या रेषेनें खालचा कुंडलभाग केला जातो आणि ४, ५ ह्या रेषा मात्रा म्हणून अक्षराचे डोक्यावर लिहिल्या जातात. बंगाली ढ कारांत बिन्दुस्फोटनांतील खालची दोन अर्धवृत्तें घेऊन खालचा भाग वरचीं दोन अर्धवृत्तें घेऊन डोक्यावरील मात्रा बनविली जाते, तात्पर्य देवनागरीप्रमाणे वामोपरिवृत्तार्ध ट काराची दांडी करण्याकरितां बंगालींत वापरली जात नाहीं. त्याची समजूत वेगळ्या आकृत्या (१), (२), (३), (४) देऊन केली आहे.

# 'ठ'

82, 83,

१
वार्ताकुवर्तुलाकारो रेखाधिष्ठितदैवतः । तिष्ठन्ति क्रमतो नित्यं चन्द्रसूर्याग्नयः प्रिये ॥
२
मात्राहीनस्तूर्ध्वशिखष्ठकारःपरमेश्वरी ॥

वार्ताक्विति । बिन्दुस्फोटने १ वार्ताकुवर्तुलाकारः मात्राहीनः २ उर्ध्वशिखः ठकार इत्यन्वयः ।

अत्र ह्रस्वाकारमात्रारेखाया : पृथग्लेखनाभावान्मात्राहीनता प्रोक्ता । न तु कालतो मात्राभावः उच्चारणे सत्वादिति पूर्वमुक्तम् । 82 मौलिकद्भवः 83 पृथग्लिखितः । ऊर्ध्वाध क्रमात्प्रथमप्राप्तमप्युपरिवामवृत्तार्धं प्रकृते वर्तुलाकारानुपयोगितया परित्यज्याग्रे गत्वा दनन्तर-मवशिष्ट दक्षोपरिवृत्तार्धेनाग्रे प्राप्तेन निर्वाहात् त्यक्तस्य पुनरुपादापकाभावादवशिऽष्टेनैव शिखाकरणं न्याय्यं भाति ।

## मराठी सारांश

### वार्ताकुवर्तुलाकार ठकार

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत वांग्याप्रमाणें वर्तुलाकार उर्ध्वशिखा असणारा आकार बनविल्यावर 'ठ'कार होतो. ऊर्ध्वं शिख म्हणजे डोक्यावर उभी शेंडी असणारा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील व उजवीकडील खालचें अर्ध आकृतींत दाखविल्याप्रमाणें जोडून '**वार्ताकुवर्तुलाकार**' होतो व उजवीकडील वरच्या अर्धानें '**ऊर्ध्वशिखा**' होते. 83 मध्ये **वार्ताकुवर्तुलाकार**' १नें व ऊर्ध्वशिखा' २नें दाखविली आहे. ठकार मात्राहीन असल्याचें लक्षणश्लोक सांगतो त्याचा अर्थ अकारमात्रारेषा ठकारांत वेगळी लिहिली जात नाहीं एवढाच आहे. **कालतः मात्रा** ठकार उच्चारणांत आहेच. हा विषय पूर्ववर्णित आहे,

### उर्ध्वशिखा उजवीकडेंच कां ?

ठकारामध्यें शेंडी डावीकडील वरच्या अर्धाला घेऊन कां करूं नये, उजवीकडील वरच्या अर्धाल घेऊनच कां करावयाची असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर खालील प्रमाणें–

बिन्दुस्फोटनांत ठकार करीत असतांना प्रथम हातीं यणाऱ्या डावीकडील वरच्या अर्धवृत्ताला घेऊन, प्रथम सांगितलेला वांग्याचा आकार करितां येत नाहीं कारण तसें करूं गेल्यास शेंडी खालच्या बाजूला देण्याचा प्रसंग येईल व ती ऊर्ध्वशिखा मग म्हणता येणार नाहीं. म्हणून सांगितल्याप्रमाणे डावीकडील वरचे अर्धवृत्त सोडून, डावीकडील खालचें व उजवीकडील खालचें घेऊन प्रथम वांग्याचा आकार बन-विला जातो. त्यानंतर उजवीकडील वरचें क्रमानें उपस्थित आहे त्याला घेऊन शेंडी बनविली जाते. दुसरा क्रमाने उपस्थित असतांना व त्या पासून इष्ट कार्य होत असतां सुरुवातीस ज्याला जोडून दिलें आहे त्याला घेणें न्याय्य नाहीं. म्हणूनच उजवीकडील वरच्या अर्धवृत्तानें शेंडी केली आहे. यावर कोणीं असें म्हणेल की– ठकार बनवितांना सव्यक्रमानें जात असतां डावीकडील वरचें अर्धवृत्त पूर्वोक्त कारणाकरितां सोडून दिलें आहे, डावीकडील खालचें व नंतर क्रमानें उपस्थित उजवीकडील खालचें घेऊन 'वार्ताकुवर्तुकाकार' केला– आतां शेंडी कोणाला घेऊन करायची असा प्रश्न येतो. तर आपण ज्या क्रमानें आलों, त्या क्रमांत प्रथम ज्याला टाकले त्याचा विचार प्रथम करून त्यानेंच शेंडी कां करू नये ? प्रथमत्यक्ताला प्रथम संधि देणें न्याय्य असेल तर त्याला घेऊन शेंडी करावी. आम्ही येथें डावी व उजवी दोन्हीकडील वरचीं अर्धवृत्तें सोडलीं आहेत, शेंडी करण्याकरितां उलट जात असतां उपस्थितिक्रमानें प्रथमप्राप्त उजवें घेऊन शेंडी केली आहे. स्थितिक्रमानें प्रथम त्यक्त जें डावे वरचें अर्धवृत्त त्याला घेऊन शेडी करण्यास आमची हरकत ना. . वार्ताकुवर्तुलाकार प्रथम करून नंतर ऊर्ध्वशिखा बनवावयास लक्षण-श्लोक सांगतो. म्हणून उजवीकडील वरचें वृत्तार्ध टाकून खालचें एक व डावीकडील खालचें एक घेऊन वार्ताकुवर्तुलाकार व डावीकडील वरचें एक घेऊन ऊर्ध्वशिखा कां करूं नये ? असें करण्यानें श्लोकप्रतिपादित लक्षणास बाध येत नाहीं. परंतु वैदिक लेखन सव्यक्रमानें आहे व ज्येष्ठप्राथम्य श्रेय असल्यानें उजवीकडील वरचें वृत्तार्ध घेऊन ऊर्ध्वशिखा केली आहे. सृष्टि अर्वाकस्रोत असल्यानें बिन्दुस्फोटनांतील ऊर्ध्व–वृत्तार्ध ज्येष्ठ म्हटली जातात.

# 'ड'

84, 85,

१ २ ३
ऊर्ध्वाधः क्रमतो रेखामध्ये त्वाकुञ्चिता तथा । लक्ष्मीर्वाणी भवानी च क्रमशः तत्र संस्थिता ॥
४
ब्रह्मरूपा तथा मात्रा महाशक्तिः प्रकीर्तिता ॥

उध्वाध इति । बिन्दुस्फोटने १ २ ऊर्ध्वाधः क्रमतोरेखा ३ मध्ये त्वाकुञ्चिता ४ तथा मात्रा = डकार इत्यन्वयः । अत्र दक्षोपरि वृत्तार्धेन १ निष्पादनम् ।

३ मध्ये इत्युक्ते तदनुरोधेन १, २ क्रमः आक्षिप्यते एवमन्यलभ्यत्वादूर्ध्वाध इति दैशिक क्रमपरम् । 84 मूले समुद्भवः 85 पृथग्लिखितः । अन्य चित्रे दक्षोपरिवृत्तार्धमेव १ आनीतं दर्शितम् ।

# मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दूस्फोडनांत वरून खाली येणारी रेषा, कुञ्चित रेषा, खालची रेषा व मात्रा काढली असतां 'ड'कार होतो.

'ऊर्ध्व' या श्लोकांतील पदानें वरून खालीं येणारी रेषा सांगितली आहे. ती 84, 85 मध्ये दाखविल्याप्रमाणें स्वतंत्रपणें बनविण्यापेक्षां तिसऱ्या आकृतींत दाखविल्याप्रमाणें बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरच्या अर्धापासून बनविण्यांत लाघव आहे. ही रेषा १नें दाखविली आहे. अध या पदानें खालची रेषा सांगितली आहे. ती बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालच्या अर्धाने बनत असून २ नें दाखविली आहे. **'मध्येत्वाकुञ्चिता'** या पदानें 'ऊर्ध्व' आणि **'अध'** या दोन रेषांचे मधीलभागीं काढावयाची कुञ्चित रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध होय. ही ३ नें दाखविली आहे 'मध्ये' या शब्दानेच १ व २ मध्यें अशी स्थाननिश्चिती होते. तथामात्रा या पदांनीं २ नंतर काढावयाची ४ ही रेषा सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचें अर्ध आकृतींत दाखविस्यानुसार २ ला जोडून घेऊन होते.

84, मध्यें मौलिक उद्‌भव व 85 मध्यें 'ड' सुटा लिहून दाखविला आहे. तिसऱ्या आकृतींत १ ही रेषा उजवीकडील वरच्या वृत्तार्धापासून आणून दाखविली आहे.

## 'ढ'

86, 87,

**ऊर्ध्वाध क्रमतो रेखा वामदक्षिणतो गता । ततः सा कुण्डलीरूपा विष्णवीशब्रह्मरूपिणी ।।**
**महाशक्तिमयी मात्रा ध्यानमस्य प्रचक्षते ।।**

(अंक: ऊर्ध्वाध – १, वाम – २, दक्षिणतो – ३, महाशक्तिमयी – ४)

ऊर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने ऊर्ध्वाधः क्रमतोरेखा २, ३ ततः वामदक्षिणतोगता ४ ततः कुण्डलीरूपा मात्रा ढकारः । पूर्वं वामतः पश्चाद्दक्षिणतः गता वामदक्षिणतो गता इति विग्रहः । १, २, ३ रेखा विष्णवीशब्रह्मरूपिणी । कुण्डलीरूपा ४ महाशक्तिमयी मात्रा । अत्र डकारे ढकारे चोक्ता ४ मात्रा सा लिख्यते च । ट कारे पूर्वोक्तरीत्या ३, ४ योः देवतागर्यामिलेखनात् ठकारे च मात्राहीनत्वेन चोक्तेः पृथग्लेखनात्-संयुक्ताक्षरेषु ट्च, ठ्च इत्यादिरीत्या विलक्षणसंयोगलेखनेन निर्वाहः क्रियते । अत्र तु ड्च, ढ्च इत्यादिरीत्या लोपमकृत्वा विलक्षणसंयोगेनैव उच्चारणकालिकमात्रालोपः सूच्यते । तत्र कारणं ढस्य मात्रालेखलोपेन 'ट्च' लेखने टकारभ्रमः स्यादिति सुज्ञायते । डस्य मात्रालोपेन लेखने तु कुड्मल (=कुड्मल), ककुद्मानित्यादिषु 'ड्म' 'द्म' योःभ्रमप्रसङ्गो नास्ति तथापि स्पष्टत्वैव विलक्षणसंयोगेनैव लेखने तत्र कारणमिति । एतेन संयुक्ताक्षरलेखने स्पष्टप्रतिपत्तिरेव नियामिकैति ज्ञाप्यते । ङकार डकारयोः विवेकार्थं अनुक्तोऽपि बिन्दुर्मूलादुपादीयत एव ङकार इति प्रसिद्धमेवेति ।

**लक्षणश्लोकाचा** अर्थ–बिन्दुस्फोटनांत एक वरुन खाली येणारी रेषा काढा. ती डावीकडे न्या तशीच पुन्हां उजवीकडे जाणारी करा. तशी नेऊन शेवट कुण्डलाकार केल्यावर 'ढ'कार होतो.

'**ऊर्ध्वाधः**' या लक्षणश्लोकांतील पदानें वरून खालीं येणारी रेषा सांगितली असून ती 86, 87 मध्यें १ नें दाखविली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरचें वृत्तार्ध होय. '**क्रमतो रेखा वामदक्षिणतोगता**' या पदांनीं १ नंतर काढावयाच्या, अनुक्रमें डावीकडे व नंतर उजवीकडे जाणाऱ्या रेषा सांगितल्या आहे. पैकी १ला बिन्दुस्फोटनांतील डावीवडील खालच्या अर्धास संलग्न करुन घेतल्यावर डावीकडे जाणारी रेषा होते, ती २नें दाखविली आहे. तिचे नंतर उजवीकडे जाणारी रेषा ३नें दाखविली आहे. '**ततः सा कुण्डलीरूपा मात्रा**' या पदांनीं ३ही रेषा कुण्डलाकार करण्यास सांगितलें आहे, तीच मात्रा होय, ती ४नें दाखविली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील

खालच्या अर्धानें बनते. बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालच्या अर्धाचे दोन तुकडे करून वरच्या तुकड्याचें शेवटापर्यंत **'वामतोगता'** व त्यानंतर खालच्याचा तुकड्याचे शेवटपर्यंत **'दक्षिणतोगता'** आणि उजवीकडील खालच्या अर्धास आंत वळवून कुण्डलाकार केल्यास आकृतींत दाखविल्याप्रमाणें पदरच्या रेषा आणाव्या लागणार नाहींत. यांत लाघव आहे.

ड कार व ढकारांत ४नें दाखविलेली मात्रा रेषा लिहिली जाते. देवनागरी टकारांत ३, ४ ही मात्रा लिहिण्याची पद्धत नाहीं परंतु ती मौलिकांत लिहिली जाते हे पूर्वोक्त आहे व ठकार मात्राहीन सांगितला आहे. या सर्व अक्षरांचीं जोडाक्षरें लिहितांना विलक्षण संयोगानें लिहिणें प्रचलित आहे.

**ड–ढ मध्ये मात्रालोप कां नाही**

ड मध्यें मात्रा लोपानें जोडाक्षर लिहिल्यास 'कुद्मल' (कुड्मल) व 'ककुद्मान्' या मध्यें फरक करतां येणार नाहीं असें नाहीं. अर्थात् 'ड्म' व 'द्म' विषयीं भ्रम होईल असेंही नाहीं कारण ड्म = द्म, द्म = द्म फरक दिसतच आहे, तथापि स्पष्टतेकरितां विलक्षण संयोगानें लिहिले जातें. 'ढ' मध्यें मात्रा-लोपानें जोडाक्षर लिहिल्यास 'ट्य, व 'ट्य' (ढ्य) मधील फरक समजणार नाहीं. अशा रीतीनें भ्रम व अव्यवस्था होऊं नये म्हणून प्रचलित पद्धत विलक्षण संयोगानें लिहिण्याचा ट, ठ, ड, ढ मध्यें अवलंब करते. या वरून जोडाक्षर लिहितांना, जेथें जेथें भ्रम होण्याची शक्यता आहे अशा स्थळीं स्पष्टपणें समजूत होणें हीच गोष्ट नियामिका आहे. ड्= द्म, द्म = द्म या ठिकाणीं भ्रम होईल किंवा होणारही नाहीं, तरीही स्पष्टपणें समजूत होणें हीच गोष्ट नियामिका धरून विलक्षण संयोगानेंच लिहिलें जातें. ट्य = ट्य, ढ्य = ट्य येथें निश्चितपणें भ्रम होत असल्यानें स्पष्टपणे समजूत होणें आवश्यक मानून विलक्षण संयोग अवलंबिला जातो. डकार व ङकारांतील फरक समजण्यासाठीं ङ मध्ये बिन्दु लिहिला जातो हें प्रसिद्धच आहे.

## 'ण'

88, 89, 90, 91, 92, **अशोकलिपि**

१ २ ३

**कुण्डलीत्वगता रेखा मध्यतस्तत ऊर्ध्वतः । वामादधोगता सैव पुनरूर्ध्वं गता प्रिये ॥**

कुण्डलीति । बिन्दुस्फोटने (यतः) १ मध्यतः कुण्डलीत्वगता रेखा २ तत उर्ध्वतः (कुण्डलीत्वगता रेखा) ३ ततः वामादधोगता सैव पुनरूर्ध्वंगता णकार इत्यन्वयः । मध्यत्वमिह बिन्दुस्फोटनस्य अर्धद्वयापेक्षम् । ऊर्ध्वत इत्यपि तथैव । तेन न यत्र क्वापि प्रसक्तिः । एवं वामत्वमधस्त्वं च । अत्र कुण्डलीत्वं अध ऊर्ध्वं गतागतत्वं च सर्वत्रैव यदा तदैव रेखया तस्यामेव रेखायां भाव्यते तदा एकैव रेखा दृश्या लेखनीया भवति । एवमादि सर्वत्र एकत्वेन पृथक्त्वेन वा दर्शनं दृग्दृष्टिभेदादिसापेक्षम् । यथा 91, 92 चित्रयोः । तयोः वामादधो रेखा मध्यमरेखां यावदेव नीयते । परं 91 चित्रे तु तृतीयरेखापर्यन्तमपीति भेदः । 88 मौलिकोद्भवः । 89 पृथग्लिखितः । 90, 92 महाराष्ट्रेषु प्रचलित 'ण' प्रक्रियां परिचाययितुम् । 91 उत्तरभारतेषु प्रचलित 'ण' अन्ये चित्रे अशोकलिपि 'ण' बोधनार्थे ।

# मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत (मध्यभागीं) एक कुण्डलाकार होणारी रेषा, तिच्यावर आणि बिन्दुस्फोटनाच्या वर आणखी एक कुण्डलाकार होणारी रेषा आणि बिन्दुस्फोटनांत डावीकडून सुरू होऊन खालीं जाऊन पुन्हां वरती जाणारी एक रेषा काढल्यावर 'ण' कार होतो.

**णकारातील दुहेरी रेषा**

**'मध्यतः कुण्डलीत्वगता रेखा'** या श्लोकांतील पदांनीं बिंदुस्फोटनांतील वरच्या दोन अर्धांचे मध्यभागीं काढावयाची कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. आकृत्यांत ती १ नें दाखविली आहे, **'ततः ऊर्ध्वतः (कुण्डलीत्वगता रेखा)'** या पदांनीं बिन्दुस्फोटनाची वरचीं दोन अर्धे व १ ही रेषा यांचे वरच्या अंगास डोक्यावर काढावयाची कुण्डलाकार रेषा सांगितली आहे. आकृत्यांत ती २ नें दाखविली आहे. **'वामादधोगता सैव पुनरूर्ध्वंगता'** या श्लोकांतील पदांनी बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरच्या अर्धाचें खालच्या टोंकापासून सुरुवात करून खाली जाऊन पुन्हां वर येणारी रेषा सांगितली आहे. ती ३ नें दाखविली आहे. खालीं जाऊन म्हणजे बिन्दुस्फोटनाचे वरचें दोन अर्ध व पूर्वोक्त १ ही रेषा यांचें खालीं जाऊन, याप्रमाणें असणारें लक्षण एकाच रेषेनें व एकाच रेषेंत अन्तर्भूत मानलें असतां आकृतींतील दुहेरी रेषांचे ठिकाणीं एकच रेषा लिहिली असतां लक्षण समन्वय होतो. एकेरी वा दुहेरी रेषा पृष्टलेखनसापेक्ष आहे.

**उत्तर भारतीय ण**

88 मध्यें मौलिक उद्भव दाखविला आहे. 89 मध्यें बिन्दुस्फोटनांतील वरचे दोन अर्ध सरळ रेषा रूपानें लिहिले आहेत. 90 मध्यें ३ ही रेषा १ या रेषेचे पातळी पर्यंतच खालीं आणली आहे. त्या मधील दुहेरी रेषा एकेरी केल्यावर 92 हा महाराष्ट्रांत प्रचलित 'ण' होतो. 90 मधील ३ ही रेषा बरीच खाली ओढून व दुहेरी रेषा एकेरी करून 91 हा उत्तर भारतांत प्रचलित 'ण' होतो.

या नंतर अशोकलिपि 'ण' ची समजूत दाखविली आहे. तो १, २, या तीन तन्त्रप्राप्त रेषा तेवढ्याच घेऊन बनतो. दुहेरी रेषा एकेरी करून दिशाबदलानें ३ लिहिल्यावर तो होतो.

# 'त'

93, 94, 95, 96, 97.

१ २ ३

**आदौ बिन्दुस्ततो मध्ये कुण्डलीत्वमवाप्य सा । दक्षाद्वामगता नित्या ब्रह्मविष्ण्वीशरूपिणी ॥**

आदाविति । बिन्दुस्फोटने १ आदौ बिन्दुः रेखा २ ततोमध्ये कुण्डलीत्वमवाप्य सा ३ दक्षाद्वामगता तकार इत्यन्वयः । अत्रादौ बिन्दुः = स्फुटितउपरितन बिन्दुः = क्लृप्तः उपस्थितः । सव्यक्रमादुपरिवामार्धवृत्ताद्दक्षार्धान्तं यावत् । ततःमध्ये कुण्डलीत्वमत्वाप्य सा रेखा । कयोर्मध्ये ? इति चेत्स्फुटितबिन्दुद्वयमध्ये, आदौ बिन्दुरित्येक सम्बन्धिनो ज्ञानादपरसम्बन्धिनो द्वितीय स्फुटितबिन्दोः स्मरणात् । इत्थं द्वयोरुपस्थितत्वात्तेन विपरीतदिशि कुण्डलीभवनव्यावृत्तिः । चित्रविभागे दर्शित इतिवत् दक्षाद्वामगतेत्युक्तेः दक्षाधस्तनवृत्तार्धे यथा पर्यवसायिनी स्यात्तथा कुण्डलीत्यर्थक्रमः सिध्यति । तेन न तु कुण्डल्या अर्धे क्वचिन्मध्य एव वामगतिः । दक्षाद्वामगतिरपि न दक्षाधस्तनवृत्तार्धे मध्ये एवं वामगतिः कारणाभावात् । किन्तु दक्षस्य पर्यन्ताद्वामगतिः । साऽपि स्फुटितसन्धेरुपस्थितौ सत्यां लाघवाद्वामवृत्तस्याधःकोटिपर्यन्तेति एकः पक्षः । उपरिकोटिपर्यन्तमिति तमिळ् पक्षः । वामगतेरुत्तरावधेरनुक्तेः अधस्तनदक्षार्धवृत्तस्य वामाभिमुखवक्रतायामेव परिसमाप्तिरिति चेन्मध्ये दृश्यैव न तिष्ठतीति लघुतम पक्षान्तरे । चित्रविभागे दर्शितवत् घृष्टे चित्रविभागे दर्शित इत्यैव लिखन्तीति सर्वैरेव ज्ञायते । 93 मूले समुद्भवः प्रदर्शितः । तत्रोपरितनमर्धवृत्तद्वयमेव बिन्दुरूपम् । ततः 94, 95 ते अर्धे मध्ये कुण्डली च सङ्क्षिप्य दर्शयित्वा 96 बिन्दुकुण्डलीरेखे अत्यन्तं सङ्गृहीते । किञ्च दक्षाद्वामगता रेखामध्ये अदृश्यत्वं प्रापिता। 97 एकस्यामेव रेखायां सङ्गृहीतत्वं चेद्विभाव्यते तर्हि ऊर्ध्वमात्रारेखां विहाय किञ्चिदन्तरे उर्ध्वमुखमधोमुखं वा दक्षाद्वामगता रेखा विभज्य लिख्यते इति लघुतमपक्ष स्थितिः । अशोकलिपिरपि वामतो मध्यतो दक्षतो वा अधस्ताद्विभक्तमेव तकारं लिखतीति दृश्यते तथातल्लिपिविचारे दर्शयिष्यति ।

# मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत वरच्या दोन वृत्तार्धांनीं बिन्दु, वरच्या व खालच्या स्फुटित बिन्दूंचे मध्ये कुण्डलाकार रेषा करून उजव्या खालच्या वृत्तार्ध मार्गानें ती उजवीकडून डावीकडून डावीकडे नेल्यावर 'त' कार होतो.

**'आदौ बिन्दु'** या पदांनीं बिन्दुस्फोटनांतील वरचीं दोन वृत्तार्धे म्हणजे **'स्फुटित उपरि बिन्दु'** उपस्थित होतो. कारण तो पूर्ण प्राप्त आहे. याप्रमाणें सव्यक्रमानें (Clockwise) डावीकडील वृत्तार्धाचे खालच्या टोंकापासून उजवीकडील वृत्तार्धाचे शेवटापर्यन्त 'बिन्दु' होय. **'बिन्दु'** या पदानें बिन्दुस्फोटनांतील वरच्या वृत्तार्धाचें ज्ञान झाल्यावर खालच्यांचें स्मरण होतें, म्हणून या नंतर **'ततोमध्येकुण्डलीत्वमवाप्य'** या पदांनीं खालच्या व वरच्या अशा दोन स्फुटित बिन्दूंचें मध्यें कुण्डलाकार रेषा करण्यास सांगितली आहे 93, 94 मध्यें १ नें 'आदौ बिन्दु' व २ नें **'कुण्डलाकाररेषा'** दाखविली आहे. या प्रमाणे खालच्या व वरच्या अशा दोन बिन्दूंचे मध्यें असा अर्थ केल्यानें उजव्या अंगाला कुण्डलाकार रेषा करूं नये असें ठरतें. **'दक्षाद्वामगता'** या पदानें कुण्डलाकार रेषा उजवीकडून डावीकडे नेण्यास सांगितलें आहे. या वरून उजवीकडील खालच्या वृत्तार्धास घेऊन डावीकडे जाणारी रेषा ठरते. आणि कुण्डलाकार रेषा मधेंच कोठेंतरी डावीकडे वळवावयाची नाहीं असेंही ठरतें.

ही रेषा ३ नें 93, 94 मध्यें दाखविली आहे. उजवीकडील खालच्या वृत्तार्धाचे मधेंच कोठें तरी डावीकडे वळावें म्हणण्यास कारण नाहीं, परंतु उजवीकडील खालच्या वृत्तार्धाचे शेवटापर्यंत रेषा नेण्यास सांगितले आहे. येथेंही डावीकडील खालच्या वृत्तार्धाच्या खालच्या टोंकापर्यंतच रेषा डावीकडे न्यावी असा एक पक्ष आहे. वरच्या टोंकापर्यंत न्यावी असा तामिळ पक्ष आहे. डावीकडे कोठ पावेतों जावें हें सांगितलें नसल्यानें उजवीकडील खालच्या वृत्तार्धातील डावीकडे वळणाऱ्या रेषाभागापर्यंतच असा लघुतमपक्ष आहे. या पक्षानुसार खालच्या दोन वृत्तार्धाचे मधली रेषा दृश्य रूपानें नसते. या पक्षानुसार प्रचलित 'त' लिहिला जातो. 93 मध्यें त काराचा मौलिक उद्भव दाखविला

आहे. 94 व 95 मध्यें मध्यभागाची कुण्डलाकार रेषा अत्यंत संक्षिप्त करून लिहिली आहे. आणि बिन्दुस्फोटनांतील वरचे दोन अर्ध एकमेकांच्या जवळ आणून ठेवले आहे. 96, 97 मध्यें दुहेरी रेषा, एकेरी करून लिहिल्या आहेत अर्थात एकरूप करून लिहिल्या आहेत. व 95 मध्यें टिबानीं दाखविलेल्या भागाचा लोप केला आहे. अशोकलिपींतही कुण्डलाकार रेषा डावीकडे वा उजवीकडें लिहून, खालची अर्धे न जोडतां 'त' कार लिहिला जातो. हें सर्व पुढें त्या लिपीचा विचार करतांना स्पष्ट होईल.

## 'थ'

98, 99, 100

२ १ ३ ४ ५

**कुञ्चिता कुण्डली भूत्वा वामाद्दक्षिणतस्ततः । वामतः कुञ्चिता भूत्वा दक्षाधो दक्षतो गता । ऊर्ध्वं ऋज्वायता रेखा सुरा गङ्गादयः क्रमात् ।**

कुञ्चितेति । बिन्दुस्फोटने १ वामात् (वृत्तार्धात्) कुण्डली भूत्वा २ दक्षिणतः वाममभि कुञ्चिता ३ ततः वामतः कुञ्चिता भूत्वा दक्षा ४ दक्षतो अधोगता ५ (ततः) ऊर्ध्वं ऋज्वायता रेखा 'थ'कार इत्यन्वयः । पुनर्वामत इत्यनुरोधेन १ वामादित्युपरितनदित्यर्थः ।

**लक्षणश्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत कुण्डलाकार कुञ्चित होणारी, (डावीकडून सुरू होऊन) उजवीकडे जाऊन कुञ्चित होऊन डावीकडे जाणारी, डावीकडून उजवीकडे कुञ्चित होऊन उजवीकडे खालीं जाऊन किञ्चित वर येणारी रेषा, या काढल्या असतां 'थ'कार होतो. **'कुण्डलीभूत्वा '** या श्लोकांतील पदानें डावीकडील वृत्तार्ध वापरून कुण्डलाकार रेषा करावयाची असें घ्यावयाचें आहे. ही रेषा आकृत्यांत १नें दाखविली आहे **'दक्षिणतः (वाममभि) कुञ्चिता'** या श्लोकांतील पदांनीं (डावीकडून सुरू करून उजवीकडे जाऊन कुञ्चित होऊन डावीकडे जाणारी (वाकडी) रेषा सांगितली आहे. ही रेषा २ नें दाखविली आहे. ही १ या रेषेच्या आंतल्या अंगास येतें. **ततः वामतः कुञ्चिता भूत्वा दक्षा'** या पदांनीं डावीकडे कुञ्चित होऊन उजवीकडे जाणारी, २ या रेषेनंतर काढावयाची रेषा सांगितली आहे. ही रेषा ३नें दाखविली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचें अर्ध होय. **'दक्षता अधो गता'** या पदांनीं ३ नंतर काढावयाची उजवीकडे खालीं जाणारी रेषा सांगितली आहे. ४ नें दाखविली आहे **'ऊर्ध्वंऋज्वायता रेखा'** या पदांनी ४ या रेषेच्या खालच्या टोंकापासून किञ्चित वर जाणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा उजवीकडील खालच्या वृत्तार्धाचे खालच्या टोंकापर्यंत जाते. उजवीकडील वृत्तार्धें व ही मिळून 'थ' काराची मात्रा होते. ती ५ नें दाखविली आहे. 98मध्यें मौलिक उद्भव दाखविला आहे. 99मध्यें उजवीकडील वृत्तार्धें सरळ रेषा रूपानें लिहिलीं आहेत 100 मध्यें प्रचलित देवनागरी 'थ' दाखविला आहे.

101, 102, 103, 104

**त्रिशक्तिसहितंदेवि ! त्रिबिन्दुसहितं तथा । आत्मादितत्त्वसंयुक्तं दकारं प्रणमाम्यहम् ॥**

**(शब्दकल्पद्रुमे वर्णोद्धारतन्त्रस्येत्येव वाचस्पत्य उद्धृत श्लोकः ॥)**

बिन्दुस्फोटने त्रिबिन्दुसहितं दकारं प्रणमामि । ढथाराद्वैलक्षण्याय तृतीय बिन्दौ रेखाऽधोऽवतार्यते । देवनागर्यां 1, 2 योः क्लृप्तसव्यक्रममनुसृत्य 101 चित्रे त्रिबिन्दवः समष्टिबिन्दुः विसर्गश्चेति पूर्ववर्णिताः । विपरीतक्रमेण 103, 104 अशोकदकारे रूपम् घृष्टत्वमिति

**लक्षणश्लोकाचा अर्थ**– बिन्दुस्फोटनांत तीन बिन्दूनीं 'द'कार होतो. ( वाचस्पत्यम् या कोश ग्रन्थांत दकाराचा हा लक्षण श्लोक 'वर्णोद्धारतन्त्रांतील शब्दकल्पद्रुमांत उद्धृत केलेला' म्हणून दिला आहे. )

दकाराचे तीन बिन्दु म्हणजे पूर्वी सांगितलेलें 1.2 मध्यें दाखविलेले समष्टिबिन्दु व विसर्ग, हे लक्षणश्लोकांतील ' त्रिबिन्दु ' शब्दानें निर्दिष्ट आहेत. त्यांचा निर्देश दकार लिहिण्याची दिशा (=सव्यक्रम) सांगण्याकरितां आहे. लिपिरेखाटन ' बिन्दुस्फोटन ' या मूलाधारास घेऊन करावयाचें असल्यानें येथें बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरचे, डावीकडील खालचें व उजवीकडील खालचे हीं अर्धे घ्यावयाची असून आकृतींत दाखविल्याप्रमाणें सव्यक्रमानें जोडावयाचीं आहेत. तीं अनुक्रमे १, २ व ३नें दाखविलीं आहेत.

### ढकाराशी वेगळेपणा

ढकाराशीं वेगळेपणा करितां तिसऱ्या बिन्दूची रेषा दकारांत खालीं ओढली जाते. ती रेषा लक्षणश्लोकांत सांगितली नाहीं ती दिली तरी लक्षणश्लोकास बाध येत नाहीं. बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालचें अर्धच मुडपून खालीं ओढलेली रेषा केली असें समजावें. देवनागरींत सव्यक्रम (डावीकडून उजवीकडे जाणें) स्वीकारला असल्याने दकाराचें पोट डावीकडे येतें. अशोक लिपींत अपसव्यक्रम ( उजवीकडून डावीकडे जाणें) स्वीकारून दकार केला जातो. 101 मध्यें दकाराचा मौलिक उद्भव दाखविला आहे. 102 मध्यें देवनागरी दकार वेगळा लिहून दाखविला आहे. 103, 104 मध्ये अशोकलिपि दकार दाखविला आहे.

105, 106, 107

१ २, ३ ४

त्रिकोणरूप रेखायां त्रयो देवा वसन्ति हि । विश्वेश्वरी विश्वमाता वामतः स्कन्धतः स्थिता ।

त्रिकोणेति । बिन्दुस्फोटने १, २, ३ त्रिकोणरूप रेखा (यस्यां त्रयो देवा वसन्ति हि) ४ वामतः स्कंधतः रेखा (यस्यां विश्वेवरी) = धकारः । अत्र त्रिकोणे त्रयो देवा इति पृथक्पदपाठोनास्ति । त्रिकोणस्य रूपमिवरूपं यस्याः सा रेखेति बहुव्रीहिश्चेदर्थप्रतिपत्तिकरो भवति । यतः १, २, ३ अनवधृत कोणत्रयवत्त्यमिहतद्रूपम् । अतो वामतः स्कंधतः स्थित रेखया अनन्तरं कोणो भविष्यन्न वार्यते । ऊर्ध्वरेखामात्रा बोद्धव्या बोध्यमित्यादौ संयुक्ताक्षरे तस्या एव लोपात् ।

## मराठी सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत त्रिकोणरूप रेखा आणि डाव्या खांद्यावर असणारी रेषा काढल्यावर धकार होतो

**'त्रिकोणरूप रेखा'** म्हणजे तीन कोण असणारें जिचें स्वरूप आहे अथवा त्रिकोणाचें रूपासारखें जिचें रूप आहे अशी रेषा. हा बहुव्रीहि समास आहे. हे तीन कोन आकृति 105, 106, 107 मध्यें १, २, ३ नें दाखविले आहेत, मधली तिरकी रेषा, खालची वक्राकार-रेषा, व उभी सरळ रेषा, मिळून होणारा भाग या पदांनी सांगितला आहे. **'वामतः स्कंधतः स्थिता'** या पदांनीं डावीकडील वरची, बिन्दु-स्फोटनांतील वरच्या डाव्या अर्धानें होणारी रेषा घ्यावयाची आहे. ही ४ नें दाखविली आहे. घ व घ रेखाटनातील फरक धकार वर्तुळाकार लिहिला तरी त्यांत त्रिकोणरूप रेखा आहे असें समजावें प्रचलित देवनागरी धकार 'ध' या प्रमाणें गांठ देऊन अथवा शिरोरेषेचे वर टोंक ठेवून 'घ' शीं फरक करण्यासाठीं लिहिला जातो, या सर्व पक्षांत पूर्वप्राप्त क्रमानें घ असें तोडून लिहिण्यांत तात्पर्य चित्रभागांत दाखविल्या-नुसार आहे. घ कारांतील उभी रेषा मात्रा समजावी कारण 'बोध्य' वगैरे जोडाक्षरांत तिचा लोप होतो.

## 'न'

107 (ब), 108, 109, 110

१ २ ३

वामतः कुण्डली रेखा ऊर्ध्वाधः क्रमतः स्थिता । चन्द्राग्निसूर्यरूपा सा मात्रा वाणी प्रकीर्तिता ॥

वामत इति । बिन्दुस्फोटने १ वामतः कुण्डली २ (ततः) ऊर्ध्वाधः क्रमतः स्थिता रेखा ३ मात्रा नकार इत्यन्वयः । अत्र ऊर्ध्वाधः क्रमोक्तेः 101, 110 एव प्रथम कल्पः ।

## मराठी सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत डावीकडें कुण्डलाकार रेषा काढून वर खालीं क्रमानें रेखा लिहून मात्रा रेषा लिहिल्यावर 'न' कार होतो.

**'वामतः कुण्डली'** या श्लोकांतील पदानें डावीकडील **कुण्डलाकार** रेषा सांगितली आहे. ही रेषा आकृत्यांत **१** ने दाखविली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचें अर्ध घेऊन होते. **'ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा'** या पदांनीं वरच्या व खालच्या बाजूला क्रमानें असणारी रेषा सांगितली आहे. ही २ नें दाखविली आहे. **'मात्रा'** या पदानें उजवीकडील दोन वृत्तार्धं घ्यावयाचें असून तें ३ नें दाखविले आहेत. 'न' कार करितांना, १ या रेषेकरितां, बिन्दुस्फोटनांचील डावीकडी खालचा अर्ध घ्यावा कीं वरचा या विषयीं **'ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा'** या वचनानुसार डावीकडील वरचा अर्ध घेऊन करण्यास प्राधान्य आहे.

107 (ब), व 109 मध्यें मौलिक उद्भव दाखविला आहे. व 108, 110 मध्यें 'न'कार वेगळा लिहून दाखविला आहे.

## ‘प’

111, 112

१ २ ३ ३ ५ ४

**कुञ्चिता वामरेखाया कोणाद्दक्षिणतोऽपरा । कुञ्चिता साऽपि विज्ञेया मात्रा वामोद्गता तथा ।। शम्भुर्ब्रह्मा भगवती क्रमशस्तासु तिष्ठति ।।**

कुञ्चितेति । बिन्दुस्फोटने १ (उत्सर्गतः प्राप्तैव वामरेखा) कुञ्चिता २ (तस्याः) वामरेखायाः दक्षिणतः कोणात् अपरा ३ साऽपि (दक्षिणतः) कुञ्चिता ४ वामोद्गता ५ मात्रा ‘प’ कार इत्यन्वयः । पकार इति शेषः । वामोद्गता (अधोगत्वा अधस्तः) वामान्निर्गत्य उद्गता इति मध्यमपदलोपी समासः । उद्गतेरधस्त्वनिरूतपित्वात् १ कुञ्चितेत्यनेनेव प्राप्ताया वामरेखायाः पुनर्वामग्राहं कथनात् अन्ते कोणं प्रकृत्येति कोणादित्यस्यार्थः । न तु कुञ्चिते स्थितं कोणमपेक्ष्येति कस्यचित्पक्षः मुख्यः नात्रह्यग्राहं प्राप्तन्कथन-वैयर्थ्यात् । अन्यथा वामारेखाकुञ्चनतः कोणादित्येवोच्येत ।

# मराठी–सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ**––बिन्दुस्फोटनांत डावीकड एक कुञ्चित होणारी रेषा, तिचे खालचे टोंकाशीं आणखी एक कुञ्चित होऊन उजवीकडे जाणारी रेषा, तिचे शेवटापासून उजवीकडै कुञ्चित होऊत आडवी जाणारी रेषा, तिचेनंतर डावीकडून सुरू होऊन खाली जाऊन वर जाणारी रेषा म्हणजेच मात्रारेषा काढली असतां ‘प’ कार होतो.

कुञ्चिता (१) या श्लोकांतील पदानें ‘**कुञ्चिता वामरेखा**’ असें घ्यावयाचें आहे. या पदानें डावीकडे असणारी कुञ्चित होणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरच्या अर्धभागाचे दोन खण्ड करून त्या पैकीं वरच्या खण्डानें होते. ही आकृत्यांत १ नें दाखविली आहे. ‘**वामरेखायाः कोणात् दक्षिणतः अपरा**’ या पदांनीं उपर्युक्त डावीकडील रेषेच्या खालच्या टोंकाशीं कोन करून उजवीकडे जाणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा हीच म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरच्या अर्धाचे दोन खण्ड केल्यावर खालचें खण्ड होय. ही २ ने दाखविली आहे. (सापि दक्षिणतः) कुञ्चिता (३ या पदानें या रेषेचे खालच्या टोंकापासून उजवीकडे कुञ्चित होणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा ३ नें दाखविली आहे. वामोद्गता–मध्यमपदलोपी समास ‘**वामोद्गता**’ या पदानें ३ रेषेनंतर डावीकडून निघून खालीं जाऊन वर येणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा ४ ने दाखविली आहे. हा मध्यमपदलोपी समास करावयाचा आहे. ‘**उद्गत**’ म्हटल्याने वरूनच खालीं जाऊन वर जाणें हें येतें **मात्रा** या पदानें उजवीकडील ४ या रेषेच्या वरची ५ नें दाखविलेली सरळ रेषा संपूर्ण सांगितली आहे. 111 मध्यें मौलिक उद्भव दाखविला आहे. 112 मध्यें ‘प’ सुटा लिहून दाखविला आहे.

## ‘फ’

110, 114.

१ २ ३ ४ ५

**वक्रा वामगता रेखा ततोऽधः सङ्गताभवेत् । तस्मादूर्ध्वंगता भूत्वादक्षमारभ्य कुण्डली ॥**

५

**ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च कुण्डली ब्रह्मरूपिणी । मात्रा वामाद्दक्षिणतः क्रमशः परिकीर्तिता ।।**

वक्राइति । बिन्दुस्फोटने १ वामगता वक्रा रेखा २ ततोऽधः सङ्गता ३ तस्मादूर्ध्वंगता भूत्वा ४ दक्षमारभ्य ५ कुण्डलीमात्रा ‘फ’ कार इत्यन्वयः । ऊर्ध्वंगता दक्षमारभ्येत्यनुक्त्वा ऊर्ध्वंगता भूत्वेत्युक्तेः ऊर्ध्वपर्यन्तं गतिर्बोध्यते । ततः दक्षमारभ्येति क्रियान्तरारम्भश्चेति । कुण्डली = मात्रा दक्षाधस्तनमर्धवृत्तमेव बिन्दुस्फोटनप्राप्तम् । अत्र ४ दक्षमारभ्य या कुण्डली सैव मात्रा । ‘स्फय’ इत्यादौ संयुक्ताक्षरे तस्या एव लोपात् । 113 मौलिकोद्भवः । 114 पृथग्लिखितः ।

# मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत डावीकडे एक वाकडी रेषा, त्या नंतर तिचें खालचे टोंकापासून आडवी जाऊन खालीं जाणारी रेषा, तिचें टोंकापासून वर वळणारी सरळ रेषा, उजवीकडन सुरू होणारी रेषा आणि डावीकडून उजवींकडे जाणारी कुण्डलाकार मात्रा रेषा काढली असतां ‘फ’ कार होतो.

'**वक्रा वामगतारेखा**' या श्लोकांतील पदानें डावीकडे असणारी वक्राकार रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध होय. ही आकृत्यांत १ नें दाखविली आहे. '**ततोऽधःसङ्गता**' (रेखा) या पदानें १ या रेषेचे खालीं असणारी आणि १ चें खालच्या टोंकापासून सुरू होऊन आडवी जाऊन खालीं वळून, तळापर्यंत जाणारी रेषा सांगितली आहे–ही रेषा २ ने दाखविली आहे. '**तस्मादूर्ध्वंगताभूत्वा**' या पदांनीं २ या रेषेपासून सरळ वर जाणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा देवनागरींत अक्षराचे डोक्यापर्यंत नेंली जाते 'भूत्वा' असें म्हटल्यावरूनच करावें असें प्राप्त होतें ही रेषा ३ नें दाखविली आहे. 'दक्षमारभ्य' या पदानें ३ या रेषेच्या उजवीकडून सुरूं होणारी रेषा सांगितली असून, तीं ४ नें दाखविली आहे. ४ ही रेषा या रेषेचें वरच्या टोंकाकडून सुरूं करून लिहून, बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरच्या अर्धानें ५ ही रेषा 'वामाद्दक्षिणतः कुण्डली' अशी कां लिहूं नये, असें लिहिण्यांत लाघव आहे. आकृतींत दाखविल्याप्रमाणें पुन्हा खालीं उतरून कां लिहावी असा प्रश्न येथें येतो.

**क्रियान्तरारम्भ**

असें न करण्याचें कारण 'दक्षमारभ्य' असे पद आहे. तेथें आरम्भ सांगितला आहे. तेथें आरम्भ सांगितला आहे. तेथें आरम्भ सांगितला आहे. दोन क्रियांत अंतर असल्याखेरीज (पहिल्या क्रियेचा शेवट व) दुसऱ्या क्रियेचा आरंभ झाला असें म्हणतां येणार नाहीं.

यावरही असा प्रश्न होईल कीं ४ ही रेषा (३ या रेषेच्या) वरच्या टोकापासून लगेंच सुरूं न करतां, थोडी तोडून, हात उचलून मग सुरूं करूं. असेही न करण्याचें कारण 'दक्षमारभ्य' येथें वर खालीं असा कोणताच स्पष्ट निर्देश श्लोकांत नसल्यानें (वर व खाली दोन्ही टोंकाचें पक्ष सोडून) मध्यभागांतून सुरूं करणें हा उत्तम पक्ष आहे.

'**मात्रा वामाद्दक्षिणतः कुण्डली**' या पदांनी ४ रेषेनंतर डावीकडून उजवीकडे कुण्डलाकार होणारी मात्रा रेषा सांगितली आहे ही रेषा म्हणजें बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालचें अर्ध होय. ही ५ ने दाखविली आहे. हींच मात्रा होय कारण 'स्पय' वगैरे जोडाक्षर लिहिताना तिचा लोप होतो.

## 'ब'

115, 116

१, २, ३ ४
**त्रिकोणरूपिणी रेखा विष्ण्वीश ब्रह्मरूपिणी । मात्राशक्तिः पराज्ञेया ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

त्रिकोणेति । बिन्दुस्फोटने त्रिकोणरूपिणी रेखा, मात्रा 'ब' कारः। इयं मात्रा कोणनिर्माणं विना अक्षरघटकत्वाविच्युतये मध्ये अस्पृष्टा स्थाप्यते यथा 115, 116 चित्रयोः स्पृष्ट्वा लिखिताचेत् वृष्टा मन्तव्या। अत्र बहुव्रीहिनार्थप्रतिपत्तिकरः मत्वर्थीयन्प्रत्ययादतो न त्रिकोणरेखेव वा त्रिकोणरूपरेखैव वा अर्थः किन्तु अवधृत कोणत्रयरूपवती रेखा इत्यर्थे त्रयः कोणरूपं त्रिकोणरूपमिति कर्मधारयान्मत्वर्थीयः प्रत्ययः ।

१, २, ३ अवधृतकोणत्रयवत्वात् त्रिकोणरूपिणी रेखा। अत्र मात्रेति मध्या ग्राह्या । तथा कोणो न निर्मातव्यः । निर्माणे वा न गणनीयः । ऊर्ध्वमात्रायाः त्रिकोणरूपिणीत्येव प्राप्तत्वात् । अथ च वर्तुललेखनेऽपि वक्रे वृत्तार्धे एकः कोणः अव्यक्तः अस्त्येव गणनीय इति । सम्पूर्णक्षरे त्रय एव अवधृताः कोणा इति ।

# मराठी–सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ**– बिन्दुस्फोटनांत त्रिकोणरूपिणी रेषा व मात्रा रेषा काढली असतां 'ब' कार होतो '**त्रिकोणरूपिणीरेखा**' या पदानें तीनच कोन असणारी रेषा या ठिकाणीं तीन कोन असणारें रूप म्हणजे त्रिकोणरूप असा कर्मधारय समास करून मत्वर्थीय 'इन्' प्रत्ययानें 'त्रिकोणरूपिणी' म्हणजे अवधृत कोणत्रयवती रेखा असा अर्थ घ्यावयाचा आहे.

आ. 115 मध्यें १ नें दाखविलेली रेषा आणि बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालचें अर्ध या मध्यें **एक कोन** आणि २ नें दाखविलेली रेषा व बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील दोन अर्धानीं बनणारी ३ ही मात्रा रेषा यांनी एक वर दुसरा खालीं असे **दोन कोन** या प्रमाणें एकूण **तीन कोन** होतात. ४ नें दाखविलेली रेषा वगळून इतर रेषाभाग '**त्रिकोणरूपिणी रेखा**' या पदांनीं सांगितला आहे. धकारामध्यें मागें '**त्रिकोणरूप रेखा**' असें पद आले आहे, तेथें बहुव्रीहि समास केल्याने, व्युत्पत्तिवादानुसार तीनच कोन असावेत असें अवधारण नाही. प्रस्तुत

स्थळीं मात्र तसें अवधारण आहे. शक्तिः (मात्रा) या शब्दानें ४नें दाखविलेली रेषा शक्तिदेवता सांगण्याकरितां उल्लेखिली आहे. अकारमात्रा म्हणून बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील दोन अर्धांनी बनणारी सरळ रेषा घ्यावयाची आहे. हिचाच जोडाक्षरांत लोप होतो. उदा. अब्ज वगैरे, त्रिकोणरूपिणी रेखेंत तिचा समावेश असल्यानें ती मात्रा म्हणून वेगळी उल्लेखिली नाहीं

## 'भ'

भकारस्य प्रकारव्दयमुक्तम् । तत्र एकः प्रकारः ऊर्ध्वाध इति ।

117, 118

२ १ ३ ४ ५

**ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा वामे वक्रा तु कुण्डली । पुनश्चाधो गता सैव अत ऊर्ध्वंगता पुनः ॥ ब्रह्माशम्भुश्च विष्णुश्चक्रमशस्तासु तिष्ठति ॥**

ऊर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने १ वामे वक्रा २ ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा ३ अधोगता कुण्डली तु ४ पुन (श्चाधोगता इत्यनुषज्यते.।

उपस्थितत्वाद्बिन्दुस्फोटन एव अधोगत्वमित्यतः समानान्तरदक्षार्धवृत्तं प्राप्येति लाघवात् सिध्यति ।) ५ सैव अत ऊर्ध्वंगता पुनरित्यन्वयः ।

अथवा

119, 120, 121' 122, 120 (ख)

द्वितीयः प्रकारः किञ्चिदिति

२ १

**किञ्चिदाकुञ्चिता रेखा वामाद्दक्षिणतो गता । ततो वक्रा वामगता तासु वाण्यादयः क्रमात् ॥**

३

**ऋजुमात्रा मध्यगता कोणाद्दक्षगता पुनः । महाशक्तिस्वरूपा सा ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

किञ्चिदिति । बिन्दुस्फोटने १ वक्रा वामगता २ किञ्चिदाकुञ्चिता वामाद्दक्षिणतोगता ततः ४ ऋजुमात्रयोः (३, ३) मध्यगता ५ कोणात् ६ दक्षगतः पुनः (साऽपि ऋजुमात्रयोः ३/३ मध्यगतेत्येव) इत्यन्वयः । १, २ योः पाठक्रमो विपरीतस्तथापि पाठक्रमादर्थक्रमोबलीयानिति न्यायाल्लेखनक्रमानुसारेण वक्रा वामगतां प्रथमं लिखित्वा वामात्किञ्चिदाकुञ्चिता दक्षिणतोगता लिख्यते । ऋजुमात्रयोर्मध्यगतेति विगृह्य समासः । कयोर्मध्यगतेति साकाङ्क्षत्वात् । ३ ऋजुमात्रे अधस्तनें द्वे उपर्यधो दक्षे च द्वे । तत्र ऋजुमात्रयोरधस्तनयोः मध्य दक्षगता ५ कोणा-दक्षगता पुनः ६ (उपर्योधस्तनयोः ऋजुमात्रयोर्मध्यरातेत्येव) तथाच ऋजुत्रयस्यापि सिद्धिः । पुनरित्यनन्तरं ऋजुमात्रामध्यगतेत्यनुषज्यते । ऋजुमात्रा चासौ मध्यगतेति विग्रहे वा असमस्तपदद्वयत्वे वा कयोर्मध्य इत्याकांङ्क्षाया अनिवृत्तिः अध्याहारे गौरवम् । अत्र ५ कोणाद्दक्षगता पुनः ६ उपर्यधस्तनयोः ३ ऋजुमात्रयोर्मध्यगतेत्येव परं 120 (ख) इव उपरिमुखं यथा तथा दक्षगतेति ग्रन्थलिपि प्रभृतिपक्षः कल्पितः गौरवाद्देवनागर्यामुपेक्षितः । घृष्टलेखने गौरवं न न्याय्यत्वे बाधकमित्यन्यदेतत् । एवं सति अत्र १, २ अंशं परित्यज्य शेषांशः पृथग्लिखितः अशोकलिप्यां चित्रविभागे दर्शितवत् भकारः इतः सिध्यति । यद्यपि प्राय उपर्यधो दक्षे ऋजुमात्रे समान रेखारूपेणैव लिखन्ति सम्प्रति लेखकाः। लिख्यते देवनागर्यां क्वचिदशोकलिप्यामपि भ चित्रविभागे यथादर्शितं उपलभ्यते सम्प्रति लेखकैस्तथैव, तथापि शास्त्रमित्थमनुसंधापयतीति दर्शितम् ।

## मराठी-सारांश

भ कार दोन प्रकारचा श्लोकांनी सांगितला आहे.

प्रकार पहिला

**लक्षण श्लोकाचा अर्थ**—बिन्दुस्फोटनांत डावीकडे एक वक्राकार रेषा, वरून खालीं येणारी रेषा, खालीं जाऊन कुण्डलाकार होणारी रेषा, पुन्हा खालीं जाऊन वर जाणारी रेषा काढल्यावर 'भ' कार होतो. '**वामे वक्रा**' या श्लोकांतील पदानें डावीकडे वक्राकार होणारी रेषा म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्ध होय. ही 117 मध्यें १ नें दाखविली आहे. 'ऊर्ध्वाधःक्रमतो रेखा' या पदांनीं वरून सुरू

होऊन खालीं येणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा १ च्या वरच्या टोंकापासून सुरू होते. ही रेषा २ नें दाखविली आहे. '**अधोगता कुण्डली तु**' या पदांनीं खालीं जाऊन कुण्डलाकार होणारी रेषा २ नंतर काढावयास सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील डावीकडील खालच्या अर्धाला घेऊन बनते. ही रेषा ३ नें दाखविली आहे. '**पुनश्च**' त्या पदांनीं '**पुनश्चाधोगता**' याचा 'अधोगता' याचेशीं अनुषङ्ग करून असें ध्यावयाचें आहे. याचा अर्थ—पुनः बिन्दुस्फोटनांत खालीं जाणारी रेषा काढावयाची आहे. ही रेषा ४ नें दाखविली आहे. ही काढण्याकरितां ३ व ४ यांचें मधील आडवी रेषा ओघानेंच येते, ४ ही रेषा बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालच्या अर्धाला घेऊन बनते. '**सैव अत ऊर्ध्वगता पुनः**' या पदांनीं ४ ही रेषा अक्षराचें डोक्यापर्यंत वर न्यावयास सांगितली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरच्या अर्धास घेऊन बनते. ती ५ नें दाखविली आहे. 117 मध्यें मौलिकोद्भव व 118 सुटा 'भ' दाखविला आहे. याला घेऊनच प्रचलित देवनागरी 'भ' बनतो. तो लिहितांना कोणीं 'भ' या प्रमाणें सुरुवातीस गांठ घेऊन अथवा कोणीं टोक शिरोरेषेचे वर काढून लिहितात. तोडून लिहिण्यांतच लक्षण श्लोकाचें तात्पर्य आहे.

**लक्षण श्लोकाचा अर्थ**–बिन्दुस्फोटनांत डाव्या बाजूला वाकडी होणारी एक रेषा, तिचे पासून थोडी आकुंचित होऊन डावीकडून उजवीकडे जाणारी एक रेषा, दोन खालीं व एक वर अशा ऋजुमात्रा, खालच्या दोन ऋजुमात्रांचे मधील एक आडवी रेषा व कोणांतून उजवीकडे जाणारी वरच्या व खालच्या ऋजुमात्रांच्या मधली एक रेषा एवढें काढल्यावर 'भ' कार होतो. '**वक्रावामगता**' या श्लोकांतील पदानें डावीकडे वाकडी होणारी रेषा सांगितली आहे. 119, 120 मध्यें १ ह्या रेषेपासून थोडी आकुंचित बनून डावीकडून उजवीकडे जाणारी रेषा सांगितली आहे. ती २ नें दाखविली आहे. '**ऋजुमात्रामध्यगता**' या पदांनी ऋजुमात्रांचे (खालच्या बाजूस ३, ३ नें दाखविलेल्या रेषा) मध्यभागीं असणारी, ४ नें दाखविलेली आडवी रेषा सांगितली आहे. या ऋजुमात्रा म्हणजे अनुक्रमे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील व उजवीकडील खालचीं अर्धें होत '**कोण**' म्हणजे ५ नें दाखविलेला, बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील खालच्या अर्धानें बनणारी ऋजुमात्रा (३) व ४ रेषा यानीं बनणारा कोण होय. '**कोणाद्दक्षगता**' या पदांनीं या कोणांतून उजवीकडे जाणारी रेषा सांगितली आहे. ती ६ नें दाखविली आहे. बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील वरचें अर्ध व खालचें अर्ध (३⁄५ नें दाखविलेलें) या ऋजुमात्रा घेऊन ६ ही रेषा त्यांचे मध्येंच येत असल्याचें स्पष्ट आहे. या ठिकाणीं '**कोणाद्दक्षगता पुनः**' ही ६ नें दाखविलेली रेषा ' 120 (ख) मध्यें दाखविल्याप्रमाणें वरच्या व खालच्या ऋजुमात्रांचे मध्यें, वरच्या ऋजुमात्रेच्या वरच्या टोंकास जाणारी '**दक्षगता**' लिहिण्याचा तामिळ ग्रन्थलिपि प्रभृतींचा पक्ष आहे. त्यांत गौरव असल्यानें तो देवनागरींत उपेक्षिला आहे. पृष्टलेखनांत गौरव असणें न्याय्यत्वास बाधक नाहीं असेंही कोणी म्हणतात.

१, २ नें दाखविलेल्या रेषांचा पाठक्रम विपरीत असला, तरी 'पाठक्रमाहून अर्थक्रम बलवान् असतो' या न्यायानें लेखनक्रमानुसार १ प्रथम लिहून नंतर २ ही रेषा लिहिली जाते, 'ऋजुमात्रा मध्यगता' हा समास 'ऋजुमात्रयोः मध्यगता' असा सोडवावयाचा आहे; कारण कोणाच्या मध्यें असा प्रश्न उपस्थित होतो. अर्थात् मध्यगता या पदाला अन्य कोणाची आकाङ्क्षा आहे. तिची पूर्तता होईल असा विग्रह करणें त्यामुळें प्राप्त होते. म्हणून असा विग्रह करून खालच्या दोन ऋजुमात्रांना घेऊन ४ ही मध्यगता, व उजवीकडील खालची एक व वरची एक अशा दोघींना घेऊन ही मध्यगता होते. '**कोणाद्दक्षगता पुनः**' या पदांचा अर्थ करितांना '**कोणाद्दक्षगता पुनः ऋजुमात्रयोः मध्यगता**' असें घेऊन अर्थ करावा लागतो कारण मीमांसेच्या अनुषङ्गाधिकरणाने प्रतिपादनानुसार लाघव साधावे लागतें. या प्रमाणें तीन ऋजुमात्रा सिद्ध होतात. असें असल्यानेंच १, २ हे रेषाभाग सोडून अशोकलिपि 'भ' 121, 122 बनतो. प्रचलित देवनागरी लेखनांत उजवीकडील ऋजुमात्रा एका सरळ रेषेंत लिहितात. येथें शास्त्र प्रतिपादन काय तें सांगितलें आहे.

## 'म'

23 24 25

१ २ ३

**ऊर्ध्वाधः क्रमतोरेखा वामे वक्रा तु कुण्डली । पुनश्चाधोगता सैव अत ऊर्ध्वगतापुनः ।।**
**ब्रह्मा शम्भुश्च विष्णुश्च क्रमशस्तासु तिष्ठति ।**

उर्ध्वाध इति । अत्र प्रथमभकारवदन्वयः । अत्र वैलक्षण्यं यथा स्यादित्येतदर्थं मौलिकोद्भवे यथास्थितं वामे वक्रत्वं स्थापितम् । अत्र तन्त्रस्थं वचनं भकारवदेव । वैलक्षण्याय यथाचारमुपरितन वामवृत्तार्धस्याधनस्तनशीर्षेण १ रेखा सम्बध्य लिख्यते । भकारे तु उपरितनशीर्षेणेति दृष्टम् । 123 मूले समुद्भवप्रदर्शनम् । 124 कुण्डली ३ सङ्क्षिप्ता । 125 सरलरेखया मात्रा प्रदर्शिता ।

## मराठी सारांश

मकाराचा लक्षण श्लोक भकाराचे पहिल्या प्रकाराप्रमाणेच आहे. भकारापासून वेगळेपणा राखण्यासाठीं डावीकडील वरचें वृत्तार्ध खालच्या टोकाकडून, डाव्या खालच्या वृत्तार्धाचे खालच्या टोंकास जोडलें आहे.

'**ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा**' या पदानें वरून सुरुवात करून खाली क्रमाने रेषा लिहिण्यास सांगितले आहे. '**वामे वक्रा**' या पदांनी डावी-कडील वाकडी रेषा सांगितली आहे. ही रेषा म्हणजे विन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचे वृत्तार्ध होय. ही आकृत्यांत १ ने दाखविली आहे. कुण्डली या पदाने १ या रेषेखाली काढावयाची कुण्डलाकार वक्र रेषा सांगितली आहे. ही रेषा २ ने दाखविली आहे. ती डावीकडील वरच्या अर्धाचे खालच्या टोंकापासून सुरू होऊन सरळ खाली येऊन डावीकडील खालच्या वृत्तार्धास घेऊन बनते. '**पुनरधोगता**' या पदाने, डावीकडील खालच्या वृत्तार्धाचे डोक्यापासून सुरू होऊन आडवी जाऊन उजवीकडील खालच्या वृत्तार्धास घेऊन बनणारी रेषा सांगितली आहे. ही 3 ने दाखविली आहे. '**सैव अत ऊर्ध्वगता**' या पदाने ३ ही रेषा वर अक्षराचे डोक्यापर्यंत नेण्यास सांगितले आहे. ही रेषा ४ ने दाखविली आहे. ही रेषा बिन्दुस्फोटनाचे उजवीकडील वरच्या वृत्तार्धास घेऊन बनते. उजवीकडील भाग सरळरेषा रूपाने लिहिणें प्रचलित आहे. 124, 125 मध्ये म काराचा उजवीकडील कुण्डल भाग लहान करून लिहिला आहे. 123 मौलिकोद्भव आहे.

## 'य'

126, 127

१ २ ३ ४

**ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा चतुष्कोणमयी शुभा । नारायणेशविधयः तासु तिष्ठन्ति नित्यशः ।।**

५

**मात्रा कुण्डलिनी ज्ञेया ध्यानमस्य प्रवक्षते ।**

उर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने उर्ध्वाधः क्रमतः चतुष्कोणमयीशुभा रेखा, मात्रा यकार इत्यन्वयः । अत्र कुण्डलिनीति मात्रादेवतोच्यते । पृथग्देवतानोक्तेः । 126 मूले मौलिकोद्भव प्रदर्शनम् । 127 पृथग्लिखिते सरलरेखया मात्रा । अशोकलिपौ उपरिवामार्धवृत्तमपि मध्ये सरल रेखारूपेण क्वचिद्यकारे अन्तर्भाव्यते ।

# मराठी–सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ** — बिन्दुस्फोटनांत वरून खाली क्रमाने '**चतुष्कोणमयी**' म्हणजे चार कोन असणारी रेषा केल्यावर मात्रा लिहून यकार होतो. ही रेषा बिन्दुस्फोटनांतील खालचे दोन अर्ध घेऊन बनते. आ. 126, 127 मध्ये १, २, ३, ४ यांनी ते चार कोन दाखविले आहेत. 'मात्रा' बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील अर्धास घेऊन बनते. 126 मध्ये यकाराचा मौलिक उद्भव दाखविला आहे. 127 मध्ये मात्रा सरल रेषा रूपाने लिहून यकार वेगळा लिहून दाखविला आहे. 126, 127 मध्ये मात्रा ५ ने दाखविली आहे. अशोक लिपीत डावीकडील वरच्या अर्धवृत्ताला देखील कोठे कोठे मधील रेषेशी य मध्ये जोडून लिहिले जाते.

## 'र'

भकारवद्रेफस्याऽपि प्रकारद्वयमुक्तं तत्र एकः प्रकारः यथा

128(क), 128(ख), 129, 130, 131

१ २ २ ४

**दक्षतः कुण्डली रेखा वामाद्दक्षगताप्यधः । पुनर्दक्षगता द्वेधा ततोऽधोगत्य चोर्ध्वतः ।।**

**भवानी शङ्करो वह्निस्तासु तिष्ठन्ति नित्यशः । अर्धमात्रा ब्रह्मरूपा महाशक्तिः प्रकीर्तिता ।।**

दक्षतः इति । बिन्दुस्फोटने १ रेखा दक्षतः कुण्डली (कर्तव्या अप्राप्ते विधानमर्थवदितिन्यायेन वामार्थवृत्तयोः तथा विधानमर्थवदिति 128 (क) चित्रे दर्शितम् ।) २ अधः वामाद्दक्षगता (कार्या) पुन (रपिअधः) ३ (अधः दक्षतः कुण्डली रेखा) ४ (अधः वामाद्दक्षगतेत्येवं) द्वेधा (कृत्वा) ५ ततोऽधोगत्य ६ ऊर्ध्वतश्च (गत्वा) अर्द्धमात्रा (कर्तव्येत्यर्थः । एवं सति) रेफ एक प्रकारः (स्यात्) केषाञ्चित श्लोकस्थपदानामाकाङ्क्षावशादनुषङ्गः सुगमः अन्येषां केषाञ्चिदर्थादिपेक्षः । अत्र बिन्दुस्फोटने दक्षवृत्तार्धद्वयस्य, अन्ते मात्रार्थत्वेनापेक्षितत्वाद्वामवृत्तार्धद्वयं वामतः कुण्डलीरूपं वामपार्श्वे कुण्डलीत्ववत् = वक्रत्ववत परिवर्त्य दक्षतः कुण्डलीत्ववत् सम्पाद्ययोजनीयमिति "दक्षतः कुण्डली रेखा" इत्यतः पर्यवसन्नम् । तथाच 128(क) मध्ये यथा वामवृत्त द्वयेन दक्षतः कुण्डल्यौ रेखे कृते । तत्र उपरितनी दक्षतः कुण्डली रेखा, (ततः) वामादधोदक्षगताधस्तनीदक्षतः कुण्डली रेखा (मूलात्तद्द्वारा) पुनरपि, तदधो वामाद्दक्षगता, इति द्वेधा तथोऽधोगत्ययोर्ध्वतःगता मात्रेत्यर्थः । अत्र 128 (ख) मध्ये दर्शितरीत्या सकृद् (२) वामाद्दक्षगतायाः पुनरपीति द्वेधा ४ दक्षगतत्वार्थमधः २/४ योर्मध्ये अधस्तन वामार्धेन पुनर्दक्षतः कुण्डली रेखा ३ कर्तव्यतापेक्षिप्तं तत्स्थानम् ततः पुनर्द्वेधा दक्षगत्येत्यादि सुगमम् 128(क) (ख) मूले उद्भवं प्रदर्शनार्थम् 131 ऊर्ध्व रेखा सरली कृता । 130 क्वचित् १ दक्षतः कुण्डलीरेखा केवला ऊर्ध्वमात्रया सह रेफ इति घृष्टं लिख्यते सा दर्शिता । 129 सर्व सरलरेखया कृतम् । कामरूप देशे एवं रेफो रूढः । इत्येकः प्रकारः । अथ द्वितीयः ।

132(क), 132(ख), 133, 134, 135, 136
१, २, ३, ८

उर्ध्वाधः क्रमतो रेखा त्रिकोणाऽधोगता हि सा । विधिरीशः केशवश्च तासु तिष्ठन्ति नित्यशः ॥
४ ७
उर्ध्वस्थिता तु या मात्रा सा शक्तिः परिकीर्तिता । तस्य मध्यगता रेखा वह्निरूपा हि सा स्मृता ॥
निर्गुणोऽसौ सदावर्णो न कदाचिद्गुणी भवेत् ॥

ऊर्ध्वाध इति । बिन्दुस्फोटने ऊर्ध्वाधः क्रमतो रेखा (यथा 132 (क) (ख) योः दर्शिता तत्र ।) अधोगता प्रथमोपस्थिता ८ त्रिकोणा १, २, ३ (कार्या) ६ उपरितन रेखा संयोजकोर्ध्वस्थितया ४, मध्यगतया ७ च रेखया 132 (ख) चित्रे इव तथा संयोजनेन कार्या यथा तत्र ४ ऊर्ध्वस्थिता ५, ६ भ्यांसह मात्रापि भवितुं युज्येत, ७ मध्यगतरेखया ६ अधोगता(त्रिकोणापि)। त्रिकोणा अधोगता इति पक्षे छेदः। 132(ख), 133, 136 चित्रेषु कोणत्रयं यथा भवति तथा सति भवतीति यौगिकस्त्रिकोणा शब्दः। सा हि(८ अधोगता रेफ शरीर केवलं तथैव-तिष्ठति ।) ऊर्ध्वस्थिता ४ तु या सा मात्रा (भवति) । अर्थात् मध्यगताधोगतेविना (५+४+६) मिलिता भूत्वा ४ मात्रा भवतीत्यर्थः । अत एव अर्कः सूर्यः इत्यादौ ५+४+६ मात्रं लुप्यते । मध्यगताऽधोगते तु स्थास्यतः । अत्र उपरितनी ६ च त्रिकोणस्याधोगतेति विग्रहेण त्रिकोणाधोगता हि (या) सा ५ ऊर्ध्वस्थिता ४, ६ तु भूत्वा मात्रा भवतीति पक्षे (तत्पुरुष लक्षणासत्त्वेऽपि) 134, 135 चित्रयोः दर्शितरीत्या भवति रूपम् । एवं 135 रेफो वङ्गेषु लिख्यते तस्याधोबिन्दुर्वकारव्यावृत्यर्थम् । न वचनप्राप्तम् ।

तत्र 132(ख) चित्रे दर्शितगतेः सर्पाकारमात्रं ४ रेखां परित्यज्य शेष रेखा वर्णोद्धारतन्त्रप्राप्तां ७ मध्यगतां च रेखा गृहीत्वा ६+७+८+५+९ इति क्रम संयोजनेन भवति । जन्मभूमौ बिन्दुस्फोटने जन्म तु 132 (क) (ख) यो-सममेव । न हि प्रोक्तप्रमाणादन्यतः कुतश्चित्स्वातन्त्र्येण प्राप्ति कस्याप्यस्ति तत्रैवं सति 132 (ख) मध्ये देवनागरी रेफस्य मूले समुद्भवः प्रदर्शितः । 133 पृथग्प्रदर्शितः संयुक्ताक्षरेषु अनाद्यो रेफः । 130 तः यावदपेक्षितं रेफांशमात्रं गृहीत्वा अक्षरादधस्ताद्विलिख्य प्रदर्श्यते यथा चक्रम्, अग्र्यम्, ऐन्द्र्या इत्यादौ । संयुक्ताक्षरेषु द्वितीयादिभिन्न रेफस्तु 136 चित्रे दर्शितं ७+८ भागमात्रं अक्षरोपरि विलिख्यते यथा अर्कः; सूर्यः इत्यादौ दर्शितम् । निर्ऋतिरित्यादि लेखकाः ऋलृकारोपरि संयुक्तेषु द्वितीयादिभिन्नत्वात् तथा लिखन्तीति वक्तव्यम् । उक्तमेव न तत्र हलोनन्तरः संयोगः सम्भवति । वस्तुतस्तु तथा लेखनं पूर्वोक्तहृस्वाकार मात्रामनुस्वरमात्रालेखप्रयोगनियममुपेक्ष्य तन्न न्याय्यम् । निरृतिः, उच्चैरृचा, निरॢकारमित्येव प्रोक्तनियमानुसारि भवतीति इत्थमेव लेखनं न्याय्यम् । ननु एवमादिषु सर्वत्र अर्क, सूर्य, चक्रम्, अग्र्यम ऐन्द्र्या निर्ऋतिः निर्लृकारम् इत्यादिषु लेखने का क्षतिरिति चेत् गौरवमेव ऋ ऌ विषये नियमोपेक्षा च । महाराष्ट्रेषु भाषायां 'दुसऱ्या', 'तऱ्हेच्या' इत्यादिषु संयुक्तादिरेवं लिख्यते सतु-यद्यपि 130 रेफस्यांशः तथापि उच्चारणे भेदाद्भिन्नः एव भाषायां प्रयुक्तः, न संस्कृते तथोच्चारणमिष्यत इति ।

# मराठी-सारांश

'र'काराचें भकारा प्रमाणेंच दोन प्रकार आहेत आणि ते प्रत्येकीं दोन श्लोकांनीं वर्णोद्धारतन्त्रानें सांगितले आहेत.

## प्रकार पहिला

128 (क) ते 131 या आकृतींनीं हा प्रकार दाखविला आहे.

**लक्षण श्लोकाचा अर्थ**—बिन्दुस्फोटनांत उजवीकडें वाकडी होणारी एक कुण्डलाकार रेषा, डावीकडून उजवीकडे खालीं जाणारी रेषा, पुन्हां तशीच डावीकडून उजवीकडे खालीं जाणारी रेषा, तिचे पासून खालीं जाणारी रेषा आणि तेथून वर येणारी ऊर्ध्वगता (मात्रारेषा) काढल्यावर 'र' कार होतो.

128 (क) मध्ये बिन्दुस्फोटनांतील डावीकडील अर्ध उजव्या कुशीवर वळवून तिरकें टाकलें आहेत. 128 (ख) मध्ये लक्षण-श्लोकानुसार भाग दाखविले आहेत. '**दक्षतः कुण्डली रेखा**' या पदानें उजवीकडे कुण्डलाकार होणारी रेषा सांगितली आहे. ही 128 (ख) मध्यें १नें दाखविली आहे. '**वामादधःदक्षगता**' या पदानें १ या रेषेच्या खालच्या टोंकापासून-म्हणजेच डावीकडें सुरू होऊन उजवीकडे खालीं जाणारी रेषा सांगितली आहे. ही रेषा २ नें दाखविली आहे. '**पुनरपि**' या पदानें '**पुनरपि दक्षतः कुण्डली रेखा**' असें घ्यावयाचें आहे. म्हणजे २ या रेषेचे खालच्या टोंकाकडे येणारी उजवीकडे कुण्डलाकार होणारी रेषा सांगितली आहे. ही ३ नें दाखविली आहे.

'**द्वेधा वक्षगता**' या पदाने पुन्हा '**वामादधः वक्षगता**' ही रेषा घ्यावयाची आहे. ही रेषा ४ ने दाखविली आहे. अर्थात् १, २ व ४ या रेषा लक्षणश्लोकांतील पदांनी येत असल्याने श्लोकांतील '**पुनः**' या पदाने ३ ही रेषा २ व ४ चे मध्ये आक्षिप्त होते '**ततः अधोगस्य**' या पदाने ४ या रेषेपासून खाली जाणारी रेषा सांगितली आहे. ती ५ ने दाखविली आहे. '**ऊर्ध्वतः**' या पदाने ५ हीच रेषा सरळ वर नेऊन मात्रा करण्यास सांगितले आहे. ही ६ ने दाखविली आहे. ती बिन्दुस्फोटनाच्या उजवीकडील दोन अर्धांस घेऊन बनते. क्रमाने लेखन करीत असता अनायास उपलब्ध अशा उजवीकडील दोन अर्धांस घेऊन ६ ही मात्रा करणे क्रमप्राप्त आहे, सहज आहे, हे लक्षात घेता १ व ३ या

रेषा 128(क) येथे दाखविलेल्या प्रक्रियेनुसार डावीकडील दोन अर्धांस घेऊन करणेच सोपपत्तिक आहे. तसेच उजवीकडील अर्धांस '**दक्षत: कुण्डलीत्व**' मुळातच असल्याने त्यांना घेऊन कर्तव्य काहीच रहात नाही. हे ही एक कारण आहे.

128(क),(ख) मध्ये मौलिक उद्भव दाखविला आहे. 131 मध्ये मात्रा सरळ रेषा रूपाने लिहिली आहे. काही वेळा १ नें दाखविलेली रेषा व ऊर्ध्वरेषा ( = मात्रा) एवढाच रेफ धृष्टलेखनाने लिहिला जातो तो 130 मध्ये दाखविला आहे. 129 मध्ये सर्व रेषा सरळ रेषा रूपाने लिहिल्या आहेत. असाच रकार आसाम प्रान्तांत लिहिला जातो.

### दुसरा प्रकार

आ. 132 ते 136 मध्ये 'र' चा दुसरा प्रकार दाखविला आहे. **लक्षणश्लोकाचा अर्थ** – बिन्दुस्फोटनात अर्धवृत्ते वरून खाली क्रमाने मांडून तीन कोन असणारी खाली जाणारी रेषा काढली असता 'र' कार होतो.

या ठिकाणी '**त्रिकोणाधोगता**' या पदाचा अर्थ कसा करावयाचा असा प्रश्न येतो. 132(क) मध्ये बिन्दुस्फोटनातील अर्धवृत्ते वरून खाली क्रमाने मांडून दाखविली आहेत. ती अनुक्रमे ६, ८ व ५ ने दाखविली आहेत. क्रमांक न दिलेले 'वामाधोवृत्त' देवनागरीत उपयुक्त नसल्याने त्यास क्रमांक दिलेला नाही. तशीच मांडणी 132(ख) मध्ये दिसतेच आहे. तेथे ६, ८, ५ ही पूर्वोक्त अर्धवृत्ते आहेत, ४ ही ऊर्ध्वस्थिता मात्रा आहे. व ७ ही आडवी दाखविलेली मध्यगता रेषा आहे. ७, ८, ४ने त्रिकोणा(रेषा) बनते. ७ व ८ मध्ये एक कोन, व ४ व ८ मध्ये दोन कोन असे एकंदर तीन कोन बनतात. 133 मध्ये १, २, ३ ने हे तीन कोन दाखविले आहेत. याप्रमाणे त्रिकोणा आणि अधोगता अशी अशी व्यस्त पदे मानण्याचा लघु पक्ष आहे. तद्नुसार ७ मध्यगता व ८ अधोगता वगळून, ४ ही ऊर्ध्वस्थिता मात्रा ५, ६ ने दाखविलेल्या उजवीकडील अर्धवृत्ताशी मिळून मात्रा बनते म्हणूनच अर्क, सूर्य वगैरे जोडाक्षर असलेल्या शब्दांत ४ + ५ + ६ या भागाचा लोप होतो. त्रिकोण शब्द रूढयर्थानें घेऊन त्रिकोणस्याधोगता असा षष्ठी तत्पुरुष समास करण्याच्या पक्षात ऊर्ध्वस्थिता ४, अधोगता ८ व मध्यगता ७ एवढ्या घेऊन रूढयर्थ त्रिकोण बनविला जातो व नंतर त्या त्रिकोणाच्या संदर्भात अधोगता ( = खाली जाणारी) ५ व ऊर्ध्वस्थिता ६ जोडून सरळ मात्रा केली जाते. हा पक्ष बंगालमध्ये प्रचलित आहे.

132 (क), 132 (ख), 133, 134, 136 या आकृति प्रथम पक्ष घेऊन बनतात. 135 दुसरा पक्ष घेऊन बनते. बिन्दुस्फोटनातील अर्धवृत्ते 132 (ख) मधील ७ या रेषेसह घेऊन सर्वाकार लिहिल्यावर अशोकलिपि र बनतो. तो 132 (क) मध्ये दाखविला आहे. कारण 132 (ख) हीच (क). (ख) दोघांची जन्मभूमी आहे, त्याचा विचार पुढ येईलच. 135 हा बंगाली र आहे. त्यामध्ये मात्रा सरळ रेषेत लिहिली आहे. 'व' व 'ब' पासून वेगळेपणा राखण्यासाठी खाली एक बिन्दु दिला जातो. बिन्दुस्फोटनात बनणारा मौलिक देवनागरी र चार अर्धवृत्ते घेऊन बनतो. अशोक लिपीत बिन्दुस्फोटनातील चारी अर्धवृत्ते घेऊन व प्रचलित देवनागरीत ३ अर्धवृत्तें घेऊन 'र' लिहिला जातो. 132 (ख), 133 व 136 या आकृत्यांत तीन कोन असणारी रेषा या अर्थी यौगिक 'त्रिकोणा' शब्द घेतला आहे.

चित्रविभागात वेगळ्या आकृत्यांनी रकाराची मात्रा स्पष्ट दाखविली आहे आणि तिचे लोपाने जोडाक्षर अर्क, सूर्य वगैरेमध्ये डोक्यावर येणारा भाग कसा येतो हे ही दाखविले आहे. 132 (ख) येथे ७ ने दाखविलेली '**मध्यगता रेखा**' 132 (क) मध्ये दाखविल्याप्रमाणे लिहिल्यास 132 (क)हाच अशोकलिपि 'र' होतो. 132 (ख) हा मौलिक उद्भव आहे. 133 मध्ये तो वेगळा लिहून दाखविला आहे.

### संयुक्ताक्षरात रकार

कधी कधी जोडाक्षरामध्ये अनाद्य रेफ असतो, अनाद्य म्हणजे सुरुवातीस नसणारा दुसरा-तिसरा वगैरे 130 मध्ये दाखविल्यापैकीं आडवी रेघ खाली लिहून तो प्रचलित जोडाक्षरांत लिहिला जातो. (उदा. चक्रम्, अग्र्यम् ऐन्द्र्या इ. द्वितीयादिभिन्न रेफ जोडाक्षरांत आल्यास तो वर दाखविलेल्या प्रक्रियेने अक्षराचे डोक्यावर लिहिला जातो. उदा. अर्क, कार्य, सूर्य वगैरे द्वितीयादिभिन्न म्हणजे अक्षरांत पहिला असणारा रेफ येथे निर्ऋति असे लिहिणारे रेफ द्वितीयादिभिन्न असल्याने डोक्यावर लिहीत असावेत, मागे विवरण केल्यानुसार वस्तुत: येथे जोडाक्षर नाही. तेथे निरृति: असेच लिहावयास हवे. कार्य वगैरेत रेफ द्वितीयादिभिन्न म्हणून तो डोक्यावर लिहावयाचा राष्ट्र, अग्र यामध्ये रेफ अनाद्य असल्याने खालच्या बाजूला लिहावयाचा. तात्पर्य अनाद्य रेफ रूढीनुसार इष्ट स्थळी खाली व द्वितीयादिभिन्न रेफ डोक्यावर द्यावयाचा. संयुक्त लिहिण्याविषयी 'वर्णोद्धारतन्त्र' काय सांगते ते आम्हास उपलब्ध न झाल्याने रूढी काय याचा निर्देश केला आहे, तदनुसार ट, ठ, ड, ढ, छ यात रेफ अक्षराखाली '़' असा लिहिला जातो. एवढा सगळा खटाटोप करण्यापेक्षा अग्र, कार्‌य असे सगळीकडे लिहिले तर काय बिघडेल ? असे लिहिण्यात लाघव रहात नाही. म्हणून पूर्वोक्त नियमानुसारच लिहिणे प्रचलित आहे. वर्णोद्धारतन्त्रविषयक या शास्त्रार्थात सर्वत्र लाघव गौरव आणि स्थितशिष्टगति यांचे विचाराने निर्णय आवश्यक आहे. मराठी मध्ये 'दुसऱ्या', 'तऱ्हेच्या' वगैरे शब्दांतील रेफ त्याचे उच्चारण वेगळे असल्याने वेगळा आहे, संस्कृताला त्याची आवश्यकता नाही. अऱ्क, सूऱ्य इत्यादि लिहिल्यास संस्कृतात उच्चारण भ्रान्ति होईल.

## 'ळ'

137, 138(ख), 138(क), 138(ग)

१, २, ३ ४
**कुण्डलीत्रय संयुक्ता वामादृक्षगतात्वधः । पुनरूर्ध्वगता रेखा तासु नारायण शिवः ॥**
**ब्रह्मा शक्तिश्च सन्तिष्ठेत् ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

कुण्डलीति । बिन्दुस्फोटने वामादृक्षगता कुण्डलीत्रयसंयुक्ता रेखा तु अधः (गत्वा) पुनरूर्ध्वगता लकार इत्यन्वयः ।

वामादृक्षगता इति कुण्डलीत्रयावस्थितिक्रमप्रदर्शनार्थम् । बिन्दुस्फोटनात्कुण्डलीत्यर्धकुण्डलीति । 138 (ख), 138 (ग) इति ळ कारस्य प्रदर्शनाथम् । ल कारो न ळकारात्पृथगिष्यते तन्त्रे तु ल कार एव तदन्तर्भावः । तथा च प्रदर्शित प्रकारेण ल लिपिरेव ळ लिपितां घृष्टप्रक्रियया नीयते । ऋग्वेदे ढ कारस्य स्थाने भवन् ळ्हकारोऽपि ळकारहकारयोः संयोग एव । अतोनाधिकः । तथा चोक्तं "ळकारस्य लकारस्य लकारादभिन्नत्वादिति" (वरिवरयारहस्य अंश २ श्लोक ६७-६८ व्याख्या यद्यपि क्रमेण अचोर्मध्ये स्थितयोः डकार ढकारयोः स्थाने ळ ळ्हयोरादेशः प्रतिशाख्ये उक्तस्तथाप्यन्तर्भावः लकार एवेष्यते । अत एव डलयोरभेद इति कविसमय सत्यपि लळयोः स्थाने डकार आदेशो न विधीयते । तत्र 138 (ख) चित्रे बिन्दुप्रदर्शितमार्गेण लकारे रेखां वर्धयित्वा 138 (ग) स्वरूपनिष्पत्ति स्फुटैव ।

## मराठी–सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ** – बिन्दुस्फोटनात डावीकडून उजवीकडे तीन कुण्डलाकार जोडून त्यापासून शेवटी खालून वर जाणारी एक रेषा दिल्यावर लकार होतो असें श्लोकानें सांगितले आहे.

'**वामादृक्षगतात्वधः**' या पदानें डावीकडून उजवीकडे तीन कुण्डलाकार लिहावेत असें सांगितलें आहे. '**कुण्डली**' या शद्वानें अर्धकुण्डलही घ्यावें. 138 (ख), 138 (ग) हे लकारा पासून ळ कार कसा बनतो हें दाखविण्यासाठी आहे. लकारांत टिबांनी 138 (ख) येथें दाखविलेली रेषा लिहून पुरी केल्यावर ळ कार होतो, ळ कार आणि लकार एकच आहेत. लकारामध्येंच ळकाराचा अन्तर्भाव असल्याचें तन्त्रांत सांगितलें आहे. ऋग्वेदप्रातिशाख्या प्रमाणें दोन स्वरामध्यें असणाऱ्या डकाराचे जागीं ळ कार आणि ढ काराचे जागीं ळ्हकार म्हटला जातो, तो ळकार ह् काराचा संयोग आहे. वरिवस्या रहस्य अंश २ श्लोक ६७-६८ व्याख्येंत ळ कार व ल कार एकच असल्याचें सांगितलें आहे. अच् मध्यें ड कार वा ढ कार आल्यास क्रमानें ळ किंवा ळ्ह प्रातिशाख्यात सांगितला असला तरी ळकाराचा लकारांतच अन्तर्भाव आहे. काव्यामध्यें ड व ल एकच मानतात, असें असलें तरी ल व ळ चे जागीं प्रातिशाख्यानुसार ड कार होऊं शकत नाहीं; डचे जागीं ळ होऊं शकतो. 138 (ख) व 138 (ग) मध्यें ळ कार कसा होतो हें दाखविलें आहे.

## 'व'

139, 140, 141 (क) 141 (ख)

१, २, ३
**कोणत्रययुता रेखा ब्रह्मविष्णुशिवात्मिका । मायाशक्तिः परा नित्या ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

## मराठी सारांश

कोणत्रयेति । बिन्दुस्फोटने १, २, ३ कोणत्रययुतारेखा वकार इत्यन्वयः ।

अत्र कोणत्रययुता रेखा 'व' इत्युच्यते । त्रिकोण शब्दो वा मात्रापदं वा पृथग्नास्ति । १, २, ३ इति एकस्यामेव रेखायां कोणत्रययुतत्वमुच्यते । किं चात्र 141 (ख) लिपि स्वरूपे १, २, ३, ४, ५, ६ कोणा अङ्किता । वक्ररेखाया प्रत्येकः कोणोऽनुसंधेयः । एवं षट्सु कोणेषु १४१ (क) स्वरूपे यथाङ्कितं १० रेखायां १, २, ३ कोणाः, ९ रेखायां २, ३, ४ कोणाः, ८ रेखायां ४, ५, ६ कोणाः ७ रेखायां ६, १, २ कोणा आगच्छन्तीति कोणत्रययुतैव सर्वा वकाररेखेति । तथां चैवं वकाररूपप्रकारसिद्धिः । एवं कृते क्रमः उपरिमात्राभागावशेषश्चानुगृह्येते । रेखेति जातावेकवचनम् । वकाररेखासामान्यमित्यर्थः । तथा च बिन्दुस्फोटनेऽपि चित्रविभागे दर्शिताः प्रकाराः कथं नेति समाहिताः । ऊर्ध्वरेखा मात्रेत्यनुक्तापि मात्रा । संयुक्ताक्षरेषु तस्या एव व्यञ्जनमित्यादौ लोपात् यदि माया पदस्थाने मात्रेति पाठः प्रामाणिक इत्युपलभ्येत तदातु प्रश्न एव नास्ति । रेखायां मात्रायां कोणत्रय युतेत्यस्य अन्वयोपि तदा शक्य एवेति ।

131 (क) सिद्धान्ते 'वः' बिन्दुस्फोटनरेखामात्रेण सिद्धेः लाघवात् । तत्र च भुजकोटयन्यतरत्वेन स्वापेक्षितत्वसम्बन्धेन १, २, ३ कोणा मात्रायां ३, ४, ५ वामाधोरेखायां ४, ५ १ वामोपरिरेखायामिति सर्वासु कोणत्रयवत्त्वसमन्वयात् । मात्रार्द्धयोः पृथक्त्वेन गणनेऽपि तत्तन्मध्ये कोणोऽनुसन्धेयः । एवं चेत् वामरेखयोः ४ कोणवत्त्वसम्भवेऽपि कोणत्रयवत्त्वं नैव हीयते 'शते पञ्चाशत्' इति न्यायात् 140 (क) घृष्टे न्यूनघृष्टत्वात् मात्रायां १८० अंशेषु समकोणद्वयमादाय वा समाधेयमिति ।

## मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ** – बिन्दुस्फोटनात तीन कोण असणारी रेषा काढली असता व कार होतो '**कोणत्रययुता**' म्हणजे तीन कोनांनीं युक्त असणारी रेषा-आकृत्यांत हे तीन फोन दाखविले आहेत. (१, २, ३) डावीकडील अर्धवृत्त बिन्दुस्फोटनांतून येतें. त्यामुळें, उजवीकडील अर्धवृत्त घेऊन होणाऱ्या ऊर्ध्वरेषेंत तीन कोनापेक्षां अधिक कोन होत नसल्यानें वचनाशीं विरोध येत नाहीं.

141 (ख) या आकृतीत १, २, ३ व ४, ५, ६, हे कोण दाखविले आहेत. येथे ४ व ६ हे कोण स्पष्ट असून ५ हा कोण (बिन्दु-स्फोटनांतील डावीकडील खालच्या) वृत्तार्ध रेषेत अनुसंधेय आहे. याप्रमाणे केल्यावर 141 (क) या आकृतीत १० ने दर्शित रेषेत १, २, ३ 141 (ख) येथे दर्शित हे ३ कोण, ९ ने दर्शित रेषेत २, ३, ४ हे ३ कोण, ८ ने दर्शित रेषेत ४, ५, ६ हे ३ कोण आणि ७ ने दर्शित रेषेत ६, १, २ हे ३ कोण येतात अशी 'कोणत्रययुता' संपूर्ण वकार रेखा म्हटली जाते. याप्रमाणे या वकाररूपप्रकाराची सिद्धि होते. या क्रमाने लिहिल्यावर वरील मात्राभागाचा अवशेष ग्रहण केला जातो. रेखा हे एकवचन वकाररेषासामान्यार्थक आहे. म्हणूनच बिन्दुस्फोटनांत चित्रात दाखविलेले वकार रेषेचे प्रकार होऊ शकत नाहीत हे स्पष्ट होते.

139 (क) येथे बिन्दुस्फोटनांतील चारी वृत्तार्धे वापरून 'व' कसा होतो हे दाखविले आहे. ही लाघवयुक्त प्रक्रिया आहे कारण बाहेरचा रेषाभाग आणावा लागत नाहीं व लक्षणसमन्वयही होतो. 139 (क) येथे भुजा व कोटि अशा परस्परसंबंधाने १, २ व ३ हे तीन कोण मात्रेचें ठिकाणी (उजवीकडील दोन वृत्तार्धे घेऊन) होतात; डावीकडील खालचें वृत्तार्ध घेऊन ३, ४ व ५ हे तीन कोण होतात आणि डावीकडील वरचे वृत्तार्ध घेऊन ४, ५ व १ हे तीन कोण होतात – याप्रमाणे 'कोणत्रयवत्त्व' हे लक्षण येते. मात्रेतील दोन अर्धवृत्तें वेगळाली घेतली तरी त्यामध्यें वामवृत्तार्धाचें संदर्भात ४ ने दाखविलेला कोण येतो, तसे झाले तरी 'कोणत्रयवत्त्व' या लक्षणांस 'शंभरात पन्नास असतातच' या न्यायानें धक्का लागत नाही. 139 (क) हे 140 (क) चेच मात्रा सरळ रेषारूपाने लिहून केलेलें घृष्टलेखन आहे, उजवीकडील अर्धवृत्तांपासून होणारी रेषा मात्रा म्हणून सांगितली नसली तरी ती मात्राच आहे. कारण 'व्यञ्जन' वगैरे जोडाक्षर लिहिताना तिचा लोप झालेला दृष्टीस पडतो. '**माया**' या श्लोकातील पदाचे ठिकाणी '**मात्रा**' प्रामाणिक पाठपुराव्यासह मिळाल्यास **कोणत्रयुतारेखामात्रा**' असा अन्वय घेऊन अर्थ करिता येईल.

## 'श'

142, 143, 144, 145, 146, 147,
148, 149, 150, 151, 152 (क), 152 (ख), 512 (ग), **गोकृतिः**

१ २ ३ ४

**कुञ्चिता वामतो दक्षगता च गोकृतिस्त्वधः । पुनरूर्ध्वगता तासु वह्निचन्द्रदिवाकराः ॥ मात्रा भवति विज्ञेया ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

कुञ्चितेति । बिन्दुस्फोटने कुञ्चिता वामतो दक्षगता गोकृतिः । ततस्त्वधोगता पुनरूर्ध्वगता मात्रा शकार इत्यन्वयः । अत्र इति मुख-पुच्छमध्ये चत्वारः पादः गोकृतिरिह बोध्या । चित्रेषु 152 (क), (ख) (ग) मध्यें प्रथमं समन्वयः सुज्ञेयः । अविच्छेदेन लेखने पादाधस्तन-योजक रेखाः । कुञ्चितत्वं वामतो दक्षगतत्वंच गोकृतेः प्रत्यक्षमेव । 142–147 पर्यन्तेषु 150 च ऊर्ध्वाधः क्रमतः गोकृतिः लिखिता दिग्भेदेन केषुचिन्मुखभागः न प्रदर्शितः । 151 वज्राक्षर इव वामतो दक्षगता तिर्यक् गोकृतिः । अतस्तत्रोर्ध्वादधोगत्वा पुनरूर्ध्वगतत्वं साधु प्रदर्श्यते । 148 उत्तानगोकृतिलेखनम् । ".उत्ताना वै देवगवा वहन्ति" इति यथा श्रूयते । यथा वा अमेरिकास्था अस्माकं दृष्टया भूगोलापेक्षया उत्तानाः स्थिताः तेषां दृष्टया वयम् । यथा वा पल्ली गृहधरणेषु उत्ताना वहति । यथा चन्द्रमण्डले पृथिव्यभिमुखभागे तिष्ठन्तः गता 'अॅस्ट्रॉनॉट' प्रभृतयः पृथिव्यपेक्षया । 149 मध्ये पादद्वयमूर्ध्वरेखया मात्रया एकीकृत्य लिख्यते । तेन प्रकारेण श्री श्लोकः (यथा चित्रविभागे प्रदर्शित) इत्यादिषु 'श' लेखः । 150 व्यञ्जनमात्रं मात्रा विना यथा श्यामाक इत्यादावुपयुज्यते । उपरिचित्राणां प्रयोजनं स्वयमूह्यम् । अत्र वामाद्दक्षगत गोकृत्यर्थं बिन्दुस्फोटने वामवृत्तार्धद्वयस्य 152 (क) इव तिर्यक्स्थापनं दिग्भेदेन कृतम् । ततः 152 (ख) मध्ये गोकृतिः तिर्यक्कृता । 152 (ग) सरल रेखया कृता ।

अत्र 'स वै गजाकार' इति ঙ, 'अकार चरणयुगुल' इति ৪ 'वार्ताकुवर्तुलाकार' इति च ठ कारौ, 'गोकृतिस्त्वध' इति श–स–कारौ बोधिताः । एवं उपमान प्रमाणेन लिपिस्वरूपं बोधयितुं प्रवृत्तानि वाक्यानि दृष्ट्वा आधुनिकविकासवादग्रहग्रहिलाः कथित

Pictography स्वबुद्धिदोषाद्यदि जिघ्रेत्तर्हि स कामकलुषनेत्रः जगदेव पित्तपीतं पश्यन् प्रामाणिक इति स्यात् । आधुनिका अपि Cartoon द्वारा बोधयितारः विकासवादीनां Pictography कालिका अग्रगता इति स्यात्। चित्रमपि उपमान प्रमाणविधया बोधयत्तत्रोपमानेऽन्तर्भूतमिति उच्यते महाराजभोजादिभिः । न हि आधुनिकविकासवादः सार्धशतवत्सरेभ्यः पूर्वं कदापि केनापि क्वचिदपि देशे विदेशे वाश्रुतपूर्वः सृष्टि-समाचारः उपमान प्रमाणस्य चर्चायामनिष्णातानां इयं सर्वा विपरीत दृष्टिः । ब्रह्मसृष्टायां शिवोपदिष्टायां लिपिरेखायामाधुनिककल्पितविकास-वादमनुसृत्य ततश्च कलहे किं स्यादित्युच्यते यथा — हठादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता । कविः स्पर्धालुश्चेदहह कविनाऽवश्यवचसा । भवेदश्वो वा प्रकृतिकुटिले पापिनि कलौ । घटानां निर्मातुस्त्रिभुवनविधातुश्च कलहः ॥ इति ।

(आधुनिक विकासवादे लिपिनिर्माता कल्पितः कश्चित्कपिसन्तानत्वात्कपिः । तदनुसारेण पदानामित्यत्र 'लिपिनां' 'कविः' इत्यत्र 'कपिः' 'अवश्यवचसा' इत्यत्र 'अवश्य लिपिना' इति तदर्थं पठनीयम्।) कविना लिपिस्रष्टृत्वाद्ब्रह्मणा । कलहः – अनेकेषां घटादेर्निमा-तृणां वैज्ञानिकानामाविष्कतृणां कृतिरियं त्रिभुवनसृष्टिः । ते अनेके एवानीशः सृष्टेः कर्तारः न त्वं त्रिभुवन विधातेति ।

# मराठी सारांश

**लक्षण श्लोकाचा अर्थ** – बिन्दुस्फोटनात कुञ्चित होऊन, डावीकडून उजवीकडे जाणारी, खाली जाऊन गायीची आकृति होणारी, पुनरपि खाली जाऊन, वर जाऊन मात्रा होणारी रेषा काढली असता 'श' कार होतो.

याठिकाणीं ‾॥ ॥‾ अशा तऱ्हेची चार पाय, एक तोंड व एक शेपूट सुचविणारी रेखाकृति म्हणजे गोकृति होय. 152 (क), (ख), (ग) मध्यें या गोकृतीचा बिन्दुस्फोटनाशीं समन्वय दाखविला आहे. तो प्रथम लक्षांत घ्यावा. यामध्ये बिन्दुस्फोटनाची आकृति आडवी पाडून भूमिसमांतर लिहिली आहे. सलग लिहीत असतां पायांना जोडणारी रेषा प्राप्त होते. येथें कुञ्चितत्व आणि डावीकडून उजवी-कडे जाणें दिसतच आहे 142 ते 147 तसेंच 150 मध्यें ही गोकृति दिग्भेदानें भूमीशीं काटकोन करून लिहिली आहे. 143 ते 145 मध्यें गायीचें तोंडाचा भाग दाखविलेला नाहीं. 156 मध्ये बंगाली प्रमाणें डावीकडून उजवीकडे तिरकी गोकृति लिहिली आहे. या आकृत्यांत खाली जाऊन वर जाणें स्पष्टपणें दिसत आहे. 148 मध्यें गोकृति पाठ भूमिसमांतर व पाय वरती करून उलटी लिहिली आहे. 'उत्ताना वै देवगवा वहन्ति' म्हणजे देवांच्या गायी (मनुष्यांचे दृष्टीनुसार) उलटया (पाठ खालीं पाय वर)अशा चालतात; अशी श्रुति आहे. भारतीयांचे दृष्टीनें अमेरिकेंतील लोक उलटे व त्यांचे दृष्टीनें आपण उलटे उभे आहोंत. घराच्या आढ्यावरून पाल उलटी चालते. चंद्राच्या पृथ्वीकडे असणाऱ्या पृष्ठावर उतरलेले अंतराळवीर पृथ्वीवरील मानवांचे दृष्टीनें उलटे चालतात. तसें येथें समजावें. 149मध्यें उजवीकडील पायांची जोडी एक करून मात्रारेषा सोडून 'श' आहे. त्याचा वापर 'श्यामाक' वगैरे लिहिले जातें. 149 ची मात्रा रेषा सोडून श्री, श्लोक वगैरे लिहिण्यांत होतो. 142, 144, 145, 146, 147 मूळ बिन्दुस्फोटनापासून धृष्टलेखनानें आजचा शकार कसा होतो हें दाखविण्या-साठीं आहेत. 145 ते 147 या तीनही प्रकारांनीं आज शकार लिहिला जातो. 143 अशोकलिपि शकार बनविण्यासाठीं आहे. तो भाग पुढे येईलच.

'स वै गजाकारः' आणि 'अकारचरणयुगल' हे ओ काराचे, 'वार्ताकुवर्तुलाकार' हे चकार व ठकाराचें, 'गोकृतिस्त्वधः' हें शकार-सकाराचें उपमान प्रमाणानें समजुतीसाठीं केलेले लक्षणश्लोकांतील वर्णन वाचून कांहीं आधुनिकांना चित्रलिपीचे विकासांतून अक्षरलिपि झाली असें वाटणें शक्य आहे. परंतु तें तसें वाटणें हा विकासवादाचा अतिरिक्त प्रभाव होय. आद्य लिपि ही ब्रह्मसृष्ट व शिवोपदिष्ट आहे. येथील स्रष्टा व उपदेष्टा अल्पज्ञ नसून सर्वज्ञ आहेत. त्यांनीं अल्पज्ञांचे बोधन सौकर्यार्थ या प्रकारानें बोध केला आहे. म्हणून विकास-वाद यास्थळीं उपर्युक्त उपमान प्रमाणाचें निमित्तें करून लागू शकत नाहीं, तसा आग्रह धरणें योग्य नाहीं. उत्तरार्धांत प्रतिपादिल्यानुसार आद्यलिपि ब्रह्म-देवानें निर्मिली तशीच सुरुवाती पासून आहे. तिचेपासून धृष्टलेखन प्रक्रियेनें–प्रचलित लिपि झाली आहे. ( संपादकीय टिप्पणी–आधुनिक मतानुसार वस्तू पाहून त्यांचे आकाररेखाटनानें चित्रलिपि व चित्रलिपीपासुन विकासवादानुसार क्रमानें अक्षरलिपि बनली आहे. या मता-नुसार वस्तुनिर्देशक चित्र आणि तत्प्रतिपादक नांवाचें अक्षरलिपींतील आद्याक्षर यांचा परस्पर संबंध आहे. गजाकार वगैरे ठिकाणीं हें जुळत नाहीं. म्हणून आधुनिक मताला घेऊन अशा रीतीनें उपमान प्रमाणावरून आक्षेपच होऊं शकत नाहीं.)

## ष

153, 154,
१, २, ३, ४

**चतुष्कोणमयी रेखा वामदक्षिणतः क्रमात् । वह्नीन्द्रविष्णवस्तासु तिष्ठन्ति क्रमतः सदा ॥**
**ऊर्ध्वमात्रा शक्तिरूपा महालक्ष्मीसमा स्मृता । मात्रामध्यगता या तु वाग्देवीसा परास्मृता ॥**

चतुष्कोणेति । बिन्दुस्फोटने वामदक्षिणतः क्रमाच्चतुष्कोणमयी रेखा पकारः । तत्र ऊर्ध्वमात्रा (शक्तिरूपा) मध्यमात्रा या तु (सा वाग्देवी) इत्यन्वयः । मध्यमात्रया कोणो न चिकीर्षितः इति चतुष्कोणत्वमेव । यद्यपीह चतुष्कोणमयी अन्यथा दक्षपार्श्वतः कुतो न क्रियतामिति प्रश्नः संभवति । तथापि पकारे इव तस्य पूर्वमुपस्थितस्य क्रमस्य त्यागे मानाभावात्तथा क्रियते । इदमुपस्थितिकृतं लाघवम् :

## मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ–** बिन्दुस्फोटनांत चार कोन असणारी रेषा डावीकडून उजवीकडे क्रमानें लिहून, ऊर्ध्वमात्रा आणि मध्यगता मात्रा लिहिल्यावर '**ष**'कार होतो.

आकृतींत पकाराप्रमाणेंच 'ष'कार लिहिला आहे. पकारांतील '**वामरेखायाः कोणाद्दक्षिणतः**' या पदावरून आणि येथील '**वामदक्षिणतः**' या पदावरून तो उलट दिशेस लिहून चालणार नाहीं. आकृत्यांत १, २, ३, ४ नें कोन दाखविले आहेत. "**ऊर्ध्वमात्रा**' या पदानें मध्यभागची उभी रेषा सांगितली असून ५ नें दाखविली आहे. '**मात्रा मध्यगता**' या पदानें पोटांत देण्याची तिरकी रेषा सांगितली असून ६ नें दाखविली आहे. कोन मोजतांना ही रेषा विचारांत घ्यावयाची नाहीं, फक्त डावीकडील रेषा, खालची आडवीरेषा व मात्राभाग घ्यावयाचा.

## स

155, 156, 157, 158,

१ २ ३ ४

**कुञ्चिता वामतो दक्षगता च गोकृतिस्त्वधः । पुनरूर्ध्वगता तासु बह्निचन्द्रदिवाकराः ॥ मात्रा भवानी विज्ञेया ध्यानमस्य प्रचक्षते ॥**

कुञ्चितेत्यादि । बिन्दुस्फोटने: (शकारवदन्वयः)। अत्र १ गोकृति २ अधः ३ ऊर्ध्वगता ४ मात्रेति । श–सयोः लक्षणवाक्यैक्येपि दिग्भेदेन संयोजनभेदेन च व्यवस्था दृश्यते ।

## मराठी सारांश

सकार हा शकाराप्रमाणेंच आहे, दोघांचा लक्षणश्लोक एकच आहे. सकार केवळ दिशाभेदानें लिहावयाचा आहे. हेंच 155 ते 158 मध्ये दाखविलें आहे. १ नें भूपृष्ठास काटकोन करून उभी असणारी '**आकृति**', २ नें खालीं जाणारी रेषा '**अध**', ३ नें पुन: वर जाणारी रेषा '**पुनरूर्ध्वगता**' व ४ नें '**मात्रा**' दाखविली आहे. 158 वरून घृष्टलेखनानें प्रचलित 'स' बनला आहे.

## 'ह'

159, 160, 161, 162

१ २ ४

**ऊर्ध्वादाकुञ्चिता मध्ये कुण्डलीत्वंगतात्वधः । पुनरूर्ध्वं गता सैव तासु ब्रह्मादयः क्रमात् ॥ मात्राच पार्वती ज्ञेया ध्यानमस्य प्रचक्षते॥**

ऊर्ध्वादिति । बिन्दुस्फोटने १ ऊर्ध्वात् २ मध्ये आकुञ्चिता ३ अधः कुण्डलीत्वं गता ४ सैव पुनरूर्ध्वगता मात्रा हकारः । ऊर्ध्वादिति ल्यब्लोपे पंचमी । 159 मौलिकोद्भवः । 160 पृथग्लिखितः । 161 प्रचलित बालबोध 'ह' |(देवनागरी) निष्पति प्रदर्शनाय । 162 देवनागरी रूढः हकारः । 161 इत्यत्र बिन्दुप्रदर्शितभागलोपेन 162 निष्पाद्यते । तथा च 161 मात्रा दृश्यादृश्य स्वरूपा लिख्यते । बिन्दुस्फोटनार्धभागे हकारस्य निष्पादनीयत्वात्समस्त शङ्कानिरासो बोध्य इति शम् ।

इतिव्यञ्जनानि ।

शब्दकल्पद्रुमे वर्णोद्धारतन्त्रात् उद्धृतश्लोकानामेव देवनागरलिपिषु यथामति समन्वयः प्रदर्शितः । पदवाक्यप्रमाणैः व्युत्पत्तिनियमानसार यदि किञ्चिच्छोधनमत्र विद्वद्भिश्चिकीर्ष्यते तदस्माभिरनुग्रहस्तेषामस्माकंसुकृतइति सबहुमानं कृतज्ञतापूर्वकं यथोचितं स्वीक्रियेतेति सविनयं विनिवेद्यते । अतः—

मान्याः कृतश्रमास्तन्त्रे क्षमध्वं यद्यप्रार्थितम् । शोधयित्वा बोधयध्वं प्रार्थये दीनवत्सलाः
॥ "श्रीकृष्णार्पणमस्तु" ॥ 'यद्यत्र सौष्ठवं किञ्चितद्गुरोरेव, मे नहि ।'

# मराठी सारांश

**लक्षणश्लोकाचा अर्थ** :––बिन्दुस्फोटनांत वरून खालीं येऊन, मध्यभागीं कुञ्चित होऊन खालीं कुण्डलाकार होऊन, पुन्हां वर जाणारी रेषा काढली असतां 'ह'कार होतो– 'ऊर्ध्वांत्' या पदानें येणारी रेषा १नें, ''आकुञ्चितामध्ये' या पदांनीं येणारी रेषा २नें, "**कुण्डलीत्वंगता-त्वधः**" या पदांनीं येणारी रेषा ४नें 160, 161 मध्यें दाखविली आहे. 159 हा मौलिकउद्भव आहे. व 160 मध्यें त्यापासून येणार 'ह'कार सुटा लिहिला आहे. 161 मध्ये देवनागरी प्रचलित 'ह' ची प्रक्रिया दाखविली आहे. व 162 देवनागरी प्रचलित 'ह' आहे. हकाराचा विस्तारानें विचार पूर्वी प्रथम प्रकरणांत होऊन गेला आहे, तो तेथेंच पहावा–

याप्रमाणें येथें व्यञ्जन विषयक शास्त्रार्थ संपला.

॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥

## प्रकरण पाचवे–देवनागरीशी अशोकलिपि व तमिळ लिपि यांचा संबंध

१, २, ३, ४, ५, ६,
७, ८, ९, १०, ११, १२,

आकृति १. शिवशक्ति समष्टिबिन्दु, २. व्यष्टिबिन्दु, ३. बिन्दुस्फोटन ४. अशोक लिपि अ, (हा ५ या मौलिक उद्भवात दाखविलेला असा भाग सोडून, त्याचे जागी असा तेथेंच दाखविलेला भाग घेऊन बनतो.) ५. वचनानुसार अ चा मौलिक उद्भव, ६ देवनागरी अ, (हा ३ व ५ मधील उजवीकडील दोन अर्ध घेऊन बनतो.) ७. बिन्दुस्फोटनांतील उजवीकडील भाग, ८ आ. ७ चे कोणयुक्त लेखन, ९ आ. ८ चे दोन भाग जोडून घेऊन लेखन, व आ. १० देवनागरी अ चा एक धृष्टलेखन प्रकार आहे.

आ. १० मध्ये, आ. ११ येथे टिबांनी दाखविलेला रेषाभाग वाढविल्यावर आ. १२ हा तमिळ अ होतो ग्रंथलिपीचा विचार मल्ल्याळम् बरोबर पुढील प्रकरणी केलेला आहे. या वरून असें दिसते की आ. ५ चा भाग घेऊन आ. ४ व ६ गनतात. आ ६ मधील उभी रेषा ही अकारमात्रा आहे, ती पूर्वोक्त गर्णोद्धारतंत्रानुसार येते. हीच मात्रा आ. ४ व १२ मध्यें उभी स्पष्ट दिसत आहे. आ. ४ व ६ चे काही धृष्टलेखन प्रकार यापूर्वी दिलेच आहेत.

१३, १४, १५, १६,

### आकारमात्रा विचार

आ. १५ मध्ये अ लिहून आणखी एक उभी रेषा अकारमात्रेजवळ दिली आहे. हा देवनागरी 'आ' आहे. आ. १३ व १४ अशोकलिपि 'आ' आहेत. त्या मध्यें मात्रा अनुक्रमें मध्यभागी आडवी व डोक्याजवळ आडवी दिली आहे. आ. १६ तमिळ 'आ' आहे. त्या मध्यें अशोक लिपि प्रमाणे एक आडवी रेषा, देवनागरी प्रमाणें उभी रेषा व ऊर्वरित रेषाभाग स्वतःचा असा अकारास जोडून आ बनविला जातो. या विषयींचा विस्तार शास्त्रार्थात झाला आहे. देवनागरी सोळाडीखत उभी रेषा सगळीकडे एकाच प्रकारची असते, दीर्घाक्षरात दोन उभ्या रेषा असतात.

### तमिळ अकारमात्रेचे वैशिष्टय

तमिळमध्ये आ. १६ प्रमाणें मात्रास्वरूप सोळाखडीत सगळीकडे रहात नाही बहुतेक वेळा दोन जोडून लिहिलेल्या उभ्या रेषा असतात. उदा० 'ङा' (चित्रविभाग पहा.) मध्यें मात्र रेषा अक्षराचे खाली वळविली जाते.

१७, १८, १९, २०, २१, २२, २३,
२४, २५, २६, २७, २८, २९, ३०,

### तमिळ इकार प्रक्रिया

आ. २१ मध्यें इकाराचा मौलिक उद्भव दाखविला आहे. बिन्दुस्फोटनात एक समष्टिबिन्दु व दोन व्यष्टिबिन्दू पूर्वी सांगितल्यानुसार अन्तर्निहित आहेत. आ. २०, २२, २३ येथें या तीन बिन्दुची समजूत दाखविली आहे. अशोकलिपींत संक्षेपानें केवळ तीन बिन्दूच लिहून टलेखनानें अनेक प्रकारचा इकार लिहिला जातो. देवनागरीत पूर्वी सांगितल्यानुसार जोडून लिहितात. आ. १७, १८, १९ येथे अशोकलिपि इकाराचे कांही प्रकार दाखविले आहेत. याचा विस्तार पूर्वी झाला आहे.

### तीन प्रकारचे कुञ्चन

आ. ३० मध्यें तमिळ इ दाखविला आहे. आ. २४ ते २९ त्याची प्रक्रिया दाखविली आहे. आ. २४ हा देवनागरी इ आहे. २५ मध्ये तोच धराशायी केला आहे. धराशायी करितांना डावीकडे फिरवून केला आहे. २५, २६, २७ मधील कुंचित अथवा कुञ्जित भाग थोडयाशा फरकाने सारखाच आहे. कोठेही कुञ्चन होतांना तें अस्पृष्ट्वा स्पृष्ट्वा किंवा छित्वा यापैकी कोणत्यातरी एका प्रकारचे असतें. अस्पृष्ट्वा म्हणजे दोन्ही बाजूच्या दोन रेषा एकमेकीस स्पर्श न करता होणारे कुञ्चन (आ. २५), स्पृष्ट्वा म्हणजे दोन्ही बाजूच्या दोन रेषा एकमेकीस स्पर्श करून होणारे कुञ्चन (आ. २६) छित्वा म्हणजे दोन्ही बाजूच्या दोन रेषा एकमेकीस छेदून जाऊन होणारे कुञ्चन (आ. २७) या ठिकाणी आ. २४ धराशायी करून छित्वा कुञ्चनाने २७ बनते २७ मधील कुञ्चनांश म्हणजे मध्यभागी असणारा गांठीचा भाग लांबोडा व किंचित् तिरका केल्यावर २८ बनते. २८ मधील उजवीकडील गांठ उलगडून २९ मध्ये टिंबांनी दाखविलेल्या मार्गाने रेषा लिहिल्यावर पूर्वस्थळी जेथे संपतो तेथपर्यंत येऊन आणि सुरुवातीस कुण्डलभाग वाढविल्यावर आ. ३० हा तमिळ इ होतो.

आणखी एका प्रक्रियेनेही देवनागरी इ पासून तमिळ इ बनतो. या ठिकाणी देवनागरी इकारास धराशायी न करता उभ्यानेंच प्रक्रिया आहे, ती खालील प्रमाणे.

1 2 3 4 5 6

### तमिळ इकार दुसरी प्रक्रिया

1 देवनागरी इ. 2–3 नें 1 मध्ये असणाऱ्या अस्पृष्ट्वा कुञ्चनाचे क्रमानें स्पृष्ट्वा छित्वा कुञ्चन करून व 3 मध्ये सुरुवातीस गांठ देऊन 4 होते, 4 चें छित्वा कुञ्चन तिरके खालीं वाढवून 5 आणि 5 खालची गांठ सोडवून तिचा वळसा मोठा केल्यावर 6 तामिळ इ होतो. येथें पूर्वी दक्षिणावर्तंच असणारे छित्वा कुञ्चन उलगडून दक्षिणावर्त रेषा मोठ्या घेरानी काढून तिचे टोक पूर्वीचें ठिकाणींच आणून ठेविले आहे. ही सर्व घृष्टलेखनाची करामत आहे. या सर्व प्रक्रियेंत देवनागरीं इ उभाच्या उभा आहे.

### इकारमात्रा विचार

आता इकारमात्रेंविषयी विचार करू – मागें आपण पाहिलेच आहे की इकारमात्रेमध्ये १) शीर्षाधः कुञ्चिता २) दक्षोर्ध्वा ३) मात्रा अशा तीन रेषा आल्या आहेत आणि दीर्घ इकारात अधः कुञ्चिता व दक्षोर्ध्वा यांचे ऐवजीं १) शीर्षाद्दक्षे २) कोणयुता ३) कुञ्चितोर्ध्वगता ४) मात्रा अशा चार रेषा आल्या आहेत ह्रस्व इकारात वर सांगितलेल्या तीन रेषा देवनागरीत अक्षराचे डावीकडें (आहेत त्याच अशोक लिपीत अक्षराचे उजवीकडें डोक्याजवळ आहेत. चित्रविभाग पहा.)

### तमिळ इकार मात्रेचे वैशिष्टच

तमिळमध्येही तीन रेषा असतात. त्या अक्षराचे उजवीकडे मात्रा रेषेप्रमाणें एक रेषा, डोक्यावर डावीकडे जाणारीं आडवी रेषा व तीच डावीकडें किंचित् खाली ओढलेली अशा प्रकारे लिहिल्या जातात. (चित्रविभाग पहा)

उजवीकडें मात्रा आली तरी दीर्घ समजू नये, कारण दीर्घ इकारमात्रा चार रेषांची बनत असल्याचे वर दिलेच आहे देवनागरीत ह्रस्व इकारमात्रा डावीकडें लिहावयास वर्णोद्धारतन्त्रानें सांगितले आहे ती तशी का वगैरे विवरण पूर्वी झालेंच आहे. याप्रमाणे इकाराचे विवरण आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३१, | ३२ | ३३, | ३४, | ३५, | ३६ |
| ३७, | ३८, | ३९, | ४०, | ४१ | |

### ईकार प्रक्रिया

आ. ३३ मध्यें 'ई' च्या मात्रेत 'इ' वगळता दोन बिन्दू वेगळें स्पष्ट रूपानें दिसतात. मात्रेत एकूण चार रेषा आहे. आ. ३४ मध्ये अक्षराचे डोक्यावर मात्रा लिहिण्याचा प्रचलित प्रकार दाखविला आहे. वर्णोद्धारतन्त्र अवयवरूपानें बिन्दु दाखविण्यास सांगत नाही. म्हणून चित्रविभागात दाखविल्यानुसारकी' वगैरे लिहिलें जाते. पूर्वी या सर्वांचा विचार झालाच आहे अशोकलिपीत ई शिलालेख वगैरेत दिसत नाही. "ईकारः पञ्चबिन्दुर्वै" या वचनानुसार अशोक लिपीत तीन बिन्दूनी होणाऱ्या इकारावर आणखी दोन बिन्दू वाढविल्यावर ई होऊ शकेल. आ. ३१ मध्ये अशोकलिपि ई ची मात्रा दाखविली आहे. ती आ. ३२ मधील देवनागरी ई चे मात्रेप्रमाणेच चार रेषांची आहे. फरक एवढाच की देवनागरींतील मात्रेतील उभी रेषा अशोकलिपीत दिग्भेदाने आडवी लिहिली जाते.

### तमिळ ईकाराचे वैशिष्टच

आ. ३५ ते ३९ तमिळ ई ची प्रक्रिया दाखविली आहे. आ. ३५ मध्ये तमिळ इ मध्ये दोन बिन्दू अधिक लिहिले आहेत. ३६मध्ये ३५ मधील लोप करावयाचा भाग टिंबांनी दाखविला आहे. त्याचा लोप केल्यावर ३७ होतें. ३७ मधील डावीकडील कुण्डल भाग उलगडून सरळ करून उभा लिहिल्यावर, डावा बिन्दु आंत व उजवा बाहेर अशी आ. ३८ होतें. ३८ मधील वक्र रेषा सरळ लिहून डोक्यावरही सरळ रेषा येईल असे कोणयुक्त लिहिल्यावर आ. ३९ तमिळ ई होतो.

### तमिळ ईकारमात्रा

तमिळमध्ये ई ची मात्रा चार रेषांनीच बनते. ती आ. ४० व ४१ मध्ये दाखविली आ. ९. फरक एवढाच की उभी रेषा डावीकडे जोडली आहे. जोडून लिहिताना त्यामध्ये काही रेषा भाग वाढतो. व्यञ्जनाबरोबर वापरताना काही ठिकाणी डावीकडें व काही ठिकाणी व्यञ्जनाचे मध्येही लिहिली जाते. कसेही असले तरी मात्रा तीच आहे. (चित्रविभाग पहा.)

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४२, | ४३, | ४४, | ४५, | ४६, | ४७, | ४९ |
| ५०, | ५१, | ५२, | ५३, | ५४, | | |

### तमिळ उकार प्रक्रिया

आ. ४६ ते ४९ मध्ये ह्रस्व उकार दाखविला आहे. खालची वक्राकाररेषा कमी अधिक लिहून या आकृति दिग्भेदानें बनतात. आ. ५० हा स्पष्ट्वा कुञ्चनाने झालेला देवनागरी उ आहे. ४२ ते ४५ अशोक लिपीतील उकार आ. ४६ ते ४९ मधील मध्यभागचा कुञ्चनांश मात्र घेऊन बनतात. आ. ५० मधील उकार तमिळ उ बनविण्याकरिता ५१ मध्ये डावीकडे वळवून वाकविला आहे व तोंड खाली केले आहे. कवायत करणाऱ्या माणसाप्रमाणे समजावे आ. ५२ मध्ये ५१ अधिक वाकवून तिला जोडण्याचा अशोकलिपिचा अंश टिंबांनी दाखविला आहे.

अथवा स्वतःचा पदरचा जोडला आहे. आ. ५२ चे डोक्याचे भागात जोडावयाचा भाग ५३ मध्ये टिंबांनी दाखविला आहे, तो जोडल्यावर आ. ५४ हा तमिळ उ होतो. ग्रंथलिपि आणि मळयाळम् मध्येही उ असाच आहे.

### नागरी–अशोक–स्वपक्ष–समुच्चय

याप्रमाणे दिग्भेदाने लिहिलेल्या देवनागरी उकारातील वरचे अर्धकुण्डल पूर्ण करून तो उकार आणि देवनागरीपासूनच बनणारा अशोकलिपि उकार या दोघांनी मिळून तमिळ उकार बनत आहे. अथवा पदरची रेषा वाढवून बनत आहे, तमिळ आकारमात्राही देवनागरी पक्ष, अशोक पक्ष व स्वपक्ष अशा समुच्चयाने बनत असल्याके पूर्वी आलेच आहे. हकारात पूर्वी सांगितल्यानुसार द्विवार लेखन असले तरी ध्वनिप्रतिनिधित्वएकवारच होते. तोच न्याय येथेही समजावा.

५५, ५६, ५७, ५८, ५९,
५०, ६१, ६२, ६३,

### तमिळ ऊकार प्रक्रिया

आ, ५८ मध्ये देवनागरी ऊ लिहिला आहे. त्या मध्यें ह्रस्व उकारापेक्षा अधिक असणारा भाग ऊकारमात्रा आहे. ही मात्रा व्यञ्जनाखाली अथवा मध्यें लिहून दीर्घ ऊकारान्त व्यञ्जन होतें. जसें आ. ६० 'कू' देवनागरी ह्रस्व उकाराचें खालचे अर्धकुण्डल व डावीकडे वळणारी वक्राकार रेषा मिळून ऊकार मात्रा होते. आ. ५९ मध्यें 'कु' दाखविला आहे. आ. ५७ अशोकलिपि ऊ आहे. त्या मध्ये मागें सांगितलेला अशोकलिपि उ लिहून एक आडवी रेषा आणखी जोडली जाते. असें समजावें (चित्रविभाग पहा)

आ. ५५ अशोकलिपि कु आहे. त्या मध्ये अशोकलिपि क लिहून, खालीं अशोकलिपि उ जोडला जातो. याच पद्धतीनें ऊ खाली जोडून अशोकलिपि कू बनतो. तो आ. ५६ मध्यें दाखविला आहे. देवनागरी व अशोकलिपि या दोहोंमध्यें उकार व ऊकार मात्रेचे सोळाखडींतील स्थान निश्चित आहे.

### तमिळ ऊकार मात्रेचें वैशिष्टय

आ. ६१ मध्यें तमिळ ऊ दाखविला आहे. तेथें तमिळ उकाराचे उजवीकडे चित्रविभागात दाखविलेला भाग वाढविला आहे. हा भाग ऊकार मात्रा आहे. तो खालील प्रमाणे देवनागरी ऊकार पासून बनतो.

1, 2, 3 4

1 मधील देवनागरी ऊकार मात्रेचा खालचा कुण्डलभाग 2 मध्यें उलटा करून, 3 मध्यें 2 मधील मोठा रेषा भाग डावीकडे कुण्डलाकार करून व लहान रेषाभाग उजवीकडे कोणयुक्त करून लिहून सर्व जोडून 4 ही तमिळ ऊकारमात्रा होते. ड्री अक्षराचे उजवीकडे लिहिली जाते. देवनागरींतही कोणीं कोणीं अक्षराचें उजवीकडील कुण्डलभागास जोडून चित्रविभात दाखविल्या प्रमाणेंही लिहितात

### तमिळ सोळाखडींतील मात्रेचें स्थान

तामिळ सोळाखडींत ह्रस्वस्वरान्त व दीर्घस्वरान्त व्यञ्जनाक्षरांतील मात्रांचें स्थान मात्र देवनागरी प्रमाणें निश्चित नाहीं कांही अक्षरांमध्यें वेगवेगळीं दोन रूपे लिहावीं लागतात. हे सर्व मद्रास गव्हर्मेंट म्युझियम बुलेटिन वा भारतीय प्राचीन लिपिमाला (ओझा) या ग्रंथांत पहावें असें स्थान वेगळें कां याचा विचार येथे करण्याचें प्रयोजन नाही. विद्वानांनी तें करावें अशी आमची प्रार्थना आहे. तमिळ णा, णै, णो (ह्रस्व), णो, (दीर्घ) आणि लै एवढे वगळतां इतर अक्षरांची बाराखडी लिहितांना तमिळ मध्येही मात्रा ही स्वरप्राप्त रूपांत व ठरीव स्थानांतच येते. तामिळ भाषेंत 'ळ' धरुन १५ च पूर्ण व्यञ्जन वर्ण आहेत. व अपूर्ण ळ, र, न् वेगळे काहेत.

### अशोक लिपींतील ऋ, ऌ, ल, ॠ

ऋ, ऌ, ल, ॠ ही केवळ संस्कृतांत उपयोगी असणारीं अक्षरें तामिळ लोकलिपींत नाहींत पाली भाषेंत अशोकाचे शिलालेख असल्यामुळें या चार अक्षरांची स्वरुपे उपलब्ध झालीं नाहींत. शक्य आहे, पुढें दिल्याप्रमाणें अशोकलिपींत त्या चार अक्षरांची रूपे असावींत कारण, संस्कृत भाषेंतील तन्त्रग्रन्थांत सांगितलेलीं कर्मे करण्यासाठीं बौद्धांनी तदर्थ उल्लेख केला आहे. त्यांचें लेखन स्वरूप यैणें प्रमाणें–

(चित्रविभाग पहा)

'होर्युजीमठ' जपान येथील "**ऊष्णीशविजयधारिणी**" या ताडपत्रावर लिहिलेल्या ग्रंथाचे शेवटी लिहिलेल्या वर्णमालेत लिहिल्या प्रमाणें प्रकार चित्रविभागात दाखविला आहे.

**उदयादित्याचे वेळीं उज्जैन** येथील शिलालेखाचे शेवटी खोदलेलीं वर्णमाला. (चित्रविभाग पहा)

हस्राकोल येथील शिलालेखांत खोदलेली वर्णमाला. ( भारतीय प्राचीन लिपिमालेवरून )

तमिळमध्यें रि अथवा रू वापरून त्याचें काम भागविले जातें. संस्कृत लेखनासाठीं तमिळ ग्रंथलिपि ही सर्व वर्ण असणारी लिपि

आहे. देवनागरींतील या चारांचा विचार पूर्वी विस्तारानें झाला आहे. तसेंच पुढें ऋ, ऌ, ॡ, यांचा सर्व लिपीतील लेखनाचा स्वतंत्र प्रकरणात विचार केला आहे.

६४, ६५, ६६, ६७, ६८,
६९, (अ), ६९, (ब), ७०, ७१, ७२,
७३, ७४, ७५,

## तमिळ ए कार प्रक्रिया

आ. ६४ व ६५ मध्यें देवनागरी एकाराचा मौलिक उद्भव आणि एक अर्धवृत्त सोडून सुटा लेख दाखविला आहे त्यामधील खालचें ऊर्वरित एक अर्धवृत्त सोडून दिल्यावर ६६ व ६७ हे अशोकलिपि ए होतात. अशोकलिपि ए रूढीनेंही त्रिकोणाकार आहे. त्यामध्यें सुद्धां आकृतींत तोडून दाखविलेला डावीकडील भाग वर्णोद्धारतन्त्रात न सांगताही येतो, तो बिन्दुस्फोटन अविच्छिन्न लिहिणें सुकर होण्यासाठी केलेलें घृष्टलेखन आहे. याचा विस्तार पूर्वी आला आहे. आ. ६८ मधील डावीकडील व खालचे अर्धवृत्त डावीकडील रेषाभागाद्वारा वर ओढून घेऊन उजवी कडील रेषाभाग उलगडून ६९ (अ) होते. खाली जाणारी रेषा वर्णोद्धारतन्त्रप्राप्त नसली तरी लिहिली जाते. ६९ (अ) ची उजवीकडील रेषा सरळ लिहिल्यावर आ. ६९ (ब) होते. आ. ७० मध्यें टिंबानी दाखविलेला भाग सोडून उरलेला भागच वर्णोद्धारतन्त्रानें ए म्हणून सांगितला आहे. आ. ६९ (अ), (ब), व ७१ हे आज प्रचलित देवनागरी ए आहेत. आ. ७२ मध्यें टिंबांनी दाखविलेला, भाग वगळून बाकीचा भाग तमिळ ए मध्यें तसाच रहातो. तेवढ्याच भागाला खालील प्रक्रियेनें आलेलें कुण्डल वरच्या रेषेच्या डावीकडील टोकास जोडलें जाते ती प्रक्रिया अशी

1, 2, 3, 4, 5,

या प्रमाणें देवनागरी एकारापासूनच कुण्डलासकट सर्व भाग घेऊन तामिळ ए बनतो. आ. ७४ तामिळ ह्रस्व 'ए' आहे. त्याला उजवीकडील रेषेचें खालचें टोकास दाखविल्या प्रमाणें वामलोगता रेषा राहू दिली असतां आ. ७५ तमिळ दीर्घ ए होतो. ह्रस्वामध्यें ती रेषा सोडून दिली जाते.

## उच्चारणभेदासाठीं लिपिभेद

तेलगु, कन्नड, तामिळ, मल्याळम् मध्यें ह्रस्व दीर्घ असे दोन ए व ओ लिपिभेद करुन लिहिले जातात. तसें तर संस्कृतांतही वैदिक व्यवहारासाठीं तसा उच्चारणभेद आहे. सामवेदांत ऋग्वेदाच्या हौत्राच्या 'न्यूङ्ख शंसनांत' असे उच्चार आहेत. व्याकरणमहाभाष्यकार व श्रौतसूत्रकार यांनी याचा विशेष विचार केला आहे श्रौतानुष्ठानांत 'न्यूङ्ख शंसन' परंपराप्राप्त आहे. सामगाना प्रमाणें लौकिक संगीतांतही तालाच्या काल-क्रिया-मानानुसार द्रुत वा अनुद्रुत करतांना दीर्घाच्या दोन मात्रा एक मात्रा काळउच्चारणांत जोडून घेतल्या जातात म्हणजेच दीर्घाचा ह्रस्व उच्चारणकाळ होतो. हा विषय संगीतज्ञांचे नित्य परिचयाचा आहे, हिन्दी-मराठीं वगैरेतील दोहा-चौपाई, ओंवी-अभंग वगैरे भाषाछंदातही ए-ओ ह्रस्व उच्चारणाची रूढी आहे. उदा. " बोलेविहसि महेश तब ज्ञान मूढ कोय । जे हि जस रघुपति करहि जब सोइ तस तेहि छन होय । " यांत अधोरेखित जे, सो, ते येथें एकमात्रा-काळांतच द्रुत उच्चारण आहे. "गळा तुळसिमाळा कांसे पीताम्बर । आवडे निरंतर हेंचि ध्यान । " यांत अधोरेखित 'से' व 'डे' चे ह्रस्व उच्चारण अशी उदाहरणें सर्व भारतीय भाषांत आहेत. मूळ वैदिक व्यवहारापासूनच हें सर्वत्र आलें आहे. अशा प्रकारच्या उच्चारणभेदासाठी वर्णोद्धारतन्त्र लिपिभेद करीत नाहीं. एकाच लिपिलेखन प्रकारानें उच्चारण-भेद दाखविला जातो. कन्नडादिकांतही सर्व उच्चारणभेदाकरिता लिपिभेद आहेत असे नाहीं. "व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य" "हकारं पञ्चमैर्युक्तमन्तस्थाभिश्च-संयुतम् औरस्यं तं विजानीयात्कण्ठ्यमाहुरसंयुतम् ।। इत्यादि प्रमाणानुसार व, य, ह यांचे फरकाकरितां लिपिभेद कोठे आहेत? तामिळ भाषेंत तर १५ च व्यञ्जनें क, ङ, च, ञ, ट, ण, त, न, प, म, य, र, ल, व, ळ या प्रमाणें आहेत, आणि अपूर्ण ळ र, व न अशी तीन त्यांचे भाषेंतील खास उपयोगा करितां कल्पित आहेत. तामिळ भाषेंत तर ख, ग, घ या तिन्ही करितां क च वापरला जातो. वर्गाद्यावरूनच दुसरा, तिसरा, चवथा वर्ण समजण्यांत येतो. भगवान् करितां पकवान्, बत्तीकरितां पत्ती, गंगाघाट करितां कंकाकाट् वगैरे तमिळ लोकलिपीत लिहिलें जातें. म्हणून वर्णोद्धारतन्त्रांत उच्चारणभेदाकरितां लिपिभेद नसले तरी हरकत नाहीं. एकाच लिपीनें काम होतें, तशीच त्यांची मर्यादा आहे. पूर्वी ऋ, ऌकाराचें शास्त्रार्थांत याचा विशेष विचार झाला आहे.

## तमिळ एकारमात्रा विचार

चित्रविभागात दाखविल्यानुसार रेषेस ए ची मात्रा म्हणतात. देवनागरींत सोळाखडी करितांना 'के' वगैरेंतल्या प्रमाणें हा भाग अक्षराचे डोक्यावर लिहिण्यांत येतो. अशोकलिपीत अक्षराचे डोक्याचे डावीकडे एकारमात्रा लिहिण्यांत येते तमिळमध्यें अक्षराचे डावीकडेच ह्रस्व वा दीर्घ एकारमात्रा बाराखडींत लिहिली जाते तेथें चित्रविभागात दाखविलेल्या देवनागरी मात्रेसच वक्राकार करून ह्रस्व एकार मात्रा व दोन कुण्डले करून दीर्घ एकार मात्रा केली आहे. याचा वापर चित्रविभागात दाखविला आहे.

### तमिळ ऐकार प्रक्रिया

७६, ७७, ७८, ७९. ८०.
८१, ८२, ८३, ८४,

आ. ७९ मध्यें देवनागरी 'ऐ' लिहिला आहे. त्यामध्यें ए ला दोन मात्रा स्पष्ट दिसत आहेत. तदनुसार ७८ हा अशोकलिपि ऐ होऊं शकतो. पूर्वी उल्लेखिलेल्या जपानमधील होर्युजी मठांतील ताडपत्रावर लिहिलेल्या "उष्णीश विजय धारिणी" ग्रंथाचे शेवटीं दिलेल्या वर्णमालेंत आ. ७७ व ७८ मध्यें दाखविल्यानुसार ऐ आहे. ७७ व ७८ मध्यें फरक नसल्याचें दिसतेंच आहे. बावर यांना मिळालेल्या भूर्जपत्रावरील पुस्तकांत आ. ७६ मध्यें दाखविल्याप्रमाणे अशोकलिपि ऐ आहे. विशिष्टपणें ऐ अशोकाच्या शिलालेखांत आढळलेला नाहीं (संदर्भ–भारतीय प्राचीन लिपिमाला = ओझां लिपिपत्र १९)

### तमिळ ऐकारमात्रा विचार

तमिळ ऐ कार बनविण्यासाठी आ. ७८ मधील दोन मात्रा आ. ८० येथें दाखविल्याप्रमाणें लिहिल्या आहेत. ८१ मध्यें त्याच दोन मात्रा एकीचे मुळाशीं दुसरीचे डोकें येईल अशा वाकवून लिहिल्या आहेत, आणि त्यांचे खालीं ८० चाऊर्वरित भाग उलटा करून लिहिला आहे. आ. ८२ मध्यें ८१ मधील मात्रा जोडून लिहिल्या आहेत. आ. ८१ मधील ] रेषा दिग्भेदानें ⌐ अशी लिहिली आहे. आ. ८३ येथें ८२ मधील सर्व रेषांस वृत्ताकार बनवून वरच्या बाजूस सुरुवातीस एक कुण्डल जोडले आहे. आ. ८४ तामिळ ऐ आहे. हें सर्व नर्तकाचे आविर्भावाप्रमाणें समजावें. दिग्भेदाविषयीं विचार पूर्वी झालाच आहे. पोहण्यासाठीं सूर मारताना माणूस उलटा होतो, अशाच्या डोक्यावरील टोपी उडून गेली असली तर माणूस अगोदर व टोपी नंतर खालीं येते. अशावेळीं माणूस तोच असतो, वेगळा नव्हे, असेंच येथें समजावें. पृष्टलेखनाचा विस्तृत विचार उत्तरार्धांत केलाच केलाच आहे. या सर्व प्रश्नांनां श्री भास्कररायांनीं सेतुबंधांत उत्तर दिलें आहे. "अत्रैकस्या नेकरूपात्मकत्वे परस्पर-विरुद्धानामपि रूपाणामभेदे च न विप्रतिपत्तव्यम् । देवता महिम्नोऽप्रतर्क्यत्वात् ।" पूर्वी दिग्भद व अवस्थानभेदाविषयीं विवरण झालेंच आहे.

### तमिळ व्यञ्जनांत ऐकारमात्रा

देवनागरी सोळाखडींत क, ग वगैरे व्यञ्जनांचे डोक्यावर दोन एकारमात्रा देऊन कै, गै वगैरें लिहिलें जातें. ए मध्यें एक मात्रा अन्तर्गतच असल्यानें डोक्यावर एकच मात्रा ऐ लिहितांना देतात, हे सर्वांना माहीतच आहे. अशोकलिपींतही असेंच असले पाहिजे. तेथें व्यञ्जनाचे डोक्यावर डावीकडे दोन आडव्या रेषा देऊन सोळाखडी केली जाते. चित्रविभाग पहा. तमिळ मध्यें त्यांचे ऐ मध्यें वरच्या भागांत दोन देवनागरी एकमात्रांनीं बनणारे रूप घेऊन ए लिहिला जातो, व्यञ्जनांत मात्र चित्रविभागात दाखविलेले रूप अक्षराचे डावींकडे लिहिलें जातें.

### तमिळ ओकार प्रक्रिया

८५, ८६, ८७, ८८, ८९, ९०, ९१.
९२, ९३, ९४, ९५, ९६, ९७,

आ. ९२ मध्यें गजाकार ओकाराचा मौलिकोद्भव दाखविला आहे. याचें वर्णन पूर्वी झालें आहे, अशोकलिपि व तमिळलिपी "ओ" दोन्हीं या पासूनच बनतात. आ. ९०–९१ अशोकलिपि ओ आहे. आ. ९३ मधील गजाकार ओकाराचा मधील चित्रविभागात दर्शित भाग घेऊन तो बनत आहे. आ. ८६ ते ८९ येथें ९०–९१ त दाखविलेल्या अशोकलिपि ओ च्या पृष्टलेखनाचे विविध प्रकार आहेत. आ. ८५ मध्यें आ. ८६ चें विपरीत पृष्टलेखन आहे. असें अशोकाच्या 'जोगड' च्या शिलालेखांत सांपडतें. आ. ९४ मध्यें आ. ९२ या मौलिक उद्भवाचे विस्तृतरूप आ. ९३ तील डावीकडील खालचें व उजवीकडील खालचें अर्धवृत्त एकमेकांजवळ घेऊन डावीकडे लिहिलें आहे. आ. ९५ मध्यें आ. ९४ चा उजवीकडील रेषाभाग वाढवून लिहिला आहे, आणि डावीकडील सोंडेचा भाग खाली लटकता सोडला आहे. आ. ९६ तमिळ ह्रस्व ओ आहे, त्या मध्यें फक्त डावीकडील भागांत एक गांठ असते. तमिळ दीर्घ ओ आ. ९७ मध्यें दोन्हींकडें गांठी असतात. तामिळ ह्रस्व ओ मध्यें उजवीकडील भाग वर वळविलेला मात्र, अर्धकुण्डलाकार असतो. तर दीर्घ ओ मध्यें उजवीकडील भाग वर वळवून पूर्ण कुण्डल केलेले असते.

या प्रमाणें देवनागरीमध्यें गणेशतापिनि उपनिषदांत सांगितल्या प्रमाणें गजाकार ओ कार बनतो. तमिळ ओ याच गजाकार ओकारापासून बनतो. लेखकाच्या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या **'गणेश मीमांसा'** ग्रंथांत याचा विस्तारानें ऊहापोह केला आहे.

### तामिळ–ह्रस्व–दीर्घ ओकारमात्रा

देवनागरींत अ ची दीर्घमात्रा+ए ची मात्रा एवढे मिळून ओ ची ो होते. या प्रमाणेंच अशोक लिपींत त्याच्या रीतीने चित्रविभागात दाखविल्या प्रमाणें दोन मात्रा देऊन को, गो. वगैरे बनतात. तमिळमध्यें अ ची दीर्घ मात्रा आणि ए ची मात्रा त्यांचे पद्धतीनें जोडूनच

ओकारमात्रा बनवितात. बहुतेक ठिकाणीं व्यञ्जनाचे मागें ए ची मात्रा व पुढे अ ची दीर्घ मात्रा लिहून ओकारान्त व्यञ्जन होते. ह्रस्व ए ची मात्रा घेऊन ह्रस्व ओ व दीर्घ ए ची मात्रा घेऊन दीर्घ ओ होतो. चित्रविभागात पहा. या प्रमाणें तामिळ ओकारमात्रा देवनागरी ओकारमात्रेशीं एकरूप आहे.

**देवनागरीपासून तामिळ औ.**

९८, ९९, १००

आ. ९९ मध्यें देवनागरी औ वर्णोद्धारतन्त्राप्रमाणे अ चे पुढे ओ ची मात्रा ो लिहून वर त्यालाच आणखी एक ए ची मात्रा चित्र-विभागात दाखविल्याप्रमाणे जोडली आहे. या प्रमाणेंच अशोकलिपि अ लिहून ओकार व एकार मात्रा त्यांच्या पद्धतीने जोडून अशोकलिपि औ. (आ. ९८) होतो. आ. १०० तमिळ औ आहे. तेथें तमिळ ह्रस्व ओ लिहून पुढें मात्रा लिहिली आहे. ही मात्रा देवनागरी औकार मात्रे पासूनच खालील प्रक्रियेनें बनते–चित्रविभाग पहा. म्हणून आ. ९८–९९ मधील औकारमात्रेप्रमाणेंच तन्त्रोक्त नियमानुसार तमिळमध्येंही औकार मात्रा निष्पन्न होत आहे. तमिळमध्यें गजाकार ओकार घेऊन औकार करतात. 'अ' घेऊन करीत नाहीत.

**व्यञ्जनांत तामिळ औकार मात्रा**

म्हणून सोळाखडी करितां औकार मात्रेची योजना. तमिळ मात्रास्वरूपावरून करितात. चित्रविभागात दाखविल्याप्रमाणें जोडून औकारमात्रा बनते, वर दाखविलेल्या प्रक्रिये प्रमाणें असेंच स्वरूप निष्पादन होत असलें तरी तत्त्वतः येथें बनत नाहीं. वर दाखविलेली प्रक्रिया केवळ औकारस्वरापुरतीच आहे, कारण तसे नसते तर तमिळ सोळाखडींत औकारान्त व्यञ्जनांत चित्रविभागात दाखविलेला अक्षराचे डावीकडचा जास्तीचा भाग आला नसता. उदा. तामिळ "कौ" वगैरे चित्रविभाग पहा.

**तमिळ औकार मात्रेचा विशेष वापर**

चित्रविभागात दाखविलेल्या मात्रेचा वापर तमिळ मध्यें अनेक ठिकाणीं व अनेक वेगवेगळ्या प्रकारानें करण्यात येतो. उ चे पुढेंही लिहून ऊ होतो. क चे पुढे लिहून कौ होतो, नुसतीच लिहून ळ होतो. या प्रमाणें ह्रस्व व दीर्घ ए, ओ साठीं वेगळी लिपि असूनही एवढ्या सर्वां करितां एकच लिपि तमिळमध्यें वापरली जाते.

**अं, अः प्रक्रिया**

१०१, १०२, १०३, १०४, १०५, १०६

आ. १०३ देवनागरी अं व १०४ अः आहेत. अं करितां अ चे डोक्यावर एक अनुस्वारबिन्दु व अः करितां अ लिहून उजवीकडे खालीं एक, वर एक असें दोन विसर्गबिन्दु दिले जातात. अशोक लिपींत असेंच आहे १०१ अशोकलिपि अं व १०२ अः आहे. अशोकलिपींत अं लिहितांना कांही वेळां बिन्दु अक्षराचे डोक्यावरच पण थोडा उजवीकडेही दिला जातो. अं, अः लिहिण्याचें दिग्दर्शन हें उपलक्षण असून त्या प्रमाणेच इतर स्वरांचें आहे.

**तमिळ लोकलिपींतील अनुस्वार**

तमिळ लोकलिपीत आ. १०५ येथें दाखविल्यानुसार अ पूर्ण लिहून त्याचे उजवीकडे अर्धा 'म्' लिहिला जातो, म्हणजे दोन्हीं मिळून अं होतो. अर्धा 'म्' लिहूनच अनुस्वाराचें काम केलें जातें. तमिळ लोकलिपींत अनुस्वार वेगळा नाहीं. ग्रंथ लिपींत अनुस्वार आहे तो अक्षराचे उजवीकडे बृहदाकार बिन्दु लिहून दाखविला जातो. ग्रंथ लिपीचा विचार पुढें येईलच. संस्कृतांत अनुस्वार अनुनासिक (ङ्, ञ्, ण्, न्) आणि म् या सर्वांचे उच्चारणांत फरक असल्यानें सर्वत्र अर्धा 'म्' वापरला जात नाहीं. तमिळ लोकलिपींत डोक्यावर बिन्दु दिल्यावर अर्धाक्षर होते, तो अनुस्वार नव्हे.

**केवळ तमिळ मधील विसर्गसदृश उच्चारण**

आ. १०६ तमिळ लोक लिपींतील विसर्ग आहे. ग्रंथ लिपींत विसर्ग संस्कृता प्रमाणेंच आहे. तामिळ लोकलिपींतील विसर्ग हा नाहीं कारण त्याचें अक् किंवा अख् असें उच्चारण आहे. कोठें जिव्हामूलीय म्हणून तर कोठें उपध्मानीय म्हणून त्यांचे भाषेकरितांच केवळ त्या चिन्हाचा उपयोग आहे. संस्कृतासारखें विसर्गाचें उच्चारण तामिळांत नाहीं. तामिळ लोकलिपींत अर्धाक्षर लिहिणें सोपें असल्याने त्याच्याच वापरानें जोडाक्षर सौलभ्याने लिहितात चित्रविभाग पहा.

चित्रविभाग पहा. या प्रमाणें देवनागरींतील स्वरांचा अशोकलिपि व तामिळ लोकलिपीशीं संबंध आहे.

---

## प्रकरण सहावे– देवनागरीशी अशोकलिपि व तमिळ लिपि यांचा संबंध-व्यञ्जने

१, २, ३, ४, ५,
६, ७, ८,
९, १०, ११,

### अशोकलिपि–तमिळ लोकलिपि क

आ. १ मध्यें देवनागरी क चा मौलिक उद्‌भव दाखविला आहे. २ मध्यें वरचीं दोन अर्धवृत्ते काढून टाकून तोच क लिहिला आहे. आज देखील कोठें कोठें असा क लिहिला जातो. दोनला शिरोरेषा देऊन ३ होते. ३ मध्यें बिन्दुस्फोटनातील डावें वरचें अर्ध लिहून ४ होते. हें अर्ध सरळरेषारूपानें लिहून ५ होते. हा तामिळ क आहे. तो सोबत दाखविल्या प्रमाणें गोलाकार वळणाने लिहिला जातो. आ. ६, ७, ८ पूर्वी सांगितलें आजहीं आजही प्रचलित असणारे विविधदेवनागरी क आहेत. आकृति ९, १०, ११, हे अनुक्रमें ६, ७, ८ चे मधील क्रूसप्रमाणें दिसणारे मध्यभाग आहेत. तेच अशोक लिपि क आहेत.

### अशोकलिपि ख

१२, १३, १४, १५, १६, १७, १८,
१९, २०, २१. २२, २३, २४, २५,

तमिळ लोकलिपींत ख, ग, घ, हे वर्ण नाहींत म्हणून येथें केवळ अशोकलिपींत त्यांचा विचार कर्तव्य आहे. आ. १२–१३ पूर्व वर्णित देवनागरी ख आहेत. हे शिलाले खांत मिळत असून घृष्टलिखित आहेत. आ. १७ मध्यें आ. १२ चें वरचें दोन अर्ध एक रेषा देऊन जोडले आहेत. या नंतर आकृति १८ ते २५ मध्यें अशोक लिपि ख चे अनेक घृष्टलिखित प्रकार आहेत. हे सर्व प्रकार आ. १७ चा वरचा टोपीसारखा भाग कुण्डलासकट घेऊन बनतात. हे सर्व केवळ लेखसामग्रीतील फरकामुळें होत नाहींत. घृष्टलेखन अनंत आहे. त्यानेच हे सर्व प्रकार होतात.

### अशोकलिपि ग

२६, २७, २८, १९, ३०,

आ. २६ देवनागरी ग चा मौलिक उद्‌भव आहे. २७ मध्यें २६ चा वरचा अर्धा भागच दाखविला आहे. तोच अशोकलिपि ग आहे. २८, २९, ३० देवनागरी ग चे घृष्टलिखित प्रकार आहेत. ३० हा प्रचलित देवनागरी ग आहे.

### अशोकलिपि घ

३१, ३२, ३३, ३४, ३५,
३६, ३७, ३८, ३९,

आ. ३१ मध्यें घ चा मौलिक उद्‌भव दाखविला आहे ३२ ३३, ३४ हे कुब्जनभेदानें होणारे प्रकार पूर्वी वर्णिले आहेत. हे सर्व घृष्टलिखित प्रकार होत आ. ३५, येथे ३२ लिहून लोप करण्याचा भाग टिंबांनीं दाखविला आहे. हा काढून टाकल्यावर आणि खालचा डावीकडून उजवीकडे वर जाणारा भाग गोलाकार लिहिल्यावर आ, ३६ बनते, आ. ३६ मधील खालच्या बाजूचे दोन्हीं गोलाकार भाग एका रेषेंत व एका आकाराचे केल्यावर आ. ३७ होते. ३७ मधील डावीकडील दोन अर्धकुण्डलें सरळरेषा रूपांत लिहिल्यावर आ. ३८ होते. हाच अशोक लिपि घ आहे. आ. ३९ मध्यें सफाईनें तोच लिहिला आहे.

### अशोकलिपि तमिळ लिपि ङ. प्रक्रिया

४०, ४१, ४२, ४३, ४४, ४५,
४६, ४७, ४८, ४९, ५०,

आ. ४३ मध्यें ङ. चा मौलिक उद्‌भव दाखविला आहे. ४२ मध्यें तोच स्पष्ट लिहून दाखविला आहे. ४१ मध्यें, ४२ मधील सोडून द्यावयाचा भाग टिंबांनी दाखविला आहे. या प्रमाणें तो सोडला असतां आणि आ. ४०–४१ मध्यें दिल्यानुसार डावीकडून जास्तीची रेषा वाढविली असतां आ. ४० हा अशोकलिपि ङ. बनत आहे. आ. ४४ मध्यें वरची उभी रेघ लांब असणारा व वरची अर्धवक्र रेषा आकुञ्चित असणारा शिरोरेषेसहित देवनागरी ङ. लिहिला आहे. आ. ४४ उजवीकडे कलवून आडवी केल्यावर ४५ होते, ४५मधील बिन्दु व शिरोरेषेचा खालचा भाग (टिंबांनी दाखविलेला) सोडल्यावर आ. ४६ उरते आ. ४६ चें आ. ४७ मध्यें दोन भाग केले आहेत. ४७ चा पहिला भाग

उंच व कोणयुक्त करून ४८ मध्यें लिहिला आहे. ४८ चे दोन्ही भाग जोडून लिहिल्यावर ४९ होतें. व ४९ ची वरची आडवी रेषा नीट लिहून ५० होतें. आ. ५० हाच तमिळ ड. आहे.

अशोक–तमिळ च

५१, ५२, ५३, ५४, ५५, ५६
५७, ५८, ५९, ६०, ६१, ६२, ६३ ६४, ६५,

आ. ५९ मध्यें बिन्दुस्फोटनांत च कसा होतो हें दाखविलें आहे. ५९ मधील डावीकडील वरचें अर्धवृत्त सोडून आ. ५८ होतें. ५८ मधील मात्रा सरळ रेषेंत लिहून आ. ५७ होतें. आ. ५७ मधील आडवी रेषा सरळ केल्यावर आ. ५६ होतें. येथें अक्षराचे डोक्यावर शिरोरेषा दिली आहे. हा प्रचलित देवनागरीच आहे आ. ५६ मधील, ५५ येथें टिंबांनी दाखविलेला भाग शिरोरेखेसह सोडून दिला असतां आ. ५४ होतें. असा च अशोकलिपींत कोठें कोठें आढळतो. आ. ६०–६१ हे आ. ५४ चेच लहान मोठे आकार लिहून होणारे घृष्टलेखन आहे. आ. ५५ मधील टिंबांनी दाखविलेला भाग सोडून दिल्यावर, डोक्यावर शिरोरेषा राहूं दिल्यावर आणि मधली आडवी रेषा उजवीकडे थोडी वाढविल्यावर आ. ५३ बनते. ५३ मध्यें वाढविण्याचा भाग ५२ मध्यें टिंबांनीं दाखविला आहे. हा वाढविण्याचा भाग म्हणजे बिन्दुस्फोटनांतील डावीकडील वरचें अर्धच होय. एवढें केल्यावर आणि वाढविलेला भाग सरळ रेषा रूपानें लिहून, डोक्यावरच्या आडव्या रेषेशीं जोडून घेतल्यावर आ. ५१ हा तमिळ 'च' बनतो. आ. ६२–६३ मध्ये अशोकलिपि च चे विविध घृष्टलेखन प्रकार दाखविला आहेत.

तामिल लोकलिपींत छ, ज, झ, हे वर्ण नसल्यानें, त्या तिघांचा केवळ देवनागरी व अशोकलिपींतच विचार होईल.

अशोकलिपि–छ

६६, ६७, ६८, ६९, ७०

आ. ६६ मध्ये पूर्वी वर्णिल्यानुसार 'अधोगता रेखा' खाली ओढून देवनागरी छ लिहिला आहे. ६७ मध्यें रेषा खालीं ओढलेली नाही. ६८ ते ७० मध्यें घृष्टलेखनानें अशोकलिपि छ कसा होतो हे दाखविले आहे. ६८ मध्ये ६७ चे संकोचन करून उजवीकडील गांठ मोठी लिहिली आहे. ६९ मध्यें ६८ मधील डावीकडील वरची वक्ररेषा सरळरेषारूपाने लिहिली आहे. ६९ मधील उजवीकडील खालचें अर्ध डावीकडील खालच्या अर्धाशीं जुळवून घेतलें आहे. आणि वरची सरळरेषा मधल्या रेषेद्वारा एक करून थेट खालपर्यंत आणली आहे. एवढे केल्यावर आ. ७० हा अशोकलिपि 'छ' बनतो.

७१, ७२, ७३, ७४, ७५, ७६, ७७, ७८

अशोकलिपि ज

आ. ७१ ते ७४ पूर्व वर्णित देवनागरी ज आहे. ७१ मध्यें दोन भाग करून, उजवीकडील अर्धा भाग सोडून देऊन फक्त डावीकडील अस्पृष्टा कुञ्चनानें जुळलेला अर्धा भाग उभा करून आ. ७५ मध्यें लिहिला आहे. आ. ७५ हाच अशोकलिपि 'ज' आहे. पुढे आ. ७८ पर्यंत ७५ हा चेच घृष्टलेखन आहे. आ. ७६, ७७ मध्यें स्पृष्टा कुञ्चन व आ. ७८ मध्य कोणयुक्त लेखन आहे.

७९, ८०, ८१, ८२

अशोकलिपि झ

आ. ८१ मध्यें देवनागरी झ चा मौलिक उद्‌भव दाखविला आहे. त्या मध्यें वरच्या बाजूचा अर्धभाग लक्षणवाक्यामध्यें सांगितलेला नाही. उरलेला भाग ८२ मध्ये दाखविला आहे या विषयी विस्तार पूर्वी झाला आहे. आ. ८१ मधील, आ. ८० येथे टिंबानीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आणि उरलेला भाग जोडून घेतल्यावर आ. ७९ हा अशोक लिपि 'झ' होतो.

अशोक तामिळ ञ

८३, ८४, ८५, ८६, ८७, ८८, ८९, ९०, ९१, ९२

आ. ८५ मध्ये देवनागरी ञ चा मौलिक उद्‌भव दाखविला आहे. त्या मधील आ. ८४ येथें टिंबानीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आ. ८३ हा अशोकलिपि ञ होतो. आ ८६ ते ८८ यांचे वर्णण पूर्वी आले आहे. ८७, ८८ शिरोरेषा देऊन लिहिल्या आहेत, ज्या ८७ मधील

सोडून द्यावयाचा भाग आ. ९२ येथे टिंबानीं दाखविला आहे. तो सोडून उरलेला भाग ९१ येथें डावीकडील तुकडा, मधल्या व उजवीकडील शेवटच्या या दोन्ही तुकड्यासमोर येईल असा लिहिला आहे. ९१ येथे ९२ मधील उजवीकडील वरचा तुकडा शिरोरेषेस जोडून घेतला आहे. व वाढविण्याचा भाग टिंबांनीं दाखविला आहे हे केल्यावर ९० होते. तेथें वाढविण्याचा भाग टिंबांनीं दाखविला आहे तो वाढविल्यावर आ. ८९ हा तामिळ 'ञ' होतो.

९३, ९४, ९५, ९६

### अशोक तामिळ ट

आ. ९३ मध्यें 'ट' चा मौलिक उद्भव दाखविला आहे. ९३ मधील वरची दोन व खालचें उजवीकडील एक अर्धकुण्डल सोडून दिल्यानर देवनागरी 'ट' होतो. त्या मधील वरची उभी रेषा सोडून दिल्यावर आ. ९५ हा अशोकलिपि 'ट' होतो. ९५ सरळरेषा स्वरूपात कोणयुक्त लिहिल्यावर ९६ हा तामिळ 'ट' होतो. तामिळ मध्यें ठ, ड, ढ, हे वर्ण नसल्याने त्यांचा केवळ अशोकलिपि पुरताच विचार होईल.

### अशोकलिपि ठ

आ. ९७ मध्यें 'ठ' चा ९७, ९८, ९९ मौलिक उद्भव दाखविला आहे, त्यापासून होणारा आ. ९८ हा देवनागरी 'ठ' आहे, ९८ मधील वरची शिखारेषा सोडून दिल्यावर राहणारा ऊर्वरित भाग ९९ हा अशोकलिपि 'ठ' होतो.

१००, १०१, १०२, १०३, १०४, १०५

### अशोकलिपि 'ड' 'ढ'

आ. १०० ड चा मौलिक उद्भव असून १०१ मधील खालच्या वृत्तार्धांनी बनलेला भाग सोगून दिल्यावर १०२ होते. याच प्रकारचा ड अशोकलिपींत कोठें कोठें आहे. १०२ कोणयुक्त लिहून, तिची खालची रेषा सरळ करुन लोंबती सोडल्यावर १०३ बनते, असाही ड अशोक लिपींत आढळतो ते १०२ चेंच घृष्टलेखन आहे. आ. १०४ मध्यें 'ढ' चा मौलिक उद्भव दाखविला आहे. व १०५ त्या पासून बनणारा देवनागरी ढ आहे. अशोकलिपि 'ढ' असाच आहे.

### अशोक तामिळ ण

१०६, १०७, १०८, १०९, ११०
१११, ११२, ११३, ११४, ११५

आ. १०६ मध्यें देवनागरी 'ण' चा मौलिक उद्भव दाखविला आहे. आ. १०७ मध्यें दुहेरी रेषा एकरूप करून लिहिल्या आहेत आणि खालचे दोन वृत्तार्ध लक्षणवाक्य घ्यावयास सांगत नसल्याने सोडून दिले आहेत किंवा तींच दोन्हीं अर्धवृत्ते **"वामादधोगता सर्वे पुनरूर्ध्वगता"** या रेषेच्या स्वरूपात दिशा बदलून वर्णोद्धारतन्त्रवचनांत संगृहीत आहेत असे समजावें दुहेरी रेषा वर्णोद्धारतन्त्रवचनानुसार येतात. याचा विस्तार पूर्वी झाला आहे. आ. १०७ व १०८ या दोन्हीं प्रकारांनी हिन्दीमध्यें ण लिहिला जातो. आ. १०८ मधील डावी उजवीकडील उभ्या दोन रेषा सोडून दिल्यावर आ. १०९ हा घृष्टलेखनाने होणारा अशोकलिपि 'ण' आहे. आ. ११०–१११ मध्यें महाराष्ट्रात लिहिल्या जाणाऱ्या ण ची प्रक्रिया दाखविली आहे. ११२ मध्ये ११० ला डावीकडे छित्वा कुञ्चनाने बिंदुस्फोटनातून येणारे डावीकडील खालचे अर्धवृत्त जोडून घेतले आहे. ११२ मधील तीन कुण्डले ११३ त समपातळीवर आणून एकस्तरीय केलीं. आहेत. ११३ तील पहिल्या कुण्डलास खालीं वाकवून एक लहान कुण्डल जोडावयाचें आकृतींत टिंबानी दाखविलें आहे त्यानुसार करुन शेवटचे कुण्डल कोणयुक्त लिहिल्यावर आ. ११४–११५ तामिळ 'ण' होतात.

खालील आकृतीत दाखविल्याप्रमाणे आ. ११२ धृष्टलेखन प्रक्रियेने मराठी मोडी ण कार द्वारा बनू शकते,

११२, १, २, ३, ४, ५, ६

प्रक्रिया सुलभ असल्याने विवरण देत नाहीं.

११६, ११७, ११८, ११९, १२०, १२१, १२२
१२३, १२४, १२५, १२६, १२७, १२८, १२९

### अशोक तामिळ 'त'

आ. ११९ मध्ये देवनागरी 'त' चा मौलिक उद्भव दाखविला आहे, १२०, १२१, १२२ मध्ये दाखविलेल्या पूर्ण वर्णित प्रक्रियेनें ११९ पासून बनणारा १२३ हा देवनागरी 'त' आहे. त्यापासूनच १२४ हा अशोकलिपि 'त' बनतो. १२४ ते १२९ अशोकलिपि त चे विविध

घृष्टलिखित प्रकार दाखविले आहेत. ११९ च्या डोक्यावर एक आडवी रेषा दिल्यावर आ. ११८ होते. ११८ मध्येच ११९ येथे टिंबांनीं दाखविलेली रेषा वेगळ्या प्रकारानें जोडणें दाखविलें आहे, ११८ मधील वरचीं दोन अर्धवृत्ते सरळरेषारूपानें लिहून ११८ मधील टिंबांनीं दाखविलेल्या मार्गानें खालचें उजवें अर्धवृत्त आखूड लिहून डाव्या अर्धवृत्तास जोडून घेतल्यावर ११७ होते. ११७ पासून होणारा तामिळ 'त' ११६ मध्यें दाखविला आहे तामिळ मध्यें थ, द, ध, नाहींत म्हणून त्यांचा केवळ अशोकलिपि विषयक विचार होईल.

१३०, १३१, १३२, १३३, १३४, १३५, १३६, १३७,
१३८, १३९, १४०

### अशोकलिपि थ द

१३२, १३३, १३७

आ. १३० मध्यें 'थ' चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १३१ मध्ये मात्रेचे खालचा **'अधऊर्ध्वगता'** हा भाग काढून टाकला आहे. १३२ मध्ये डावीकडील वरचा दुहेरी रेषा भाग उजवीकडें झुकवून, डावीकडील खालच्या वृत्तार्धाजवळ लिहिला आहे. आ. १३३ मध्यें उजवीकडील वरचें अर्धवृत्त डावीकडे झुकवून डावीकडील खालच्या वृत्तार्धाच्या शिरोभागाजवळ आणलें आहे. १३४ मध्यें उजवीकड झुकवून घेतलेला रेषाभाग सरकावून घेऊन त्याचाच मध्यभागीं बिन्दु केला आहे. हा अशोकलिपि 'थ' आहे.

आ. १३५ मध्यें 'द' चा मौलिक उद्भव दाखविला आहे, आ. १३६ मध्यें आ. १३५ पासून पूर्वी सांगितल्याप्रमाणें बनणारा देवनागरी द लिहिला आहे. आ. १३७ हा अशोकलिपि 'द' आहे. त्याचा प्रकार देवनागरी प्रमाणेंच असला तरी मध्यभागाचा रेषाभाग उजवीकडील वृत्तार्ध घेऊन देखील लिहिला जातो. १३८ ते १४० अशोकलिपि द चे घृष्टलेखन प्रकार आहेत.

१४१, १४२, १४३, १४४, १४५

### अशोकलिपि 'ध'

आ. १४३ पूर्ववर्णित देवनागरी 'ध' आहे. १४२ त्याचाच लेखन प्रकार आहे. १४२ मधील १४१ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून देऊन ऊर्वरित भाग सलग लिहिला असता १४४ हा अशोकलिपि 'ध' बनतो. तो आ. १४५ मध्यें दाखविल्याप्रमाणें दिग्वैपरीत्यानेही लिहिला जातो.

१४६, १४७, १४८, १४९, १५०, १५१, १५२, १५३, १५४
१५५, १५६, १५७, १५८, १५९,

### अशोक तामिळ 'न' १५२ ते १५८

आ. १४६ मध्यें 'न' चा मौलिकोद्भव दाखविला आहे. १५९ व १४७ पूर्ववर्णित आहेत. १४८ मध्यें दाखविलेला १४६ चा अंश घेऊन सरळरेषारूपानें लिहिल्यावर १४९ अशोकलिपि 'न' होतो. डावीकडील वरचे वृत्तार्ध घेऊन बनणारा देवनागरी 'न' १५०, १५१, १५२ येथ दाखविला आहे १५३ येथें १५१ चा अंश घेऊन सरळ रेषारूपाने लिहिल्यावर १५४ हा अशोकलिपि 'न' होतो.

आ. १५५ येथें १५० लिहून उजवीकडे व डावीकडे कांहीं भाग टिंबांनी दाखविला आहे. व देवनागरी प्रमाणे डोक्यावर आडवी रेष दिली आहे. १५६ मध्यें उजवीकडील वरचे अर्धवृत्त थोडे खाली सरकाविले आहे व वरची दोन अर्धवृत्ते जोडणारीं तिरकी रेषा संक्षिप्त केली आहे. १५६ मधील वरच्या दोन रेषा डावीकडील वरचे अर्ध वृत्त व पूर्वोक्त तिरकी रेषा सरळ उभ्या लिहिल्यावर आणि टिंबांनी दाखविलेल्या भागाचा लोप केल्यावर १५७ होते. १५७ मध्ये अधिक करावयाचा भाग टिंबांनी दाखविला आहे. तो करून सलगपणे लिहिल्यावर १५८ हा तामिळ 'न' होतो. हा न संस्कृताप्रमाणेच उच्चारण असणारा आहे. तामिळ भाषेतील खास उपयोगासाठी असणारा ऩ चित्र विभागात दाखविलेला अपूर्व उच्चारण असणारा, आणखी एक न आहे. तो केवळ तामिळ करितां असल्याने, तो वर्णोद्धारतन्त्र सांगत नाही.

अथवा–१५२ ते १५८ येथें दाखविल्याप्रमाणे तामिळ 'न' (१५८) देवनागरीं 'न' (१५२) पासून घृष्टलेखनाने बनणें शक्य आहे.

१६०, १६१, १६२, १६३, १६४
१६५, १६६, १६७, १६८, १६९, १७०, १७१

### अशोक तामिळ प

आ. १६२ मध्यें 'प' चा मौलिक उद्भव दाखविला आहे १६३ मध्यें उपेक्षितांश सोडून देवनागरी प दाखविला आहे. १६१ मधील उभ्या रेषेचा उजवीकडील खालचा अर्धा भाग घेऊन १६० हा अशोकलिपि प होतो. १६३ चा १६५ मध्यें टिंबांनी दाखविलेला भाग सोडून दिल्यावर १६६ होते. १६६ ला सरळरेषारूपाने लिहिल्यावर १६७ हा तामिळ प होतो.

### अशोकलिपि फ

आ. १७२ मध्ये देवनागरी फ चा मौलिकोद्भव व १७१ देवनागरी फ दाखविला आहे आ. १६८ व १६९ अशोकलिपि फ आहेत. अशोकलिपि प लिहून उजव्या टोकाला एक कुण्डल जोडल्यावर अशोकलिपि फ होतो.

तामिळमध्यें फ, ब, भ नाहीत.

१७२, १७३, १७४, १७५, १७६

### अशोकलिपि ब

आ. १७२ मध्यें देवनागरी ब चा मौलिक उद्भव दाखविला आहे. आ. १७२ मधील डावीकडील वरचें अर्धवृत्त सोडून १७४ होते. १७४ मधील वरचे एक अर्धवृत्त देखील व मध्यमात्रा सोडून दिल्यावर आ. १७५ व १७६ हे अशोकलिपि ब होतात. मध्यमात्रा वरच्या रेषेशी एकरूप झाली असेही म्हणता येईल आ. १७४ मौलिकोद्भूत ब आहे; त्यांत दक्षार्धवृत्तें वक्रच लिहिलीं आहेत.

१७७, १७८, १७९, १८०

### अशोकलिपि भ

आ. १७७ मध्यें दाखविलेला देवनागरी भ चा प्रकार पूर्वी विस्ताराने वर्णिलेला आहे. त्यातील डावीकडील डोकें व मान वगळून उरलेला भाग १७८ मध्यें दाखविला आहे, हांच अशोकलिपि 'भ' आहे. आ. १७९ मध्यें म चा पूर्व वर्णित आणखी एक प्रकार लिहिला आहे. त्यामधील डावीकडील डोकें व मान वगळून उरलेला भाग १८० येथें दाखविला आहे. हा ही अशोकलिपि भ आहे.

१८१, १८२, १८३, १८४, १८५, १८६
१८७, १८८, १८९, १९०, १९१, १९२

### अशोक तामिळ म

आ. १८५ मध्यें देवनागरी म चा मौलिकोद्भव दाखविला आहे. १८६, १८७, १८८ हे सर्व देवनागरी म चे वेगवेगळे लेखन-प्रकार आहेत. १८९ हा प्रकार १९२ मधील लेखनक्रमानुसार आहे. १८९ मधील १९० येथें टिंबांनीं दाखविलेला भाग वगळल्यावर भाग १९१ हा तामिळ 'म' होतो. १८४ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर बरोबर उभा करून १८३ हा अशोकलिपि म होतो १८१, १८२ वगैरे सर्व १८३ चेंच घृष्टलेखन आहे. १८४ तील उक्त भागाचा लोप केल्यावर मधली आडवी रेषा संक्षिप्त केली आहे, व डाव्या खालच्या अर्धवृत्ताचे आंतली रेषा अधिक वक्र व लांबवर लिहिली आहे.

१९३, १९४, १९५, १९६, १९७, १९८, १९९, २००

### अशोक-तामिळ य

आ. १९३ मध्यें य चा मौलिकउद्भव दाखविला आहे. १९४ मध्यें १९३ मधील डावींकडील वरचा अर्धवृत्तभाग सोडून दिला आहे आणि उजवीकडील दोन वृत्तार्धांनीं बनणारी मात्रा सरळ रेषारूपाने लिहिली आहे. १९४ हाच देवनागरी य आहे. १९४ चा १९५ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून देऊन आणि अर्धवृत्ताकार लिहून आ. १९६ बनते. १९६ मध्यें डावीकडील वरचें अर्धवृत्त व योजक रेषाभाग आंतल्या बाजूस आणि डावीकडील खालचे अर्धवृत्त आणि मात्रारेषेस जोडणारी रेषा व मात्रेचा वरचा भाग आहेत याप्रमाणे वृत्ताकार बनला आहे. १९६ मधील उजवीकडील रेषा संक्षिप्त करून ऊर्वरित रेषा चन्द्रकोरीप्रमाणे मांडून आ. १९७ होते. १९७ चे अंत र्भागांतील उजवीकडील रेषा सरळ उभी लिहिल्यावर आ. १९८ होते. १९८ च्या वामभागांतील सन्निधरेषा एकरूप केल्यावर १९९ होते. हाच अशोकलिपि य आहे. कोठें कोठें तो असाही लिहिलेला आढळतो. त्यामध्यें १९३ मधील डावीकडील वरचे अर्धवृत्त रेषारूपाने जोडून घेतलें आहे. आ. १९९ कोणयुक्त लिहिल्यावर आणि वक्ररेषा सरळ केल्यावर २०० हा तामिळ 'य' बनतो. तामिळ मध्ये मधली रेषा डावीकडील उभ्या रेषेच्या जवळ आणि उजवीकडील उभी रेषा मधल्या रेषेपासून याप्रमाणें लांब लिहिणें मान्य केलें गेलें आहे. याचेही इत्यादि अनेक घृष्टलेखन प्रकार बुद्धि अनन्त आहे, घृष्ट लेखन अनन्त आहे. येथें दिग्दर्शन मात्र यथाशक्य करण्याचा यत्न आहे.

२०१, २०२, २०३, २०४, २०५, २०६'
२०७. २०८, २०९, २१०, २११. मल्याळम् 'र'

### अशोक–तामिळ र

देवनागरी र बनविण्यासाठीं बिंदुस्फोटनांतील चली अर्धवृत्ताना एकाखालीं एक याप्रमाणे ठेवावे लागतें २०१ मध्यें दाखविल्यानुसार टिंबांनीं दाखविलेल्या मार्गाने ही अर्धवृत्तें जोडल्यावर सापाचा आकार होतो. हा सापाचा आकार म्हणजेंच अशोकलिपींतील 'र' आहे २०२ मध्यें दाखविल्यानुसार वरची तीन व खालचें एक अशी अर्धवृत्तें बिन्दुस्फोटनांतून घेऊन पूर्वी वर्णिल्यानुसार जोडल्यावर देवनागरी 'र' होतो. २०२ हाच देवनागरी र आहे आ. २०३ ते २०८ मध्यें अशोकलिपि र च्या घृष्टलेखनाचें वेगवेगळें प्रकार दाखविले आहेत. हे सर्व शिलालेखांतून मिळतात. आ. २०९ मध्ये देवनागरी र डावीकडे आडवा पाडून भूमिसमांतर लिहिला आहे. आ. २१० मध्ये त्याचे उजवीकडील शेपटाचा भाग काढून टाकला आहे. आ. २१० मधील सर्व रेषा कोणयुक्त लिहिल्यावर खालीलप्रमाणें आ. २११ बनते, तोच तामिळ लोकलिपि र आहे.

आ. २१० गोल लिहिल्यावर 'मल्लयाळम्' 'र' आहे

२१२, २१३, २१४, २१५, २१६ २१७
२१८, २१९, २२०, २२१, २२२

### अशोक–तामिळ ल

आ. २१२ मध्यें देवनागरी ल चा मौलिक उग्दव आणि २१३ व २१४ मध्यें पूर्ववर्णित देवनागरी ल दाखविला आहे २१४ चा २१५ यथें टिंबांनी दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आणि २१६ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग जोडून घेतल्यावर २१७ हा तामिळ ल होतों २१६ मधील शेवटचे अर्धवृत्त सरळरेषारूपाने लिहिल्यावर आ. २१८ होते. आ. २१८ चा २१९ येथे टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आ. २२० हा अशोकलिपि ल होतो. २२१, २२२ हे अशोकलिपि ल चेंच घृष्टलिखित प्रकार आहेत.

२२३, २२४, २२५, २२६, २२७
२२८, २२९, २३०, २३१, २३२

### अशोक–तामिळ व

आ. २२३ मध्ये देवनागरी व चा मौलिक उग्दव दाखविला आहे २२४ मध्ये २२३ मधील डावीकडील वरचें एक अर्धवृत्त सोडून देऊन उजवीकडील दोन अर्धवृत्तांनी बनणारी मात्रा सरळ रेषेंत लिहिली आहे. हा देवनागरी व आहे २२५ मध्यें २२३ मधील डावीकडील वरचे अर्धवृत्त सोडून उरलेला भाग लिहिला आहे. २२५ मधील खालच्याचार रेषा वर्तुळाकार करून वरची तशीच लिहून २२६ ची वरची रेषा मध्यभागी सरळ लिहिल्यावर २२७ अशोकलिपि व होतो. आ. २२८ मध्ये देवनागरी व शिरोरेषेसह लिहिला आहे. २२८ मधील सोडून द्यावयाचा भाग २२९ मध्यें टिंबांनीं दाखविला आहे. तो सोडल्यावर आ. २३० होते. २३० मध्ये उजवीकडे वळवून भूमिसमांतर आडवी पाडल्यावर २३१ होते. २३१ मध्यें टिंबांनीं दाखविलेला कुण्डल भाग अधिक जोडल्यावर आ, २३२ हा तामिळ व होते.

आता तामिळ लोकलिपितील व्यञ्जनांपैकी ळ एवढेंच पूर्णाक्षर शिल्लक आहे, तीन अपूर्णाक्षरें ऴ, ऩ, ऱ एवढीच शिल्लक आहोत. श, ष, स, ह तामिळ लोकलिपींत नाहींत, त्यांचे करितां प्रायः च वापरला जातो. अपूर्णाक्षरे केवळ तामिळ भाषेकरितांच उपयुक्त असल्याने त्यांचा विचार येथें करीत नाहीं. श, ष, स, ह यांचा केवळ अशोक लिपीत विचार होईल.

२३३, २३४, २३५, २३६
२३७, २३८, २३९, २४०

### अशोकलिपि श

आ. २३३ मध्यें श चा मौलिक उद्भव दाखविला आहे. २३४ मध्यें अशोक लिपिसाठी २३३ मधील सोडून द्यावयाचा भाग टिंबांनी दाखविला आहे. तो सोडविल्यावर २३५ होते. हा अशोकलिपि श आहे, २३६ ते २४० याच श चे घृष्टलेखन आहे.

२४१, २४२, २४३

### अशोकलिपि ष

देवनागरी ष करण्याकरिता प लिहून त्यामध्यें एक मध्यमात्रा देण्यास वर्णोद्धारतन्त्रात सांगितले आहें. अशोक लिपितही त्याचप्रमाणें अशोकलिपि प लिहून त्या मध्यें मध्यमात्रा लिहून अशोकलिपि ष बनतो, तोच आ. २४२ व २४३ मध्यें दाखविला आहे. आ. २४१ देवनागरी ष आहे.

२४४, २४५, २४६, २४७, २४८, २४९

### अशोकलिपि स

आ. २४४ ते २४६ मध्ये पूर्णवर्णित व निरूपीत देवनागरी स दाखविला आहे. २४६ डावींकडे फिरवून भूमिसमांतर आडवा पाडल्यावर २४७ होते. २४७ चा २४८ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर २४९ हा अशोकलिपि स होतो.

२५०, २५१, २५२, २५३, २५४, २५५
२५६, २५७, २५८, २५९, २६०

### अशोक लिपि ह

वरील आकृतींत देवनागरी व अशोकलिपि ह काराचीं प्रक्रिया दाखविली आहे. त्याचा विस्तार पूर्वी प्रथम प्रकरणांत झाला आहे. २५० मौलिकोद्भव, २५१–२५३ देवनागरी ह प्रक्रिया, २५४–२५५ अशोकलिपि ह प्रक्रिया, २५६–२५९ अशोकलिपि ह चे घृष्टलिखित प्रकार व २६० देवनागरी ह चा घृष्टलिखित प्रकार आहे.

२६१, २६२, २६३, २६४, २६५, २६६, २६७
२६८, २६९, २७०, २७१, २७२, २७३,

### अशोक तामिळ ळ

आ. २६६ देवनागरी ल आहे. त्यापासून मागे वर्णिल्यानुसार २६७ हा देवनागरी ळ बनण्यासाठी २६६ ची दोन भागात आ. २३५ मध्ये दाखविल्याप्रमाणें विभागणी केली आहे. त्या पासून उजवा भाग कोणयुक्त करून २६४, २६३ होऊन तदनंतर दोन्ही भाग सारख्या आकाराचे करून जोडून लिहिल्यावर २६२ होते. २६२ घडळयाचे काटयाचे विरुद्ध दिशेनें फिरवून उभी केल्यावर २६१ हा अशोकलिपि 'ळ' होतो. (मद्रास गव्हर्मेंट म्युझियम बुलेटिन मध्यें दिल्याप्रमाणे) २६७ चा २६८ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर २६९ होते. २६९ दोन भागांत विभागल्यावर २७० होते. २७० मधील उजवीकडील भाग कोणयुक्त लिहिल्यावर २७१ होते. २७१ मध्यें २७२ येथें टिंबांनी दाखविलेला भाग वाढवून सलग लिहिले असता आ. २७३ हा तामिळ लोकलिपि ळ होतो.

या प्रमाणें देवनागरी, अशोकलिपि व तामिळ लोकलिपि व्यञ्जनांचा परस्पर संबंध आहे.

(सर्वत्र अशोकलिपि म्हणून अशोकाचे गिरनार येथील शिलालेखातील लिपि व दक्षिणात्य लिपींकरितां मद्रास गव्हर्मेंट म्युझियम बुलेटिन आधारभूत धरलें आहे.)

---

# देवनागरीशीं मल्याळम् आणि तामिळ ग्रंथलिपिचा संबंध

## —स्वर—

१, २, ३, ४, ५
६, ७, ८, ९,

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् अ

आ. ४ देवनागरी अ आहे. ३ मध्यें त्याचें घृष्टलेखन दाखविलें आहे, ३ मध्यें २ येथे टिंबांनीं दाखविलेला रेषा भाग वाढविला असतां १ हा मल्ल्याळम् अ होतो. ५ मध्ये ४ या देवनागरी अ चें घृष्टलेखन दाखविले आहे. ५ मध्ये ६ येथें टिंबांनीं दाखविलेला रेषा भाग वाढविला असता ७ हा तामिळ ग्रंथलिपि अ आहे. ६ व ७ मध्यें खालच्या बाजूला डावीकडे एक कमानदार कुञ्चन आहे. परंतु कोणीं कोणीं हे कमानदार कुञ्चन सोडूनही लिहितात म्हणून आ. ८ मध्ये कुञ्चन वगळून ५ मध्ये टिंबांनीं वाढवावयाचा भाग दाखविला आहे. तो वाढविल्यावर ९ तामिळ ग्रंथलिपि अ होतो.

१०, ११, १२

### आकार मात्रा विचार

आ. ११ पूर्ववर्णित देवनागरी आ आहे. तो अ ला आकार मात्रा देऊन होतो. आ. १० मल्ल्याळम् आ आहे. १२ तामिळ ग्रंथलिपि आ आहे. या दोहोंमध्यें त्या त्या लिपींतील अ लिहून आणखी कांही रेषाभाग जोडला आहे तामिळ ग्रंथलिपींतया रेषाभागांतील खालची रेषा भागांतील खालची रेषा लांब आडवी आणली आहे, तर मल्ल्याळम् मध्यें ती संक्षिप्त आहे. मल्ल्याळम् मध्ये ती तशीच लिहितात. तामिळ व मल्ल्याळम् मध्ये आकार मात्रा अशोकपक्ष–नागरीपक्ष व स्वपक्ष यांच्या समूच्चयानें होते.

१३, १४, १५, १६, १७, १८

### ग्रन्थलिपि मल्ल्याळम् इ

आ. १३ देवनागरी ऱ्हस्व इ आहे. १४ मध्यें तोच इ घड्याळाचे कांट्याचे विरुद्ध दिशेने फिरवून भूमिसमांतर आडवा केला आहे. १४ मधील मध्यभागाचें अस्पृष्टवा कुञ्चन १५ मध्यें स्पृष्टवा केलें आहे. १५ मधील उजवीकडील स्पृष्टा कुञ्चन १६ मध्यें अस्पृष्टा केलें आहे, १६ ला सुरुवातीस १७ येथें टिंबांनीं दाखविल्याप्रमाणे रेषाभाग वळवून घेतल्यावर आणि उजवीकडील अस्पृष्टा कुञ्चन वाढवून लिहिल्यावर १८ हा एकाच प्रकारचा असणारा मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि इ होतो.

१९, २०, २१, २२, २३

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् ई
### ईकार मात्रा विचार

आ १९ मल्ल्याळम् ई आहे. २० देवनागरी दीर्घ ई आहे. देवनागरी ई मध्य इ लिहून त्यावर ईकारमात्रा दिली जाते. त्याचप्रमाणें मल्ल्याळम् मध्येंही त्यांचा इ लिहून त्याचे उजवीकडे १९ मेथें दाखविल्याप्रमाणें ईकार मात्रा लिहिली जाते. मल्ल्याळम् मध्यें बाराखडी लिहितांना मात्र अशी ईकारमात्रा वापरतात, स्वरांत मात्र दाखविल्याप्रमाणेंच लिहिले जाते. या जास्तीचें मात्रेंतच बिन्दुद्वय अर्न्तनिहित

आहेत असें समजावें आ. २१ मध्यें तामिळ ग्रंथलिपि इ मध्यें छित्वा कुञ्चनसहित लिहून पूर्वी सांगितल्यानुसार " बीजं बिन्दुद्वयारूढं --- महाकामकला " या वचनानुसार दोन बिन्दु वाढविले आहेत. त्यामध्यें मध्यभाराचे कुञ्चन छित्वा कुञ्चन करून घेतलें आहे. त्यानंतर २१ मधून २२ चा आहे तेवढाच अंश घेऊन २२ बनविली आहे. डावीकडील कुण्डलभाग उलगडून घेतला आहे. येथें दोन बिंदु आहेत तसेच बाहेर राहिले आहेत. कारण २१ पासून २२ मध्यें घेतलेला भाग सरळच आहे आणि तामिळ लोकलिपि प्रमाणें एकाबाजूस झुकलेला नाहीं. लोकलिपींत असा झुकलेला भाग सरळ लिहीत असतां एक बिन्दु आंत व दुसरा बाहेर असें होत आहे. तामिळ ग्रंथलिपींत दोन बिन्दु बाहेरच आहेत.

२४, २५. २६

### ग्रंथलिपि–मल्ल्याळम् उ–ऊ

आ. २४ मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपी मधील एकाच प्रकारचा असणारा उ आहे. याचा देवनागरीशीं संबंध पूर्वी तामिळ लोक-

लिपीचा विचार करतांना विस्ताराने सांगितला आहे. आ. २५ मध्यें मल्याळम् ऊ दाखविला आहे त्यामध्यें त्यांचा उ लिहून पुढें दीर्घ ऊकारमात्रा उजवीकडे लिहिली आहे. ही मात्रा ई व ऊ मध्यें सारखीच आहे. तामिळ ग्रंथलिपीत उ तसाच असला तरी ऊकारमात्रेचें वळण तामिळ लोकलिपिप्रमाणें आहे.

ऋ, ॠ, ऌ, ॡ यांचा विस्तार स्वतंत्र प्रकरणांत केला आहे.

२७, २८, २९, ३०, ३१

३२, ३३, ३४, ३५, ३६

### ग्रंथलिपि मल्याळम् ए

आ. २७ देवनागरी ए आहे. २८ मध्यें २७ चे दोन्ही बाजूस जोडावयाच्या जास्तीच्या रेषा टिंबांनीं दाखविल्या आहेत. त्या जोडल्यावर होणाऱ्या २९ मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग वाढविल्यावर आ. ३० हा मल्याळम् ए होतो हा दीर्घ ए आहे म्हणून उजवीकडे दोन अर्धकुण्डले आहेत. आ. ३१ मध्यें दाखविल्यानुसार एकच अर्धकुण्डल दिल्यावर मल्याळम् ह्रस्व ए होतो. आ. ३० चा ३२ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर ३३ होते. ३३ मधील उजवीकडील दोन अर्धकुण्डलें घड्याळाचे काटयाचे विरूद्ध दिशेने फिरवून भूमिसमांतर केल्यावर ३४ होते. ३४ मध्य ३५ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग रेषा वळवून करून घेतला असतां आणि उजवीकडील शेवटचें कुण्डल कोणयुक्त लिहिलें असतां जोडून लिहिल्यावर आ. ३६ हा तामिळ ग्रंथलिपि ए होतो. तामिळ ग्रंथलिपिचा वापर केवळ संस्कृत लेखनासाठीच होत असल्यानें तिच्यात ह्रस्व ए नाही. देवनागरीमधील एकाराचा मोठा भाग वगळून तामिळ ग्रंथलिपि एकार केला असला तरी आ. ३५ व ३६ मध्यें शेवटी देवनागरी एकार तामिळ ए च्या रूपाने येतच आहे. हा शेवटचा भाग दोन मात्रांचा असल्यामुळें हा दीर्घ ए आहे. मल्याळम् एकार लिहितांना डोक्यावरची आडवी रेषा ३ या प्रमाणें वर्तुळाकार लिहिली तरी चालते. घृष्टलेखनानें असें होतें. बुद्धिअनन्त आहे. घृष्टलेखनही अनन्त आहे, येथें दिग्दर्शन मात्र आहे.

३७, ३८, ३९

### ग्रंथलिपि मल्याळम् ऐ

आ. ३७ मध्यें देवनागरी ऐ, ३८ मध्यें मल्याळम् ऐ व ३९ मध्यें तामिळ ग्रंथलिपि ऐ दाखविला आहे. देवनागरीत एकाराचे डोक्यावर मात्रा देऊन ऐ होतो. हीच देवनागरी मात्रा अशी कुण्डलाकार करून मल्याळम् ऐकारांत ए लिहून त्याच्या डावीकडे लिहितात, व तामिळ ग्रंथलिपि ऐ कारांत त्यांचा ए लिहून त्यांच्याही डावीकडेच लिहितात. देपनागरींत ऐकारान्त व्यञ्जन लिहितांना ऐ च्या दोन मात्रा असतात, यानुसारच ए = २ ए मध्ये डावींकडील मात्रा सिद्ध होते. कारण यात एकाच मात्रेनें ऐ बनतो. येथें ह्रस्व ए पासून ऐ मल्याळम् मध्ये बनवितात. ग्रंथलिपींत ह्रस्व ए नसल्याने प्रश्नच उद्भवत नाही, तामिळ ग्रंथलिपि व मल्याळम् बाराखडींत ऐकारान्त व्यञ्जन लिहितांना, यामुळेंच ൭൭ अशा दोन मात्रा त्यामध्यें दिसतात उदा.

तामिळ ग्रंथलिपि – 'क' 'कै' = (चिह्न विभागात पहा)
मल्याळम् — 'क' 'कै' =

४०, ४१, ४२, ४३, ४४, ४५

४६' ४७, ४७ (क) ४७ (ख) ४७ (घ)

### ग्रंथलिपि मल्याळम् ओ

आ. ४० मध्यें गजाकार ओकाराचा मौलिक उद्भव दाखविला आहे. ४१ तामिळ लोकलिपि ओ आहे. याचा विचार पूर्वीच झालाच आहे. आ. ४२ तामिळ ग्रंथलिपि ओ आहे. तो तामिळ लोकलिपि ओ मधील उजवीकडील खालचा सोंडेचा वळलेला भाग सरळ उलगडून रेषांरूपाने लिहिल्यावर बनतो. आ. ४३ मध्यें तामिळ ओ पुन्हां लिहिला आहे. त्यापैकीं आ. ४४ मध्यें तीन रेषानी बनणारा भाग सर्व रेषा एकत्र मिळवून लिहून आ. ४५ होते. तीच सलग लिहूग आ, ४६ हा मल्याळम् ह्रस्व ओ होतो, त्याचेपुढे मल्याळम् दीर्घ ओकार मात्रा जोडल्यावर आ. ४७ हा मल्याळम् दीर्घ ओ होतो. अथवा आणखी एका प्रकाराने मल्याळम् ओ बनू शकतो, यांत लाघव आहे, ही प्रक्रिया खालील प्रमाणे,

1, 2, 3, 4

आ, 1 पूर्ववर्णित तामिळ ओ प्रक्रियेंतील आहे आ, 2 मध्यें 1 चा सोंडेचा भाग कोणयुक्त लिहिला आहे, आ, 3 मध्ये तो तामिळ प्रमाणे लटकता खाली सोडला आहे. त्यांतील कुञ्चनाशी कुञ्चन एकरूप करून सलग लिहिल्यावर आ 4 हा मल्याळम् ओ होतो.

### मल्ल्याळम् अकारमात्रा

आ. ४७ (क) मध्ये तामिळ आकार मात्रा दाखविली आहे त्यांचें वर्णन पुर्वी झालें आहे. ४७ (क) मधील काही भाग कमी केल्यावर ४७ (ख) होते. त्यापासून ४७ (घ) हे मल्ल्याळम् दीर्घ आ चे, बाराखडींत उपयुक्त असणारें मात्रा स्वरूप होते. हेंच स्वरूप दीर्घाचा संकेत करण्यासाठी मल्ल्याळम् ह्रस्व ओचें पुढें लिहिलें जातें.

४८, ४९, ५०, ५१, ५२, ५३, ५४

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् औ

आ ४९ देवनागरी औ आहे. ४८ मल्ल्याळम् औ आहे. त्यामध्यें मल्ल्याळम् ओ लिहून पुढें मात्रा लिहिली जाते. ही मात्रा आ. ५० ५१ मध्यें दाखविल्याप्रमाणें देवनागरीं औकार मात्रे पासून बनते.

### ग्रन्थलिपि मल्ल्याळम् औकारमात्रेचा विशेष विचार

येथें असा प्रश्न उभ्दवतो कीं येथें दाखविल्या पैंकी चित्रात दाखविलेली औकार मात्रा; ४७ (घ) खाली दाखविल्याप्रमाणे दोनवेळा घेऊन असा मात्रा रेषाकार औकारांत कां बनवू नये ?

असें न करण्याचे कारण औकारमात्रेप्रमाणेंच असणारी अशी मात्रा मल्ल्याळम् ई, ऊ मध्यें दीर्घत्वद्योतक म्हणून आली आहे. त्याठिकाणी आ. ५०–५१ मध्यें दाखविलेंल्या रीतीनें अशी मात्रा बनविणें, ही ौ औकारमात्रा असल्याने न्याय्य ठरणार नाही. म्हणून औकारमात्रा म्हणून येणारा असा रेषाधार ५०–५१ मधींल प्रक्रियेने आणि ई, ऊ मध्यें दीर्घत्वद्योतक म्हणून येणारा तोच रेषाकार ४७ (घ) येथें दाखविलेली दीर्घमात्रा दोन वेळा घेऊन खालील प्रक्रियेने बनविणेंच योग्य आहे.

1, 2, 3, 4

असें केले म्हणजे आकृति एक असूनही विसंगति होणार नाही.

यावर ही असा प्रश्न उद्भवतो कीं ऊ व ई करितां एकाच प्रकारानें निष्पादित होणारा आकार तामिळ ग्रंथलिपि व मल्ल्याळम् मध्यें वापरावा लागतो, तें कितपत योग्य आहे ? या करितां असें म्हणतां येईल कीं पूर्वी तामिळ लोकलिपींत दाखविल्याप्रमाणें नागरी ऊकारमात्रेपासून होणारी अशी मात्रा ग्रंथलिपि ऊ मध्यें दीर्घत्वद्योतक म्हणून वापरली जाते व ई मध्यें खालीं दाखविल्याप्रमाणें दोन आकार मात्रांपासून बनणारे असेच रेषास्वरूप दीर्घत्वद्योतक म्हणुन वापरले जातें. मल्ल्याळम् मध्ये वर 1, 2, 3, 4, येथें दाखविल्याप्रमाणें होणारा असा रेषाकार ई मध्यें दीर्घत्वद्योतक म्हणून आणि ग्रंथलिपि ऊ मधील ৯ याचे घृष्टलेखनानें ऊ करितां असा रेषाकार बनतो. याप्रमाणें पूर्वनिरूपित, "प्रधानेसम्प्रत्यय" यावच्छक्य साधतां येतो. विद्वान लोकांनी आणखी कोणती पद्धत योग्य असल्यास कृपाळूपणें त्या विषयीं बोधन करावें.

आ. ५४ तामिळ ग्रंथलिपि औ आहे, तो तामिळ लोकलिपि औ पासून बनवितां येतो. आ, ५२ तामिळ दीर्घ ओ व ५२ ऱ्हस्व ओ हे पूर्ववर्णित आहेत. आ. ५३ च्या सोंडेच्या भागास सरळरेषारूपनें लिहिल्यास आ. ५४ होते. त्याचे उजवीकडे औकार मात्रा लिहिली आहे. यामध्यें ौ या मधील उभी रेषा जशीच्या तशी ठेवली आहे. ग्रंथलिपि ऊ तही अशीच आकृति असणारी मात्रा असते, ती तेथील दीर्घ मात्राद्वय घेऊन करावी– या दोन्हीं प्रक्रिया खालील प्रमाणें—

( औकारांत ) ( ऊकारांत ) (चित्रविभाग पहावा)

५५, ५६, ५७, ५८, ५९, ६०

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– अं-अः

आ ५७ मध्ये देवनागरी अं आहे, तो देवनागरी अ चे डोक्यावर एक बिन्दु देऊन होतो आ. ५८ हा देवनागरी अः आहे तो देवनागरी अ चे उजवीकडे खालीं एक, वर एक असे दोन बिन्दु देऊन बनतो, आ. ५५ मल्ल्याळम् अं आहे, तो मल्ल्याळम् अ चे उजव्या बाजूस एक बिन्दु देऊन बनतो. आ. ५६ मल्ल्याळम् अः आहे तो मल्ल्याळम् अचे उजवीकडे खाली एक, वर एक असे दोन बिन्दु देऊन बनतो, आ. ५९ तामिळ ग्रंथलिपि अं आहे, तो त्यांचे अचे उजवीकडे एक बिन्दु देऊन बनतो. आ. ६० तामिळ ग्रंथलिपि अः आहे तो त्यांचे अ चे उजवीकडे खालीं एक, वर एक असे दोन बिंदु देऊन बनतो, इतर सर्व स्वर आणि व्यञ्जनें याचप्रमाणें उपलक्षणानें इं, इः, कं, कः वगैरे समजावींत,

---

प्रकरण ६ वे

# देवनागरीशी मल्लयाळम् आणि तामिळ ग्रंथलिपीचा संबंध

## व्यंजने

६१, ६२, ६३, ६४, ६५, ६६
६७, ६८, ६९, ७०

### ग्रन्थलिपि–मल्ल्याळम् 'क'

आ. ६१ चे डावीकडील आकृतीमध्यें मल्ल्याळम् क मध्ये अन्तर्निहित असणाऱ्या देवनागरी क चा मौलिक उद्भव दाखविला आहे. येथे मध्यभागच्या क्रूसाची दांडी लांब घेतली आहे. मल्ल्याळम् क याप्रमाणें बिन्दुस्फोटनासह असणाऱ्या देवनागरी क ला घेऊन बनतो. आ. ६७ मध्ये दाखविल्यानुसार क्रूसाची दांडी आखूड घेतल्यास बिन्दुस्फोटनांतील डावीकडील अर्धवृत्तास टिंबांनी दाखविलेल्या वक्राकार रेषेने सहज मिळवून घेता येते. आ. ६१ मध्यें तसें मिळवून घेता येत नसल्याने वामार्धवृत्तास मधली रेषा वाढवून बिन्दुदर्शित मार्गानें मिळवावी लागते. हा सर्व प्रकार आ. ६१ मध्ये टिंबांनी दाखविला आहे. असे केल्यासच डावीकडे खालीं कमानदार भाग येऊ शकतो. आ. ६७ मध्ये तामिळ लोकलिपि क दाखविला आहे, तो बिन्दुस्फोटनासह आखूड दांडीचा क्रूस असणारा देवनागरी क घेऊन बनतो. आ. ६३ हा मल्ल्याळम् क आणि ६४ तामिळ ग्रंथलिपि क बिन्दुस्फोटनासह लांब दांडीचा क्रूस असणारा देवनागरी क घेऊन बनतो. आ. ६१ मधील डावीकडील वृत्तार्ध, टिंबांनी दाखविलेला रेषाभाग, मधली रेषा आणि उजवीकडील वृत्तार्ध सारख्या पातळीवर आणून, उजवीकडील वरचे अर्धवृत्त सोडून दिल्यावर आ. ६२ बनते. आ. ६२ मध्ये टिंबांनी दाखविलेल्या मार्गानें रेषा काढल्यावर आ. ६३ हा मल्ल्याळम् क होतो. तामिळ ग्रंथलिपि क ६४ व आकृति ६३ मल्ल्याळम् क या मध्ये फरक एवढाच आहे की मल्ल्याळम् क ची वरची रेषा वक्राकार आहे तर ग्रंथलिपीची कोणयुक्त आहे. आ. ६५ मध्ये टिंबांनी दाखविल्याप्रमाणे रेषाभाग करून वरची डाव्या बाजूची रेषा वेगळ्या प्रकाराने लिहून ६६ हा मल्ल्याळम् 'छापखाना टाईप' क होतो. आ. ६९ व ७० हे मल्ल्याळम् क चे हस्तलिखितात मिळून येणारे घृष्टलेखन प्रकार आहेत.

७१, ७२, ७३, ७४, ७५, ७६,
७७, ७८, ७९, ८०, ८१

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ख'

आ. ७१ मध्ये देवनागरी ख दाखविला आहे. आ. ७१ मधील उजवीकडील व डावीकडील खालच्या दोन रेषा सोडून दिल्यांवर ७२ होते. ७२ मधील वरची आणि उजवीकडील रेषा आहे त्याचक्रमाने घड्याळाचे काट्याचे दिशेने फिरवून आ. ७३ होते. यामधील डावीकडील भाग व फिरवून आणलेला भाग ७४ मध्ये गांठ देऊन जोडन घेतला आहे. आ. ७५ मध्यें डावीकडील रेषेस एक कुण्डल जोडून किंचित डावीकडे झुकविली आहे व गांठ लहान केली आहे. आ. ७६ मध्ये गांठ केवळ रेषा संधि इतकीच ठेवून डावीकडील कुण्डलधारी रेषा अक्षराचे थेट तळापर्यंत झुकवून लिहिली आहे. आ. ७६ हा मल्ल्याळम् ख आहे. तामिळ ग्रंथालिपि ख असाच आहे. पण त्या मधें डावीकडील भाग लांबोडा लिहिला जातो. तो आ. ७६ मध्यें दाखविला आहे. आ. ८० हा ही मल्ल्याळम् ख आ. ७६ येथें दाखविलेलाच आहे. तो देवनागरी पासून खालील प्रमाणें दुसऱ्याही एका प्रक्रियेनें बनू शकतो. आ. ७७ मध्यें देवनागरी ख मधील डावीकडील खालची रेषा उजवीकडे व उजवीकडील डावीकडे कलती लिहिली आहे, तसेच मात्रा रेषेचे डावीकडील गोलाकार भाग कोषयुक्त असा दोन रेषांनी लिहिला आहे. या प्रमाणे चार रेषा होतात. आ. ७८ मध्ये त्या जवळ जवळ लिहिल्या आहेत. आ. ७९ मध्यें त्या एकमेकात मिसळून देऊन एकच आडवी रेषा लिहिलीआहे. ७९ ला डावीकडे एक कुंडल जोडून अक्षराचे तळापर्यंत झुकवून लिहिल्यावर आ. ८० हा मल्ल्याळम् ख व त्या पासुन पूर्वी सांगितल्याप्रमाणे आ. ८१ हा तामिळ ग्रंथलिपि ख होतो. ग्रंथलिपींत प्रक्रिया तीच आहे. केवळ लिहिण्याचें वळणांत बदल आहे.

८२, ८३, ८४, ८५, ८६, ८७, ८८, ८९

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ग'

आ. ८२ मध्ये बिन्दुस्फोटनापासून येणारा ग खालचा अर्धभाग घेऊन सर्व वक्ररेषांनी बनविला आहे. आ. ८३ मध्ये मात्रा रेषा सरळ लिहिली आहे. आ. ८२ मध्यें वाढविण्याचा रेषाभाग आ. ८४ येथें टिंबांनी दाखविला आहे. त्यानुसार वाढवून बनणारा आ. ८५ हा मल्ल्याळम् ग आहे. आ. ८६ मध्यें आ. ८३ घड्याळाचे काट्याचे दिशेनें फिरवून भूमिसमांतर केली आहे. त्यानुसार होणारा आ. ८७ हा तामिळ ग्रंथलिपि ग आहे. आ. ८८ हस्तलिखित मल्ल्याळम् ग व ८९ तामिळ ग आहेत.

९०, ९१, ९२, ९३, ९४
९५, ९६, ९७, ९८

ग्रन्थलिपि मल्ल्याळम् ' घ '

आ. ९० पूर्ववर्णित आहे. ही मौलिक उद्भवापासून येते. ९० मध्यें ९१ येथें टिंबांनी दाखविल्यानुसार बिन्दुस्फोटनांतील वरचें उजवें अर्धवृत्त घेऊन तें समोरच्या डावीकडील वरच्या अर्धवृत्ताशीं नेऊन ठेवल्यावर आ. ९२ होते. ९२ मधील डावीकडील कुण्डलभाग डावीकडे झुकवून ९३ बनते. हा कुण्डलभाग अक्षराचे तळापर्यंत झुकविल्यावर ९४ बनते. ९४ चा उजवीकडील भाग कोणयुक्त लिहून कुण्डल सफाईनें लिहिल्यावर ९५ हा तामिळ ग्रंथलिपि घ होतो. ९६ मध्यें ९५ मधील मधली उभी रेषा वर नेऊन खाली उतरविताना ९५ चे पातळीपेक्षां टिंबांनी दाखविल्यानुसार खालीं ओढली आहे, व छित्वाकुंबन केले आहे. ९७ चे सुरुवातीचे कुण्डल उलगडून आणि सुरुवातीचा वक्रभाग सारख्या प्रमाणात आकुञ्चित लिहिल्यावर आ. ९८ हा मल्ल्याळम् घ होतो.

९९, १००, १०१, १०२, १०३, १०४, १०५
१०६, १०७, १०८, १०९, ११०, १११

ग्रंथलिपि मल्ल्याळम् ' ङ. '

आ. ९९ मध्ये देवनागरी ङ दाखविला आहे. आ. १०० हें ९९ चें घृष्टलेखन आहे. मोडी (मराठी) व गुजरातीत अशा प्रकाराने ङ लिहिला जातो. १०१ मध्यें आ. १०० डोक्याकडे आडवी लिहून त्या खालीं तिला समांतर आ. ९९ बिन्दु काढून टाकून लिहिली आहे. १०२ मध्यें १०१ मधील खालच्या भागांतील अस्पृष्ट्वा कुञ्चनाचें स्पृष्ट्वा कुञ्चन केलें आहे. १०३ मध्यें १०२ मधील वरचा वक्रभाग कोणयुक्त वर टोक काढून लिहिला आहे. बिन्दु काढून टाकला आहे. १०४ मध्यें १०३ मधील वरची रेषा कोन काढून टाकून स्पृष्ट्वा कुञ्चनानें सरळरेषा स्वरूपांत लिहिली आहे. १०४ घडचाळाचे काटयाचे दिशेनें फिरविल्यावर १०५ होते. १०५ मध्ये खालची रेषा सरळ करून अक्षराची खाली येणारी रेषा वेगळेपणाने त्या रेषेचे सुरुवातीस टिंबांनीं दाखविल्याप्रमाणे डावीकडे नेऊन जोडल्यावर आ. १०६ होते. १०६ मध्यें सुरुवातीस एक कुण्डल जोडल्यावर आ. १०७ हा तामिळ ग्रंथलिपि ङ होतो. याच १०७ पासून १०८, १०९, ११० मध्ये दाखविल्यानुसार १११ मल्ल्याळम् ङ होतो. या प्रमाणे असणाऱ्या प्रक्रियेत १०२ कन्नड व १०४ तेलगु ङ आहेत. वास्तविक खालील प्रमाणे थोडक्यात ग्रंथलिपि व मल्ल्याळम् ङ बनू शकतात.

११२, ११३, ११४, ११५, ११६
११७, ११८, ११९, १२०, १२१

११२ व ११३ क्रमानें मागील ९९ व १०० आहेत. ११४ मध्यें त्या दोघींना ११२ वर व ११३ खालीं याप्रमाणे दोघांची डावी बाजू उजवीकडे येईल अशा रीतीने बिन्दूचा लोप करून लिहिल्या आहेत. ११५ मध्यें ११४ चा वरचा भाग स्पृष्ट्वा कुञ्चनाने लिहून, टिंबांनी दाखविलेला भाग वाढविल्यावर ११६ होते. ११६ चे खालचे भागास कोणयुक्त लिहून ११७ होते. हा कोणयुक्त भाग स्पृष्ट्वा कुञ्चनाने एकरूप करून लिहिल्यावर ११८ होते. हा तामिळ ग्रंथलिपि ङ आहे, मागील आ. १०८ प्रमाणें ११८ पासून ११९, १२०, १२१ येथें दाखविलेल्या प्रक्रियेने १२१ हा मल्ल्याळम् ङ होतो. मागील आ. १११ प्रमाणें मागें वर्णिलेल्या प्रक्रियेंत आ. १०२ मधील बिन्दूनें ती आ. ९९ पासून बनत असल्याचें दिसून येतें. आ. १०३ पासून बिन्दु गेल्यामुळे अव्यक्त प्रक्रिया होत आहे. त्यामुळे समजावयास कठीण पडते. या दुसऱ्या प्रक्रियेत आ. ११४ नेंच बिन्दूचा लोप होतो. प्रसंगवशात कन्नड, तेलगु ङ दाखविण्यासाठीच पहिली प्रक्रिया दिली आहे. पहिल्या प्रक्रियेत ९ पायऱ्या असून दुसरीत ७ च आहेत, म्हणून दुसरी प्रक्रिया लघु आहे म्हणूनच इष्ट आहे.

1, 2, 3, 4, 5, 6

तामिळ ग्रंथलिपि ङ ची आणखी एक प्रक्रिया वरील आकृतीत दाखविली आहे. 1 मध्यें दाखविलेल्या देवनागरी ङ चे 2 मध्ये दाखविल्या प्रमाणे दोन भाग करून डावीकडील भागास घेऊन 3, 4, 5 मध्यें दाखविलेल्या प्रक्रियेने 6 हा तामिळ ग्रंथलिपि ङ बनतो. जेथे जेथे शक्य आहे तेथे तेथे तामिळ लोकलिपि व ग्रंथलिपि यामध्ये समान असणारी अक्षरे लोकलिपींतील प्रक्रिया अनुसरूनच ग्रंथलिपींत बनविणे योग्य असा काहींचा अभिप्राय येणें शक्य आहे. आमचाही असाच अभिप्राय आहे. म्हणून 2 पासून 3 करून, 4 करितांना 2 चे शिरोरेषेंतील डावीकडील भागाऐवजी उजवीकडील भाग घेतला आहे. तामिळ ग्रंथलिपि ङ पासून मल्ल्याळम् ङ. पूर्वोक्त रीतीनें बनतो. ही प्रक्रिया लघुतम असल्याने इष्ट आहे.

१२२, १२३, १२४, १२५, १२६, १२७
१२८, १२९, १३०, १३१, १३२, १३३
१३४, १३५, १३६, १३७, १३८, १३९, १४०

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् ' च '

आ. १२२ मध्ये देवनागरी च दाखविला आहे. १२२ मधील मात्रारेषा आखूड करून आ. १२३ मध्यें टिंबांनी दाखविलेल्या भागाचा लोप करून १२४ होते. १२४ चा डावीकडील भाग चोंचदार करून १२५ होते. हाच चोंचदार भाग हंसाप्रमाणे आणखी लांब केल्यावर १२६ होते. १२६ मधील खालची रेषा सरळ केल्यावर १२७ होते. ती १२८ प्रमाणे लिहिल्यावर तोच १२८ हा मल्ल्याळम् च होतो. १२८ चे डावी कडील वक्राकार रेषाभागास एक कुण्डल लावल्यावर १२९ हा तामिळ ग्रंथलिपि च होतो.

### ग्रन्थलिपि मल्ल्याळम्. 'छ'

आ. १३० मध्यें मल्ल्याळम् च ला. या प्रमाणें एक महाप्राण चिन्ह लावल्यावर तो मल्ल्याळम् छ होतो, आ. १३१ मध्यें तामिळ ग्रंथलिपि च ला त्यांचे प, फ प्रमाणें महाप्राण चिन्ह जोडून तोच तामिळ ग्रंथलिपि छ होतो. या खेरीज साक्षात् देवनागरी छ पासूनही हे दोन्हीं बनू शकतात. १३२ मध्यें देवनागरी छ दाखविला आहे. १३३ मध्यें १३२ चा वरचा कांही भाग कमी केला असून तळची रेषा सरळ केली आहे. १३३ चा डावीकडील खालचा भाग १३४ मध्यें कोणयुक्त केला आहे. त्या नंतर आ. १३५ मध्यें त्याच भागास वक्ररेषांनी बनवून आ. १३६ केली आहे. ती मध्यें १३७ मध्ये टिंबांनी दाखविलेला भाग खालच्या रेषा भागापासून करून १३८ हा मागील १३० प्रमाणें मल्ल्याळम् छ होतो. खालच्या रेषाभागास १३९ मध्यें दाखविल्यानुसार जसेंच्या तसेंच ठेवलें असता १४० हा मागील १३१ प्रमाणेंच होतो. याप्रमाणें दोन प्रक्रियांनी छ बनू शकतो.

महाप्राणचिन्ह लावून छ करण्याची प्रक्रिया गौण आहे. म्हणून दुसरी प्रक्रियाच योग्य आहे. प्रधान व गौण अशा दोहोंनी एखादया गोष्टीची सिद्धि होत असेल तर ती प्रधानानेंच करणें– ' **प्रधानाप्रधानयोः प्रधाने सम्प्रत्ययः** ' या न्यायानुसार योग्य आहे.

१४१, १४२, १४३, १४४, १४५, १४६

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ज'

आ. १४१ मध्यें देवनागरी ज चा मौलिक उद्भव दाखविला आहे. आ. १४२ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग १४१ मध्यें वाढविल्यावर १४३ होते. १४३ चें वरचें मध्यकुञ्चन लहान करून खालच्या भागाला डावीकडे कलते केल्यावर १४४ होते. १४४ चा डावीकडे कलता केलेला भाग भूमिसमांतर पुरा आडवा केल्यावर १४५ होते. १४५ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग वाढवून १४६ हा मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि ज होतो.

१४७, १४८, १४९, १५०, १५१, १५२
१५३, १५४, १५५, १५६, १५७, १५८

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'झ'

आ. १४७ मध्ये देवनागरी झ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १४७ चा १४८ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग मल्ल्याळम् झ् बनविण्यासाठीं सोडावयाचा आहे. बिंदुस्फोटनांतील उजवीकडील वरचें वृत्तार्ध अशोकाप्रमाणें या मध्येंही घेतलें आहे. या प्रमाणें उरलेला भाग १४९ मध्यें दाखविला आहे. १४९ ही क्रमानें १५० व १५१ मध्यें डावीकडें अधिकाधिक झुकवून लिहिली आहे. १५२ मध्यें सर्व भाग एका पातळींत लिहिले आहेत. १५२ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर १५३ हा मल्ल्याळम् झ होतो. तामिळ ग्रंथलिपि झ बनविण्यासाठी आ. १५१, १५४ येथें दाखविल्याप्रमाणें लिहिली. १५४ मधील भाग एका पातळीवर लिहून आणि १५४ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून १५५ होते. आ. १५५ चे सुरुवातीचे भागास कोणयुक्त लिहिल्यावर १५६ आणि १५६ सलगपणें लिहिल्यावर १५७ हा तामिळ ग्रंथलिपि झ होतो. १५८ हा हस्तलिखित तामिळ ग्रंथलिपि झ आहे.

१५९, १६०, १६१, १६२, १६३
१६४, १६५, १६६, १६७

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ञ'

आ. १५९ मध्ये देवनागरी ञ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १६० मध्यें १५९ मधील सोडून द्यावयाचा भाग टिंबांनी दाख-

विला आहे. उरलेल्या भागात १६१ येथें टिंबांनी दाखविलेला भाग जोडल्यावर आ. १६२ होते. ती एका पातळीत लिहिल्यावर आ. १६३ होते. १६३ येथें टिंबांनी दाखविलेला भाग अधिक केल्यावर आ. १६४ हा मल्याळम् ञ होतो. १६५ मध्यें १६४ तीन भागांत विभागून लिहिली आहे. १६५ चा मधला भाग वर कोणयुक्त लिहून त्याचा ऊर्वरित भाग मोठ्या आकाराच्या कुण्डलाचे स्वरूपांत लिहिला आहे आणि तिसरा भाग खालचे बाजूस फिरवून दिल्यावर १६७ हा तामिळ ग्रंथलिपि ञ होतो. आ. १६२ चें सुरुवातीस कुण्डल जोडून त्या पुढील भाग कोण-युक्त लिहून अक्षराचें शेवटचें टोंक फिरवून डावीकडे ओढलें असतांही ग्रंथलिपि ञ होतो.

१६८, १६९, १७०, १७१, १७२, १७३
१७४' १७५, १७६, १७७, १७८

### ग्रन्थलिपि मल्ल्याळम् ट, 'ठ'

आ. १६८ मध्यें देवनागरी ट दाखविला आहे. १६९ मध्यें तोच उलटा ( खाली डोके वर पाय ) लिहिला आहे. १६९ मधील खालची रेषा १७० मध्ये टिंबांनीं दाखविल्याप्रमाणें केल्यावर १७१ होते. तोच मल्ल्याळम् ट आहे. १७२ मध्यें तोच लहान लिहिला आहे. १६९ हीच १७३ मध्यें लिहिली आहे. तिच्यामधील सर्वांत वरच्या दोन रेषा उभ्या करून १७४ मध्यें टिबांनीं दाखविलेला भाग वाढवून लिहिल्यावर १७५ हा तामिळ ग्रंथलिपि ट होतो. आ. १७६ मध्यें देवनागरी ठ लिहिला आहे. १७६ ची शेंडी काढून टाकून १७७ हा मल्ल्याळम् ठ होतो. १७७ मध्यें एक टिंब दिल्यावर १७८ तामिळ ग्रंथ लिपि ठ होतो. कन्नड व तेलगु ठ असाच परंतु शिरोरेखेसहित आहे.

१७९, १८०, १८१. १८२, १८३,
१८४, १८५, १८६, १८७.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ड'

आ. १७९ देवनागरी ड आहे, हीच १८० मध्यें घड्याळाचे काटयाचे दिशेनें फिरवून आडवा पाडला आहे. १८० चे अस्पृष्ट्वाकुञ्चन, आ. १८१ मध्यें स्पृष्ट्वा केले आहे. १८२ येथें दाखविल्याप्रमाणें १८१ चा वरचा भाग केल्यावर १८३ होते. १८३ मधील वरचा भाग उजवी-कडे अक्षराचे अर्ध्यापेक्षांही अधिक झुकविल्यावर १८४ हा तामिळ ग्रंथलिपि ड होतो. १८३ चा हाच भाग १८५ मध्यें दाखविल्याप्रमाणें करून १८६ प्रमाणें समपातळीवर लिहून सुरुवातीचें कुण्डल काढून टाकल्यावर १८७ मल्ल्याळम् ड होतो.

१८८, १८९, १९०, १९१, १९२
१९३, १९४, १९५, १९६, १९७

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ढ'

आ. १८८ मध्ये देवनागरी ढ दाखविला आहे. १८९ मध्यें तोच तीन भाग करून लिहिला आहे. हे तीन भाग १९०, १९१ येथें दाख-विल्याप्रमाणें उत्तरोत्तर घेऊन आ. १९२ मध्यें टिबांनी दाखविलेली अधिक रेषा देऊन जोडून लिहिल्यावर आ. १९३ होते. १९३ मधील सुरु-वातीचा भाग १९४ मध्यें दाखविल्याप्रमाणें वक्राकार लिहून वाकवून, आडवा संकोचानें लिहिला असता आ. १९५ हा मल्ल्याळम् ढ होतो. १९५ चा सुरुवातीचा भाग वर उचलून टोकास १९६ येथें टिंबांनी दाखविल्याप्रमाणे कुण्डलाकार वक्र केला असता १९७ तामिळ ग्रंथलिपि ढ होतो. अथवा ग्रंथलिपि ड ला शेवटीं एक कुण्डलाकार महाप्राण चिन्ह जोडून १९७ ग्रंथलिपि ढ बनतो असेंही म्हणता येईल. ही प्रक्रिया चित्र-विभागात दाखविली आहे.

याशिवाय आणखीही एका प्रक्रियेनें तामिळ ग्रंथलिपि ढ ब ूं शकतो. ती प्रक्रिया खालील प्रमाणें—

1, 2, 3. 4, 5.

या प्रक्रियेनें १८९ पासून ७ पायऱ्या आहेत, मागीलमध्यें ८ आहेत या प्रमाणें तीन प्रक्रिया आहेत.

यापैकी महाप्राण चिन्ह देऊन करण्याची प्रक्रिया गौण आहे. वर दिल्यापैकी तिसरी प्रक्रिया पूर्वोक्त **प्रधानाप्रधानयोः प्रधाने सम्प्रत्ययः'** न्यायानें अनुसरणीय आहे. तसेंच त्यात लाघवही आहे.

१९८, १९९, २००, २०१, २०२
२०३, २०४, २०५, २०६, २०७

### ग्रंथलिपि मल्ल्याळम् ण

आ, १९८ मध्यें ण चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १९९, २००, २०१, २०२ पूर्ववर्णित आहेत. १९८ चें खालचें उजवे अर्धवृत्त सोडून डोक्यावरच्या दुहेरी रेषा एकरूप करून व खालची दुहेरी रेषा आडवी करून आ. २०३ लिहिली आहे. २०३ एका पातळीवर

लिहिल्यावर २०४ होते. २०४ मध्यें टिंबांनीं दाखविल्याप्रमाणें भाग वाढविल्यावर आणि छित्वा कुञ्चनांचे स्पृष्ट्वाकुञ्चन करून आ. २०५ हा मल्ल्याळम् ण होतो. मल्ल्याळम् ण मध्यें ञ शीं फरक राखण्यासाठीं मध्यें छित्वा कुञ्चन नाहीं २०४ चा शेवटचा भाग २०६ येथें दाखविल्याप्रमाणें कोणयुक्त करून लिहिल्यावर २०७ हा तामिळ ग्रंथलिपि ण होतो. तेथें मात्र छित्वा कुञ्चन आवश्यक आहे.

२०८, २०९, २१०, २११

**ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'न'**

आ. २०८ मध्ये देवनागरी त चा मौलिक उद्भव दाखविला आहे. आ. २०८ मधील डावीकडील वरची खालची वृत्तार्धे सोडून उरलेला भाग २०९ मध्यें लिहिला आहे. २०९ आडवी कडून २१० मध्ये भूमिसमांतर लिहिली आहे, हाच मल्ल्याळम् त आहे. २११ हा तामिळ ग्रंथलिपि त आहे. हा लोकलिपि त च असल्याने याचा विचार पूर्वी झाला आहे.

२१२. २१३, २१४, २१५,
२१६, २१७, २१८, २१९

**ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'थ'**

देवनागरी थ च्या आ. २१२ त टिंबांनीं दाखविलेल्या भागाचा लोप केल्यावर २१३ होते. २१३ चें २१४ मध्ये दोन भाग केले आहेत. २१५ मध्यें २१४ चा डावीकडील भाग उजवीकडे आणून जशाचा तसा ठेवून उरलेला भाग त्याचे डावीकडे उजत्या कुशीवर उलटून ठेवला आहे. २१६ येथे दाखविल्या प्रमाणें २१५ तील दोन भाग जोडून घेतल्यावर २१६ हा तामिळ ग्रंथलिपि श होतो.

२१५ मधील दोन भाग २१७, २१८ येथें दाखविल्या प्रमाणें जवळ जवळ खालींवर घेऊन जोडल्यावर २१९ हा मल्ल्याळम् थ होतो. लेखकाचे संग्रही असणाऱ्या "संवत् १८८२ मिति अधिक कृष्ण सप्तमी मंदवासरे तद्दिने लवाट्योपनामक रंगनाथेन लिखितं समाप्तम्।" असा कालनिर्देश असणाऱ्या ऐतरेयारण्यकाच्या हस्त लिखित प्रतीमध्यें द्वितीयारण्यक द्वितीय खण्डाचे आरंभीं-चित्रविभागात दाखविल्याप्रमाणे देवननागरी थ चें तेथें दाखविलेले घृष्टलेखन आढळतें. त्यानुसार २१६ उपपादित आहे.

२२०, २२१, २२२, २२३, २२४, २२५
२२६, २२७, २२८, २२९, २३०, २३१

**ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'द'**

आ. २२०, २२१ पूर्व वर्णित आहेत. २२२ मध्यें टिंबांनीं दाखविलेली रेषा जोडून घेतली आहे. ही रेषा २२० मधील डावीकडील वरच्या वृत्तार्धाला घेऊनच होते. घृष्टलेखन करितांना क्रमानें अस्पृष्ट्वा कुञ्चनाचें स्पृष्ट्वा कुञ्चन केलें आहे. या प्रक्रियेनें २२६ हा मल्ल्याळम् द बनतो. २२७ देवनागरी द आहे. त्याचें वरचें अर्धवृत्त गुंडाळून एक कुण्डल करून २२८ ते २३० मध्यें दाखविल्याप्रमाणें घृष्टलेखन करून २३१ हा तामिळ ग्रंथलिपि द होतो. मल्ल्याळम् 'ओ' मध्यें सुरुवातीस एक कुण्डल आहे. व द मध्यें कुण्डल नाहीं, एवढाच 'द' व 'ओ' मध्यें फरक आहे.

२३२, २३३, २३४, २३५, २३६

**ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'ध'**

आ. २३२ येथें दाखविलेल्या प्रमाणें देवनागरी ध चा टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आ २३३ होते. २३३ चा डावा वरचा अर्धभाग आणि खालचा अर्धभाग एका पातळीवर आणल्यावर आ. २३४ होते. २३४ चें दोन्हीं भाग सारखे लिहिल्यावर २३५ हा मल्ल्याळम् ध होतो. २३५ चा डावा भाग लहान व उजवा मोठा लांबोडा लिहिल्यावर २३६ तामिळ ग्रंथलिपि ध होतो.

२३७, २३८, २३९, २४०
२४१, २४२, २४३, २४४

**ग्रंथलिपि मल्ल्याळम् 'न'**

आ. २३७ येथें दाखविलेला तामिळ ग्रंथलिपि न व लोकलिपि न सारखाच आहे. त्याचा विचार पूर्वी झाला आहे. २३८ हा देवनागरी न आहे. त्याचे डावेकडील कुण्डल २३९ मध्यें दाखविल्या प्रमाणें उलगडल्यावर आणि उजवीकडे टिंबांनी दाखविलेली रेषा केल्यावर २४० हा मल्ल्याळम् न होतो.

अथवा

५४१ मध्यें दाखविलेल्या देवनागरी न चा टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून देऊन, उरणारे दोन भाग २४२ येथें टिंबांनीं दाखविल्याप्रमाणें जोडून घेतल्यावर २४३ होते. २४३ येथें टिंबांनीं दाखविल्याप्रमाणें भाग सोडला असतां आ. २४४ हा मल्ल्याळम् न होतो.

प्रथम प्रक्रिया लघु असल्यानें इष्ट आहे.

२४५, २४६, २४७, २४८, २४९

ग्रंथलिपि मल्ल्याळम् ' प '

आ. २४५ येथें टिंबांनीं दाखविलेला देवनागरी प चा भाग सोडून दिल्यावर आ. २४६ होते. वर्णोद्धारतन्त्रप्राप्त वाम उपरि-अर्धवृत्त २४५, २४६ येथें दोन भागात लिहिले आहे. २४६ चा डावीकडे टिंबांनीं दाखविलेला भाग करून आणि वरच्या भागाचा लोप करून आ. २४७ होते. २४७ चा सुरुवातीचा भाग वक्रावर सलगपणें लिहिल्यावर आ. २४८ हा मल्ल्याळम् प होतो. त्याला सुरुवातीस वळवून कुण्डल केल्यावर आ. २४९ हा तामिळ ग्रंथलिपि प होतो.

२५०, २५१, २५२, २५३, २५४, २५५

ग्रंथलिपि मल्ल्याळम् ' फ '

आ. २५० येथें टिंबांनीं दाखविलेला देवनागरी फ चा भाग सोडून दिल्यावर आ. २५१ होते. २५१ मध्यें पकारांत २४६ येथें दाखविल्याप्रमाणें आकृति लिहुन २५१ मधल्या-प्रमाणें दोन अर्धवृत्तें ठेविल्यावर आ. २५२ मधील प चा भाग खालीं ओढून खालच्या अर्धवृत्ताचे पातळीवर घेतल्यावर अथवा पुढील भाग उलटून वर घेतल्याबर आ. २५३ होते. २५३ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग वाढवून सलग लिहिल्यावर आ. २५४ हा मल्ल्याळम् फ होतो. त्यालाच एक कुण्डल लावलें असतां आणि शेवटचे कुण्डल घड्याळाचें दिशेने लिहिलें असतां २५५ हा तामिळ ग्रंथलिपि फ होतो. अशोकलिपि प्रमाणें मल्ल्याळम् फ त्यांचे प चे शेवटीं महाप्राणचिन्ह (कुण्डल) लावून होतो असेंही म्हणता येईल. हा गौणपक्ष आहे.

२५६, २५७, २५८, २५९, २६०,
२६१, २६२, २६३, २६४, २६५,

ग्रंथलिपि मल्याळम्– (ब)

आ. २५६ मध्ये देवनागरी ब आहे. त्याची मात्रारेषा कमी करून वेगळ्या वळणानें लिहिल्यावर २५७ होते. २५८ मध्ये २५७ च्या वाटींतील मधली रेषा सरकावून खालच्या रेषा संधि भागांत आणली आहे, व वरची रेषा गडूचे तोंडाप्रमाणे केली आहे. २५८ चे मध्यमात्रेचे ठिकाणी २५९ व २६० मध्यें क्रमाने स्पृष्ट्वा आणि अस्पृष्ट्वा कुञ्चन करून डावीकडील सर्वांत वरची रेषा डावीकडे अधिकाधिक झुकविली आहे. २६०, २६१ मध्ये उलगडून आडवी केली आहे. २६२ मध्ये अस्पृष्ट्वा कुञ्चन संकुचित करून सुरुवातीस एक कुण्डल टिंबांनीं दाखविले आहे. २६२ चे दोन भाग २६३ मध्ये दाखविल्याप्रमाणें २६४ मध्ये जोडून लिहिले आहेत. २६४ हा मल्याळम् ब आहे. तो लांबोडा लिहिल्यावर २६५ हा तामिळ ग्रंथलिपि ब होतो. या प्रक्रियेंतील आ. २५९ व २६० कन्नड व तेलगु ब करिता उपयुक्त आहेत. खालील आखुड प्रक्रियेनें ही मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि व बनू शकतात.

1, 2, 3, 4, 5.

प्रक्रिया सुलभ आहे.

२६६, २६७, २६८, २६९, २७०
२७१, २७२, २७३, २७४, २७५.

ग्रंथलिपि मल्ल्याळम् ' भ '

आ. २६६ मध्यें वर्णोद्धार तन्त्रांत सांगितल्याप्रमाणे भ चा पूर्व वर्णित प्रकार आहे. २६७ ही पूर्व वर्णित आहे. २६८ ते २७१ पर्यंत टिंबांनी २६७ चे घृष्टलेखन दाखविले आहे. २७२ मध्ये आ. २७१ घड्याळाचे काट्याचे दिशेनें फिरवून उभी केली आहे. २७३ हाच मल्याळम् भ आहे. त्यामध्यें २७२ चा खालचा भाग दूर करून लिहिला आहे. २७१ चे खालचे रेषेंत काही भाग जास्त जोडून लोंबता सोडल्यावर २७४ होते. २७४ ला टिंबांनीं तेथेच दाखलेला भाग जोडल्यावर २७५ हा तामिळ ग्रंथलिपि भ होतो.

२७६, २७७, २७८, २७९, २८०, २८१
२८२, २८३, २८४, २८५, २८६.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– 'म'

आ. २७६ मध्यें टिंबांनीं दाखविलेल्या देवनागरी म तील भाग सोडल्यावर आ. २७७ बनते. आ. २७७ मध्यें टिंबांनीं दाखविलेली रेषा मनानेंच आणलेली नसून, भ आणि म चे लक्षणवाक्य एक असल्यांने आकृतीत दाखविल्याप्रमाणे संयोजनभेदाने नसून श, स प्रमाणे अवस्थान भेदाने करून घेतली आहे; म्हणून ती भ पासून आली आहे. यावरून मल्ल्याळम् लोकांना वर्णोद्धार तन्त्राचें रहस्य ठाऊक होते याची साक्ष मिळते. तिऱ्यांत टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग वाढवून, खालची गांठ समाविष्ट करून, उजवीकडील रेषाही तिरकी लिहिल्यावर २७८ व पुढें २७९ बनतात. २७९ ला २८० ला येथें दाखविल्याप्रमाणे डोक्यावर लावून सलग लिहिल्यावर २८० हा मल्ल्याळम् म होतो. त्याचेच २८१, २८२, २८३ येथे दाखविल्याप्रमाणे घृष्टलेखन केल्यावर २८४ हा तामिळ ग्रंथलिपि म होतो. २८५, २८६ हे त्याचेच लेखनप्रकार आहेत. क्रमांक न दिलेला छापील मल्ल्याळम् म आहे.

२८७, २८८, २८९, २९०
२९१, २९२, २९३.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– 'य'

आ, २८७ मध्ये देवनागरी य दाखविला आहे. २८८ मध्यें त्याची मात्रा लहान केली आहे. व डावीकडील गांठ छित्वाकुञ्चनानें लिहिली आहे. २८९, २९० मध्ये डावीकडील गांठ क्रमाक्रमाने मोठी करून २९१ मध्ये बरोबरीने लिहिली आहे. तोच मल्ल्याळम् य आहे. आ. २९२ तामिळ ग्रंथलिपि य आहे. तो लोकलिपी य प्रमाणेच आहे. लोकलिपीचा विचार पूर्वी झाला आहे. आ. २९३ मध्ये तोच य प्रथमार्धवृत्ताकार लिहून लांबट लिहिला आहे. क्रमांक न दिलेला छापील मल्ल्याळम् य आहे.

२९४, २९५, २९६, २९७, २९८
२९९, ३००.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– 'र'

आ. २९४ मध्यें देवनागरी र दाखविला आहे. २९५ मध्यें तोच घड्याळाचे काट्याचे विरुद्ध दिशेने फिरवून भूमिसमांतर आडवा पाडला आहे. २९५ मधील उजवीकडील शेवटची रेषा २९६ मध्यें काढून टाकली आहे. २९६ झुकवून शेवटची रेषा आखूड लिहून लिहिल्यावर २९७ होते. २९७ वक्राकार लिहिल्यावर २९८ हा मल्ल्याळम् र होतो. २९८ ची डावीकडील रेषा सरळ उभी लिहिल्यावर २९९ होते. २९९ चा डोक्यावरचा भाग सरळ रेषेने लिहून कुण्डल लंबवर्तुळाकार लिहिल्यावर आ. ३०० हा तामिळ ग्रंथलिपि र होतो क्रमांक न दिलेला मल्ल्याळम् छापील र आहे.

३०१, ३०२, ३०३, ३०४, ३०५
३०६, ३०७, ३०८, ३०९.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– ल आणि व

आ. ३०१ मध्यें देवनागरी ल दाखविला आहे. ३०२ मध्यें त्याचे वरचे अंगाला टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिला असतां आणि खालच्या अंगाला टिंबांनीं दाखविलेला भाग वाढविला असता ३०३ होते. ३०३ कोणयुक्त लिहिल्यावर ३०४ मल्ल्याळम् ल होतो. ३०३ जशीच्या तशी ठेवून कुण्डल भागास लहान आकाराचा तामिळ ल आकृतीत दाखविल्यानुसार केल्यावर कन्नड ल व पूर्णवृत्ताकार केल्यावर तेलगु ल होतो. आ. ३०६ ला ३०७ प्रमाणें लिहिल्यावर तामिळ ग्रंथलिपि ल होतो. आ. ३०८ मध्यें दाखविल्याप्रमाणे तामिळ लोकलिपि व प्रमाणेंच ग्रंथ लिपि व आहे. त्याचें कुण्डल काढून टाकल्यावर ३०९ हा मल्ल्याळम् व होतो.

३१०, ३११, ३१२, ३१३, ३१४, ३१५
३१६, ३१७, ३१८, ३१९, ३२०.

### ग्रंथलिपि मल्ल्याळम्– 'श, ष'

आ. ३१० मध्ये देवनागरी श दाखविला आहे. ३१० ची मात्रा वगळून उरलेला भाग आ. ३११ येथे घड्याळाचे काट्याचे विरुद्ध दिशेनें फिरवून भूमि समांतर आडवा केला आहे. ३११ ची सुरुवातीची रेषा ३१२ मध्यें थोडी दूर लिहिली आहे. व शेवटची रेषा सोडून

दिली आहे. ३१२ ला ३१३ प्रमाणे लिहिल्यावर तोच मल्ल्याळम् श होतो. ३१४ मध्ये ३१३ चें दोन भाग करून लिहिले आहेत. ३१५ मध्यें ३१४ चा दुसरा भाग तामिळ ग्रंथलिपि र प्रमाणे लिहून दोन्ही भाग जोडल्यावर आ. ३१६ हा तामिळ ग्रंथलिपि श होतो.

आ. ३१७ देवनागरी ष आहे त्यांच्या प्रकाराचे पोटांत रेषा देऊन ष होतो. त्यानुसारच सर्वत्र ष बनतो. ३१८ मध्यें मल्ल्याळम् प लिहून वाढविण्याचा भाग टिंबांनी दाखविला आहे. तो वाढविला असताना आ. ३१९ हा मल्ल्याळम् ष होतो. तामिळ ग्रंथलिपितही असेच आहे, फक्त मध्यरेषा व प काराची शेवटची रेषा तिरकी घृष्टलेखनानें लिहिली जाते. याप्रमाणें बनणारा आ. ३२० हा तामिळ ग्रंथलिपि ष आहे.

३२१, ३२२, ३२३, ३२४, ३२५
३२३, ३२७, ३२८, ३२९.

**ग्रंथलिपि मल्ल्याळम्–'स'**

आ. ३२१ मध्ये देवनागरी स आहे. ३२२ मध्ये आ. ३२१ चे दोन भाग करून डावीकडचा भाग आडवा केला आहे. व उजवीकडचा तसाच उभा ठेवला आहे. ३२३ मध्ये ३२२ चे शेवटच्या भागाचे स्पृष्ट्वा कुञ्चनाचे अस्पृष्ट्वाकुञ्चन केले आहे. ३२४ मध्यें हे दोन्ही भाग जोडून लिहून ३२५ मध्यें ३२४ ची शेवटची रेषाही समान पातळीवर घेऊन ३२५ हा तामिळ ग्रंथलिपि स होतो. ३२६ मध्यें देवनागरी स दाखविला आहे. ३२७ मध्ये त्याचा डावीकडील अर्धा भाग आडवा पाडला आहे. उजवीकडचा आहे तसाच ठेवला आहे. ३२७ चे शेवटचें भागांतील कुञ्चन ३२८ मध्ये फाकवून लिहिले आहे. व ३२७ मधील दोन्ही भाग जुळवून घेतले आहेत. ३२८ चे दोन भाग वक्राकार लिहून ३२९ हा मल्ल्याळम् स होतो. खालील प्रक्रियेनेंही मल्ल्याळम् स होतो–

३३०, ३३१, ३३२, ३३३, ३३४.

३३० मध्यें दाखविलेल्या देवनागरी स ची डावीकडील वरची रेषा ३३१, ३३२ मध्यें दाखविल्याप्रमाणें क्रमानें अधिकाधिक डावीकडे वांकवून तळापर्यंत नेली आहे. ३३२ मधील सर्वांत उजवीकडील रेषेचें स्पृष्ट्वाकुञ्चन ३३३ मध्यें अस्पृष्ट्वा केलें आहे. तें अधिक वक्र लिहून ३३४ हा मल्ल्याळम् स बनतो. या प्रक्रियेंत पूर्वोक्त प्रक्रियेंप्रमाणें मोठी फिरवाफिरव करावी लागत नाही. (चित्रविभाग पहा)

३३५, ३३६, ३३७, ३३८, ३३९.
३४०, ३४१, ३४२, ३४३, ३४४, ३४५.

**ग्रंथलिपि मल्ल्याळम्–'ह'**

आ ३३९ मल्ल्याळम् ह आहे. ३४४ तामिळ ग्रंथलिपि ह आहे. यांचा विचार प्रथम प्रकरणांत विस्तार झाला आहे. त्यानुसार तामिळ ग्रंथलिपि ह एकाच प्रक्रियेनें मल्ल्याळम् शीं संबंध न ठेवतांही बनू शकतो. (चित्रविभाग पहा)

मल्ल्याळम् मध्यें अपूर्ण ळ आणि अपूर्ण र अशी दोन अक्षरें आहेत. अपूर्ण मल्ल्याळम् 'र' दोन एकापुढें एक लिहिले असतां तो दन्त्यमिश्र ट होतो. हें तामिळ लोकलिपीतही आहे. ग्रंथलिपींत अपूर्णाक्षरें नाहींत. अपूर्णाक्षरांचा विचार संस्कृतोपयोगी नसल्यानें वर्णोद्धारतन्त्र करीत नाही.

ऋग्वेदांत व अन्य वैदिक वाङमयांत ळ हा एकच वर्ण मात्र उच्चारणांत आहे. तन्त्र तो ल चाच प्रकार सांगत असल्यानें त्याला वेगळा वर्ण मानण्याचें कारण नाहीं. वरिवस्यारहस्यांत श्री भास्करराय म्हणतात. "**अत एवाकारहकारयोर्मध्यें सर्वबर्णपाठः। ळकारस्य लकाराद‌भिन्नत्वात्।**" (**वरिवस्यारहस्य अंश २ श्लोक ६७–६८ व्याख्या**) म्हणजेच ळ हा ल चाच प्रकार प्रकार आहे. वर्णोद्धारतन्त्र याविषयीं कांहीं वेगळें सांगत नसलें तरी तो खालीलप्रमाणें ल पासून घृष्टलेखनानें होतो.

३४५, ३४६, ३४७, ३४८, ३४९
३५०, ३५१, ३५२

**ग्रंथलिपि मल्ल्याळम्–'ळ'**

आ. ३४५ हा देवनागरी ल आहे. ३४६ तामिळ ल आहे त्याचा विचार पूर्वी झाला आहे. ३४७ मध्यें त्याचे दोन भाग केले आहेत. त्यापैकी दुसऱ्या भागला ३४८ मध्ये दाखविल्याप्रमाणें करून घेऊन ते दोन भाग जोडून घेतल्यावर ३४९ होते, ३५० हा तामिळ ग्रंथलिपि ळ आहे. ३४९ चे दोन भाग सारख्या पातळीवर लिहिल्यावर होते. ३५१ मध्यें दाखविल्याप्रमाणें ३५० चा अंतिम रेषा भाग सोडून उरलेला भाग वर उचलल्यावर शेवटी ३५२ हा मल्ल्याळम्ळ होतो.

या प्रमाणे मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपित देवनागरी अन्तर्निहित आहे. हेंही एक पुरातत्त्व उत्खननच आहे.

स्वरमात्रा व बाराखडीचा विचार विवरणांत आहे.

---

प्रकरण ७ वे

# देवनागरीशीं कन्नड व तेलगूचा संबंध

१, २. ३, ४, ५, ६
७, ८, ९, १०, ११, १२

### कन्नड तेलगु – अ आ

आ. ४ व ६ कन्नड तेलगु अ आहेत. ते आ. १ या अशोकलिपि अ पासून २, ३, व ५ मध्ये दाखविलेल्या प्रक्रियेनें बनतात. याचा वस्तार पूर्वी झाला आहे. अशोकलिपि हा तन्त्रोक्त देवनागरीचाच एकदेश आहे.

आ. ७ कन्नड व तेलगु आ आहे. तो करितांना त्या लिपींतील अ लिहून आ. ७ येथ दाखविल्याप्रमाणे एक आडवी, एक उभी व एक पुन्हां आडवी अशा रेषा दिल्या आहेत. हा जास्तीचा रेषाभाग आकारमात्राचा आहे. वरची आडवीरेषा अशोकपक्ष, उभी रेषा देवनागरी पक्ष व खालची आडवी रेषा स्वपक्ष अशा समुच्चयानें ही बनत आहे. कानडी तेलगु लेखन व मुद्रणांत हा रेषाभाग चित्रविभागात दाखविल्यानुसार सलग लिहिला व छापला जातो. कन्नडमध्ये आकारमात्रा चित्रविभागात दाखविल्यानुसार व तेलगु चित्रविभागात दाखविल्यानुसार अक्षराच्या उजवीकडे शिरोरेषेजवळ लिहिली जाते.

जसे :– क = का = (कन्नड)
क = का = (तेलगु)

### कन्नड तेलगु – इ

आ, ८ ते १२ इ आहे. त्याचे विवरण तामिळ लोकलिपीचे विचारांत झालें आहे. आ. १२ कन्नड, तेलगु इ आहे. तो आ. ११ ला सुरुवातीस कुण्डल लावून होतो. कोणीं कोणीं कुण्डलाखेरीजही लिहितात. अशोकलिपि इ चे तीन बिन्दु देवनागरींत अन्तर्गत असल्याचा विचार पूर्वी झालाच आहे. कसेंही असलें तरी कन्नड व तेलगु इ देवनागरी इ पासून बनत असल्याचें स्पष्ट दिसतच आहे.

१३, १४, १५, १६, १७, १८
१९, २०, २१, २२, २३, २४

### कन्नड तेलगु ई

आ. १३ मध्ये देवनागरी इ आडवा पाडून बिन्दुद्वयारूढ केला आहे. आ. १४ मध्ये १३ चा फक्त मधलाच कुञ्चनभाग बिन्दूसह घेऊन शिरोरेषा दिली आहे. १५ मध्ये १३ चे मधलें अस्पृष्टा कुञ्चन छिन्वा केलें आहे. १५ चा मध्य कुञ्चन भाग १६ मध्ये बिन्दूसह वेगळा लिहिला आहे. यामुळे परिणामाचे दृष्टीने आ. १४ = आ. १६ झालें. बिन्दू संगत रेषेनें जोडून घेतले आंहेत. १७ मध्यें १६ लिहून पुढे कन्नड ई ची मात्रा लिहिली आहे. आ. १८ मध्ये १७ फुगवून लिहिली आहे, १७ च्या डोक्यावर शिरोरेषा केली आहे. व बिन्दू आणि ई ची मात्रा आडव्या सरळ रेषेने जोडून सलग लिहिलीं आहेत. हाच कन्नड ई आहे. आ. १८ ची मात्रा वगळून लिहिल्यावर १९ होते. १९ ला नागरी ई कार मात्रा आडव्या रेषेला जोडून खालून वरती फिरवून सलग लिहिल्यावर २२ हा तेलगु ई होतो.

### ई कार मात्रा विचार

आ. २० मध्ये कन्नड ई ची मात्रा व २१ मध्यें ई ची मात्रा दाखविली आहे. इकार मात्रा बाराखडींत डोक्यावर लिहिली जाते. (चित्रविभाग पहा) याप्रमाणे. दीर्घ इकारान्त व्यन्जन करताना मात्र हृस्व इकारान्त व्यन्जन लिहुन पुढें ई ची मात्रा लिहितात. जसें की = याप्रमाणे. तेलगुमध्ये बाराखडींत इकारान्त व्यज्जन करण्याकरितां अक्षराचे डोक्यावरच ऱ्हस्व मात्रा देतात. दीर्घ ईकारान्त व्यंज्जन करण्याकरिता ऱ्हस्व मात्रेचे डोक्यावरच दीर्घ मात्रा जोडून तो सर्व भाग व्यंजनाक्षराचे डोक्यावर लिहितात. त्यातील हृस्व इकार मात्रेचा भाग आ. २३ मध्यें दाखविला आहे, त्यावरच नागरी ईकार मात्रा उजव्या कुशीवर उलटवून लिहितात. हेंच २४ मध्ये दाखविले आहे. (चित्रविभाग पहा)

देवनागरी ई कार मात्रा (चित्रविभाग पहा) तेलगुमध्यें वापरली जाणारी तेलगु 'ई' मध्ये चित्रविभागात दाखविलेली ईकार-मात्रा पूर्ववर्णित आहे. बाराखडीत ईकारान्त व्यज्जन करण्यासाठी, वर 'की' वगैरे मध्ये दिल्याप्रमाणें, चित्रविभागात दाखविल्यानुसार ईकारमात्रा वापरली जात आहे. वस्तुतः वरील आकृतीत दाखविल्या प्रमाणे देवनागरी ई कार मात्रेपासून चित्रविभागात दाखविलेला तेलगु

ई कार मात्रा बनत आहे. देवनागरी ईकारान्त व्यञ्जनांत ती मात्रा वापरली जाते, (देवनागरीचें अनुसरण करणाऱ्या) तेलगूंत तशी मात्रा व्यञ्जनात न वापरतां स्वरांत वापरली गेली आणि देवनागरी ई मध्ये हीच दिग्भेदानें वापरली जाते, ती तेलगु स्वरांत न वापरतां व्यञ्जनांत वापरली गेली. असें कां याचा विद्वानांनी विचार करावा.

२५, २६, २७, २८

कन्नड तेलगु उ ऊ,

आ. २५ देवनागरी उ आहे. २६ मध्ये २५ मधील स्पृष्ट्वा कुञ्जनाचें अस्पृष्ट्वा कुञ्चन केलें आहे. २६ घड्याळाचे काट्याचे दिशेने फिरवून आडवी केल्यावर २७ होते. २७ यथे सुरुवातीस टिंबांनी दाखविल्याप्रमाणें ' वामगता रेषा ' गुंडाळून कुण्डल केलें असतां कन्नड उ होतो. आ. ३८ मध्यें कन्नड कु दाखविला आहे. तेथे उजवीकडील रेषा ही उकारमात्रा प्रत्यक्ष आहे.

२९, ३०, ३१, ३९ (१), ३९ (२)

आ. २९ देवनागरी दीर्घ ऊ आहे. देवनागरी उ स ऊकार मात्रा देऊन तो होतो. कन्नडमध्येंही त्या प्रमाणेंच आहे. ३० मध्ये कन्नड उ लिहून पुढें मात्रा दिली आहे, ही कन्नड ऊकारमात्रा आहे. कन्नडमध्यें ऊ करण्यासाठीं तीच वापरली जाते. ३० मधील भाग जोडून लिहिल्यावर ३१ हा कन्नड ऊ होतो. आ. ३९ मध्यें दोन प्रकारचा कन्नड कू दाखविला आहे. ते दोन्हीं प्रकार प्रचलित आहेत. त्या मध्यें उजवी कडील रेषा ऊकार मात्रा आहे. ३९ (१) मध्ये ' क ' पुढे ऱ्हस्व उ मात्रेस दीर्घ ऊ मात्रा जोडली आहे, ३९ (२) मध्यें ऱ्हस्व उ मात्रेस दीर्घत्वद्योतक आकारमात्रा जोडली आहे.

३२, ३३, ३४, ३५
३६, ३७, ४०, ४१

आ. ३२ मध्ये देवनागरी ऱ्हस्व उ दाखविला आहे. ३३ मध्ये तोच उ घड्याळाचें काट्याचे दिशेने फिरवून तो भूमिसमांतर आडवा केला आहे. ३३ मध्य टिंबांनी दाखविलेली रेषा केल्यावर आ. ३४ होते. ३४ मध्ये ३५ येथे टिंबांनी दाखविलेली रेषा केल्यावर आ. ३६ हा तेलगु उ होतो. यालाच डोक्यावर आणखी एक उभी रेषा देऊन, तेलगु ईकाराप्रमाणें मात्रा जोडल्यावर तेलगु ऊ होतो. येथें डोक्यावरील दोन उभ्या रेषा दीर्घ असल्याचें दाखवितात. मग उजव्या कडेची रेषा कशाला ?

तेलगु ऊ काराचा विशेष विचार

याचा उलगडा खालीलप्रमाणे करतां येतो–

चित्रविभागात दाखविल्यानुसार उ कळचूरी व होय्सळ यांचे लेखनांत आढळतो. त्यांवरून तेलगुमध्ये चित्रविभागात दाखविलेला उ घृष्ट लेखनाने आला असावा असें म्हणतां येईल. तरीही ऊ मध्यें उजवीकडचा रेषाभाग कसा आला हा प्रश्न राहतोच. राष्ट्रकूटाचे लेखांत आढळणारा अशोकलिपि सांप्रदायाच्या 'उ' ला देवनागरी उ वर जोडून चित्रविभागात दाखविलेला तेलगु उ बनला असावा. यालाच अनुसरून दीर्घ ऊ लिहितांना अशोकलिपि दीर्घ ऊ ची मात्रा घेऊन डोक्यावरच्या दोन उभ्या रेषा व देवनागरीमधील चित्रविभागात दाखविलेली मात्रा घेऊन उजवीकडील रेषाभाग येऊन तेलगु ऊ बनला असावा. अर्थात अशोकलिपि व देवनागरीलिपि या दोहोंच्या समभाग मिश्रणानें तेलगु घृष्टलेखन होंत असावें असें समजल्यास हे शक्य आहे. आ. ४० मध्ये तेलगु ' कु ' व ४१ मध्यें ' कू ' मात्राप्रदर्शनार्थ दाखविले आहेत. दीर्घ व्यञ्जन करताना ऱ्हस्व उकार मात्रा देऊन आकारमात्रा दिली जाते.

ह्रस्व/दीर्घ ऋ व ऌ यांचे विवेचन स्वतंत्र प्रकरणांत केले आहे.

४२, ४३, ४४, ४५, ४६, ४७
४८, ४९, ५०, ५१, ५२, ५३

कन्नड तेलगु ए

आ. ४२ मध्ये ए चा मौलिक उद्भव दाखविला आहे. ४३ मध्यें डावीकडील खालचे अर्ध कमी करून देवनागरी ए दाखविला आहे. खालचीं दोन्हीं अर्धवृत्तें कमी करून ४४ देवनागरी ए आहे. ४५ मध्ये केवळ वर्णोद्धारतन्त्रानें सांगितलेला भाग तेवढाच लिहिला आहे. ४६ मध्यें ४५ मधील खालची रेषा टिंबांनी दाखविलेल्या मार्गानें वर नेऊन जोडण्याचें सुचविलें आहे. त्याप्रमाणे केल्यावर आ. ४७ बनते. ही दक्षिणावर्त कुण्डल असणारी आहे. ती घड्याळाचे काट्याचे दिशेने फिरविली असतां व उभी केली असतां ४८ होते. ४८ मध्यें कुण्डल पूर्ण गोल आहे. ४९ मध्यें कुण्डलाचा वरचा भाग सोडून दिला आहे. ४८ व ४९ दोन्हीं कन्नड दीर्घ ए आहेत. खालच्या बाजूस कन्नड

दीर्घ ए वेगळा लिहून दाखविला आहे. आ. ५०–५१ मध्यें आ. ४८–४९ मधील वरची मात्रा रेषा काढून टाकली आहे. ५१ मध्यें ४९ मधील डावीकडील कुण्डलाचा वरचा अर्धही काढून टाकला आहे. हे दोन्ही कन्नड ऱ्हस्व ए आहेत. खालच्या बाजूस कन्नड ऱ्हस्व ए वेगळा लिहून दाखविला आहे. वेगळा दाखविलेला कन्नड ऱ्हस्व 'ए' आ. ५० मधील खालचा कुण्डल भाग तोडून गुंडाळून झाला आहे. आणि वेगळा दाखविलेला कन्नड दीर्घ 'ए' आ. ४८ मधील खालचा कुण्डल भाग तोडून गुंडाळून झाला आहे. यांचे घृष्टलेखन वगैरे प्रकारानें कदम्ब राजवंशाचे शिलालेखापासून पहावयास मिळतें. आ. ५२ तेलगु दीर्घ ए आहे त्यामध्यें वरची मात्रा सरळ उभी लिहिली जाते. ५३ मध्यें ५२ ची मात्रा काढून टाकल्यावर तेलगु ऱ्हस्व ए होतो.

५४, ५५, ५६, ५७, ५८

### ए कार मात्रा विचार

कन्नड हृस्व के – कन्नड दीर्घ के.

आ. ५४ देवनागरी के व डोक्यावरील एकार मात्रा आडवी लिहिलेली दाखविली आहे. अशीच आडवी डोक्यावर लिहिल्यावर ५५ कन्नड हृस्व के होतो ५५ चें उजवीकडे दीर्घ मात्रा लिहिल्यावर कन्नड दीर्घ के होतो. ही दीर्घमात्रा ईकारमात्रेसारखी असली तरी कन्नड मध्यें इतरत्रही ती दीर्घत्व द्योतनार्थ वापरली जाते– तेलगुमध्यें मात्रा आडवीच लिहिली जाते, पण कुण्डल भाग उलगडून लिहिला जातो. दीर्घ मात्राही डोक्यावरच लिहिली जाते. आ. ५७ तेलगु हृस्व के व ५८ तेलगु दीर्घ के आहे. (आकृति चित्रविभागात पहा)

५९, ६०, ६१, ६२ कन्नड ऐ तेलगू ऐ.

### कन्नड – तेलगु. ऐ.

आ. ५९ मध्यें कन्नड ए लिहून देवनागरी ए च्या दोन मात्रा त्याच्या डोक्यावर लिहिल्या आहेत. त्या मात्रा जोडून लिहिल्यावर ६० होते. त्या सलग वक्ररेषांनीं सफाईदारपणे लिहिल्यावर ६१ हा कन्नड ऐ होतो. याचे खालचे भागांत डावीकडे सुरुवातीस 'ए' मधील पूर्ण कुण्डल तसेंच ठेवून कुण्डल लिहिणें प्रचलित मुद्रणांत आढळते. ६२ तेलगु ऐ आहे. तो तेलगु ए लिहुन, डोक्यावर दोन एकार मात्रा लिहून खालच्या भागांत डाव्या बाजूला दक्षिणावर्त कुण्डल करून होतो. खालून वर लिहितांना दक्षिणावर्त कुण्डल होतें. दृश्यमान आकृतींत वरून खाली पहात असतांना रेषा घड्याळाचे काटयाचे विरुद्ध दिशेने जाताना दिसत आहे– म्हणजे वरून खालीं लिहितांना वामावर्त कुण्डल होतें. ६२ मध्यें दाखविलेला ऐ कन्नड व तेलगु दोहोंत उपयोगी आहे. ६० व ६१ मध्यें दाखविलेला ऐ केवळ कन्नड मध्येंच प्रयुक्त आहे.

६३, ६४, ६५
६६, ६७, ६८

### कन्नड तेलगु ओ.

आ. ६३ देवनागरी ओ आहे. ६४ त्याचा अशोकलिपीने उचललेला भाग आहे. ६४ ला ६३ मधील मधला आडवा रेषा भाग जोडल्यावर ६५ होतो. ६५ ला ६६ मध्यें दाखविल्याप्रमाणे सुरुवातीस कुण्डल जोडून व खालचा भाग स्पृष्ट्वा कुञ्चनानें लिहून ६७ हा कन्नड व तेलगु हृस्व ओ होतो. त्याला उजवीकडे वरच्या बाजूस गजाकार ओ काराचा सोंडेचा शेवटचा तुकडा लिहिल्यावर कन्नड व तेलगु दीर्घ ओ होतात. ज्या प्रमाणें तमिळ स्व व दीर्घ ओमध्ये गजाकार ओकाराचा शेवटचा भाग असणें व नसणें या पासून फरक केला जातो, तसेच येथें आहे.

६९, ७०

### कन्नड तेलगु औ

आ. ६९–७० मध्यें औ. आहे. ६९ कन्नड व ७० तेलगु औ आहे. हृस्व ओ कन्नड व तेलगु मध्यें एकच आहे; मागील प्रमाणें औकार मात्रा दोघांनींही आपापल्या पद्धतीनें दिली आहे. मात्रेतही फारसा फरक नाही हें दिसतच आहे. ६९ कन्नड व ७० तेलगु औ. आहे.

७१, ७२

### कन्नड तेलगु अं अः

आ. ७१ व ७२ अनुक्रमे कन्नड व तेलगु अं, अः आहेत. अनुस्वार अक्षराचे उजवीकडे लिहिला जातो, विसर्ग संस्कृताप्रमाणेच उजवीकडे वर खालीं दोन बिन्दू देऊन लिहिला जातो. क्रमांक न दिलेले मुद्रित अं, अः आहेत.

७३. ७४, ७५, ७६, ७७, ७८
७९, ८०, ८१, ८२. ८३, ८४
कन्नड कै; कन्नड हृस्व को; कन्नड दीर्घ को;
तेलगु कै; तेलगु हृस्व को; तेलगु दीर्घ को;

**कन्नड तेलगु मात्रा विचार**

आ. ७३ देवनागरी कै आहे. त्यामध्ये क च्या डोक्यावर दोन एकार मात्रा दिल्या जातात. त्याच दोन एकारमात्रा आ. ७४ मध्ये वक्राकार रेषांनी दाखविल्या आहेत. त्या मध्ये एका मात्रेच्या टोंकाचा वक्रभाग सरळ केला आहे. आ. ७५ मध्ये कन्नड ह्रस्व के लिहून ७४ मधील दोन मात्रा उलटचा करून त्यांचे खालीं ठेवल्या आहेत. या मात्रा उजवीकडे सरकावून एक वक्र व दुसरी कुञ्चनाने तिला जोडून लिहिल्यावर खालीं वेगळा लिहून दाखविलेला कन्नड कै होतो. ७५ हाही कन्नड कै आहे. आ. ७६ तेलगु कै आहे. त्यामध्ये तेलगु के लिहून त्याचे खालीं दोन एकारमात्रा उलटचा करून सरळ रेषांनी लिहिल्या आहेत. एक मात्रा टोंकास वक्र व एक सरळ करून लिहिली आहे. या दोन्हीं जोडून लिहिल्यावर खालीं वेगळा लिहून दाखविलेला तेलगु कै होतो. आ. ७७ देवनागरी को आहे. त्या मध्ये डोक्यावर एक एकार मात्रा व उजव्या बाजूस एक आकारमात्रा आहे. या प्रमाणेच कन्नड क ला देऊन कन्नड को होतो. हें ७८ मध्ये दाखविले आहे. येथे चित्रविभागात प्रदर्शित एकारमात्रा डोक्यावर आणि चित्रविभागात प्रदर्शित अशी आकारमात्रा उजवीकडे दिली आहे. वरची ए ची मात्रा असल्याने आकारमात्रा उजवीकडे आली आहे. चित्रविभागात प्रदर्शित कन्नड का मध्ये पूर्वी चित्रविभागात प्रदर्शित मात्रा येऊन गेली आहे. आणि येथे चित्रविभागात प्रदर्शित दिसून येत आहे– ज्याप्रमाणे दीर्घ ऊकाराची मात्रा आहे. परंतु ही ऊकारमात्रा नाहीं. कारण या मध्ये चित्रविभागात प्रदर्शित डावीकडील वक्ररेषा केवळ योजक रेषा म्हणून आहे. दीर्घ ऊचे मात्रेप्रमाणे यात ह्रस्व उ चा मात्रांश नाही. अथवा ज्या प्रमाणें ई मध्यें उत्पन्न झालेल्या मात्रेचा दीर्घत्वद्योतनार्थ दीर्घ के वगैरेमध्यें कन्नडमध्यें उपयोग केला जातो. त्याप्रमाणें येथेंही ऊ चीच मात्रा दीर्घत्वद्योतनार्थ आहे, असे विद्वानांची मान्यता झाल्यास म्हणता येईल. आ. ७९ कन्नड ह्रस्व को आहे, ८० कन्नड दीर्घ को आहे. ८१ मध्यें तेलगु ओकार मात्रा आहे. तिच्यातही चित्रविभागात प्रदर्शित दोन भाग आहेत. डावा भाग तेलगु एकार मात्रेचा संक्षेप आहे व उजवा भाग आकार मात्रा असल्याचे स्पष्ट आहे. या दोघांना जोडून तेलगुमध्यें व्यञ्जनांचे डोक्यावरच मात्रा लिहिली जाते. याच मात्रेचे उजवीकडील कुण्डल चित्रविभागात प्रदर्शित रीतीने वर ओढल्यावर तेलगु दीर्घ ओची मात्रा होते. ( आ. ८१ ) आ. ८२ तेलगु दीर्घ को, आ. ८३ तेलगु ह्रस्व ओची मात्रा व ८४ तेलगु ह्रस्व को आहे. याप्रमाणे तन्त्रोक्त लेखन स्वरूप प्रचलित लेखन प्रकारांतही अन्तर्निहित असल्याचे दिसुन येतें.

८५, ८६, ८७, ८८
८९, ९०, ९१, ९२

आ. ८५ देवनागरी कौ आहे. त्या मध्ये डोक्यावर दोन एकारमात्रा व उजवीकडे एक आकार मात्रा आहे. आ. ८६ या अशोक लिपि की मध्यें तीच मात्राभाग आडवा लिहिला आहे. आ. ८७ मध्यें ८६ मधील मात्रा भाग जोडून लिहून उजवीकडे टोंकाला एक कुण्डल जोडले आहे. याप्रमाणें असणारी मात्रा डोक्यावर लिहून ८८ हा कन्नड कौ बनतो. ८९ कन्नड कौ सफाईदार सलग लिहिला आहे. कुण्डल खाली ओढून त्या मध्यें लिहिलें जातें. तेलगु मध्यें औकार मात्रा अशीच असते. परंतु उजवीकडील कुण्डल भाग संक्षिप्त व खाली न ओढतां लिहिला जातो. आ. ९० तेलगु कौ आहे.

**अनुस्वाराचा विशेष विचार**

आ. ९१ व ९२ मध्यें अनुक्रमे अनुस्वार व विसर्ग दाखविले आहेत. ते उपलक्षणानें सर्व वर्ण मालेस लागू होतात. तेलगुमध्यें अर्ध अनुस्वार व अर्ध विसर्ग असा फरक आहे. संस्कृतात जिव्हामूलीय ( म्हणजे क, ख, ही अक्षरे पुढें आली असता होणारा उच्चार ) व उपध्मानीय ( म्हणजे प, फ हीं अक्षरे पुढे आली असता होणारा उच्चार ) यांचे शिवाय कोणताही अर्धविसर्ग नाही. अर्धाक्षर लेखनाप्रमाणेंच अर्धविसर्ग लेखन समजावे. या प्रमाणें बिन्दु, अर्धबिन्दु या तन्त्रोक्त प्रकाराखेरीज अन्य कोणताही अर्ध अनुस्वार तन्त्रात सांगितलेला नाही. त्या मध्येंही वेगळा लेखन प्रकार नाही. अर्धचंद्रादि चिन्हे तंत्रोक्त आहेत. परंतु त्यांचा विचार करण्याचे प्रस्तुत ग्रंथाचे संदर्भांत प्रयोजन नाही. येथे भारतीय लिपींचे मौलिक एकरूप तेवढेंच पहावयाचे आहे. ' आन्ध्रशब्द चिन्तामणि ' कारांनी अनुस्वार हे नांव देऊन त्यांचे लेखनाचें प्रतिपादन केलेलें नाही. तेथें **आन्ध्रशब्द चिन्तामणिचे ' अप्पकवीय '** टीकाकार **' काकुनूरि अप्पकवि '** हे **' अनुक्तमन्यतः '** या न्यायाने प्रशस्त नागरी लिपीपासून अनुस्वार लेखनाचा संग्रह करावा असें लिहितात. याची विशेष नोंद करण्याची जरूरी आहे. या प्रमाणें कन्नड व तेलगु मधील स्वरांचा विचार आहे.

९३, ९४, ९५, ९६, ९७, ९८
९९, १००, १०१, १०२, १०३, १०४
१०५, १०६, १०७, १०८, १०९

**कन्नड–तेलगु क ख ग घ.**

आ. ९३ मध्यें देवनागरी क दाखविला आहे. ९३ घडचाळाचे काटचाचे विरूद्ध दिशेनें फिरवून आडवी करून कन्नड पद्धतीची शिरो रेषा दिल्यावर ९४ हा कन्नड क होतो. हाच सलगपणें लिहून चित्रविभागात दाखविलेला प्रचलित लेखन प्रकार बनत आहे. ९४ ची शिरोरेषा सोडून देऊन, ९५ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून देऊन, तेलगु पद्धतीनें शिरोरेषा लिहिल्यावर ९६ हा तेलगु क होतो. अथवा चित्र-

विभागात दाखविल्यायाप्रमाणें कन्नड क ची मधली रेषा वक्र रेषाभागात मिळवून टाकून तेलगू क होतो असेंही म्हणता येईल.

९७ मध्यें दाखविल्याप्रमाणें देवनागरी ख चा टिंबांनी दाखविलेला भाग सोडल्यावर आणि वाटी उलगडून छि त्वा कुञ्चनाने जोडून लिहिल्यावर ९८ होतें. ९८ मधील डावे टोक आणखी डावीकडे वळवून गाठ मोठी लिहून वक्ररेषेनें उजवीकडे गेल्यावर ९९ होतें. तोच कन्नड ख आहे. तोच सलगपणें लिहून चित्रविभागात दाखविलेला असा प्रचलित लेखन प्रकार बनत आहे. मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपीचे विवरण करीत असतां ही प्रक्रिया पूर्वी विस्तारानें सांगितली आहे. कन्नड ख चे खाली एक लहान उभी रेषा ( = महाप्राणचिन्ह ) दिल्यावर आ. १०० हा तेलगु ख बनतो. १०१ कन्नड ग व १०२ तेलगु ग आहे. त्यांचेमध्यें अशोकलिपि ग जसाच्या तसा घेऊन आपापल्या पद्धतीची शिरोरेषा दिली आहे. अशोक लिपि विवरण पूर्वी झाले आहे. आ. १०३ घ चा मौलिक उद्भव आहे. ( पूर्वोक्त अशोक लिपि प्रकरणातील आ. ३२ ) १०४ मध्यें १०३ मधील उजवीकडील दोन अर्धवृत्तांपैकी वरच्यानें खालचे व खालच्याचें वरचे टोक आतील बाजूस बाहेर डोकावते ठेवून सरळ रेषाकार बनविली आहेत. १०४ घड्याळाचे काट्याचे विरुद्ध दिशेने फिरवून आडवी केल्यावर १०५ होते. आ १०६ मध्यें १०५ मधील वरचे उजव्या टोंकाचे टिंबांनी दाखविल्याप्रमाणे वर वळवून आणि खालच्या भागात टिंबांनी दाखविलेला भाग वाढवून १०७ हा कन्नड घ होतो. १०७ चें खालचे कुण्डल उलगडून दक्षिणावर्त (क्लॉकवाइज) लिहिल्यावर, तसेच टिंबांनी दाखविलेली तेलगु पद्धतीची शिरोरेषा देऊन वरची आडवी वक्ररेषा खाली उभी ठेवल्यावर १०९ हा तेलगु घ होतो. हा कन्नड व तेलगु दोहोंत उपयुक्त आहे.

११०, १११, ११२

### कन्नड–तेलगु ङ

आ. ११० येथें मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि विवरणांतील आ. १०२ आहे. तिला टिंबांनी वाढविण्याचा कुण्डलभाग दाखविला आहे. तो जोडून १११ हा कन्नड ङ. होतो. तेथील पूर्वोक्त विवरणांतीलच आ. १०४ घेऊन कुण्डल लावल्यावर ११२ हा तेलगु ङ होतो.

११३, ११४, ११५, ११६
११७, ११८, ११९

### कन्नड–तेलगु च

आ. ११३ मध्ये च चा मौलिक उद्भव दाखविला आहे. त्यामध्ये डावीकडील आडवी रेषा तेथेंच टिंबांनी दाखविलेल्या मार्गाने उभी करून, डावीकडील खालची आडवी रेषा व डावींकडील वरचे अर्धवृत्त दोन्हीं संक्षेपानें लिहून ११४ होते. ११४ येथें टिंबांनी दाखविलेला भाग वाढविल्यावर आ. ११५ हा कन्नड च होतो. ११६ मध्ये मौलिकोद्भवांतील डावेंवरचे अर्धवृत्त सोडून दिलें आहे, चोचीचा रेषाभाग सरळ आडवा लिहिला आहे. आणि टिंबांनीं वाढवावयाचा भाग दाखविला आहें. ११६ चें उजवे वरचे अर्धवृत्त संक्षिप्त करून व खालचे कलते करून त्याला वरचें जोडून लिहिल्यावर ११७ होते. ११८ येथें टिंबांनीं दाखविल्या प्रमाणें ११७ ला शिरोरेषा दिल्यावर ११९ हा तेलगु च होतो. त्यामध्ये देवनागरी च चा अर्धाभाग प्रत्यक्ष दिसतच आहे.

१२०, १२१, १२२. १२३

### कन्नड तेलगु छ

आ. १२० मध्ये देवनागरी छ आहे. १२१ मध्ये तो ' छ ' घड्याळाचे काट्याचे विरुद्ध दिशेने फिरवून डावाभाग खालीं व उजवा वर भूमिसमांतर येईल असा केला आहे. १२१ मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषा भाग जोडला असतां १२२ हा कन्नड छ होतो. १२३ तेलगु छ आहे त्यामध्ये मागे सांगितलेल च लिहून त्याचे खालीं महाप्राण चिन्ह केल्यावर तो होतो हें दिसतच आहे. आ. १२० मधील एवढाच भाग घेऊन ५ या प्रमाणे ६ अशा देवनागरी छ चें घृष्टलेखन होऊ शकतें, त्यामुळे ' प्रधाने सम्प्रत्यय ' होऊ शकतो. सर्व लिपींचा एकत्रित विचार पुढे येणार आहे. त्यामध्यें याचा विस्तार पहावा. आकृति चित्रविभागात पहा.

१२४, १२५, १२६, १२७

### कन्नड तेलगु ' ज '

आ. १२४ मध्यें ज चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १२४ मधील उजवी कडील वरचें अर्धवृत्त तिरकें लिहिलें आहे. व उजवी कडील खालचें अर्धवृत्त संक्षिप्त करून डावी कडील खालच्या अर्धवृत्तांत मिळवून दिलें आहे, टिंबांनीं वाढविण्याचा रेषाभाग दाखविला आहे. एवढे केल्यावर १२६ होते. १२६ मधील तळाचें अस्पृष्ट्वा कुञ्चनाचें स्पृष्ट्वा कुञ्चन करून वरचें अर्धवृत्त भूमिसमांतर आडवें लिहिल्यावर १२७ हा कन्नड व तेलगु ज होतो.

### कन्नड तेलगु ' झ '

आ. १२८ हा पूर्वोक्त शास्त्रार्थ प्रकरणातील (प्रकरण चौथें) आ 73 आहे. आ. १२९ मध्यें १२८ ची उजवी बाजू खालीं येईल अशा रीतीनें ती भूमिसमांतर लिहिली आहे. १३० मध्यें १२९ चे सर्वभाग एका पातळीवर आणून थोडें फुगवून लिहिले आहेत. हीच आ. १३१

मध्यें सफाईनें लिहून कन्नड पद्धतीची शिरोरेखा दिल्यावर कन्नड झ होतो. तेलगु पद्धतीची शिरोरेखा दिल्यावर तेलगु झ होतो, तो आ. १३२ मध्यें दाखविला आहे. कन्नड व तेलगु मध्यें कोणीं कोणीं खालचें महाप्राण चिन्ह आ. १३१ व १३२ मध्यें दाखविल्यापेक्षां उजवीकडे सरकावून पुढच्या संधींतही लिहितात. त्याची उपपत्ति अशी --

1 2 3 4 5

आ. 1 साक्षात् मौलिक उद्भव आहे. त्या मधील उजवी कडील खालचें अर्धवृत्त सोडून दिले आहे. आणि डावीकडील खालचें अर्धवृत्त व त्या जवळचा रेषा भाग संकुचित करून, तसेंच डावीकडील वरचें अर्धवृत्त थोडें अधिक खालीं झुकविले आहे. एवढें केल्यावर २ बनते. 2 ची डाव्या बाजूची गांठ 3 मध्यें लहान केली आहे. आणि उजवीकडे जाणारी आडवी रेषा मधल्या उभ्या रेषेंत मिळवून टाकली आहे. 3 मधील उजवीकडील अर्धवृत्त भागवर डावीकडे लिहून शिरोरेषा केल्यावर आणि मध्यभागच्या रेषेचे डावीकडचा भाग वर ओढून संकुचित केल्यावर 4 हा कन्नड व 5 हा तेलगु झ होतात. या प्रक्रियेंत रेषा पुढील संधींत येते.

१३३, १३४, १३५, १३६, १३७, १३८

**कन्नड ञ तेलगु ञ**

आ. १३३ ही मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथ लिपि प्रकरणांतील आ. १६० आहे. तेथलीच आ. १६२ ही येथें आ १३४ मध्यें लिहून तिचे उजवीकडे आ. १३३ मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग जोडला आहे. त्याप्रमाणें जोडून लिहिल्यावर आ. १३५ हा कन्नड ञ बनतो. आ. १३६ मध्यें आ. १३५ लिहून तिचे शेवटचा वक्ररेषा भाग सरळरेषा करून लिहिला आहे. पुढें आ. १३७ मध्यें त्या सरळ रेषेला कुञ्चन आणून आ. १३८ मध्यें तें कुञ्चन पुनरपि जोडून घेतलें आहे. आ. १३८ हा तेलगु ञ आहे. त्या मध्येंही अशीच प्रक्रिया आहे. तो व कन्नड ञ दोन्हीं बाजूला सलग लिहून दाखविले आहेत.

१३९, १४०, १४१, १४२.

**कन्नड तेलगु– ट, ठ**

आ. १३९ कन्नड ट आहे. आ. १४० तेलगु ट आहे. याचें विवरण पूर्वोक्त शास्त्रार्थ प्रकरणांत दिल्यानुसार आहे. आ. १४१ कन्नड ठ आहे. पूर्वी मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तेथील १७८ तामिळ ग्रंथलिपि ठ घेऊन त्याला आपापल्या पद्धतीनें शिरोरेखा देऊन कन्नड व तेलगु ठ होतात. १४२ तेलगु ठ आहे. मध्यें टिंब न दिल्यास त्यांच्या त्यांच्या र पासून फरक समजणार नाहीं. म्हणून टिंब आवश्यक आहे.

१४३, १४४, १४५, १४५ (अ), १४६, १४७, १४८.

**तेलगु कन्नड- ड, ढ**

आ. १४४ मध्यें उजवीकडे देवनागरी ड आहे. त्या मध्यें १४४ येथें टिंबांनीं दाखविलेल्या रेषा वाढविल्या असतां १४३ हा कन्नड ड होतो. १४३ ला खाली महाआण चिन्ह दिल्यावर १४६ हा कन्नड ढ होतो. १४५ येथें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग वाढवून तेलगु पद्धतीने शिरोरेषा दिल्यावर १४७ ला खाली महाप्राण चिन्ह दिल्यावर १४८ तेलगु ढ होतो. १४७ हा तेलगु ड होतो. कन्नड ड १४५ (अ) मध्यें दाखविल्याप्रमाणें ही कोणी कोणीं लिहितात.

**देवनागरीपासून कन्नड–**

ढ खालीलप्रमाणें देवनागरी ढ पासूनही कन्नड ढ बनू शकतो–

1, 2, 3, 4.

4. मध्यें दाखविल्याप्रमाणें महाप्राण चिन्ह विरहीत ढ ही कन्नड मध्ये लिहिला जातो.

१४९, १५०, १५१.

**कन्नड– तेलगु– ण**

आ. १४९ मल्ल्याळम् तामिळ ग्रंथलिपि प्रकरणांतील आ. २०३ आहे. तेथें टिंबांनीं दाखविलेला भाग वाढविल्यावर १५० हा कन्नड व तेलगु ण होतो. १५१ मध्यें तोच डावीकडील खालचें अर्धवृत्त संक्षिप्त करून लिहिला आहे.

१५२. १५३. १५४, १५५, १५६

**कन्नड तेलगु त**

आ. १५२ मध्यें त चा मौलिक उम्दव दाखविला आहे. १५२ चें डावीकडील वरचें वृत्तार्ध सोडून १५३ मध्यें टिंबांनीं दाखविलेली

रेषा केल्यावर १५४ हा कन्नड त होतो. १५२ चें डावीकडील वरचें वृत्तार्ध सोडून १५५ येथें टिंबांनीं दाखविलेली शिरोरेषा आणि टिंबांनीं दाखविल्याप्रमाणें वळवून डावीकडे कुण्डल भाग रेषा केल्या असतां १५६ हा तेलगु त होतो. तेलगुमध्यें याप्रमाणें दोन्हीं बाजूस कुण्डलाकार करून घृष्टलेखनानेही त लिहिला जातो.

१५७, १५८, १५९, १६०, १६१, १६२
१६३, १६४, १६५, १६६, १६७, १६८
१६९, १७०. १७१, १७२

### कन्नड तेलगु थ, द, ध

आ. १५७, १५८, १५९ मध्यें चित्रविभागात दाखविलेला भाग देवनागरी थ, द आणि ध मध्यें समान आहे; तो दाखविला आहे. त्यानुसार आ. १६० मध्यें द लिहिला आहे. १६० मध्यें टिंबांनीं दाखविलेला भाग वाढविल्यावर मराठी मोडी द होतो. एवढा मोडी भाग थ, द, ध मध्ये समान मधें घेऊन आहे आ. १६० समपातळीवर लिहून आ. १६१ मध्यें १५७ मधील वरची कुण्डली बिन्दुरूपानें खाली एक महाप्राण चिन्ह दिल्यावर १६१ हा कन्नड थ होतो. महाप्राण चिन्ह विरहीत थ ही कदम्ब ते कळचूरी राजांचे लेखांत कन्नडमध्यें कोठें कोठें आढळतो. १६० मात्र लिहून शिरोरेषा दिल्यावर १६२ हा कन्नड द होतो. त्याला खाली महाप्राण चिन्ह दिल्यावर १६३ हा कन्नड ध होतो. शिरोरेषा वगळतां कन्नड व तेलगु थ, द, ध सारखेच आहेत. आ. १६१, १६२, १६३ अनुक्रमें कन्नड थ, द, ध व १६४, १६५, १६६ तेलगु थ, द, ध अनुक्रमे आहेत. थ मध्यें कुण्डली बिन्दुमध्यें येण्याची प्रक्रिया १६९–१७० मध्यें दाखविली आहे. थ मधील १ एवढा भाग रेषेशीं मिळवून घेतला व मात्रा संक्षिप्त करून खालीं महाप्राण चिन्ह म्हणून वापरली. आ. १७१–१७२ मध्यें अशोकलिपि प्रकरणांतील १३२ घेऊन उपपत्ति दिली आहे. दोहोंपैकीं जी योग्य असेल याचा विद्वानांनी विचार करावा. देवनागरी 'ध' ला भूमिसमांतर चित्रविभागात दाखविल्याप्रमाणें करून टिंबांनीं दाखविलेला भाग जोडल्यावर कन्नड ध बनतो असेंही म्हणतां येईल. म्हणजे प्रधाने सम्प्रत्ययही होईल.

१७३, १७४, १७५, १७६, १७७

### कन्नड तेलगु न

आ. १७३ मध्ये टिंबांनी दाखविलेला देवनागरी न चा भाग सोडल्यावर १७४ होते. तिच्यांतील रेषा वक्राकार लिहून १७५ मध्यें टिंबांनीं दाखविलेली शिरोरेषा केल्यावर १७६ हा कन्नड न होतो. १७५ ला तेलगु न पद्धतीनें शिरोरेषा दिल्यावर अक्षराचे डोक्यास चिकटून लिहिली जाते. तेलगु स, न सारखाच असल्यानें फरक करण्यासाठीं तेथें शिरोरेषा अक्षराचे डोक्यास न चिकटता लिहिली जाते.

१७८, १७९, १८०, १८१.
१८२, १८३, १८४, १८५.

### कन्नड तेलगु प

आ. १७८ मध्यें नागरी व अशोकलिपि प चा पूर्वोक्त मौलिकोभ्दव दाखविला आहे. १७९ मध्यें प साठीं लागणारा भाग वेगळा लिहिला आहे. आ. १७९ संकुचित केल्यावर १८० होते. १८० चे डावीकडील दोन भाग एकस्तरीय भूमिसमांतर सारखे करून उजवी-कडचा भाग टोपीप्रमाणें मध्यभागीं वर ठेवल्यावर १८१ होते. १८१ मध्यें १८२ टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग केला असतां १८३ हा कन्नड प होतो. १८१ चा केवळ खालचा भाग घेऊन १८४ मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग केल्यावर १८५ तेलगु प होतो. तेलगु प आणि व सारखाच असल्यानें, फरक करण्यासाठीं प मध्यें शिरोरेषा अक्षराचे डोक्यास न चिकटतां लिहिली जाते व मध्यें ती चिकटून लिहिली जाते–

### कन्नड – तेलगू फ

१८६ १८७

आ. १८६ कन्नड फ आहे. व आ. १८७ तेलगु फ आहे. हें दोन्हीं त्यांच्या त्यांच्या प ला खालीं महाप्राण चिन्ह देऊन बनतात. अथवा खालीलप्रमाणें देवनागरी फ पासूनही कन्नड व तेसगु फ घृष्टलेखनानें करितां येतात, त्यायोगें " प्रधाने सम्प्रत्यय " ही होतो.

1, 2, 3, 4, 5, 6, 7,

### देवनागरी पासून कन्नड तेलगु फ.

आ. 1 मध्यें फ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. व 2 मध्यें 1 मधील क्रूस व डावीकडील वृत्तार्ध संकुचित करून लिहिली

आहेत. २ मधील वृत्तार्धाची स्थिती बदलून ३ व ५ मध्यें लिहिलीं आहेत, व टिबांनीं वाढविण्याचा भाग दाखविला आहे. ३ पासुन शिरोरेखा देऊन व सरळ लिहिलेल्या उजव्या खालच्या वृत्तार्धानें महाप्राण चिन्ह बनवून वरची टोपी सोडून 4 तेलगु फ होतो. 5 यथादर्शित जोडून भूमि समांतर करून, सरळ लिहिलेल्या उजव्या खालच्या वृत्तार्धानें महाप्राणचिन्ह करून, 6 मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषा भाग वाढविला असतां 7 हा कन्नड फ होतो. अथवा महाप्राणचिन्ह विरहित ( = खालची उभी रेषा नसलेला ) फ मौलिक उद्भवांतील अशोक लिपि फ पासून खालील प्रमाणें घृष्टलेखनांने बनतो, असाही फ कन्नड मध्यें कोणीं कोणीं लिहितात– ( पहा– कन्नड लिपिय उगममत्तु विकास पृ. ८३ )

1, 2, 3, 4, 5.

प्रक्रिया सुलभ आहे. बिन्दु स्फोटनांत अशोकलिपि ' फ ' होण्याविषयीं ही प्रक्रिया साक्ष आहे.

१८८.

### कन्नड–तेलगु ब

आ. १८८ कन्नड व तेलगु ब आहे. मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि प्रकरणांतील आ. २६० पासून तो बनतो. प्रक्रिया पूर्व वर्णित आहे.

१८९, १९०

### कन्नड तेलगु भ.

आ. १८९ मध्यें कन्नड व १९० तेलगु भ आहे, आपापल्या ब ला खालीं महाप्राण चिन्ह देऊन ते बनतात. अथवा खालील प्रमाणें देवनागरी भ पासूनही ते बनूं शकतात, म्हणजे " प्रधाने सम्प्रत्यय " ही होतो.

1, 2, 3, 4, 5, 6, 7(अ), 7(ब).

### देवनागरी पासून कन्नड तेलगु भ

1 मध्यें छित्वा कुंचन न करता मात्रा स्पृष्टा कुञ्चनानें जोडून भ लिहिला आहे. त्याला अनुसरून 2 मध्यें देवनागरी भ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. 2 मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग वाढवून सफाईनें सलगपणें लिहिल्यावर 3 होते. अशा प्रकारानें भ लिहिलेला कन्नड मध्यें कोठें कोठें आढळतो. 4मध्यें पूर्वोक्त दुसऱ्या प्रकारचा देवनागरी भ लिहिला आहे. त्याचे 5 मध्ये टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग जोडून घृष्टलेखन केल्यावर 6 होतें. 6 ला आपापल्या पद्धतीनें शिरोरेखा देऊन 7 (अ) कन्नड व 7 (ब) तेलगु भ होतात.

१९१, १९२, १९३, १९४, १९५
१९६, १९७, १९८, १९९, २००
२०१, (1) (2)

### कन्नड तेलगु म,

आ. १९१ मध्यें देवनागरी म चा मौलिक उद्भव दाखविला आहे. १९१ चा १९२ येथें टिंबांनीं दाखविलेला भाग सोडून दिल्यावर आणि डावीकडील खालचा भाग तिरका वर उचलून लिहिल्यावर १९३ होते. १९३ चे सर्व भाग एका स्तरावर लिहिल्यावर १९४ होते. १९४ चा डावीकडील खालचा लांबट कुंडल भाग गोलाकार लिहिल्यावर आणि शिरोरेषा दिल्यावर १९५ होते. १९५ चा कुण्डल भाग वर उचलून लिहिल्यावर १९६ कन्नड म व तेलगु शिरोरेखेने १९७ तेलगु म होतो. १९४ मधील डावीकडील खालचा कुण्डल भाग लहान करून लिहिल्यावर १९८ होऊन १९९ प्रमाणें म होतो, असाही म कोणीं कोणीं कन्नडमध्यें लिहितात. १९६ वा १९९ च्या कुण्डल भागांतील वरचें अर्ध सोडून दिल्यास २०० व २०१ प्रमाणें म बनतात. आ. १९६ येथील डावीकडील कुण्डल भाग तोडून, तुटक लिहिल्यावर ( 1 ) बनते. ( 1 ) मधील तुटक लिहिलेला कुण्डल भाग गुंडाळून ( 2 ) बनते. ( 2 ) पासून २०० बनते.

२०२, २०३, २०४

### कन्नड तेलगु य

आ. २०२ मध्ये मल्ल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि प्रकरणांतील आकृति २८९-ते २९१ मधील पूर्व दर्शित प्रक्रियेनें आलेलें य चें रुप घेतलें आहे. त्यालाच एका पातळीवर गोल गोल लिहून आपापल्या पद्धतीची शिरोरेखा देऊन २०३ कन्नड व २०४ तेलगु य बनतो.

२०५, २०६, २०७, २०८, २०९

### कन्नड तेलगु र

आ. २०५ मध्यें देवनागरी र भूमि समांतर लिहिला आहे. २०६ हा २०५ चां च मधला गांठीचा भाग आहे. त्याला २०७ प्रमाणें करून कन्नड पद्धतीची शिरोरेषा दिल्यावर २०८ कन्नड व २०९ तेलगु र बनतो.

२१०, २११

**कन्नड तेलगु ल**

मल्याळम् व तामिळ ग्रंथलिपि प्रकरणांत वर्णित आ. ३०३ व ३०५ याच वर अनुक्रमे २१० व २११ आहेत. २१० तेलगु ल आहे. २११ कन्नड ल आहे.

२१२, २१३, २१४, २१५, २१६, २१७, २१८

**कन्नड तेलगु व**

आ. २१२ देवनागरी व आहे. त्या मधील सोडावयाचा भाग तिथेंच टिंबांनी दाखविला आहे. उरलेल्या भागांतील आडव्या दोन वक्र रेषांपैकी वरची लांब व खालची आखूड केल्यावर २१३ आणि वरची आखूड व खालची लांब केल्यावर २१५ होते. २१३ ला २१४ प्रमाणें लिहिल्यावर तोच कन्नड व होतो. आ. २१५ पासून कुण्डल गोलाकार करून वक्र लिहिल्यावर २१६ हा कन्नड व होतो. असाही कोणीं कोणीं लिहितात. २१४ ला तेलगु पद्धतीची शिरोरेषा दिल्यावर २१७ हा तेलगु व होतो, तेलगु प शी फरक करण्याकरितां शिरोरेषा अक्षराचे डोक्यास चिकटून लिहिली जाते. २१४, २१६ मधील कुण्डलाचा वरचा भाग तोडून गुंडाळून होणारा २१८ असाही कन्नड मध्यें लिहिला जातो.

२१९, २२०, २२१, २२२, २२३, २२४

**कन्नड तेलगु श**

आ. २१९ देवनागरी श आहे. २२० मध्यें २१९ मधील डावीकडील खालची रेषा आडवी करून मात्रे मध्यें जोडून मात्रा रेषेचा टिंबांनीं दाखविलेला भाग सोडावयास सांटितला आहे. या प्रमाणें होणाऱ्या आकृतीवर कन्नड पद्धतीची शिरोरेखा देऊन २२१ हा कन्नड श आणि तेलगु पद्धतीची शिरोरेखा देऊन २२२ हा तेलगु श होतो. २२१ मध्यें दाखविल्या प्रमाणेंही कन्नडमध्यें श लिहिला जातो. बिन्दुस्फोटनां-तील डावीकडील वरच्या वृत्तार्धाचें वरच्या टोंकास डावीकडील खालच्या वृत्तार्धाचें खालचें टोंक न जोडतां वरचें टोंक जोडून छित्वा कुञ्चन न करता डावी कडील खालच्या वृत्तार्धाचें खालचे टोंक मात्रा रेषेस खालच्या बाजूला जोडण्याची प्रक्रिया आ. २२३ मध्यें दाखविली आहे. मात्रा रेषा वक्राकार केल्यावर त्या पासून आ. २२४ हा कन्नड श होतो.

२२५, २२६, २२७

**कन्नड तेलगु ष**

आ. २२५ देवनागरी ष आहे– प काराचे पोटांत रेषा देऊन तो बनतो. तसेंच कन्नड व तेलगू यध्यें आहे. आ. २२६ कन्नड व २२७ तेलगु ष आहे. तेलगु मध्यें रेषा अक्षराच्या केवळ बाहेरील भागांतच दाखविली जाते.

२२८, २२९, २३०, २३१.

**कन्नड तेलगु स**

२२८ देवनागरी स आहे. २२९ मध्ये त्याला घड्याळाचे काट्याचे विरुद्ध दिशेने फिरवून आडवा पाडला आहे आणि मात्रेचे उजवी-कडील टोंक वर वळविलें आहे. मधली संक्षिप्त करून बिन्दुरूप ठेवल्यावर २३० हा कन्नड स होतो. मधली रेषा काढून टाकून मात्रा रेषा शिरोरेषेंत रुपांतरित केल्यावर २३१ तेलगु स होतो, तेलगु न शीं फरक करण्यासाठीं शिरोरेषा अक्षराचे डोक्यास न चिकटतां लिहिली जाते.

२३२, २३३, २३४, २३५, २३५ (अ), २३६, २३७

**कन्नड तेलगु ह**

आ. २३५ हा कन्नड ह आहे. व २३७ तेलगु ह आहे. कन्नड ह चे २३५ (अ) या प्रकारानें घृष्टलेखनही आढळतें. या दोघांची वर दाखविलेली प्रक्रिया प्रथम प्रकरणीं वर्णित आहे.

२३८, २३९, २४०, २४१, २४२

**कन्नड तेलगु ळ**

आ. २३८ मध्यें देवनागरी ळ दाखविला आहे. तो ल पासून बनतो असा तन्त्रशास्त्राचा सिद्धांत आहे. २३८ चे एक मोठा त्रुटित व एक लहान लांबट अत्रुटित असे दोन भाग करून उभी रेषा आडवी करून २३९ मध्यें शिरोरेषेंत मिळवून टाकली आहे. आ. २३९ उभी करून तेथे २४० मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग केल्यावर, आपापल्या पद्धतीनें शिरोरेषा देऊन २४१ कन्नड व २४२ तेलगु ळ होतात.

या प्रमाणें देवनागरी ही तन्त्रोक्त लिपि कन्नड व तेलगु मध्यें अन्तर्निहित आहे.

कन्नड मध्यें संस्कृतांत नसलेल्या उच्चारणाची अक्षरें नाहींत. कन्नडमधील ह्रस्व ए. ओ आणि ळ हे वेदांत प्रयुक्त होत असल्यानें संस्कृतांत आलेलेच आहेत.

---

प्रकरण ९ वे

# देवनागरी आणि सर्व भारतीय लिपींचा समन्वय

### सर्व भारतीय लिपीतील अ

या प्रकरणात देवनागरीचा गुजराती, गुरुमुखी काश्मिरी = (शारदा), बंगाली आणि उडिया या लिपींशी समन्वय कसा आहे. व त्यांचें एकरूपत्व कसें आहे हें पूर्व वर्णितांचा उल्लेख मात्रेकरून परामर्श सर्वांना एकत्र देण्यासाठीं घेतला आहे.

क, १, २, ३, ४, ५, ६, ७, ८,
९, १०, ११, १२, १३, १४, १५, १६

आ. ४ मध्यें बिन्दुस्फोटनांत देवनागरी अ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. आ. ५ देवनागरी अ, ३ अशोकलिपि अ, ८ तामिळ लोकलिपि अ, ९ तामिळ ग्रंथलिपि अ, १० मल्ल्याळम् अ, ११ देवनागरी हिन्दी अ, १२ काश्मीर शारदा अ, १३ गुरुमुखी अ, १४, १५ गुजराती अ, १६ उडिया अ, १ बंगाली अ, व २ कन्नड तेलगु अ आहेत. आ. ६ व ७ मध्यें प्रक्रिया दाखविली आहे. या सर्वांचे विस्तारानें विवरण पूर्वी झालें आहे.

१७, १८, १९, २०, २१, २२,
२३, २४, २५, २६, २७

### सर्व भारतीय लिपीतील आ

आ. १८ कन्नड व तेलगु आ, १९ अशोक आ, २१ तामिळ लोकलिपि आ, २२ तामिळ ग्रंथलिपि आ, २३ मल्ल्याळम् आ, २० देवनागरी आ, या सर्वांचे विवरण पूर्वी झालें आहे. आ. १७ बंगाली, २५ गुरुमुखी, २६ गुजराती, २७ उडिया आ आहेत. या सर्वामध्यें त्यांचे त्याचे लिपींतील अ लिहून त्यांचे उजवीकडे देवनागरी प्रमाणे एका उभ्या रेषेनें आकारमात्रा दिली आहे. आ. २४ काश्मीर ( = शारदा) आ आहे. त्या मध्ये आ. २१, २२, २३ प्रमाणें अशोक देवनागरी स्वपक्ष समुच्चयानें होणारी आकारमात्रा घेतली आहे. आ. १७, २५, २६, २७ मध्यें वापरलेली आकारमात्राच त्या त्या लिपीत बाराखडीत वापरली जाते.

२८, २९, ३०, ३१, ३२
३३, ३४, ३५, ३६, ३७
३८, ३९, ४०, ४१, ४३
४२, ४४, ४५, ४६, ४७ ४८, ४९, ५०

### सर्व भारतीय लिपीतील इ

आ. ३३ मध्यें देवनागरी इकाराचा मौलिक उद्भव दाखविला आहे. ३४ मध्यें तोच वेगळा लिहून दाखविला आहे. ३५ कन्नड व तेलगु इ ३६ तामिळ ग्रंथलिपि व मल्ल्याळम् इ, ३२ अशोकलिपि इ, ३७ तामिळ लोकलिपि इ आहे. या सर्वांचे विवरण पूर्वी झालें आहे. आ. ३०–३१ मध्यें काश्मीर (शारदा) इ दाखविला आहे. ३४ मधील खालची कोणांश रेषा सोडल्यावर तो बनतो. ३३ पासुन घेतलेला गुरुमुखी करितां आवश्यक अंश ४४ मध्यें वेगळा लिहिला आहे. ४४ ला २९ मध्यें टिंबांनीं दाखविलेला रेषाभाग केल्यावर २८ हा गुरुमुखी इ होतो. ३४ पासून घेतलेला बंगाली इ करितां आवश्यक अंश ३९ मध्यें वेगळा लिहिला आहे. ३९ मध्ये टिंबांनी दाखविलेल्या अस्पृष्टा कुञ्चनाचे स्पृष्टवा कुञ्चन केल्यावर ३८ चा खालचा भाग होतो. ३३ चा मात्रा भाग ४० मध्ये दाखविल्याप्रमाणें केल्यावर ३८ चा डोक्यावरील भाग होतो. यथे आ. ४० मध्ये टिंबांनी दाखविलेला रेषाभाग डावीकडे रेषेनें दाखविल्याप्रमाणें करून घेऊन ३८ चे डोक्यावर ठेवला आहे. याप्रमाणे होणारी आ. ३८ बंगाली इ. आहे.

आ. ३३ पासून घेतलेला उडिया इ साठी आवश्यक असणारा अंश ४३ मध्यें भूमिसमांतर आडवा लिहिला आहे. त्यामध्ये टिंबांनीं दाखविलेली रेषा वाढविल्यावर ४२ हा उडिया इ होतो. ४१ मध्यें तो सफाईनें लिहिला आहे. तेथील आडव्या भागातील अशी रेषा आ. ३३–३४ मधून येते, उरलेली उजवीकडील खालचे भागांतून निघून तिरकी वर डावीकडे जाऊन पुन्हा उजवीकडे वळणारा रेषाभाग या आकाराचा आ. ३३ मधील मात्राभाग आहे, उरलेला वक्र रेषाभाग उडिया लिपीचा शिरोरेषानीं भाग आहे.

आ. ४५ मध्ये आ. ३४ चा गुजरातीसाठीं लागणारा रेषाभाग वेगळा लिहिला आहे, वरच्या टिंबांनीं सोडावयाचा भाग दाखविला आहे. खालच्या टिंबांनीं दाखविलेल्या भागांतील अस्पृष्टवा कुञ्चनाचें स्पृष्टवा कुञ्चन करून कोणाचें अर्धवृत्त केल्यावर ४६ होते. तिच्यात टिंबांनीं

दाखविलेला भाग वाढविल्यावर आ. ४७ होते. ४८ मध्यें आ. ३३ मधील मात्राभाग लिहिला आहे. ४७ चे उजवीकडे तो ठेवून ४९ मध्यें दाखविल्याप्रमाणे केल्यावर ५० हा गुजराती इ होतो.

बाराखडीमध्यें ह्रस्व इकारान्त व्यञ्जन लिहितांना बंगाली, गुरुमुखी, गुजराती व उडियां मध्यें देवनागरी प्रमाणेंच ह्रस्व इकार-मात्रा लिहितात.

५१, ५२, (क) ५३, ५४, ५५, ५६
५७, ५८, ५९, ६०, ६१, ६२
६३, ६४, ६५, ६६, ६७, ६८, ५२ (ख)

## सर्व भारतीय लिपीतील 'ई'

आ. ५६ मध्यें दीर्घ ई चा मौलिकोद्भव दाखविला आहे. ५७ मध्यें तोच वेगळा लिहिला आहे. ५८, "**ईकारः पञ्च बिन्दुर्वै**" या वचनानुसार अशोकलिपि ई होऊं शकेल. आ, ५९, ६०, ६१, ६२, ६३ हे क्रमानें तामिळ ग्रंथलिपि, तामिळ लोकलिपि, कन्नड, तेलगु, व मल्ल्याळम् ई आहेत. यांचें सर्वांचे वर्णन पूर्वी झालें आहे.

आ. ५५ गुरुमुखी ई आहे. तो गुरुमुखी इकारांत ५६ प्रमाणें मात्रा देऊन होत आहे. ५३ व ५४ काश्मीर (= शारदा) ई आहे. काश्मीर इ सरळ अथवा कुञ्चित रेषारूपानें खालीं डावीकडे वळवून लिहून त्यावर दोन बिन्दु देऊन तो बनत आहे. ५२ (क) गुजराती आहे. तो गुजराती ह्रस्व इ लिहून डोक्यावर आणखी एक रेषा जोडून होतो. त्याची प्रक्रिया ५२ (ख) मध्यें दाखविली आहे. ५१ उडिया ई आहे. उडिया ह्रस्व इकारास दीर्घत्वद्योतनार्थ आणखी एक मात्रा जोडून तो बनतो. दोन मात्रा वगळून उरणारा भाग शिरोरेषा होय. आ. ६४ ते ६८ बंगाली ई आहे. ६४ मध्यें आ. ५७ चा तीन कोण असणारा वरचा भाग लिहून उरलेला भाग टिंबांनीं दाखविला आहे. हा टिंबांनीं दाखविलेला भाग वर्णोद्धार तन्त्रवचनांत '**अधोगता कोणशीर्षा**' या पदांनी सांगितला आहे. म्हणून शीर्ष वर असलें पाहिजे असें पत्करून ६५ मध्यें टिंबांनीं दाखविल्यानुसार तो कोणभाग उलटा करून वर घेतला व उरलेला ह्रस्व इ प्रमाणें केला आहे. त्या नंतर '**कुञ्चिता दक्षतः शुभा**' या पदानुसार उजवीकडे वळविल्यावर आ, ६६ होते. त्यालाच वरच्या मात्रेसकट लिहिल्यावर आ. ६७ बंगाली ई होतो. या प्रकारानें मात्रा बंगाली ह्रस्व, दीर्घ दोन्ही इकारांत दिली जाते. म्हणून (**बिन्दुद्वयारूढत्व**) हें दीर्घाचें लक्षण समजून येत नाहीं. या करिता आ. ६८ मध्यें दाखविल्या प्रमाणें दीर्घ ईकार लिहून अवस्थान भेदानें तें दाखविलें जातें. अर्थात बंगाली दीर्घ इकारांत ह्रस्वा पेक्षा अधिक असणाऱ्या भागांत अथवा वेगळ्या धर्तीनें लिहिलेल्या भागांत बिन्दुद्वयारूढत्व आहे. असें समजलें पाहिजे. तान्त्रिक प्रयोगांतही बिन्दु अवयवयमात्र न लिहितां रेषा स्वरूपांत लिहिणारे लोकही त्या त्या कार्यांत रेषेचे ठिकाणीं बिन्दुचेंच अनुसंधान करितात. बंगाली, उडिया, गुरुमुखी, गुजराती या लिपींत ईकारान्त व्यञ्जनास नागरी प्रमाणेंच मात्रा बाराखडींत वापरली जाते.

६९, ७०, ७१, ७२, ७३, ७४
७५, ७६, ७७, ७८, ७९, ८०

## सर्व भारतीय लिपीतील उ

आ. ७४ मध्यें देवनागरी उ चा मौलिक उद्भव दाखविला आहे. ७५ मध्ये तोच वेगळा लिहिला आहे. ७६ मधील तीनही अशोक-लिपि उ आहेत. ७८ कन्नड, ७९ तेलगु उ आहेत. ७७ हा तामिळ ग्रंथलिपि, लोकलिपि व मल्ल्याळम् उ आहे. या सर्वांचे विवरण पूर्वी झालें आहे.

आ. ८० उडिया उ आहे, त्यामध्यें देवनागरी उ चें वरचें अर्धवृत्त सरळ रेषारुपानें तिरकें लिहून अक्षरांच्या खालच्या टोंकापासून सुरू होणारी उडिया पद्धतीची शिरोरेषा दिली आहे. आ. ७५ काश्मीर उ आहे. मद्रास गव्हर्मेंट म्युझियम बुलेटिन मध्यें याचे डोक्यावर एक टिंब दाखविले आहे. ७३ गुरुमुखी उ आहे. त्यामध्ये आ. ७५ लिहुन त्याचे खालचें टोक डावीकडून फिरवून वर डोक्याजवळ घेतलें आहे.

आ. ७२ गुजराती उ आहे. त्यामध्येंही रेषा डावीकडे फिरवून डोक्यापर्यंत नेली जाते. वस्तुतः हे सर्व देवनागरीचें घृष्टलेखनच अस-ल्याचें स्पष्ट दिसत आहे. आ. ७१ बंगाली उ आहे. त्याकरितां ७५ चें वरचें अर्धवृत्त सरळ रेषा करून स्पृष्टा कुञ्चनाचें अस्पृष्टवा कुञ्चन केलें आहे. पुढे त्या कुञ्चन भागास आ. ७१ मध्यें दाखविल्याप्रमाणें डावीकडून उजवीकडे तिरकी पुढें उजवीकडून डावीकडे वळवून डोक्याजवळ लिहिलें आहे, आणि डोक्यावर इकाराप्रमाणें मात्रारेषा शिखारेषा जोडली आहे. एवढे केल्यावर ७१ हा बंगाली उ बनतो.

**शब्दकल्पद्रुमांत उद्धृत केलेल्या वर्णोद्धार तन्त्रांच्या वचनात उकाराचे डोक्यावर शिखारेषा सांगितलेली नाहीं. बंगालीमध्ये ती बंगाली ड शी फरक करण्याकरितां दिली जाते किंवा कसे याचा विचार लिपि समालोचकांनीं करणे जरूर आहे. याचे वरूनच वर्णोद्धार तन्त्र केवळ वङ्गक्षर प्रतिपादनार्थ नाही असेही म्हणता येईल याविषयी स्वतंत्र प्रकरणात पुढे विचार केला आहे. हा सर्वच विषय विद्वानांनी विचारास घ्यावा.**

पावर्तलिपि ५३) पादलिखितलिपि ५४) द्विरुत्तरपदसंधिलिखितलिपि ५५) दशोत्तरपदसंधिलिपि ५६) अध्याहारिणीलिपि ५७) सर्वरुत्संग्रहणीलिपि ५८) विद्यानुलोमलिपि ५९) विमिश्रितलिपि ६०) ऋषितपस्तप्तलिपि ६१) धरणीप्रेक्षणलिपि ६२) सर्वौषधनिष्यंदलिपि ६३) सर्वसारसंग्रहणीलिपि व ६४) सर्वभूतरुद्ग्रहणीलिपि.

Bhudhist Sanskrit Text No. 1 Editor Dr. P. L. Vaidya 'ललितविस्तर' Maithil Institute Darbhanga सन १९५८ या प्रतीत 'कनारीलिपि' आढळत नाही. मित्र यांचे प्रतींत किनारी आणि Lefmann वरून वैद्यांनी घेतलेला पाठ 'किरातलिपि' आहे.

यापैकी तन्त्रोक्त अठरा व्यष्टिलिपि कोणत्या याचा निश्चय करता येत नाहीं. कारण ललित विस्तर, सर्वज्ञ म्हणून बुद्धदेवांचे चरित्र वर्णन करण्यासाठीं रचलेला आहे. व्यष्टिसमष्टि मोजण्याकरिता नाही.

### प्रकरणाची भूमिका

प्रस्तुत ग्रंथात भारतात ज्या लिपींना विशिष्ट प्रदेश आहेत आणि ज्यांची प्रमुख भारतीय लिपीत आज गणना होते अशा प्रचलित अकरा लिपींचा व प्रचलितांपैकी अशोकलिपीचा विचार केला आहे, यापैकीं व्यष्टिलिपि कोणत्या व समष्टिलिपि कोणत्या हे कळावयास काही मार्ग नाहीं. तथापि एवढ्यावरून बुद्धिमंतास सर्व लिपींचे उपपादन करतां येईल. आता या प्रकरणांत लेखन प्रकाराविषयी वरील प्रतिपादनाच्या अनुरोधाने काही महत्वपूर्ण विचार मांडावयाचा आहे.

### बालबोध आणि घृष्ट

मुख्यत: लेखनाचे बालबोध आणि घृष्ट असे दोन प्रकार आहेत. बालबोध म्हणजे ज्या बालकाला ज्या प्रकारे लिपिलेखन प्रथम शिकविले जाते तो लिपिलेखनप्रकार त्या बालकाचे दृष्टीने बालबोध होय. (येथे वापरलेला बालबोध शब्द केवळ मराठीच सांगणारा नसून या केलेल्या व्याख्येप्रमाणें व्यापक अर्थानें घ्यावा.) अशी बालबोधलिपि शिकविल्यावर लिहितांना जेव्हा तो बालक घृष्टलेखनानें लिहितो तेव्हा त्या लेखन प्रकारास 'घृष्ट' म्हणतात. जगात सर्वत्र अशा रीतीचे घृष्टलेखन आपल्या मनाप्रमाणें केलेले दिसून येतें. जरी वेगवेगळ्या व्यक्तींचे बालबोध लिखाणांत अथवा एकाच व्यक्तीच्या वेगवेगळ्या वेळी लिहिलेल्या बालबोध लिखाणात सूक्ष्म असा फरक पडताना दिसतो. तरी विवक्षित मर्यादेपर्यंत हा फरक पत्करूनही त्या लिखाणास बालबोध असेच म्हटले जाते. बालबोध म्हणून ओळखण्यास कठीण होऊ लागल्यावर त्याचा घृष्टलेखनात अंतर्भाव होतो. या दोहोंची अशा प्रकारची सीमारेषा लिपिशास्त्रानुसार आहे.

### घृष्टलेखनाची अप्रत्यक्ष वाढ

जरी सर्वत्र सुंदर व सुवाच्य लिहावे असा सर्वसंमत व सर्वस्वीकृत पायंडा असला, तसेच मुद्रण टंकलेखन वगैरेद्वारा बालबोधाचा व्यापकप्रसार असला तरी घृष्टलेखन व हाताने लिहिणे मुळींच नाहींसे झालेलें नाहीं. घृष्टलेखनाची उदाहरणे डॉक्टरचे प्रिस्क्रिप्शन, कारकुनी लेखन, कॉलेज विद्यार्थ्यांच्या क्लासनोट्स्, सही करणें वगैरेमध्यें आजही सर्वत्र दृष्टीस पडतात. मुद्रण, टंकलेखन वगैरेमध्यें प्राधान्याने बालबोध स्वीकृत असले तरी यंत्राचे सौकर्यार्थ बालबोधाचे मूळ स्वरूपातच बदल करण्याची वृत्ति वाढून अप्रत्यक्षत: घृष्टलेखनाची आज वाढ होऊ लागली आहे. उदाहरणार्थ मुद्रणामध्यें शङ्कर याचे ठिकाणीं सर्रास शंकर असे छापले जाते. टंकलेखनात की बोर्डचे सुलभ उपयोगार्थ कार्य, अर्थ, धर्म वगैरे शब्द मराठी मान्य टंकयंत्रात कार्‍य, अर्‍थ, धर्‍म असे टंकित होतात. वाचकांच्या सोयीकरिता येऊन आता ही यंत्रे स्वत:चे सोयीसाठी बालबोधाचे मूळ स्वरूपांत बदल करू लागली आहेत.

घृष्टलेखनामध्ये लिपि वेगळी बनविली जात नाहीं. परंतु खालील उद्देश साधण्याकरितां तीच लिपि कमी अधिक करून वापरण्यात येतें. ते उद्देश– १) दुर्ज्ञेय म्हणजे जाणण्यास कठीण करणें २) गूढ करणें ३) मूळ आच्छादित करणें ४) वैलक्षण्यानें भिन्नताभास उत्पन्न करणें ५) जलद लिहिणें ६) इतरासाध्य म्हणजे दुसऱ्याला अनुकरण करण्यास असाध्य करणें ७) रुबाबदारपणा, रेखीवपणा व लपेट वाढविणें इत्यादि होत.

### लिपिलेखनाचे ८ प्रकार

पुढीलप्रमाणें वर्गीकरण केल्यास एकंदर लिपिलेखनाचे आठ प्रकार आहेत. १) विकल्प २) कलाशिल्प ३) नियतघृष्टता ४) त्वराघृष्टता ५) न्यून ६) अधिक ७) द्रष्टृस्थानदिग्दृष्टिभेदवत्. ८) बिन्द्वङ्कित

विकल्प म्हणजे बालबोध शिक्षणापासून, जसें वर्णोद्धार तन्त्रापासून येणारे एकाच लिपीचे अनेक प्रकार उदाहरणार्थ भ, र, आणि झ यांचे पूर्वी सांगितल्या प्रमाणें दोन प्रकार, कलाशिल्प म्हणजे वृक्ष, लता, पशु, पक्षी, वगैरेंचे रूपाने अक्षरांचें कलायुक्त लेखन. आधुनिक लिपिसमालोचकांत प्रसिद्ध असणारी चित्रलिपि अथवा पिक्टोग्राफी ही नव्हे. कलाशिल्प म्हणजें कलाकारांनीं वर दिल्याप्रमाणे सजविलेली वर्ण

लिपीच आहे. नियत घृष्टता म्हणजे एकाद्या लिपीचें घृष्टलेखन होऊन, तें घृष्टलेखन हाच एक लिपि प्रकार म्हणून निश्चित रूपाने रूढ होणे उदाहरणार्थ देवनागरी बालबोध पासून मराठीं मोडी हा नियतघृष्ट प्रकार बनला आहे. तन्त्रोक्त मूळ लिपीपासून, झालेल्या सर्व प्रधान भारतीय लिपी नियतघृष्ट या प्रकारांतच मोडतात. त्वराघृष्टता म्हणजे जलद लिहिण्यासाठीं केलें जाणारें घृष्टलेखन उदाहरणार्थ सही, अन्यान्य लिपींचें धावतें लेखन वा जोडलेखन. न्यून म्हणजे बालबोध लेखनांतील काही भाग कमी करणे व अधिक म्हणजे बालबोध लेखनांत काही भाग वाढवून लिहिणें. बिन्द्वङ्कित म्हणजे बिन्दूनीं बनणारा लिपिप्रकार उदाहरणार्थ अशोक लिपींतील ' इ,' विजेचें रोषणाईत दिव्यांनीं बनविलेलीं अक्षरें, द्रष्टृस्थानदिग्दृष्टिभेदवत् म्हणजे पाहणाऱ्याचें स्थान, पाहणाऱ्याची दिशा व दृष्टीमुळें होणारे वेगवेगळे लिपिप्रकार–यां पैकीं शेवटचे चार प्रकार घृष्टलेखनांत अधिक उपयोगांत येतांना दिसतात, चित्रकला, शिल्पकला वगैरे मध्यें वरील सर्व प्रकारांचें फार महत्त्व आहे.

### घृष्टलेखनाची व्याख्या

घृष्टलेखन म्हणजे एकाचें अनेक करणें, अनेकांचें एक करणें, दूरच्यास जवळ आणणें, जवळच्यास दूर करणें, सुलटयास उलटें करणें उलटयास सुलटे करणें, लहानाचें मोठे करणे, मोठयाचें लहान करणें, अपूर्णाचें पूर्ण करणे, पूर्णाचें अपूर्ण करणें, वक्राचे सरळ करणें, सरळाचें वक्र करणें, अधिक रेषाभाग करणे, रेषाभाग कमी करणें, वगैरे विविध प्रकारची प्रक्रिया होय.

### घृष्टलेखनांतील कुञ्चनाचे प्रकार

या प्रमाणेच घृष्टलेखनांत कुञ्चितत्व अथवा कुब्जितत्वाचे तीन प्रकार ध्यानीं घेतले पाहिजेत. १) अस्पृष्ट्वा २) स्पृष्ट्वा ३) छित्वा. हे प्रकार चित्रविभागांत १, २ व ३ आकृतींत दाखविले आहेत. या सर्वांचा विचार पूर्वार्धातील शास्त्रार्थ प्रकरणात केला आहे. याचे चित्रविभागात दर्शित भेद करून घ्यावेत. पूर्वार्धांतील प्रकरणांतून यांचा वापर दाखविलाच आहे. कांहींवेळा घृष्टलेखनात स्वतःच लिहिलेलें स्वतःलाच वाचतां न येण्याची स्थिति उद्भवत असली तरी मूळ लिपीपासून वेगळी लिपी झाली असें समजलें जात नाहीं. ' चतुरःसखि ते भर्ता तल्लिखितं यत्परो न वाचयति । तस्मादप्यधिको मे स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति ॥ '

असें एक प्रसिद्ध विनोदी वचन या संदर्भात आहे. कवायत, नृत्य, क्रीडा, व्यायाम, कसरत, योगासने, वगैरे करितांना एकच व्यक्ति आपले हातपाय वेगवेगळया स्थितीत ठेवून ते ते प्रकार करते परंतु त्यामध्ये ते करतांना व्यक्ति वेगळी आहे असें समजलें जात नाहीं. तसेंच घृष्टलेखनाबद्दलही आहे. मूळ लिपीपासून घृष्टलेखन वेगळे समजले जात नांही' याच अभिप्रायानें कन्नड लिपिय उगम मत्तु विकास या पुस्तकात डॉ. ए. वि. नरसिंह मूर्ति म्हणतात ' ओंदु निर्दिष्ट अक्षरवन्नु वैयक्तिक अभिरुचिगे तक्कन्ते अळवडिसिकोंडु मूलतः बदलावणेगळन्नु माडदे बरेयबहुदु पृ. ३८.

---

प्रकरण १२ वे

# लेखनाच्या प्रकारभेदाची कारणे

" कोणतेही अक्षर आपल्या वैयक्तिक अभिरुचीला साजेल तसे बदलून मूलात बदल न करता लिहिता येते. "

जेव्हा एकादा वर्ग अथवा समाज एकाद्या धृष्टलेखनप्रकारास आपल्यापुरता नियत करून घेतो आणि त्याच प्रकारांचें आपल्या बालकांना प्रथम शिक्षण देतो, तेव्हां त्या धृष्टलेखन प्रकाराला त्या वर्गाची अथवा त्या समाजाची लिपि असें म्हटलें जातें, आणि त्या वर्ग वा समाजांतील बालकांकरितां तोच प्रकार बालबोध म्हटला जातो. नंतर त्याचें अनियत धृष्ट लेखन त्या बालकांकडून होणें सर्वसामान्य गोष्ट आहे.

### तन्त्रोक्त लिपीशी समन्वय अनिवार्य.

म्हणून ज्या ज्या भारतीय लिपींचा तन्त्रोक्त कार्याकरितां वापर केला जातो त्या त्या सर्व लिपींचा मीमांसेच्या यववराहाधिकरण न्यायानुसार तन्त्रोक्त लिपीशीं समन्वय असणें अनिवार्य आहे. बिन्दुस्फोटन = मूळांत वर्णोद्धार तन्त्रोक्त रेखाविन्यास न्यायमीमांसेनुसार श्लोकार्थ करून केल्यावर देवनागरी लिपिस्वरूप अधिक सुकरतेनें मिळतें. या तन्त्रोक्त लिपीचें धृष्टलेखनानें प्रमुख भारतीय लिपी बनत असल्याचें यापूर्वी दाखविलेंच आहे. वर्णोद्धारतन्त्रोक्त श्लोकांचा देवनागरीशीं समन्वयही तृतीय व चतुर्थ प्रकरणांत दाखविला आहे. हाच न्याय भारतीय लिपींचें मौलिक एकरूप दर्शनाचा प्रामाणिक आधार आहे.

### लेखनाच्या प्रकारभेदाचीं कारणें.

भारतीय लिपि अशोकलिपीपासून झाली असें मानणाऱ्या वा नागरीलिपीपासून झाली असें मानणाऱ्या दोन्हीं लिपिसमालोचकांनी परंपरा आग्रहपूर्वक रक्षण करणाऱ्या प्राचीन भारतीयांच्या लेखन पद्धतींत प्रकारभेद अथवा बदल कां घडून आला याचा छडा लावणें आवश्यक आहे. शिलालेख, नाणी, प्राचीन वस्तू वगैरेचे आधारे आधुनिक पुरातत्त्व अभ्यासकांनीं अशोकापासून आजतागायत एतद्देशीय व परदेशीय लिपींत अनेक प्रकारभेद दाखविले आहेत, त्या कालखंडांतील लिपी वाचण्याचा स्तुत्य प्रयत्नही केला आहे. अशोकाची ब्राह्मी लिपीही मध्यें बऱ्याच काळपर्यंत वाचतां येत नव्हती, तिचें वाचन व उलगडा केला. तथापि लिपींत प्रकार कां निर्माण झालें याची योग्य उपपत्ति अद्याप पावेतों पुढें आलेली नाहीं. प्राचीन भारतीय परंपरेतील संस्कृत भाषा संपूर्ण भारतात प्रायः एकाच प्रकारची सुरक्षित राहिली आहे, लिपींचें मात्र अनेक प्रकार झालें. असा प्रकारभेद होण्याचे कारण काय ? हा फरक मूळांतच फरक असल्यामुळें झाला कीं एकच मूळ असून कांहीं कारणाने त्यांत फरक होऊन प्रकार झाले या प्रश्नांचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे.

### आमचें मन्तव्य

या विषयींचा विचार बराच काळ विसरला ( उपेक्षिला ) गेला आहे. खालील प्रमाणांवरून एकाच मूळाला ठेवून कांहीं कारणानें अनेक प्रकार झाले असें म्हणावें लागतें–

१) वर्णोद्धारतन्त्र २) मीमांसेचा यववराहाधिकरणन्याय ३) या दोघांचे आधारें धृष्टलेखनाच्या पूर्वी सांगितलेल्या प्रक्रियेनें होणारें प्रत्यक्ष व उच्चारणसाम्य.

### न्यायकुसुमाञ्जलीतील लिपिविचार

जरी शॉर्टहॅंड व तत्सदृश लिपींचे बाबत त्या कोणत्याही प्रकारानें मूळाशीं एकरूपता न राखतां झाल्यां आहेत असें कोणीं म्हणेल तरीही अशा लिपी ' रेषा या ध्वनि सङ्केत असतात ' एवढ्या बाबतींतच पूर्वीचे लिपींचें आदर्शापासून प्रेरणा घेऊन बनविल्या गेल्या आहेत असें मानावेंच लागेल. या लिपींना उदयनाचार्यांनीं न्यायकुसुमाञ्जलींत ' आदर्शाभास 'म्हणजे आदर्शकल्पित म्हटले आहे. आदर्श–कल्पित म्हणजे पूर्वीच्या आदर्शावरून ऐक्यावाचून कल्पनेनें बनविलेल्या असा अर्थ आहे.

लिपींचे आदर्शरूप स्थिर करण्याचे अगोदर ' आधुनिक विकासवादाच्या रीतीनें कल्पित ' वगैरे अर्थ त्याचा नाहीं कारण उदयनाचार्य आधुनिक विकासवादी नाहीत. ईश्वरापासून सर्व सृष्टि झाली असें मानणारे व क्रमानें सर्व शक्ती आणि संप्रदायांचा ह्रास मानणारे ते आहेत ' जन्मसंस्कारविद्यादेः शक्तेः स्वाध्यायकर्मणोः ह्रासदर्शनतो ह्रासः संप्रदायस्य मीयताम् ' असें ते म्हणतात. त्यांचे मतें प्रथम लिपिरूपच ईश्वरसृष्ट, आदर्शरूप व स्थिर आहे. तें लिपिरूप नदीचे प्रवाहांतील घासून घासून निर्माण होणाऱ्या गोट्याप्रमाणें नव्हे. तें तसें झालें म्हणण्यास आधुनिक विकासवाद्यांजवळ काय पुरातत्त्व प्रमाण आहे. ?

### व्यष्टि व समष्टि लिपि

या व्यतिरिक्त ज्या मूळ रूपापासून बनतात त्यांना व्यष्टिलिपि आणि व्यष्टि लिपीपासून साक्षात् वा परंपरेनें मूळाशीं एकरूपता

ठेवून घृष्टलेखन प्रक्रियेनें बनलेल्या समष्टि-लिपि म्हटल्या गेल्या आहेत. अशा प्रमाणें व्यष्टिलिपि अथवा समष्टिलिपि न बनल्यास त्यांचा न्यायत: विधानांत वापर होऊं शकत नाही. या संबंधांत मीमांसेच्या यववराहाधिकरणाचें प्रमाण प्रथम प्रकरणाचें अंतीं दिलेंच आहे.

### लिपीच्या तीन सीमा

लिपीबद्दल नृत्य, चित्रकला वगैरेंचे न्यायानें मूळापासून बालबोध, घृष्ट आणि आदर्शकल्पित अशा तीन सीमा लेखकाचे अपेक्षेनुसार आहेत. 'बालबोध' म्हणजे काय हें 'लेखन प्रकार' या प्रकरणांत सांगितलें आहे. घृष्ट म्हणजे काय हें प्रथम प्रकरणांत व 'लेखन प्रकार' या प्रकरणांत सांगितलें आहे. आदर्शाभास 'आदर्शकल्पित' म्हणजे 'रेषा या ध्वनिसंकेत' आहेत एवढ्याच बाबतींत पूर्वींचे लिपींचे आधारास स्वीकारून मूळाशीं एकरूपता न ठेवतां बनणाऱ्या लिपि, या तीन सीमेंतच जगातील सर्व लिपींची शास्त्रीय गणना आहे.

### संस्कृत वर्ण व शब्दांचें बाबतींत विशेष

संस्कृत वर्ण व शब्दांचे बाबत 'साधु' 'असाधु' आणि 'न साधु न असाधु' अशा तीन सीमा आहेत. तिसरी सीमा–संज्ञा अनुकरण इत्यादि पुरतीच मर्यादित आहे. अभ्युदययोग्यता अथवा व्याकरणव्यञ्जनीयजाति यास 'साधुत्व' म्हणतात.

अनपभ्रष्टतानादि: यद्वाभ्युदययोग्यता ।
व्याक्रिया व्यञ्जनीया वा जाति: कापीह साधुता ।।
(भाट्टदीपिका–व्याकरणाधिकरण )

हे दोन्हीं ज्या मध्यें नाहीं तें 'असाधु' या सीमांचा विशेष विचार संस्कृत व्याकरणांत पहावा. वैयक्तिक ध्वनिभेदामुळें होणारें वैलक्षण्य 'साधु' या प्रकारांतील असून क्षम्य आहे. 'साधु' सीमेच्या बाहेर उच्चारणवैलक्षण्य झालें असतां त्याला 'साधु' असे म्हटलें जात नाहीं.

सर्वे सर्वार्थवाचका: असें मत आहे. पण सर्वे सर्वार्थसाधका: असें मत नाही. ही गोष्ट 'दैवी वाग्वव्य व कीर्णेयमशक्तैर भिधातृभि: या हरिकारिकेंत सांगितली आहे. याचा अर्थ संस्कृतेतर सर्व भाषा शुद्धोच्चारणास अशक्त लोकांनी संस्कृत भाषेंत बिघाड करून बनविल्या आहेत.

'प्रकृति: संस्कृतं तस्मादागतं प्राकृतम्' अशी प्राकृत शब्दाची व्युत्पत्ति केली गेली आहे. 'स्वाभाविक म्हणजे प्राकृत, त्याला व्याकरणानें संस्कार करून संस्कृत झालें.' इत्यादि आधुनिकांचे प्रतिपादन, प्राकृत व्याकरणास मान्य नाहीं. आधुनिकांचे प्रतिपादनानुसार, पूर्वप्राप्त प्रसिद्धीही नाहीं. व्याकरणानें भाषा व्याकृता होते असें म्हटलें गेलें आहे. 'संस्कृतावाक्' होणे सृष्टयारंभापासून संस्कृत भाषेंत स्वत: असतें. संस्कृतत्व म्हणजे 'अनाद्यनपभ्रष्टता, अभ्युदययोग्यता' म्हटले गेलें आहे. हें संस्कृतत्व कांहीं व्याकरणाने उत्पन्न होत नाहीं. तें संस्कृत भाषेंत अनादिसिद्धच असतें. व्याकरणाने भाषेला 'व्याकृतत्व' येतें. 'व्याकृतत्व' म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभागज्ञान. त्यानंतर ती अशक्तिमुळे असंस्कृता–प्राकृता–अपभ्रष्टा होते, असा सिद्धान्त आहे. भाषेचा प्रथम शिक्षक स्वत:सिद्ध शुद्ध संस्कृत बोलणारा आहे. येथे आधुनिकांप्रमाणें विकासवाद नसून ह्रासवाद आहे. व्याकृतत्व म्हणजे संस्कृतत्व नव्हे. पूर्वोक्त अर्थाशिवाय सम्यक्कृतत्व असा संस्कृत–शब्दाचा योगार्थ आपल्या कल्पनेनें केला तरी तो आरम्भापासून सम्यक्कृताला लागू होतच आहे, जीर्णोद्धार किंवा पूर्वी असम्यक् असणाऱ्यास सम्यक् करणें झालें तरच तो लागू होतो असें नाहीं. लौकिक व्यवहारांत देखील, आरम्भापासून सम्यक्कृत झाल्यास त्यालाही 'Well done ! well constructed from the begining' असे म्हणतात. निसर्गशोभा पाहूनही तिला सम्यक्सृष्टा म्हटली जाते. म्हणून नैसर्गिक सम्यक्कृतत्वाला घेऊन संस्कृतत्व योगार्थ समजावें. पूर्वोक्त परिभाषितार्थ व मन:कल्पित असणाऱ्या योगार्थ यांचे मध्ये याप्रमाणें फरक करितां येतो. संस्कृत भाषेची व्याकरण विषयक अशुद्धता कोठें कोठे आढळतें या संदर्भात एका श्लोकांत व्याकरण जाणणाऱ्यांनीं तडीपार करून दिलेलें अपशब्द, अशुद्ध प्रयोग वगैरे ज्योतिषी, नट, खुशमस्करे, गायक वैद्यक व्यवसाय करणारे यांचे वाणीचा आश्रय करतात असे विनोदार्थ सांगितले आहे.

वैयाकरणकिरातैरपशब्दमृगा: क्व यान्ति सन्त्रस्ता:
ज्योतिर्नटविटगायकभिषजां मुखगव्हराणि यदि न स्यु: ?

### उच्चारण विषयक विचार

याविषयी असे म्हणणे पुढे येणें शक्य आहे– 'अपि माषं मषं कुर्याच्छन्दोभङ्गं न कारयेत्' म्हणजे जरी माष शब्दाचे मष उच्चारण केले तरी चालेल पण छंदाचा भङ्ग होऊं देऊं नये. यावरून मूळ संमत उच्चारणाचें घृष्ट उच्चारण केलें तरी चालेल असें वाटतें पण तें तसें नाहीं. कारण या वाक्यांत 'अपि' असा शब्द असल्यानें त्याला विधिशक्ति नाहीं. अर्थात् छन्दोभङ्ग होणार नाहीं याची सर्व प्रकारची काळजी घेऊन रचना करावी इतकेंच सांगण्याकडे या वाक्याचें तात्पर्य आहे. सामगानामध्यें जें द्रुत अनुद्रुत वगैरे उच्चारण होतें तें विहित असल्यानें

' साधु ' या सीमेंत अनुमत आहे. तन्त्रोक्त मूळ लिपिस्वरूपापासून घृष्टलेखनानें इतर लिपि बनतात, तेथें तन्त्रोक्त मूळ अन्तर्निहित असल्यानें तान्त्रिक प्रयोगांत त्या त्या लिपींचा वापर मीमांसान्याय संमत आहे. म्हणून सर्पः असें लिहावयाचे ऐवजीं तामिळ भाषिकानें ग्रंथलिपीचा वापर करूनही (चित्रविभाग पहा) लिहिलें तरी तें न्याय्य आहे, विनियोगार्ह आहे. परंतु शब्दोच्चारणाचे विषयीं मात्र सर्पः यांचें साँप (हिन्दी) साप ( मराठी ) पाप ( तामिळ ) सर्पंट (इंग्लिश), वगैरे उच्चारणे न्याय्य ठरत नाहीं. कारण घृष्टलेखनाप्रमाणें असे घृष्ट उच्चारण व्याकरण-संमत होऊं शकत नाहीं. घृष्ट लेखनात जशी तन्त्रोक्त लिपि अन्तर्निहित असतें तसें घृष्ट उच्चारणांत व्याकरणोक्त उच्चारण अन्तर्निहित नसतें म्हणून चित्रकला, शिल्पकला वगैरेंचे नियम लेखनास लागू होतात. पण उच्चारणास होत नाहींत या करितांच उच्चारणाविषयीं हें प्रतिपादन प्रसंगवशात् विषयांतर पत्करूनही केलें आहे. कारण शब्दोच्चारण व लेखन यांची गल्लत होऊन अयोग्य निष्कर्ष निघूं नयेत.

## प्रकारभेदाचा आणखी विचार

यानंतर आतां तन्त्रोक्त मूळाचें घृष्टलेखनानें प्रकारभेद कां झाले याचा विचार करूं, या विषयीं कांहीं लिपिसमालोचक म्हणतात कीं लेखनसामग्री, लेखकाची आवडनिवड व लेखकावर असणारा अन्य कोणाचा प्रभाव वगैरे प्रकार भेदाचीं कारणें आहेत. यापैकी लेखन–सामग्री विषयींचा विचार आधुनिक लिपिचिंतकांनीं विस्तारानें केला असल्यानें त्याची पुनरुक्ति येथे करीत नाहीं. या संबंधीं भारतीय प्राचीन लिपिमाला ले. पं. गौरीशङ्कर ओझा आणि टायपोग्राफी ऑफ देवनागरी ले. बी. एस्. नाईक या ग्रंथातील लेखनसामग्री विषयक प्रकरणें जिज्ञासूंनीं अवलोकन करावीत. लेखन-सामग्रीस लेखनाच्या प्रकारभेदाचें प्रमुख कारण मानणें योग्य वाटत नाहीं, कारण अशोकाचे वेळेपासून सुरुवात करून छापखान्याचा प्रचार होईपर्यंत एकाचवेळीं अस्तित्वांत असणाऱ्या भूर्जपत्र, ताडपत्र, चर्मपत्र, पार्चमेंट, पॅपिरस, धातुपट्ट, अश्म-पट्ट वगैरे तसेच लोह लेखनी, मोरपीस, साळिंदरपीस, काष्ठशलाका, बांबू इत्यादि भारतात वापरल्या जाणाऱ्या लेखनसामग्रींत कांही फार मोठा फरक झाल्याचें आढळत नाहीं. म्हणून लेखनसामग्रीचें योगानें जरी कांहीं फरक झाला असला तरी ऐच्छिक शिरोरेषा, वळणदारपणा, लपेट वगैरे वगळता अन्य तन्त्रोक्त मूळ रेषाभागांत घृष्टलेखन प्रक्रियेवाचून कांही मनःकल्पित भेद झाला असे मानणें न्याय्य होणार नाहीं.

## लेखकाची आवड निवड

या करिता लेखकाची आवड निवड व इतर कोणाचा प्रभाव या दोन कारणांवरच अधिक भर द्यावा लागेल. अशोकाचे वेळीं संस्कृत प्रतिष्ठित असूनही त्याचे आवडीनुरूप व त्याचेवरील प्रभावानुरूप खोदले गेलेले त्याचे सर्व उपलब्ध शिलालेख पाली भाषेंतच खोदविले गेल्याचें आढळून येतें. याप्रमाणेंच त्याचे आवडीनुरूप आणि त्याचेवरील प्रभावानुरूप लिपिविषयक बाबतींत ब्राह्मी, व खरोष्टी लिपींत त्याचे लेख खोदविले गेले असें आढळून येतें, हे प्रतिपादन अनुचित ठरणार नाही. कोणताही मनुष्य त्याच्या आवडत्या भाषेंत व लिपींत लेखन करतो हा सामान्य नियम आहे. पाली भाषा व ब्राह्मी खरोष्ठी लिपींचें साहचर्य पाहून युरोपियन विद्वानांनी अशोकलिपीचा पाली, इंडियन पाली, साऊथ अशोक वगैरे नांवांनीं परिचय दिला असावा असें म्हणण्यांत त्रुटि नाहीं. अथवा पाली भाषाव्यवहारास ती लिपी अधिक उप–योगी झाली असल्याने ते लोक तसें सांगते झाले असावेत.

अशोक हा जगद्विख्यात सम्राट होता. म्हणून तत्कालीन देशी विदेशी राजे त्याच्या प्रभावाने प्रभावित झाले असणे व लोकही तदनुकूल प्रभावित असणे ' यथाराजा तथा प्रजा ' या उक्तीनुरूप स्वाभाविक आहे. अर्थात अशोकाचे काळीं सर्वत्र सर्व कार्ये त्याच्या प्रभावाने प्रभावित होऊ शकत होती–

प्रभावशाली राज्यकर्त्याच्या प्रभावाचा आविष्कार त्याच्या प्रजेच्या व अन्यही प्रभावितांच्या व्यवहारात दिसून येतो. उदा. मुस्लिम राजवटींत उर्दू फारसी, ब्रिटिश राजवटींत इंग्लिश वगैरे. आचार- विचार- व्यवहार या सर्वातच प्रभावितांचे कृतीत प्रभावशालीचा प्रभाव दृग्गोचर सर्व काळांत होत असतो. तसें अशोक काळांत असल्यास आश्चर्याचे कांहीच कारण नाही. ' कन्नड लिपिय उगम मत्तु विकास ' या पुस्तकांत डॉ, ए. वि. नरसिंह मूर्ति असाच अभिप्राय पृ. ३१ वर प्रदर्शित करतात–

" केवल ओंदुनूरु वर्षगळल्लि चन्द्रवळ्ळिय शासनद लिपियु ताळगुंद शासनदल्लि काणुव लिपियागि परिवर्तित वागिरुवुदु आश्चर्य वेंदु, अदु गुप्तरलिपिय प्रभावदिंद उंटागिरबेकेंदु केलवू विद्वांसरु अभिप्राय पडुत्तारे. "

" केवळ शंभर वर्षातच चन्द्रवळ्ळि शासनाची लिपि ताळगुंद शासनात आढणाऱ्या लिपींत परिवर्तन झाली हे एक आश्चर्यच आहे व गुप्तलिपीच्या प्रभावामुळेही बदल घडलेला आहे असा कित्येक विद्वानांचा अभिप्राय आहे. "

तात्पर्य प्रभाव-शालीचा प्रभाव अस्तित्वांत असेपर्यंत त्याचे प्रभावानें प्रभावित असणारें कार्य चालू रहातें, प्रभावाचा अस्त झाल्यावर वा त्यांत शैथिल्य आल्यावर तत्प्रभावित कार्येही अस्त होतात वा शिथिल होतात. यानुसार अशोकाचा प्रभाव असेपर्यंतच अशोकलिपींचे कार्य राहिले व तदुपरान्त अस्त झालें असें म्हणावे लागतें.

प्रभावशालीचे प्रभावाचा परिणाम असतांनाही जो प्रभावित होतो त्याचे मूळ स्वरूप अव्यक्त धारेचें रूपानें टिकून असतें. असें अव्यक्त न झाल्यास प्रभावशालीचा प्रभाव कोणता ? प्रभावशालीचा प्रभाव शिथिल झाल्यावर अव्यक्त धारारूपाने असणारे प्रभावितांचे मूळ स्वरूप डोकें वर काढते. प्रभावशालीचा प्रभावच सतत राहिला तर त्याची जागा घेणारे दुसरे कोणी नाही म्हणून तोच पुढेंही राहिला असे म्हणावें लागते. म्हणून प्रभावशालीचा अस्त झाल्यावर मूळधारा प्रकट होणें युक्तियुक्त आहे. या प्रमाणे तन्त्रोक्त लिपि मूळधारा असून, अशोक लिपि हा तिचा एक अंश प्रभावशाली बनून शिलालेख वगैरेमध्यें प्रतिष्ठित झाला, तो अंशच मूळ अंशीच्या धारेस प्रमाणित करतो. जशी पाली भाषा तिचें मूळ असणाऱ्या संस्कृत भाषेस प्रमाणित करते. तशीच अंशरूप अशोकलिपि तिचे मूळ नागरीस प्रमाणित करते. पाली, अर्धमागधी वगैरे भावांचे मूळ महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची या चार प्राकृत भाषा आहेत व या चारही भाषांचे मूळ संस्कृत आहे.

### तन्त्रग्रन्थाचा अभिप्राय

प्रस्तुत ग्रंथांत अशोकलिपि हा मूळ तन्त्रोक्त नागरी लिपीचा एकदेश कसा आहे हे दाखविलेंच आहे.

'**नित्याषोडशिकार्णव सेतुबंध टीकेंत भास्कररायांनी**' नागरी लिपींत एकार त्रिकोणाकृति असल्याचें सांगितले आहे.

यदेकादशमाधारं बीजं कोणत्रयोद्भवम् ।
ब्रह्माण्डादिकटाहान्तं जगदद्यापि दृश्यते ॥
(नित्याषोडशिकार्णव वि. १ श्लो. ६)

यस्या मातृकाया एकदेशमेकाराक्षरं कोणत्रयवदुद्भवो लेखो यस्य तत् । नागरलिप्यां सांप्रदायिकैरेकारस्य त्रिकोणाकार तयैव लेखनात् । (सेतुबंध) म्हणजे त्रिकोण एकटाच कोणत्रयवदुद्भव आहे असे तात्पर्य नाही. **तन्त्रराजतन्त्र कादिमत** चतुर्थ पटलांत इकार तीन बिन्दूंनीं बनलेला असल्याचे सांगितले आहे.

**विद्याबीजत्रयं देवि तुरीयस्वरशेखरम् ।
तत्तुरीयस्वरूपं तु बिन्दुत्रयवदीरितम् ॥
तदात्मकं देव्यास्ते साधकस्यच यद्भवेत् ।
तद्भावनां श्रृणु प्राज्ञे महोदयकरीं शुभाम् ।
ऊर्ध्वं बिन्द्वात्मकं चक्रमधोबिन्दुद्वयात्मकम् ।
कुचद्वयञ्च तच्छेषैः शेङ्गानि च भावयेत् ॥**
(तन्त्रराजतन्त्र कादिमत पटल ४ श्लो. ९८-१००)

या वरील **सुभगानन्दनाथांची मनोरमा टीका** खालीलप्रमाणें —

"......... तत्तुरीयस्वरूपं तस्य तुरीयस्वरूपस्य ईकारस्य स्वरूपमित्यर्थः। स्वरूपमिति लिपिरूपमुच्यते बिन्दुत्रयवदीरितं सर्वासु लिपिषु तुरीयस्वरूपस्य बिन्दुत्रयात्मता विद्यत एव तेन चैतदात्मकत्वं गुरुदेवतासाधकानां प्रतिपादयति। .........तत्र ऊर्ध्वं बिन्द्वात्मकमिति। एतदुक्तं भवति मूलविद्यायाः खण्डत्रयस्यापि चतुर्थस्वरैकावसानत्वात् तत्स्वरूपस्य च बिन्दुत्रयवत्वात्तदूर्ध्वं बिन्दुना वदनं अधःस्थित बिन्दुद्वयेन कुचद्वयं तदक्षरशेषरेखया तस्या देव्याः परिपूर्णानिवयवांश्च ।"

**वातुलागम टीकेंत** शिवमंत्र ' ह्रिं ' नें शिवमूर्ति नागरीलिपीनेंच बनू शकते अन्य लिपीने नाहीं असे स्पष्ट सांगितले आहे.

शिवमेकं विजानीयान्मन्त्रमूर्तिपरं शिवम् ।
नादं किरीटमित्युक्तं बिन्दुर्वक्त्रमुदाहृतम् ॥
हकारं देहमित्युक्तं द्वयोतुङ्गौ भुजौ तथा ।
वह्निपादद्वयं विद्यान्मन्त्रमूर्तिरुदाहृता ॥ (वातुलागम)

शिवमन्त्रान्मूर्त्युद्धारकृतिः नागरीलिपिभिरुद्धारयितुं युज्यते । व्यतिरिक्तलिपिभिर्नोद्धारयितुं युज्यते । टीका
(इंडियन अँटिक्वेरी व्हॉल्यूम ३५ पृ. २७९)

या सर्वावरून असे दिसते की टीकाकार अशोकलिपीला नागरी लिपीचीच एक साम्प्रदायिक लेखनपद्धति समजत होते. म्हणूनच त्या वेळीं नागरी लिपीची अन्य लेखनपद्धती अस्तित्वांतच नव्हती असे म्हणतां येत नाहीं.

यापूर्वी आपण बिन्दुस्फोटनांत वर्णोद्धारतन्त्रोक्तरेषा देऊन नागरीलिपी कशी होते हे पाहिलेंच आहे, या प्रकारानें उत्पन्न लिपीचा अशोकलिपि हा अंश कसा आहे हेही पाहिले आहे. यावरून अंशाचे पूर्वी अंशीचा अभाव मानणें युक्तियुक्त ठरणार नाहीं, ते न्यायसंमत नाहीं.

इतकेच नव्हे तर बिन्दुस्फोटनात वर्णोद्धारतन्त्रोक्त विधानानें प्राप्त होणाऱ्या भागासच जास्त कमी करून घेऊन अशोकलिपीचे उपपादन होते हेच पुढील तक्त्यांत प्रदर्शित केलें आहे–

येथे अशोकलिपींतील उ, ऊ, क, ण हे वर्ण केवळ वर्णोद्धारतन्त्रवचनाने येणाऱ्या रेषा तेवढयाच घेऊन बनतात, अन्यवर्ण बिन्दु-स्फोटन व वर्णोद्धारतन्त्र या दोहोंतील कांही भाग स्वीकारून बनतात.

अशोकलिपींत बिन्दुस्फोटनापासून येणाऱ्या चन्द्रकोरींची संख्या–

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | ए | ऐ | ओ | औ | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ | | |
| २ | २ | २ | १ | २ | २ | २ | ३ | १ | ३ | ३ | २ | १ | १ | | |
| ट | ठ | ड | ढ | त | थ | द | ध | न | प | फ | ब | भ | म | | |
| १ | २ | १ | ३ | १ | २ | १ | १ | १ | १ | १ | २ | ३ | ३ | | |
| य | र | ल | व | श | ष | स | ह | इ | ई | उ | ऊ | अं | अः | क | ण |
| २ | ४ | १ | ३ | २ | १ | १ | २ | ० | ० | ० | ० | २ | २ | ० | ० |

आता मूळांत असणारी एकता ठेवून प्रकारभेद लिहिण्याचा घृष्टलेखन एवढाच एक मार्ग बाकी राहतो. हा सर्व जगांत असून स्वभावसिद्ध आहे. घृष्टलेखनाची आमच्या मतानुसार कारणमीमांसा पूर्वी केलीच आहे. अन्य कारणांचा विचार आम्हीं चिकित्सकांवर सोपवीत आहोंत.

### आधुनिकांचा अभिप्राय

सर्व भारतीय लिपी अशोकलिपीपासून निघाल्या असल्याचें अनेक आधुनिक लिपिचिंतकांनीं लिहिले आहे. याकरितां काय पुरावा आहे ? अशी पृच्छा केल्यास देवनागरीचा शिलालेख सर्वात जुना मिळत नाही सर्व म्हणून (अनुपलब्धित्वात्) अशोक लिपीपासून भारतातील इतर लिपि झाल्या असल्या पाहिजेत असे ते प्रमाणित करूं पाहतात. ही तर्कपद्धतीच बिनचूक नाहीं.

### विस्मृत पुरातत्त्व

एखाद्या पितापुत्रांपैकीं पुत्र अगोदर मृत होऊन त्याचें स्मारक झाले व तदनन्तर पित्याचें निसर्गक्रमाने मृत्यूनंतर स्मारक झाले, स्मारक होण्याचे काळांतील पौर्वापर्यावरून कोणी पुत्रापासून पिता झाला असें म्हणेल तर तें सुसङ्ग म्हटले जाणार नाहीं. अशोकलिपींतील शिलालेख व देवनागरींतील शिलालेख यामध्यें असेच कशावरून नसेल ? म्हणूनच आधुनिकांचे कथन एकान्तिक वाटतें कारण वेद व तन्त्र यापासून नागरलिपि येते हें यापूर्वी ' विस्मृत पुरातत्त्व ' म्हणून दाखविलेंच आहे. त्याचा अधिक विचार व्हावयास हवा. केवळ शिलालेखांचे कालिक पौर्वापर्यावरून निर्दुष्टनिर्णय होणार नाहीं– कारण शिलालेख त्यांचे निर्मितीकाळाचें पौर्वापर्य प्रमाणित करतील, परस्पर संबंधाचें नव्हे– जसे पितापुत्र. अशोकलिपि कोठून आली याचे उत्तर आधुनिकांजवळ नाहीं हेही चिन्तनीय होय.

### भारतीय बुद्धिवादाची कसोटी

तन्त्र, वेद यांचा विचार केल्यावर देवनागरी सिद्ध होते. देवनागरीचा एकदेश अशोकलिपि व देवनागरीपासून घृष्टलेखनानें इतर लिपि होत असल्याचे प्रत्यक्ष आहे– पूर्वार्धांत दाखविलेंच आहे. याला प्रमाण काय ? असा प्रश्न येतो. विहित कार्यांत विनियुक्त होण्यासाठीं त्या त्या लिपींना शास्त्रस्थ लिपिरेषेशीं समन्वित असलें पाहिजे हा मीमांसान्याय पूर्वी दाखविलाच आहे. तोच या प्रश्नाचे उत्तर आहे. त्यानुसारच महायांनादि तान्त्रिक विधानांत अशोकलिपि विनियुक्त व्हावयाची असल्यास तिला तन्त्रोक्त लिपीशीं समन्वित व्हावेंच लागेल. म्हणून आधुनिकांचे म्हणण्यानुसार असलेला अशोक लिपीचा सर्वांत जुना शिलालेख मिळतो म्हणून ती सर्व लिपीची जननी व तिची जननी आणखी कोणी शोधावी लागेल, हा विचार भारतीय बुद्धिवादास तर्कशुद्ध वाटत नाहीं. तसेच अशोक लिपि देवनागरीपासून झाली नसल्यास अन्य कोणांपासून आली याचा विचारही चिकित्सकांनीं करावा. तो करितांना खालील प्रतिपादनाकडेही ध्यान द्यावे–

### आधुनिक कल्पनेचे वैय्यर्थ्य

अशोक लिपि देवनागरीपासून उद्भवल्याचे प्रत्यक्ष दिसत असूनही तसें मानावयाचे नसेल तर अशोकलिपीचे हें स्वरूप वर्णोद्धारतन्त्र व देवनागरीचे अगोदर स्वतंत्रपणें प्रचारांत होतें असे म्हणावें लागेल. तसेच नंतर अशोकलिपि न रुचणाऱ्या कोणा धूर्तांने, तिजवर आजुबाजूस बिंदुस्फोटनाची कल्पना केली आणि अशोकलिपीचा पूर्वसिद्ध स्वन्त्रत अंश त्याचे पोटांत येईल या रीतीनें देवनागरी जमविली. त्या नंतर त्याच धूर्तानें शिवपार्वतीचे नांवावर एक वर्णोद्धारतंन्त्र लोकांत प्रसृत केलें व आपण बनविलेल्या लिपीचाही प्रसार त्यानें केला असे म्हणावें लागेल. या प्रमाणें कांहीं दिवसांतच त्या धूर्ताला अशोकलिपि नष्ट करण्यात यश मिळाले. तत्कालीन लोकही या धूर्तानें रचलेल्या नवीन लिपीवर खूश होऊन गेले व सर्वांनीं त्या लिपीचा स्वीकार करून वर्णोद्धारतन्त्र अंधश्रद्धेने प्रमाण मानलें. म्हणून पुढें सर्वत्र याच लिपीचा प्रसार झाला. नंतर

पूर्वीचें प्रकरणांत दाखविल्यानुसार देवनागरीपासून सर्व लिपी झाल्या. अथवा असेंही असू शकेल कीं तो धूर्त ' शिव ' या नावाचा होता. वगैरे आधुनिक ऐतिहासिक कल्पना करावी लागेल.

### योगायोग की वस्तुस्थिति ?

या स्वरूपाची कल्पना केवळ ' मुखमस्तीतिवक्तव्यं ' आहे कीं त्याला कांहीं पुरावा आहे ? पुराव्याशिवाय बोलावयाचे असल्यास असे ही म्हणता येईल कीं अशोक लिपीचे प्रचारकांनी पूर्वसिद्ध देवनागरीपासून आपला अंश घेऊन देवनागरीचे सर्व अवशेष नष्ट करून टाकले. पुढें पूर्वसिद्ध देवनागरीचा प्रचार होऊ लागल्यावर अशोक लिपि मागें पडली वगैरे. म्हणून अशा सर्व प्रमाणावांचून केलेल्या विधानांवरून कोणताही निर्णय होऊ शकत नाहीं. या प्रमाणें जमवून आणलेली कल्पना सर्व लिपींत दैव योगानें जुळणें ही सुद्धां मोठा गंभीर विचार करण्यासारखी गोष्ट आहे. याचा तत्त्वनिर्णय ऐतिहासिक कसा काय करतील ?

### संतानावरून पूर्वजांचे अस्तित्व सिद्ध.

अशोकापूर्वीचा देवनागरी शिलालेख मिळत नसेल तर तेवढ्यावरून अशोकापूर्वी देवनागरी नव्हती असे कसे काय सिद्ध होईल ? ज्यांच्या पूर्वजांच्या समाध्या वगैरे स्थायी अवशेष नाहींत त्यांचे पूर्वज नव्हतेच असे सिद्ध होईल काय? सन्तानावरूनच त्या पूर्वजांचें अस्तित्व सिद्ध होत असेल तर अशोकलिपिनें उचलेल्या अंशावरूनच देवनागरीचे पूर्व अस्तित्व सिद्ध होतें. वेगळा शिलालेख वगैरे शिवायच ही गोष्ट होणारी आहे.

### साम्यावरून पितृत्व निर्णय

यावर कोणीं असें म्हणतील कीं– फिनिशियन वा नॉर्थ सेमिटिकपासून अशोकलिपि उद्भवली कारण त्या दोघांत साम्यस्थळें दिसतात. या संदर्भात साम्यावरून पितृत्व ठरवितांना खालील गोष्टी ध्यानी घेणें जरूर आहे. १) साम्यस्थळें जन्यजनक भावाविषयीं जास्तीत जास्त व्याप्य असावयास हवींत. २) मूलभूत रचनेंत आणि विभागणींत जास्तींत जास्त योग्यत्व व साम्य असलें पाहिजे. ३) स्थळाचे दृष्टीने एकवाक्यता असली पाहिजे. एवढयानें पर्याप्त होईल असें कांहींना वाटतें, पण तें तसें नाहीं. हे तीनही हेतु विपरीत देवाण घेवाण असली तरी असूं शकतात. ( तर्कशास्त्र तु सादृश्येन वाच्यवाचकभावस्य जन्यजनकभावादेवीं उपमिति प्रमितिः प्रयोजक तर्कशुद्धं साध्यसाधनभावं तत्र सादृश्यं स्वरूपसन्तमपेक्षत इति निरुपयति । यथा– ' न साधर्म्यस्यकृत्स्नप्रायाल्पभावमाश्रित्योपमानं प्रवर्तते, किंतर्हि प्रसिद्धसाधर्म्यात्साध्यसाधनभावमाश्रित्य प्रवर्तते इति । ' ( न्यायभाष्ये २।१।४५ )

### अनुपलब्धिप्रमाण

तर्कशास्त्राप्रमाणें साम्यावरून जन्यजनकभाव निश्चित करण्याकरितां त्या साम्यामध्यें जन्यत्वांची व्याप्ती असली पाहिजे, नाहींतर अतीवसादृश्य असणाऱ्या दोन भावात ज्येष्ठापासून कनिष्ठ झाला असें मानण्याची पाळी येईल. याप्रमाणें असणारी व्याप्ती देखील प्रयोजकतर्कानें टिकणारी असली पाहिजे. अनिश्चितेमुळें ही स्थिती येथें नाहीं. याशिवाय फिनिशियन वा नॉर्थ सेमिटीकमध्यें अशोकलिपी एवढे वर्ण, नाहींत, फिनीशियन व नॉर्थसेमिटिक लिपि उजवीकडून डावीकडे लिहिल्या जातात, फिनीशियन व नॉर्थसेमिटिक लिपीचें अशोकलिपिशीं सुस्पष्ट व सुलभतेनें साम्य दिसत नाहीं. डेरिवेशन करितां जास्त प्रक्रिया लागते आणि फिनीशियन वा नॉर्थसेमीटिक या दोन्हीं लिपि भारतवर्षांतील नाहींत. पाश्चात्य लिपिसमालोचक आणि तत्प्रेरित एतद्देशीय लिपिसमालोचकांस बिंदुस्फोटन व वर्णोद्धारतन्त्र माहीत नसल्यानें ते अशोकलिपिचा फिनिशियन ओरिजिन सांगतात. यावरही कोणीं म्हणेल कीं वर्णोद्धार तन्त्राने फिनीशियनपासून प्रक्रिया उचलली तर तें वरील धूर्त कल्पनेप्रमाणें ' मुखमस्तीतिवक्तव्यं ' एवढेंच ठरेल अशोकाचे पूर्वीचा देवनागरी शिलालेख यदाकदाचित् जरी मिळाला तरी त्यावरहीत्यानेंही फिनीशियनपासून प्रक्रिया उचलली हीच शंका घेता येईल. पाश्चात्यांचे प्रभावाने सर्व भारतीय विषय शंकाक्रांत झाले असतील तर अशा निर्मूल शंकांची समाप्ति होऊ शकत नाहीं. याउलट भारतापासून फिनिशियनने प्रक्रिया उचलली असे कां म्हणूं नये ? म्हणून हे सर्व निर्मूल आक्षेप आहेत. सद्सद् विवेकानें विचार केल्यास वर्णोद्धार तन्त्रोक्त देवनागरीपासून अशोक-लिपि झाली असाच निर्णय होतो.

देवनागरीचे अशोकलिपिनें उचललेले अंश सोडून देवनागरीच्या अशोकपूर्व अवशेषांच्या आजच्या अनुपलब्धीस 'हेतु' करून त्यावरून अशोकपूर्वकाळांत देवनागरीचा अभाव सिद्ध करावयास जाल तर तो ' व्यभिचरित हेतु ' होईल जसे पूर्वजांच्या समाधि वगैरे पूर्वावशेषांचे अभावावरून संतती असूनही पूर्वजांचा अभाव सिद्ध करावयास जाणे. (अशोकपूर्वकालः (पक्षः) देवनागर लिप्यभाव (साध्य) वान् अस्माभिः अशोकलिप्युपात्त देवनागर्यंशातिरिक्त देवनागर्यवशेषस्य अशोक (लिपि) पूर्वकालिकस्याद्यनुपलब्धेः (हेतुः) इति न्याय प्रयोग पूर्वोक्ते अंशिकाले साध्याभाववति हेतोः सत्वात् । अन्यथांशोपादानासंभवात् । ) आणि ' अनुपलब्धि ' प्रमाणानें अशोकपूर्वकालीन देवनागरीचा अभाव सिद्ध करावयास गेल्यास योग्य असल्यास पूर्वावशेषांचा आज असणारा अभाव सिद्ध होईल, देवनागरीचा नव्हे. कारण ज्याची ' योग्यानुपलब्धि ' त्याचा अभाव त्या अनुपलब्धीनें सिद्ध होतो.

टिकावू नसलेल्या पानांवर लिहिण्याची चाल अशोकापूर्वी नव्हती काय ? अशोकापूर्वी कोणतीही लिपि भारत वर्षात नव्हती असे अशोकाने लिहून ठेवलें आहे काय ? या उलट अशोकलिपि हा तन्त्रोक्त लिपीचा सांप्रदायिक लेखनप्रकार असल्याचे भास्कररायादिकांचे उल्लेखा वरून पूर्वी दाखविलेंच आहे. अर्थात् अशोकलिपिवरूनच देवनागरीचे पूर्व अस्तित्व सिद्ध होते.

तान्त्रिकांनीं तन्त्रोक्त स्वरूपाव्यतिरिक्त तन्त्रोक्त स्वरूपाचा अन्य कोणताही सांप्रदायिक लेखन प्रकार नव्हता असे म्हटलेलें नाही. मीमांसेच्या यववराहाधिकरणानुसार तन्त्रोक्त लिपीखेरीज इतरांचा तान्त्रिककार्यांत समन्वयावांचून वापर न्याय प्राप्त ठरत नाहीं. अशोक-लिपि जर महायानादि तन्त्रोक्त साधनांत वा कार्यात वापरली जात असेल तर तन्त्रोक्त लिपिशी समन्वयावांचून तिचा न्यायतः तसा वापर होऊच शकत नाहीं त्यामुळे पूर्वी दाखविल्यानुसार तन्त्रोक्त लिपीचा म्हणजे देवनागरीचा अशोकलिपीशीं समन्वय असणें अनिवार्य आहे.

---

प्रकरण १३ वे

# वर्णोद्धारतंत्राचा कर्ता कोण ? काल काय ?

## तन्त्रोपदेष्टा भगवान शङ्कर

शब्दकल्पद्रुमांत उद्धृत केलेल्या वर्णोद्धारतंत्राच्या श्लोकांत सुरेशानि, प्रिये, परमेश्वरी, देवि अशी संबोधने दिसून येतात. त्यावरून ते शिवपार्वती संवादरूप आहे, असं कळते. शंकरानें पार्वतीस ६४ तंत्राचा उपदेश करून ६५ वें वामकेश्वर तंत्र पार्वतीचे आग्रहास्तव प्रकट केले असा उल्लेख श्रीमदाद्य शंकराचार्यांचे सौंदर्यलहरींत व तंत्रराज तंत्रांत मिळतो.

चतुःष्षटचा तन्त्रैः सकलमति सन्धान भुवनं ।
स्थितस्तत्तत्सिद्धिप्रसवपरतन्त्रैः पशुपतिः ।
पुनस्त्वन्निर्बंन्धाद खिलपुरुषार्थैक घटना ।
स्वतंत्रं ते तन्त्र क्षितितलमवातीतरदिदम् ।।
(सौंदर्य लहरी श्लोक ३१)
भगवत्सर्वतन्त्राणि भवतोक्तानि मे पुरा ।
नित्यानां षोडशानां च नवतन्त्राणि कृत्स्नशः ।
तेषामन्योन्यसापेक्षाज्जायते मतिविभ्रम : ।
तस्मात् निरपेक्षं मे तन्त्रं तासां वदप्रभो ।।
(तन्त्रराजतंत्र कादिमत पटल १ श्लोक २–३)

यावरून सर्व तन्त्रे शङ्कराने उपदेशिल्यांचें स्पष्ट दिसते.

## अपौरुषेय तन्त्रशास्त्र

सौंदर्य लहरी लक्ष्मीधर व्याख्या, नित्याषोडशिकार्णव, सेतुबन्ध, परशुराम कल्पसूत्र यांचेंतील तन्त्रशास्त्रविषयक प्रतिपादन आर्थर अॅव्हलॉन (सर-जॉन-वुड्रॉफ) यांचे Principles of Tantra Vol-1 आणि Preface to तन्त्राभिधान या मधील प्रतिपादन, तसेच उपलब्ध तन्त्रग्रंथांतील प्रतिपादनाचे गुरुमुखैकवेद्यत्व व विषयव्याप्ति लक्षांत घेतां तन्त्रग्रंथ मानुषप्रज्ञेचें अवतरण असल्याचे कदापीही म्हणवत नाहीं, मानुष्यवाङ्मयाचा कोणताच निकम तेथें लागू पडत नाहीं Preface to तन्त्राभिधान या मध्ये आर्थर अॅव्हलॉन (सर-जॉन-वुड्रॉफ) यांनी विष्णुक्रान्ता, रथक्रान्ता व अश्वक्रान्ता अशी तीन वर्गांत विभागणी महासिद्धिसार तंत्रादिकांचे आधारें यथाशास्त्र दिली आहे. रथक्रान्ता वर्गातील १५ वे तन्त्र वर्णोद्धृति अथवा वर्णोद्धारतन्त्र असे दिलें आहे.

मन्त्र और मातृओंका रहस्य ' या पुस्तकाचे लेखक पं. श्री. शिवशङ्कर अवस्थी पृ. १३ वर हेंच उध्दरण देतात. तात्पर्य वर्णोद्धार-तंन्त्राचा कर्ता भगवान् शङ्कर आहे तान्त्रिकांचे दृष्टीनें शिवपार्वती हे जगाचे देवतारूप मातापिता आहेत. ज्यांची बुद्धि हे देवतारूप समजण्यास असमर्थ आहे त्यांनीं आपल्या भाग्यानुसार तन्त्रशास्त्राचे कोणी एक आचार्य व त्यांची पत्नि असें एक कैलास पर्वताचे प्रदेशांत राहणारें दापत्य होतें असें समजावें.

## समर्थ योगीश्वर उपदेष्टा

परंतु ते आचार्य प्रकृतिस्थ लिपिस्वरूप पाहण्यास समर्थ असें योगीश्वर होतें असें मानावेंच लागेंल. कारण वर्णोद्धारतन्त्र वा शिव-सृष्ट अन्यमूळ तन्त्रांतील उपदेश Empiricalapproach नाहीं तन्त्रशास्त्रार्थाचे मनुष्यबुद्धि अगम्यत्व आजही प्रसिद्ध असल्यानें अर्वाचीन अभ्यासकास वाटतें तेवढया सहजपणें हस्तलिखितें गोळाकरून, मनुष्याने आपल्या बुद्धीनें रचलेल्या वाङमयाप्रमाणें कालनिर्णय करणे तन्त्राचे बाबतीत सोपे नाहीं. दुसरें असें कीं– तन्त्रशास्त्रार्थाचें गुरुमुखैकवेद्यत्वामुळे, बुद्धितः श्री शङ्करांनीं परम्परेशिवाय जाणणें अशक्य होईल अशी परिभाषारचना अनेक तन्त्रांत केलेली आढळते. वर्णोद्धारतंत्राचे बाबतींतही यापूर्वी तिसऱ्या व चवथ्या प्रकरणांत मीमांसान्यायाच्या कसोटचा लावून आक्षेपपरिहारपूर्वक प्रत्येक पदाचा अर्थ करणे योग्य असल्याने केला आहे.

## काल निर्णय करणे कठिण

या वरून केवळ भाषेचे थाटणीवरून व त्यामधून उपदिष्ट लिप्याकराचे अन्यलिपिसाम्यावरून वर्णोद्धार तन्त्राचा कालनिर्णय करू जाणे धाडसाचें ठरेल. लिपिविषयक विचारांत सांप्रतकाळीं पाश्चात्यांचा प्रभाव अधिक आहे. म्हणूनच ब्यूलर, बीम्स, बर्नेल, डिरिंजर वगैरेंचे मताचा केवळ अनुवाद केला जातो, आणि आधुनिक स्वीकृत ऑर्कियालॉजिकल एव्हिडन्सवर बोला व तेवढेच खरें असा सार्वत्रिक सूर दिसतो. त्याचा प्रामाण्या–प्रामाण्य विचार ' लेखनाच्या प्रकार भेदाचीं कारणें, ' या प्रकरणांत केला आहे.

**लिपिविषयक आधुनिकांचे मताचा परामर्श**

त्याचाच विशेष परामर्श पुनरुक्ति दोष पत्करूनही अर्वाचीनांचे संतोषार्थ येथें घेत आहोत.

१) वेदामध्यें लेखनाचे उल्लेख मिळत असल्याचें पुढे दाखविलें आहे. यावरून पूर्वीपासून लिपि होती हें सिद्ध आहे.

अशोकापूर्वी नागरी शिलालेखादि मिळत नाहीं इतक्याच कारणावरून नागरीची अनुपलब्धि अर्वाचीन दाखवितात. ही अयोग्य अनुपलब्धि आहे, म्हणून कुतर्क असल्याने, अशोकापूर्वी नागरी नव्हती म्हणण्यास निर्दुष्ट हेतु होत नाहीं. इलेक्टॉन, मायक्रोस्कोप प्रचारांत येण्यापूर्वी पृथ्वीवर व्हायरस नव्हते असें म्हणण्यासारखा हा प्रकार आहे.

२) अर्वाचीनांवर असणारा पाश्चात्यांचा प्रभाव बाजूस ठेवून ते स्वतंत्रपणें विचार करीत नाहींत (पुणें येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'सोबत' या साप्ताहिकांत १५ ऑगस्ट १९७६ चे अंकांत पृ-३ वर मराठी साहित्यखुजें कां ?' या लेखांत 'मेघःश्याम' यांनीं हाच विचार प्रसंगोपात्त प्रभावीपणें मांडला आहे. तो येणें प्रमाणें– 'आपला सारा समाज परावलंबी आहे. आपल्या देशांत कधीं एके काळीं वैचारिक स्वायत्तता होती व विचारवन्तांना अहंता होती. नवनव्या गोष्टींत खोलवर जाऊन संशोधन करावें, चिकित्सा करावी, एकाद्या गोष्टीचा ध्यास धरून ऋषितुल्य जीवन जगावें– यामुळे आयुर्वेद, ज्योतिर्विज्ञान, निसर्गविज्ञान या अनेक मूलभूत गोष्टींवर आपण विचार केला व नवीं शास्त्रें निर्माण केलीं, स्वतंत्रमन जोपासलें, आक्रमकाची भूमिका घेतली म्हणूनच त्या काळांत असें उज्ज्वल असें साहित्यही निर्माण झालें. गेल्या हजारवर्षाहून अधिक कालखण्डात येथील संस्कृतीचा पराभव झाला, येथील ग्रंथांचा नाश झाला, पाठशाळा ओस पडल्या, संशोधनका र्य संपलें, आणि आपण जेत्यांच्या संस्कृतीला शरण गेलों. ही गुलामगिरीची वृत्ति आपल्या अंगोपांगीं भिनली होती. गुलामांना स्वतंत्र प्रज्ञेची प्रतिमा नसते ते नुसतेच शारिरीक गुलाम होत नाहींत तर मानसिक गुलामही होत जातात मग इंग्रजांनी आपल्या संस्कृतीला नेस्तनाबूद केलें. त्यांच्या तलवारीचें पाणी तिखट होतें व त्यांच्या बंदुकीचा टप्पाही मोठा होता– आणि यालाच आपण उच्च संस्कृति समजूं लागलों. आपण मैदानात पराभूत झालोंच पण त्याहीपेक्षां ग्रंथालयांत, विद्यालयांत, वादसभेंत, साहित्यांत सर्वांत पराभूत झालों. लष्करी पराभव हे संस्कृतीचे पराभव नसतात. हें कळण्याचे भानही आपणास राहिलेले नाहीं.' अभिप्राय स्पष्ट आहे.)

हें उद्धरण देण्याचा उद्देश मनोभंग करणे वा केवळ दोषदर्शन करणें असा नसून परकीय प्रभाव सर्वंकष कसा पडूं शकतो व त्याने उज्ज्वल परंपरेचा कसा नाश होतो हे दाखविण्याचा आहे. असें असलें तरी परंपरा प्राप्त गीताशास्त्रापासून लोकमान्य टिळकांनीं कर्मयोगाची महात्मा गांधींनी सत्याग्रह व अहिंसेची, आणि सुभाष बाबूंनीं व अन्य क्रांतिकारकांनीं क्रांतीची प्रेरणा घेतली व तिचे बळावर ज्यांचें राज्या-वर सूर्य कधीं मावळत नाहीं अशा ब्रिटिशांस परास्त केलें. तात्पर्य प्राचीन परंपरा, स्वत्व, आणि परकीयांचे हेतूंची सतत जाणीव जागोर ठेवून सर्व क्षेत्रांत आचार विचार होणे भारतीय परंपरा वर्धिष्णु करणारें आहे. चुकांची उजळणी त्या सुधारण्यासाठीं असते हें विशेष–

३) वर्णोद्धारतन्त्र व मीमांसेचा यववराहाधिकरणन्याय तसेच तन्त्रोक्त मूळ बिंदुस्फोटनाची अनुपपत्ति सप्रमाण दाखवून दिल्याशिवाय त्यांतील लिपिविषयक वक्तव्य बाजूस सारता येत नाहीं.

४) अर्वाचीनांचें प्रतिपादन म्हणजे साम्याधिष्ठित संगति ही 'मला वाटतें' एवढ्याच आधारावर असून तशा तऱ्हेने लावलेल्या संगतींतही एकवाक्यता नाहीं, अर्वाचीनांतही नागरीची वर्तुळाकार रचना व चन्द्रकोरी सांगणारे लिपिसमालोचक आहेतच.

५) तन्त्रोक्त यन्त्रलेखनाचे आकारावर आधारलेली लिपीची उपपत्ति कांहीं अर्वाचीनांनीं सांगितली आहे. असें असतां साक्षात् लिपि सांगणाऱ्या तन्त्राचें प्रामाण्य कां नसावें ?

६) ( हस्तलिखितें व ताम्रलेखादींचा कालनिर्णय करण्याची C-14 पद्धति सर्वथा निर्दोष नाही. कारण नैसर्गिक किरणोत्सर्गी कार्बन ॲटम आंत प्रवेश करणें संभवनीय असतें, त्यामुळे कळालेल्या वयांत तफावत येऊ शकते. पुणें येथील डॉ. पद्माकर विष्णु वर्तक यांनी त्यांचे वेदविषयक व अन्य लेखनांत याचा ऊहापोह केला आहे ) संपादक.

७) केव्हाही लेखनाचे काळावरून त्या लेखनांत प्रतिपादित विषयाचा काळ ठरवितां येत नाहीं, सीमित करतां येत नाहीं. सृष्टीची चर्चा करणाऱ्या पुस्तकाच्या काळावरून सृष्टीचा काल ठरविण्यासारखा हा प्रकार अन्यथा होईल. आधुनिक भाषाशास्त्रीय स्वरूपाचा विचार ईश्वरसृष्ट रचनेस लागूं शकत नाहीं. साक्षात् भगवान शङ्कर अमुक एका प्रकारची भाषा जाणीत नाहींत असे म्हणणें शास्त्रीय प्रमाणांस सुसंगत नाहीं.

८) नित्याषोडशिकार्णव विश्राम ४ श्लोक २४ मध्ये

" बीजरुपामुल्लसन्तीं ततो ऽ नङ्गपदावधि ।
ब्रह्मग्रन्थि विनिर्भिद्य जिह्वाग्रे दीपरुपिणीम् ॥ "

असा सिद्धमंत्राचा काम्य प्रयोग सांगून पुढील नऊ श्लोकांत फलश्रुति सांगितली आहे. तेथें ३२ व्या श्लोकांत ' **समस्तलिपिकर्मकृत्** ' साधक होईल अर्थात् सर्व लिपि जाणणारा होईल, असें सांगितले आहे. या सारखे अन्यही प्रयोग सुन्दरीरहस्य, शक्तिसंगमतन्त्र, वगैरेंत आढळतात. यामधील प्रयोगोपदेष्टा शिव प्रयोगविज्ञान, प्रयोगाची सिद्धि-असिद्धि वगैरे जाणत नव्हता असें म्हणणें युक्त ठरणार नाही.

९) अमुक तन्त्रात अमुक विषय आला आहे म्हणून तें तन्त्र अमुक काळातलें हे विधानही साक्षात् ईश्वरोपदिष्ट अशा तन्त्र वाङमयास लागू होत नाहीं. कारण ईश्वराचें सर्वज्ञत्वाविषयी वेदादिक आर्ष वाङ्मय प्रमाण आहे. सरते शेवटीं **' अचिन्त्या खलु ये भावा न तांस्तर्केण योजयेत्** ' हें महाभारतवचन या विषयाबद्दल विचार करितांना स्मरणांत ठेवून प्रतिपादन करणें आवश्यक आहे. तात्पर्य एकवाक्यता नसणाऱ्या प्रमाणोपलब्धिसापेक्ष असणाऱ्या अर्वाचीनांचे निर्णयापेक्षां मीमांसान्याय व तन्त्राचें बलवान प्रमाणाने आलेला लिपिविषयक निर्णय योग्य आहे.

**लिपिस्रष्टा हाच प्रथम लेखक**

या सर्वांचा निष्कर्ष असा कीं प्रथम वैदिक वाङमय व नंतर तन्त्रवाङमय, ईश्वरोपदिष्ट आहेत. **सर्वत्र** ग्रन्थामधील उल्लेखावरून कर्ता निश्चित केला जातो, मग येथेंच शङ्का कां ? म्हणून वर्णोद्धारतन्त्र जेव्हांपासून वर्ण–लेखन आहे तेव्हांपासून अस्तित्वात आहे असें किमानपक्षी म्हणावे लागतें कारण जेव्हांपासून लेखन असेल तेव्हांपासून कसें लिहावें हे सांगणारे तन्त्रही असले पाहिजे, अर्थात् वर्णोद्धारतन्त्राचा काळ भारत वर्षांत लिपिलेखन प्रचारांत आले तो काळ किमानपक्षीं होय. लिपिस्रष्टा प्रथम लेखक होय.

**आधुनिक मतानुसार लेखनकाळ**

' लिख् अक्षर–विन्यासे ' म्हणून मुख्यार्थाने वर्णलेखनातें लिपि व्यवहारच भारतीयांना मान्य आहे. चित्रलिपि, भावलिपि, वगैरे आधुनिक व्यवहार लिपि म्हणून मुख्यार्थानें मान्य नाहींत. भारतीय प्राचीन लिपिमाला या ग्रंथांत पृ. १५ वर पं. गौरीशङ्कर ओझा यांनी रॉथ (Roth) चें मत दिले आहे– ' रॉथ लिखता है कि लिखनेका प्रचार भारतवर्षमें प्राचीन समयसे ही होना चाहिए क्योंकि यदि वेदोंकेलिखित पुस्तक विद्यमान न होते तो कोई पुरुष प्रातिशाख्य बना न सकता ' यावरूनही प्रातिशाख्य रचनेच्या बऱ्याच मागे लेखनाचा पर्यायाने वर्णोद्धारतन्त्राचा काळ आधुनिकाचे प्रतिपादनानुसार देखील जातो.

**सृष्टयारंभीच वर्णोत्पत्ति व तन्त्रोत्पत्ति**

आगमशास्त्राचें ईश्वरोपदिष्टत्वाबद्दल–
आगतं शिववक्त्राब्जाद्गतं तु गिरिजाश्रुतौ ।
तदागम इति प्रोक्तं शास्त्रं परमपावनम् " ॥

हें आगम शास्त्राविषयीचें वचन प्रसिद्ध आहे. शारदातिलक राघवभट्टी **पदार्थादर्श टीका पटल १ श्लोक १**. या मध्येंही शङ्करा पासून तान्त्रिक मन्त्ररूपाने वर्णोत्पत्ति सांगितली आहे. **पटल १ श्लोक २५ टीका, व पटल २ श्लोक ९ व १० टीका, पृथ्वीधराचार्यकृत** भुवनेशीस्तोत्र. यामध्येंही सृष्टयारंभीच वर्णोत्पत्ति व लिप्युत्पत्ति सांगितली आहे. म. म. पं. गोपीनाथ कविराज ही या तन्त्रोक्त अभिप्रायाचें **' तान्त्रिक वाङमय में शाक्त दृष्टि '** या ग्रंथाच्या पृ. ९ वर समर्थन करतात. याप्रमाणें वर्णोत्पत्ति व वर्णोद्धारतन्त्रोत्पत्ति सृष्टयारंभींच झाल्याचें स्पष्ट आहे. तान्त्रिकांचा हा सिद्धान्त आहे.

**वर्णोद्धार तन्त्राचा विषय प्राचीनच.**

एवढें असूनही वर्तमान वर्णोद्धारतन्त्रानुपूर्वी ( वर्तमान वर्णोद्धारतन्त्राची शब्दरचना ) तेवढी प्राचीन नसल्याचें आधुनिकांचें म्हणणें असेल तर त्याचे समर्थनार्थ अयोग्यानुपलब्धि सोडून तर्कसङ्गत असें कारण द्यावें लागेल. यदाकदाचित् अशा बलवान् प्रमाणाने त्यांना आपलें म्हणणें सिद्ध करतां आले तरी वर्णोद्धार तन्त्रात प्रतिपादन केलेला विषय प्राचीन मानावाच लागेल. जसें पाणिनीपूर्व काळांत इन्द्र, आपिशलि, स्फोटायन, गार्ग्य, शाकल्य, शाकटायन, गालव, भारद्वाज, काश्यप, चाक्रवर्मण व सेनक हे व्याकरणकार होते व व्याकरणशास्त्रही होतें. पाणिनीनें या सर्वांचे विचाराचा संक्षेपाने सङ्ग्रह केला, अर्थात् अष्टाध्यायी ग्रंथ पाणिनीपूर्वी नसला तरी पाणिनी प्रतिपादित विषयार्थ पाणिनीपूर्व काळांत नव्हताच असें म्हणता येत नाहीं.

तसेच यास्काचार्यांचें निरुक्तापूर्वी औदुम्बरायण, कौष्टुकी, शतबलाक्ष, मौद्गल्य, शाकपूणि, शाकटायन, स्थौलाष्ठीवी, आग्रायण, औपमन्यव, और्णवाभ, कात्थक्य, कौत्स, गार्ग्य, गालव, चर्मशिरस्, तैटिकी, वार्ष्यायणि व शाकल्य हे वैय्याकरणी व निरुक्तकार होतेच. अर्थात् यास्काचार्यांचा निरुक्त ग्रंथ त्याचें पूर्वी नसला तरी यास्कप्रतिपादित विषयार्थ तत्पूर्व काळांत अस्तित्वांतच नव्हता असे म्हणतां येत नाहीं. ' स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ' हा गीतोक्त न्याय ही येथें लक्षांत घेणें जरूर आहे. बंगालमध्यें प्रचलित ' प्राणतोषिणी ' या

तन्त्रग्रन्थातही वर्णोद्धृति या नावानें वर्णोद्धारतन्त्राचा उल्लेख मिळतो. या सर्वांवरून विषयाचें प्राचीनत्व आधुनिकांस मानावेंच लागेल. तात्पर्य वर्णोद्धार तंत्राचा प्रतिपाद्य विषय, लिपिलेखनप्रकार जेंव्हांपासून लेखन अस्तित्वांत आहे तेंव्हांपासून आहे.

### श्री उदयनाचार्यांचा अभिप्राय

शिक्षित झाल्याशिवाय माणसाचें पहिलें लिपिलेखन होणें अशक्य व अप्रामाणिक असल्याचें श्री उदयनाचार्यांनीं म्हटलें आहे. त्यांचे प्रतिपादनाचा सारांश व तात्पर्य न्यायकुसुमाञ्जलि या त्यांचे ग्रंथावरून खालील प्रमाणे–

पाणिनीशिक्षेत संस्कृतात ६४ वर्ण असल्याचे वेगळ्या प्रकारानें विभागणी करून सांगितले आहे. त्यांचेविषयीं ' त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः सम्भवतो मताः ' असा पाठ दिला आहे. यांचें तात्पर्य कण्ठताल्वादि स्थानांत वागिन्द्रियानें सन्धिधर्मानें होणाऱ्या यमादिकांचा मोजून एवढयाच शुद्ध वर्णाचें उच्चारण संभवनीय आहे, यापेक्षा कमीजास्त असणारें उच्चारण सर्वच त्यांच्या अशुद्ध उच्चारणांत मोडते असें आहे. मध्य आशिया वगैरे अन्य कोणत्याही देशात एवढया वर्णांचा व्यवहार नाहीं.

उत्कृष्ट देवतांचें उच्चारण हे शुद्धतेविषयींचा आदर्शभूत निकष आहे. इतर सर्वजणांचे वर्ण याच्या अशुद्ध व अपूर्ण उच्चारणाने बनलेले असतात. अनेक शिक्षाग्रंथांत स्थानप्रयत्नानुप्रयत्नादिकांचा शुद्ध उच्चारणाकरितां असणारा हिशोब सांगितला आहे. 'शिक्षा' हे नांवच सांगते कीं शिकविल्यावाचून हे शुद्ध वर्णस्वरूप ( = लेखन) आणि शुद्धोच्चारण मानवांना येऊं शकत नाहीं.

आज प्रत्यक्ष दिसते कीं आपण वैज्ञानिक प्रगतीच्या शिखरावर असल्याचा डिण्डिम पिटणाऱ्या जगांतही शिक्षेनुसार शुद्धोच्चारण करणें शक्य होत नाहीं. एवढे वर्ण इतर कोणत्याही लिपींत त्यांचे स्वतःचे नाहींत, त्यांचे उच्चारणही नाहीं. वेदच एवढया वर्णांचा शिक्षेनुसार शुद्धोच्चारणाचा नियम पाळतो. वेदाशिवाय अन्याकरितां पूर्वपरंपरेनें प्राप्त असे वर्णोच्चारण प्रक्रिया सांगणारे अन्यशास्त्र नाहीं. या वर्णांचा वर्णमालेतील क्रमही मोठ्या वैज्ञानिक हिशेबाचा आहे. शुद्ध वर्णस्वरूप ऐकूनही जगांत प्रायः अशुद्ध उच्चारणच जास्त ऐकू येतें.

ऐकल्याखेरीज भाषा प्रथम बोलण्यास येत नाहीं, हें प्रयोगसिद्ध आहे. इतिहास आहे कीं वेगवेगळ्या समुदायांतील कांहीं बालकांना बादशहा अकबरानें जन्मापासून कोणताही बोललेला शब्द ऐकू येणार नाहीं अशा व्यवस्थेत वाढविले. पुढें तीं सर्व बालकें मुकीं झालीं. प्रकृतींतील हा प्रयोग सर्व परिचित आहे कीं पोपट वगैरे बोलूं शकणारे पक्षीही शिकविल्याखेरीज ( सतत ऐकल्याखेरीज ) वर्णोच्चारण करूं शकत नाहींत. सामान्य बोली भाषेची ही तऱ्हा तर शुद्धवर्णोच्चारणाची गोष्ट कशाला ? असो.

### प्रथम शिक्षक कोण ?

या सर्व वर्णांचा प्रथम शिक्षक कोण ? या वर्णमालेचा असा स्वरूपक्रमनिर्णय कसा झाला ? या प्रश्नांचा विचार श्रीउदयनाचार्यांनी न्यायकुसुमाञ्जलींत केला आहे. ही संस्कृत वर्णमाला अतिशय नियमबद्ध व संरक्षित पुरातत्वप्रमाण आहे. या वर्णमालेचा प्रथम शिक्षक कोणीं तरी स्वतः सिद्ध शुद्ध उच्चारण करणारा व (शुद्ध लेखन करणारा) असा स्वतः सिद्ध असला पाहिजे, नाहीं तर अनवस्था ओढवेल. माणूस तर ऐकल्याखेरीज शुद्ध उच्चारण करू शकत नाहीं. व दाखविल्याशिवाय घटविल्याशिवाय शुद्ध लिहूं शकत नाहीं. मनुष्येतर तिर्यग्योनींत हे दोन्ही असंभव आहे. तेंव्हां असा प्रथम शिक्षक केंव्हा झाला याविषयीं काहीं शिलालेख वगैरे आहे का ? असा लेख वा अन्य बलवान प्रमाण नसतांना आधुनिक विकासवादी जर म्हणतील कीं त्यांच्या वानरोद्भूत आद्य मानव सन्तानापैकी कोणाच्या तोंडातून एक, कोणाच्या तोंडातून दुसरा असें विविध आवाज केंव्हा तरी बाहेर अचानक पडून त्यांच्या एकत्रीकरणाने सर्व वर्णमाला बनली तर याला पुरावा काय ?

### विकासवाद ही अन्धश्रद्धाच

विकासवाद्यांच्या मनःकल्पितापेक्षां बलवान प्रमाणसिद्ध तर्क अनुसन्धेय असल्याचें उघड आहे. एकाच्या शुद्ध उच्चारणानेंच सर्वच शुद्ध उच्चारण करणारें झाले असे होत नाहीं हे प्रत्यक्ष आहे. म्हणूनच संस्कृत भाषेचें शुद्ध उच्चारणास अशक्त लोकांनीं त्यामध्यें बिघाड करून अन्य भाषा बनविल्या, अन्य लिपि बनविल्या. असा हा ह्रासवाद वेदशास्त्र व तंत्रामध्ये उपदेशिलेल्या व्यवहार विद्याकलादिकांविषयी आहे हा प्रत्यक्ष सिद्ध आहे. याकरितां आधुनिकांचा वर्तमान जगांतील विकासवादाचा अंगीकार व शिक्षण प्रमाणावाचून असल्याने अंधश्रद्धाच आहे.

### विकासवादावर आक्षेप

(दुसरें असें कीं, एकीकडे विकासवाद सांगतांना Biology सांगतांना अर्वाचीन शास्त्रें Life म्हणजे काय, याची स्पष्ट व्याख्या देत नाहींतच तथाकथित अविकसित झुरळ व विकसित मनुष्य यांच्या Life मध्यें फरक काय ? हा प्रश्न टाळतात. तसेंच अर्वाचीन प्रक्रियेनुसार प्रथमतः Life पृथ्वी ग्रहावर नैसर्गिक प्रक्रियेनें DNA वRNA तयार होऊन झाले असें सांगितलें जातें. परंतु असेच पुन्हां कां होत नाहीं व रासायनिक प्रक्रिया असल्यास कंट्रोल्ड लॅबोरेटरीत ती आज कां जमूं शकत नाहीं. आरंभीं ही प्रक्रिया करणारा वैज्ञानिक कोण होता? ईश्वर किंवा प्रकृति (निसर्ग) विश्वस्रष्टे वैज्ञानिक म्हणून आधुनिक विकासवादास मान्य आहेत कां ? या व ही नैसर्गिक प्रक्रिया टाळून Species चा Spread Sexual वा Asexual Reproducltion नेंच कां होतो ? याची उत्तरें देणें टाळतात. तात्पर्य आधुनिक समाजातील सृष्टिविषयीं असणाऱ्या विकासवादी कल्पना प्रमाणावांचून आहेत, मनःकल्पना व दुष्ट तर्क आहेत.

प्राण्यांच्या फलोन्मुख पूर्वकर्माशिवाय आकस्मिक वैलक्षण्यकारक कोणतीही गोष्ट प्रमाणसिद्ध नाही. गर्भविज्ञानाचें उदाहरण देऊन विकासवादी म्हणतात, तेंही विचारणीय आहे. पी. डी. गुणे यांनीं Lefever (लेफेवर) यांचें म्हणणें खालील प्रमाणें दिलें आहे. "अब अनुभव एवं आगमन (Induction) पारस्परिक सहयोगसे मानवताके वंशवृक्षका पता लगानेमें समर्थ हुए। मानवशास्त्रमें एक शुभ विज्ञानका आविष्कार हुआ। गर्भ विज्ञानमें युगयुगसे खोजे गए अथवा अनुमानित रूपान्तरण (Transformation) का संक्षिप्त रूप प्राप्त हुआ। अनुवीक्षण यंत्रकी सहायतासे भ्रूणमें अण्डे तथा उस अति-तरल पदार्थ समुदायोंकी अवस्थाओंके क्रमिक विकासका अवलोकन किया जा सकता है जो आगे चलकर मनुष्यता का गौरव प्राप्त करता है अर्थात् हजारों शताब्दियोंके कार्य को कुछ महिनोंमें स्पष्ट कर देता है।" (Comparative Philology By P. D. Gune हिन्दी अनुवाद डॉ. भोलानाथ तिवारी) यांचा निष्कर्ष "Ontogeny repeats phylogeny" यावर आमचा विचार खालील प्रमाणे. गर्भावस्थेंमध्यें दिसून येणारे बदल (Repetition of phylogeny) हें मनुष्याचे रजोवीर्यादिकांचे योगें उत्पन्न वस्तूत होतात कीं इतरांचे? जर मनुष्याचे रजोवीर्यापासून होत असतील तर अमानवी प्राण्यापासून मनुष्य झाला या निर्णयास तर्कशुद्धता कोणती? एवढेच Induction होऊ शकते की मनुष्य रजोवीर्यापासून होणाऱ्या गर्भावस्थेंतील बदलापासून त्या त्या बदलांतील प्राण्याकारापासून मनुष्य झाला. यावरून मनुष्य रजोवीर्याशिवाय झालेल्या प्राण्यांपासून प्रतिपादित क्रमविकास तर्कशुद्ध नाहीं. याविषयीं अनुभव–निरीक्षण व तर्क तीनही नाहींत. अर्वाचीन वैज्ञानिक Mutation हें वैलक्षण्याचें कारण मानतात. Mutation म्हणजे आकस्मिकपणे प्राण्याचे ठिकाणी घडणारा पुढील वंशजांत सङ्क्रान्त होऊ शकणारा बदल. या बदलाचे कारण Genetic Material मध्यें होणारा बदल असें देण्यांत येतें. परंतु हा बदल होण्याचें कारण काय याची उपपत्ति मिळत नाहीं.) संपादक म्हणून Mutation ची फलोन्मुख पूर्वकर्माशीं सांगड घालावीच लागते. इतकेच नव्हे तर जडाचीही व्यवस्था पूर्वकर्मावांचून होत नाहीं, म्हणून जड व चेतन या सर्वांत होणाऱ्या बदलाचें नियामक म्हणून भोक्त्याचें फलोन्मुख पूर्वकर्म मानल्याखेरीज पूर्ण समाधान होत नसल्यानें पूर्वकर्माला फलोन्मुख करण्यामध्येंच सर्व प्रयोगाची समाप्ति आहे यापेक्षा वेगळे Mutation शास्त्र संमत नाहीं.

विकासवादासंबंधी असलेला आधुनिक विचार मुख्यत्वेकरून प्राण्यांचें शरीररचनेंवरून केलेल्या वर्गीकरणास घेऊन, दोन गटांत असणाऱ्या साम्यावरून याच्यापासून तो झाला हे ठरविण्यावर आधारलेला आहे. शास्त्रीय भाषेत म्हटलें तर साम्यावरून जन्यजनकभाव येथें ठरविला जात असल्याचे दिसते. परिस्थितीनें शरीरांत होणारे बदल व म्युटेशन या बदलास कारणीभूत गोष्टी आहेत असें म्हणतात. दोन गटांस जोडणाऱ्या प्राण्यांचाही विचार कनेक्टिंग लिंक म्हणून आधुनिकांनी मांडला आहे. कसेही असलें तरी तेथें साम्यावरून, साधर्म्यावरून जन्यजनक भाव निश्चय मूलाधार आहे. हा मूलाधारच तर्कतः बरोबर नाहीं. एकाच पित्याचे चार पुत्र आहेत, त्यांच्यांत साधर्म्य आहे. मग मोठ्यापासून धाकटा झाला असें म्हणावे काय? असे म्हणतां येत नाहीं म्हणून विकासवादांतील अमक्या फायलम पासून तमका फायलम झाला म्हणणें विसङ्गत आहे. आमच्या एका सुविद्य प्राध्यापकापुढे हें मांडल्यावर तें म्हणाले तुम्ही बापाचीं मुलें असें म्हणतां की म्हणून तुमचेंच म्हणणें चूक आहे. यावर फारसा विवाद करण्याची जरूरी नाहीं. कारण तर्काची मूळ व्याख्याच "व्याप्यारोपेण व्यापकारोपस्तर्कः" नजरेआड करून केलेलें हें विधान आहे. विकास वाद्यांचेच व्याप्य घेऊन येथें व्यापकारोप करून आपत्ति दिली आहे. तेव्हां विकासवाद असिद्ध आहे. यावर कांहीं लोक गर्भावस्थेंत विविध काळांत दिसणारे आकार सांगून Ontogeny repeats Phylogeny हा आधार देऊन आक्षेप करतील. तेथेंही मनुष्य वा तत्तद्विचार्य प्राण्यांचे शुक्रशोणितांतून होणारे हे आकार आहेत, अन्य प्राण्यांचे नव्हेत, तेंव्हा हेंही गैरलागू ठरतें. केवळ साधर्म्यावरून जन्यजनकभाव निश्चय करतां येत नाहीं, असे न्यायभाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे– 'न साधर्म्यस्य कृत्स्नप्रायाल्पभावमाश्रित्योपमानं प्रवर्तते, किं तर्हि? प्रसिद्धसाधर्म्यात्साध्यसाधनभावमाश्रित्य प्रवर्तते इति।' (न्यायभाष्ये २।१।४५) म्हणून आधुनिक विकासवाद युक्तिसङ्गत नाहीं. यावर प्रश्न येतो ही व्यवस्था कशी आहे? परंपरेनें प्राप्त व्यवस्था, ईश्वरानें वेगवेगळ्या काळीं वेगवेगळ्या प्राण्यांची व अन्य पदार्थांची स्वेच्छामात्रें भूतसमष्टि विराट शरीरापासून अयोनिज सृष्टि केली व तत्पश्चात् मैथुनी प्रजा होत राहिली. उत्पत्तीत पौर्वापर्य आहे, परन्तु सर्व प्रारंभी विराडुद्भूत ईश्वरसृष्टच आहेत. मैथुनी प्रजेची व्यवस्था प्रारब्धानुसार, कर्मविपाकानुसार निश्चित ईश्वरानेंच केली आहे. परंतु मागल्या गटापासून पुढला गट असें नाहीं, सृष्टीमध्ये सत्त्वाचा विकासवाद नसून ह्रासवाद आहे. उत्तरोत्तर घटत जात असलेली शारीरिक व मानसिक शक्ति सर्वांना प्रत्यक्ष दिसतच आहे. तसेंच सत्त्वह्रासाचा विकास आहे. सत्त्वविरोधी राजस, तामस प्रगतीचा विकास आहे. ईश्वर विमुखतेचा अष्टादश विद्यास्थान विमुखतेचा विकास आहे. हा आर्ष सिद्धान्त प्रत्यक्ष आहे.

विकासवाद असङ्गत असल्याचें आणखी एक प्रमाण म्हणजे पिशाच्चादिकांचें अस्तित्व. त्यांचें मनुष्याकार अयोनिज शरीर कोणत्या वानरापासून उत्पन्न होतें? पिशाच्च मनुष्यापेक्षां विकसित म्हणावें कीं अविकसित म्हणावें हा मोठा प्रश्नच आहे. आज देखील पिशाच्च आदींचा मनुष्याकार अयोनिजशरीर भूतसमष्टि (विराट् शरीरापासून) होऊं शकतें तर प्रथम मानवांना 'महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा। मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः' म्हटलेल्यांचे अयोनिज शरीर तसें होऊं शकत कां नाही? काय Archaeologial Evidence तसें न होण्यास प्रमाण आहे? समष्टिचैतन्यविशिष्ट प्रकृति म्हणजे परमेश्वरी व प्रकृतिविशिष्टसमष्टिचैतन्य म्हणजेच परमेश्वर या पासून नाहीं तर मग काय शून्यापासून सगळे होतात असे म्हणायचे काय? केवळ प्रकृतिपासून सगळे होतात असे तरीं म्हटलेंच पाहिजे ना? तात्पर्य परंपरापराप्राप्त व्यवस्था सोडून देऊन विकासवादाचें आश्रयण करण्यास कोणतेंही बलवत्तर प्रमाण नाहीं. विकासवादाचा आणखी परामर्श पूर्वी झालाच आहे.

शिक्षण घेतल्याशिवाय जगांतील कोणताही मनुष्य प्रथम भाषण व प्रथम लेखन करूं शकत नाहीं, हे प्रयोगसिद्ध व तर्कसिद्ध आहे. ( आजचे समालोचक विकासवादाचें नांव घेऊन एकदा प्रथम पूर्वजास अविकसित (Undeveloped) म्हणतात आणि प्रथम शिक्षकाची अनिवार्यता मान्य करून आपण स्वत:सिद्ध नसल्याचें स्वीकारून व प्रथम शिक्षकाचें स्वत: सिद्धत्व पत्करून अप्रत्यक्षतः प्रथम पूर्वजांस विकसित (developed) म्हणतात ही मोठीच विसङ्गति आहे, याप्रमाणें विकासवादांत अनेक त्रुटि आहेत ) संपादक.

प्रसिद्ध वैदर्भीय सन्त गुलाबराव महाराजांनी त्यांच्या अलौकिक व्याख्यान–मालेंत, संप्रदाय–सुरतरुंत व साधुबोधांत प्रबळ तर्कांनीं विकास–वादाचें खण्डन केलें आहे, तें तेथें पाहून घ्यावें.

या सर्व प्रतिपादनाचा निष्कर्ष-वर्णलेखन व वर्णोच्चारण यांचा स्वत:सिद्ध असा प्रथम शिक्षक मानावा लागतो, ज्याचे पासून प्रथम मनुष्यानें शुद्ध वर्णलेखन व उच्चारण शिकून तें पुढील मनुष्यास परंपरेनें प्राप्त करून दिलें. पुढें उच्चारण व्यवकीर्ण व लेखन घृष्ट होऊन अन्यान्य भाषा व लिपी बनल्या गेल्या. स्वतन्त्र विश्वसृष्टीप्रमाणेंच ही वर्णलिपिसृष्टि आहे. याचा स्रष्टा स्वत: सिद्ध आहे. असें न मानल्यास सृष्टीला केवळ तर्कानें अनेककर्तृकत्व वेदान्तांत आपत्ति दिल्याप्रमाणें मानावे लागेल. तसे मानणे एका मोठ्या ग्रहापासून आजची सर्व ग्रहमाला (Solar System) झाली या आधुनिक तर्कास विसङ्गत ठरेल. म्हणून ब्रह्मा नावाची स्वतंत्र विश्वरूप हिरण्यगर्भ देवता, देवभाषा, ही प्रथम भाषा, तिची लिपी व क्रम यांची प्रथमशिक्षक आहे. असें स्वीकारल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. यावर आधुनिक म्हणतील कीं अशी प्रथम पासून लिपि माहीत असतां वेद कण्ठस्थ करण्याचें कारण काय याचा विचार पुढें केला आहे. उदयनाचार्य याच अभिप्रायानें लिहितात. ' पदात् खल्वपि–कार्यत्वान्निरुपाधित्वमेवं धृति विनाशयोः ।।...............विच्छेदेन पदस्यापि प्रत्ययादेश्च पूर्ववत् ।।५।।

पदशब्देनात्र पद्यते गम्यते व्यवहाराङ्गमर्थोऽनेनेति वृद्धव्यवहार एवोच्यते । अतोऽपीश्वरसिद्धिः । तथाहि यदेतत्परादिनिर्माण नैपुण्यं कुविन्दादीनां वाग्व्यवहारश्च व्यक्तवाचां लिपितत्क्रमव्यवहारश्च बालानां स सर्व स्वतन्त्रपुरुषविश्रान्तः व्यवहारत्वान्निपुणतर शिल्पि-निर्मितापूर्व घटघटनानैपुण्यवत् चैत्रमित्रादिपदवत् पत्राक्षरवत् पाणिनीयवर्णनिर्देशक्रमबच्चेति ।।... अस्त्वर्वाग्दर्शी कश्चिदेवात्रमूलमितिचेन्न–तेनाशक्यत्वात् कल्पादावादर्शाभासस्यसिद्धेः । इति । ( न्याय कुसुमाञ्जलि स्तबक ५ कारिका २६ )

या सर्व प्रतिपादनाचें सारांशरूप टिपण करून हें प्रकरण संपवितो.

१) वर्णोद्धार तन्त्राचा कर्ता भगवान शङ्कर होय.
२) वर्णोद्धार तन्त्राचा काळ लिपिलेखन अस्तित्वांत आल्याचा काळ किमान पक्षी होय.
३) वेद व तन्त्रे सृष्टयारंभी ईश्वरानें उपदेशिलीं.
४) सृष्टीमध्यें वेद व तन्त्रात उपदेशिलेल्या व्यवहार विद्याकलादिकांचा विकासवाद नसून ह्रासवाद आहे.
५) माणसाला ऐकण्या व शिकविल्यावाचून प्रथम बोलता व लिहितां येत नाहीं.
६) आद्य भाषा व लिपि ईश्वरोपदिष्ट आहे. ईश्वर हाच त्यांचा स्वत:सिद्ध असा प्रथम शिक्षक आहे.
७) आद्य भाषेचें व्यवकीर्णतेनें व आद्य लिपीचें घृष्टलेखनाने व आभासानें इतर सर्व भाषा व लिपि बनल्या.

---

प्रकरण १४ वे–

# नाव ब्राह्मी कां देवनागरी ?

केवळ अशोकलिपिलाच ब्राह्मी हें नाव असल्याचें पूर्वप्रसिद्ध नाहीं. ' भारतीय प्राचीन लिपिमाला ' ग्रंथांत पं. गौरीशङ्कर हीराचंद ओझा पृ. १८ टिप्पणी ३ मध्यें म्हणतात– " युरोपियन विद्वानोंने ब्राह्मी लिपीका पाली, इंडियन पाली, साउथ अशोक या लाटलिपि आदि नामोंसें भी परिचय दिया है परन्तु हम इस लेखमें सर्वत्र ब्राह्मी नामकाही प्रयोग करेंगे । "

### ब्रह्मणा सृष्टा = ब्राह्मी

यावरून असें सिद्ध होतें कीं केवळ अशोकलिपीचेंच ब्राह्मी हे नांव असणें सर्वपरिचित वा सर्वमान्य असें निश्चित नव्हतें. ब्राह्मी याचा अर्थ ' ब्रह्मणा सृष्टा ब्राह्मी ' एवढाच आहे. ब्रह्माण्ड शरीरी असणाऱ्या स्वयम्भू ब्रह्मानें, सृष्ट्यारंभी प्रथम मन्वन्तराधिपति असणाऱ्या स्वायम्भुव मनूस लिपिज्ञान दिले. स्वायम्भुव मनूपासून प्रियव्रत, आग्नीध्र, नाभि आणि नाभीपासून श्री ऋषभदेव असा क्रम आहे, ऋषभदेवानीं ब्राह्मी नांवाचे त्यांच्या मुलीला शिकविलेल्या १८ प्रकारच्या लिपि ब्राह्मी म्हटल्या जातात, अशी जैन परंपरेतील प्रसिद्धि आहे. ही प्रसिद्धि सृष्ट्यारंभानंतर फार पुढील असल्यानें तिचा स्मृतिप्रोक्त ब्रह्म-सृष्टत्वाशीं विरोध होऊ शकत नाहीं. जसें पूर्वी युनायटेड प्रॉव्हिन्स म्हणून यू. पी. असें म्हटले जाई. आज उत्तरप्रदेश म्हणून यू. पी. म्हणण्यांत येतें. येथें मूळ वस्तूंत विरोध काय ? जैनाचार्यांनाही केवळ अशोकलिपिलाच ब्राह्मी हें नांव असल्याचें, या वरून मान्य नाहीं असें सिद्ध होतें. या वरून जैनमतानुसारही श्री ऋषभदेवाएवढी भारतीय लिपि प्राचीन आहे.

सूर्य सिद्धान्तमतानुसार चालू मन्वन्तर सातवें आणि महायुग अठ्ठाविसावें आहे. सन १९८० ला या मन्वन्तरांतील गतकलीच ५०७९ वर्षे आहे. याविषयीचा विशेष विचार David Diringerयांचे विषयींचे परामर्शांत पुढें केलां आहे. देवनागरी याचा अर्थही ' देवांना नगरे भवा देवनागरी ' एवढाच आहे. या दोन्ही नांवांचे अर्थ तन्त्रोक्त लिपीशी जुळतात.

### तन्त्रमताप्रमाणे सृष्टि

तन्त्राच्या मताप्रमाणें सृष्टि चार प्रकारची सांगितली गेली आहे. १) शब्दमयी, २) अर्थमयी, ३) चक्रमयी, ४) देहमयी यापैकी चक्रमयी सृष्टि विश्वाचें प्रतीक असणारें श्रीचक्र व प्राणिमात्राचे शरीरांतील षट्चक्रे वगैरेची आहे. वास्तुशिल्पज्ञ घर बांधण्यापूर्वी घराचा आराखडा काढतो. तसेच श्रीचक्र हा विश्वनिर्मात्यानें सर्व वेळां सृष्टि करण्यासाठीं तयार केलेला विश्वाचा एकच आराखडा आहे. (वरिवस्या रहस्य)

### श्री चक्रात बीजाक्षर सृष्टि

म्हणून चक्रसृष्टि होतानाच बीजाक्षर सृष्टि त्याचवेळीं चक्राचे अङ्ग म्हणून होणें अनिवार्य आहे. म्हणूनच आजमितीसही श्री चक्र-लेखन करतांना बीजाक्षर लेखन करण्याचें विधान आहे. अर्थात् श्रीचक्र उत्पन्न करणारा ब्रह्माच तेथूनच उत्पन्न असणाऱ्या बीजाक्षर सृष्टीस उत्पन्न करणारा आहे. श्रीचक्राचा वेदामध्यें ' देवानां पूरयोध्या ' असा उल्लेख आहे.

' अन्येषामसाध्यं देवता निवासभूतं श्रीचक्र नगरम् । ' असा याचा श्री भास्कररायांनी ' नित्याषोडशिकार्णव सेतुबन्ध ' टीकेंत अर्थ केला आहे. यावरून श्रीचक्र जेथें देवांचा निवास आहे अशी नगरी आहे. म्हणून तेथें उत्पन्न झालेल्या बीजाक्षर लिपीस देवनागरीं म्हटले आहे.

अष्टाचक्रा नवद्वारा देवानां पूरयोध्या । तस्यां हिरण्मयः कोशः । स्वर्गो लोको ज्योतिषावृतः ।
(तैत्तिरीय आरण्यक १।२७५) (अथर्ववेद शौनकशाखा १०।२।३०)

त्रैलोक्यमोहनादि सर्वसिद्धिप्रदान्त चक्राष्टकयुक्तं नवयोनिघटितमन्येषामसाध्यं देवतानिवासभूतं श्रीचक्रनगरं............ !
(नित्याषोडशिकार्णव विश्राम ६ श्लोक ११ सेतुबन्ध)

वगैरे या विषयास प्रमाणे आहेत. याप्रमाणें ब्राह्मी व देवनागरी हीं दोन्ही नावे तन्त्रोक्त अशा, श्रीचक्रात, ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या बीजाक्षर-लिपीलाच पूर्णतया जुळतात.

## ब्राह्मी व देवनागरी एकच

ज्या प्रमाणें ' गणानां त्वा ' या ऋचेमध्ये ' ब्रह्मणस्पते गणपतिं त्वा हवामहे ' म्हणजे ' हे ब्रह्मणस्पते तुज गणपतीचें आम्ही आवाहन करतो ' असें आहे. यावरून ब्रह्मणस्पति व गणपति या एकच देवता असल्याचे सिद्ध होतें. त्याचप्रमाणें ब्राह्मी व देवनागरी हीं दोन्हीं नावे पूर्वोक्त प्रमाणांवरून एकाच तन्त्रोक्त लिपीचीं असल्याचे समजून येतें. जसें श्रौत ग्रन्थांमध्यें ब्रह्मणस्पति वा गणपति या दोन्हीं नांवांपैकी ब्रह्मणस्पति हें नाव अधिक आढळते व पुराणग्रन्थांत गणपति हे नांव अधिक आढळते; तसेंच एका लिपीलाच स्मृत्यादिकांत ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेली या अर्थाचे शब्दानें अधिक उल्लेखिलेलें आढळते व श्रुति तन्त्रादिकांत देवांच्या नगरांत उत्पन्न झालेली या अर्थाचे शब्दानें अधिक उल्लेखिलेले आढळते. असें असल्यास आश्चर्याचे कारण नाहीं.

## ललितविस्तराचा अभिप्राय

जर ' ब्राह्मी 'वरून ' देवनागरी ' जाणली जाऊं शकत नसेल, गृहीत धरली जाऊं शकत नसेल तर द्रविड वंग, कनारी वगैरे लिपींचा उल्लेख करणाऱ्या ललितविस्तरकारांनीं देवनागरीचा वेगळा उल्लेख न करणें अनुचित ठरलें असतें. द्राविडादि लिपींची नांवें ठाऊक असणाऱ्यांस देवनागरी ठाऊक नव्हती असें मानणें कठीण आहे. जर देवनागरी वेगळी असूनही तिचा उल्लेख केला नसेल तर व्यञ्जनेने, बुद्धदेवांना देवनागरी ठाऊक नव्हती असा अभिप्राय व्यक्त करावयाचा आहे कां ? म्हणूनच ब्राह्मी म्हटल्यावर देवनागरी येत असल्याने वेगळी उल्लेखिली नाहीं असें म्हणणें भाग पडतें. यावर प्रश्न केला जाऊं शकेल कीं ' ललितविस्तर ' या बौद्धग्रन्थांत उल्लिखित ६४ लिपींपैकीं ' देवलिपि ' एक नांव आहे. तीच देवनागरी आहे, अतः स्वतन्त्र उल्लेखिली नाहीं म्हणणें चूक आहे. असें म्हणणें योग्य नाही.

' देवलिपि ' शब्द ' **देवानां लिपिः–देवलिपिः** ' असा एक विग्रह करून बनतो, तसेच ' **देवनागरीलिपिः देवलिपिः** ' असा दुसऱ्या प्रकाराने विग्रह करून बनतो. पहिला **षष्ठितत्पुरुष** ' व दुसरा ' **शाकप्रियः पार्थिवः शाकपार्थिवः** ' ' **देवपूजकोब्राह्मणः देवब्राह्मणः** ' ' मुख-नासिकावचनो ऽनुनासिकः ' सूत्रांत ' **मुखसहिता नासिका मुख नासिका** ' इत्यादि प्रसिद्ध विग्रहाने ' **मध्यम पदलोपी समास** ' आहे त्यापैकी ' **देवलिपि** ' शब्दानें पद्मपुराणांत ' **देवनागरीलिपि** ' चा उल्लेख ' मध्यमपदलोपी समास घेऊन आला आहे. पद्मपुराणांतील भाग पुढें येणारच आहे. ललितविस्तरांत या प्रकारानें त्यामधील ' **देवलिपि** ' शब्द घेंतां येणार नाहीं, कारण तसा घेतल्यास त्याचा अर्थ देवनागरी होईल तसा अर्थ स्वीकारल्यास, देवनागरी अशोकलिपीची (ब्राह्मीची) जनक असल्यानें ६४ च्या यादींत जन्यापेक्षां जनकाचें नांव उल्लेखिले पाहिजे होतें. स्वतःचें नांव लिहून पित्याचें नांव लिहिण्याच्या सम्प्रदायाला अनसरून द्वितीय स्थानांत तरी देवनागरीचा उल्लेख पाहिजे होता– तर दुसरा उल्लेख खरोष्ठीचा आहे व देवलिपि २५ वी आहे. देव–नाग–यक्ष गन्धर्व, किन्नर. महोरग वगैरे लोकान्तरांतील वर्गांच्या लिपींच्या सहपाठांत ती उल्लेखिली आहे. ' चक्रलिपि ' म्हणून या पेक्षां पुढेंही ती आहे. ती देखील श्रीचक्रांतील ब्रह्मसृष्ट लिपि ललितविस्तरांत म्हणतां येणार नाही कारण– ती सृष्टयारंभीं झाल्यानें ब्राह्मीपेक्षां मूलभूत व ज्येष्ठ अशी तिची जननी मानावी लागेल म्हणून तिचा सर्वप्रथम उल्लेख व्हावयास हवा होता. वेदापासून देवनागरी नांव येत असलेलें बुद्धदेवाला अज्ञात असल्याचें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. बुद्धदेव अनुचित क्रमाने ६४ लिपींची यादी देत आहे असेंही म्हणतां येणार नाहीं. ' **सर्वज्ञः सुगतोः बुद्धः** ' अशी श्री बुद्ध देवांची प्रसिद्धि आहे. एवंविध आपत्ति बुद्धदेवांवर आणणारी रचना ललितविस्तरकार करतील असेंही कोणी म्हणणार नाही. ' **देवानां लिपि** ' असा देवलिपि शब्दाचा अर्थ केल्यास आणि ' ब्राह्मी ' देवनागरी म्हणून घेतल्यास वरील कोणतीच आपत्ति येणार नाहीं, कांरण ' नागरी ' म्हणून सर्व नागरी त्यांत येऊन जाते. किं च वरील सर्व आपत्ति पत्करूनही ' **देवलिपि** ' शब्दाने ' **देवनागरी** ' ललित विस्तरांत घेतल्यास तरीही अशोकलिपीपूर्वी देव नागरी नव्हती किंवा ती ज्ञात नव्हती म्हणण्यास त्यामुळे समर्थन मिळत नाहीं. प्रत्युत विरोधच येईल.

## जैन सूत्रांचा अभिप्राय

जैनांचे ' भगवती सूत्रात ' ' नमो बंभीए लिविए ' असें वन्दन आहे. त्या विषयीं ' **प्रमेयचन्द्रिका** ' टीकाकार ' **घासीलाल महाराज** ' म्हणतात– ' ब्राह्मी अकारादारभ्य हकारपर्यन्त वर्णात्मिका भाषा । तदुक्तं ब्राह्मी तु भारती भाषेत्यमरः । तत्सङ्केतरूपा लिपिर्ब्राह्मी लिपिः । **अथवाऽष्टादशप्रकारा लिपिः श्रीमदादिनाथेन ब्राह्मी नाम्नीं स्वपुत्रीं प्रदर्शिता तस्मादियं लिपिर्ब्राह्मीति शब्देन कथ्यते** ' या वरून जैन ही केवळ अशोकलिपीलाच ब्राह्मी म्हणत नाहींत. जैनसूत्रीलिखित अष्टादश लिपींतही देवनागरी हें नांव वेगळे उल्लिखित नाहीं. तसेच ' **प्रमेयचन्द्रिका** ' व्याख्येंत सांगितल्याप्रमाणें ' **अकारादारभ्य हकारपर्यन्त वर्णात्मिका भाषा** ' देवनागरीची असल्याने त्या व्याख्येंनुसार देव-नागरी ब्राह्मी होतेच.

जैन अथवा बौद्ध, त्यांचेपेक्षां पूर्वकाळी भारतात लिपी नव्हती व आपणच लिपि निर्माते आहोंत असें जैन अथवा बौद्ध कोठेंही म्हणत नाहीत. आधुनिक पुरातत्वाभ्यासकांकडे कोणताही स्पष्ट प्रत्यक्ष पुरावा अथवा प्रबळ तर्क नसतां प्राचीन प्रसिद्धीलाच मानणें भाग आहे. म्हणून अशोकलिपि हा नागरीचा अंश असल्यानें नागरीचा साम्प्रदायिक प्रकार असल्याचे भास्कररायांचे म्हणणे सङ्गत आहे. अर्थात् अशोकलिपि हा ब्राह्मी ( = ब्रह्मसृष्टा) लिपीचा एक सांप्रदायिक लेखनप्रकार आहे. अशोकलिपि नागरीपासुन निघाल्याचे ' **प्राचीन भारतीय लिपिमाला** ' या पं. **गौरीशङ्कर ओझा** यांचे पुस्तकांतील पृ. ३ वर दिलेल्या अशोकपूर्वकाळातील बडली येथे सापडलेल्या लेखांतील चित्र-

विभागात दाखविल्याप्रमाणे असणाऱ्या ' वी ' या अक्षरातील वेलांटीवरून सूचित होते. वस्तुतः अशोकलिपि ' वी ' चित्रविभागात दाखविल्या प्रमाणे आहे. म्हणून अशोकलिपि हीच केवळ ब्राह्मी लिपि असल्याचे (आधुनिकांचे) म्हणणें पूर्वप्राप्त वेदशास्त्रप्रसिद्धीला अनुकूल नाही, अशी विदेशी प्रसिद्धी ही नाही. म्हणून या प्रकरणाचे सुरवातीस ओझा यांनी दिलेल्या उद्धरणांतील युरोपियन विद्वानांची साक्ष सङ्गत आहे.

### ब्राम्ही व देवनागरी एकच

या प्रमाणें आधुनिक लिपिचिन्तकांचे अशोकलिपि या ब्राह्मीच्या एकदेशालाच केवळ ब्राह्मी म्हणणे अर्थविप्लव करणारे आहे. वेद-तन्त्रादिकापासून देवनागरी व स्मृत्यादिकापासून ब्राह्मी हे नांव एकालाच प्राप्त झालें आहे, हाच खरा सिद्धान्त आहे. एकाच लिपीपासून अनेक लिपि होऊं शकत असल्याने एकच लिपि प्रथम ब्रह्मसृष्ट असणे युक्त आहे. इत्थं च ब्राह्मी व देवनागरी ही एकाच लिपीचीं दोन नांवें आहेत. ब्रह्मसृष्टत्वा संबंधी खालील प्रमाणें आहेत.

' षाण्मासिकेपि समये भ्रान्तिस्सन्जायते नृणाम् ।
धात्राक्षराणि सृष्टानि पत्रारूढान्यतः पुरा ॥ '
(वीर मित्रोदय व्यवहार प्रकाशोद्धृत बृहस्पतिवचन)
नाकरिष्यद्यदि ब्रह्मा लिखितं चक्षुरुत्तमम् ।
तत्रेयमस्य लोकस्य नाभविष्यच्छुभा गतिः ॥ (नारदस्मृति)
तात्पर्य ब्राह्मी व देवनागरी एकच आहेत.

---

प्रकरण १५ वे–

# देवनागरीलिपि आणि संस्कृत

### वङ्गीयांचा नागरी विषयक दृष्टिकोण

आतापर्यंत आपण पाहिलें आहेच कीं ब्रह्मसृष्टा म्हणून जिला ब्राह्मी असे नांव आहे, त्याच लिपीला श्रीचक्रांत म्हणजे देवनगरांत उत्पन्न झालेली म्हणून देवनागरी असेही नांव येते. तन्त्रोक्त लिपीला हीं दोन्हीं नांवे श्रुति, स्मृति व तन्त्रानुसार प्रमाणित असल्याचें दाखविलेच आहे. प्रस्तुत प्रकरणात अन्य भारतीय लिपि लेखकांचे दृष्टीनें देवनागरीचा संस्कृताशीं कसा संबंध आहे हे पहावयाचे आहे. शब्दकल्पद्रुमाच्या नागरी आवृत्तीचे भूमिकाकार देवनागरी विषयी लिहितात–

वङ्गाक्षरैरितः पूर्वं कोश एष प्रकाशितः ।
तेनासौ सुखपाठ्योऽभूत्केवलं वङ्गवासिनाम् ।।६७।।
नागरी वर्णमाला तु संस्कृतैकोपयोगिनी ।
सर्वत्रादियते प्रायः सर्वैः संस्कृतपाठिभिः ।।६८।।
सर्वेषां बोधसौकर्यमतोऽस्माभिर्विधित्सुभिः ।
प्रशस्तैर्नागरैर्वर्णैरेष कोशः प्रकाश्यते ।।

' बङगाली लिपींत हा कोश पूर्वी प्रकाशित केला गेला तो केवळ बंगालात राहणाऱ्यांचेच सहजपणें उपयोगाचा झाला.

सर्वत्र संस्कृत वाचणाऱ्या मंडळीत संस्कृताला उपयोगी अशी नागरी वर्णमाला आहे यावद्दल मतैक्य असल्यानें नागरी लिपीचा आदर केला जातो.

सर्वांना सहजपणें बोध व्हावा असे आमचेंही मत असल्याने प्रशस्त अशा नागरी वर्णांचा वापर करून हा कोश प्रकाशित करीत आहोत– ' या वरून वङगीय भूमिकाकारांची संस्कृतैकोपयोगी ' प्रशस्त नागरी ' अशी दृष्टि दिसते.

### काकुनूरि अप्पकवीचा अभिप्राय

या प्रमाणेंच ' शुद्धआन्ध्र लिपिलेखन क्रम ' या प्रकरणांत ' आन्ध्रशब्दचिन्तामणि ' चे ' अप्पकवीयम् ' व्याख्याकार ' काकुनूरी अप्पकवि ' म्हणतात.

' अनुक्तमन्यतः अनु न्यायमुचेत नीशब्दानुशासन सूत्रमुनंदु जेप्पिन यनुस्वारमुनु, विसर्जनीयमुनु, सकलदेश प्रशस्तमैन नागरिलिपियंदु नेट्टवलेनो यट्टुल देलिसिकोनुनदि ।। "

म्हणजे सकलदेश प्रशस्त नागरलिपीपासून येथें सांगितलेल्या अनुस्वार व विसर्गाची आकृती घेतली पाहिजे. काकुनूरि अप्पकवि या व्याख्याकारांचा काळ इ. स. १६५६ म्हणजे सतराव्या शतकाचा मध्यकाळ त्याच्याच उल्लेखावरून कळून येतो. यावरून आन्ध्रग्रन्थकारांचा नागरी विषयक दृष्टिकोन प्रकट होतो.

### मल्ल्याळम् मासिक पत्रिका–अनादि

या प्रमाणेच मल्ल्याळम् मासिक पत्रिका ' अनादि ' ( Magazine Anadi Vol. 3 No. 8 Editor: Erakkara Raman Namboodiri, Office Thirunavaya- Bhramswom Madhom P. O. Tavanur Dist. Mallapuram Kerala State India ) ऑगस्ट १९७४ च्या संपादकीयांत लिहिले आहे.

' इनत्तयिल् इन्नु काणुन्न भाषकळ् एरियकुरं संस्कृत भाषयुटे संतानङळाणेन्नु विचारिक्कानुळ्ळ स्पष्टमाय न्यायं काणुन्नु एन्नतु कोण्टावां सार्वत्रिकमाय अंगीकरणं आ भाषक्कु लभीच्चत । एंताणा न्यायङळ एन्नचोद्यत्तिन् आद्यं किट्टुन्न महपेडिअक्षरङळ एन्नुं पिन्नेकिट्टुन्न मरुपटि लिपियेन्नुमाण् आधमर्ण्य बोध्यमाकुं अवयुटें लिपिकळुटें रूपं परिशोधित्याळुं सादृश्यं व्यक्तमावुं संस्कृतत्तोट एट्टवुं कूट्टतलं एतिर्प्पु प्रकटिप्पिकुन्न द्राविडभाषाभिमानिकळे कंट्टकिट्टुन्नतु तामिळनाट्टिलाणु एन्नात अवर्कपोलुं तमिळिले लिपियुटे नागरी सादृश्यं ओळिवाकान् इन्नुवरे कळिञ्ञिट्टिल्ल नागरीयिले ' अ ' युटे मुकळिरुळ्ळ वर एट्टत्तुकळञ्ञ् ओळुवकन् रीतियलेलुतियताण तामिळिले 'अ' एन्नु स्पष्टमल्ले ? (पृ. ३)

याचा संक्षिप्त सारांश असा आहे– ' सर्व भारतीय भाषांच्या वर्णमाला आणि लिपि संस्कृताच्या ऋणि आहेत. संस्कृतास सर्वाहून अधिक विरोध दाखविणाऱ्या तामिळांचे अक्षरात आद्य अकाराचेच नागरीशीं सादृश्य अजून काढून टाकता येत नाहीं.

### कन्नडिगांचा अभिप्राय

कन्नडिगांचा अभिप्राय देखील ' कन्नड लिपिय उग मत्तु विकास ' या पुस्तकात डॉ. ए. वि. नरसिंहमूर्ति यांनी दिला आहे.
' बादामि चाळुक्यर कालदल्लि ई अक्षरक क संस्कृतद त एंब अक्षरवन्नु बहळवागि होळुत्तदे ' (पृ, ७९)
'सातवाहन कालदल्लि 'ई' अक्षरवु संस्कृतद द एंब अक्षरवन्नु बहळवागि होळुत्तदे. ' (पृ. १००)

वरील वाक्यांत 'बादामि चालुक्य ' व ' सातवाहन ' राजवंशीयांचे शिलालेखांत ' व ' आणि ' द ' ही अक्षरें संस्कृतांतील ' व ' आणि 'द' प्रमाणेंच आढळतात असें म्हटलें आहे.

या वरून देवनागरी ही संस्कृताची लिपि असल्याची त्यांची धारणा प्रकट झाली आहे.

### तामिळ भाषिकांचा दृष्टिकोण

आता तामिळ भाषिकांचा संस्कृताबद्दलचा दृष्टिकोण पाहूं. एका तामिळ कवीचें एक पद्य आहे.
' मरै मुतर् किळन्तवायान् मतिमुकिळमुटित्तवेणी
इरैवर् तन् पेयरै नाट्टि इलक्कणं चैय पट्टै ।
अरै कटल् वरै पिर् पाटै यनैत्तुं वेन्नार्यत्तोटुरळ्तरु
तामिळ् तैवत्तैयुष्णिन्नेन तेत्तल् चैवोम् ॥

याचा अभिप्राय असा कीं वेदोपदेश करणाऱ्या व डोक्यावर चन्द्रकला धारण करणाऱ्या शङ्करानें जिचें व्याकरण आपलें नांवें रचविलें आणि जी समुद्रावरील तरंगाप्रमाणें असणाऱ्या अन्य भाषांना जिंकून संस्कृताशीं अविभाज्य स्थितीत असते त्या तामिळ् देवतेचें ध्यान करून तिला प्रणाम करतो–

### तामिळचा संस्कृताशीं संबंध

या वरून तामिळचा संस्कृताशीं असणारा अविभाज्य संबंध कवि प्रकट करतो. तो कसा झाला या विषयीं आणखी कांही विस्तार आवश्यक असल्यानें– ' **तमिळ साहित्य और संस्कृति** ' या ' **अवधनन्दन** ' यांचे मद्रास विद्यापीठस्थ विद्वानांनीं संशोधित केलेल्या आणि मार्तण्ड उपाध्याय, मन्त्री सस्ता साहित्य मण्डल नई दिल्ली यांनीं सन १९५८ मध्यें प्रकाशित केलेल्या पुस्तकावरून उद्धृत करीत आहे– पृष्ठ ६५ तामिळ लिपि प्रकरण– ' तमिळ लोग अपनें अक्षरोंकी उत्पत्ति भिन्न भिन्न देवताओंसे मानते हैं । उनका विश्वास है कि १२ स्वरोंको ब्रह्मानें और १८ व्यञ्जनोंको शिव, विष्णु, कार्तिकेय, इन्द्र, सूर्य, चन्द्र, कुबेर, यम, वरुण आदि देवताओंने बनाया । जहाँ हमने तमिळ और देवनागरी वर्णमाला और अक्षरोंके बीच अन्तर बतलाये है, वहाँ दोनोंके बीच बहुतसी बातें एक दूसरेसे मिलती जुलती भी दृष्टिगोचर होती है । तमिळ और नागरी वर्णमालाओंकी परस्परतुलना करनेपर दोनोंकी वर्णमालाओंमें भेद होते हुए भी कुछ विलक्षण समानता (दोनोंमे) देखनेमे आती है जिससे यह प्रतीत होता है कि या तो इन दोनों वर्णमालाओंका स्त्रोत एकही रहा होगा या दोनोंमे आदान प्रदान हुआ होगा ' यापुढील चार विभागात चार तुलना प्रकार दाखवून पांचव्या विभागांत लिहितात.

' तमिळ के अनेक अक्षरोंके रूप नागरीके अक्षरोंसे मिलते जुलते हैं । इसी आधारपर अनेक विद्वानोंने यह मत प्रकट किया है कि तमिळ लिपि भी ब्राह्मी लिपिके आधारपर ही बनायी गयी है '

या उद्धरणांत ' नागरीके अक्षरोंसे मिलते जुलते ' असें म्हणून लगेंच ' ब्राह्मी लिपिके आधारपरही ' असें विद्वानांचें मत दिले आहे. या दोहोंत सङ्गति लागू शकत नाहीं नागरी ही ब्राह्मी पासून नसून ब्राह्मीप्रमाणे तामिळ नागरीपासून असल्यानें ' मिळते जुळते ' असल्याचें आम्हीं यापूर्वीच दाखविले आहे, पाश्चात्यांचे प्रभावानें अनुसरल्या गेलेल्या मतानुसारच हें प्रतिपादन आहे. जसें मागें A. B. Walawalkar यानीं सुद्धां ब्राह्मी (अशोकलिपि) तील चन्द्रकोरी दाखविण्यासाठीं देवनागरी लिपींतील उदाहरण दिलें आहे. असो.

याच ग्रंथाच्या पृ. ७५ वर तामिळ साहित्य प्रकरणात ' अवधनन्दन ' म्हणतात– पुराणोंके ( = तामिळ पुराणोंके ) अनुसार पहिले संघम् का आरंभ अगस्त्यसे हुआ । अगस्त्यके संबंधमे अनेक दन्तकथाएं प्रचलित हैं । कहा जाता है कि अगस्ति मुनि उत्तरके रहनेवाले थे । उन्होने दक्षिण में आकर ' पोदियमलै नामक पर्वतपर अपना निवास स्थापित किया और तामिळ भाषा की वृद्धिमें लगे । – लोगोंका

विश्वास है कि अगस्तिने हि तामिळ लोगोंको आयुर्वेद, शिल्पकला, नक्षत्रशास्त्र, रसायनशास्त्र, ज्योतिष आदि विषयोंका ज्ञान दिया। यह भी कहा जाता है कि वर्तमान तामिळलिपि भी अगस्त्यकी देन है। ' अहप्पोरुळ् ' के भाष्यकार ' नक्कीरर् ' ने अपनी रचनामें पहिले और दुसरे संघम् कालके अनेक ग्रन्थोंके नाम दिये है।'

वरील प्रतिपादनावरून ब्रह्मा, शिव वगैरे देवतांपासून तामिळ लिपीची उत्पत्ति असल्याचें म्हणण्यांत 'वर्णोद्धारतन्त्रातील शिवोपदिष्ट ब्रह्मसृष्ट नागरी लिपिपासून घृष्टलेखनानें तामिळ लिपि होत असल्यानें दोहोंची तद्द्वारा एकवाक्यता आहे.

अगस्तीपासून तामिळ लिपीची उत्पत्ति सांगितली जाते व प्रकृत अगस्ति हे वैदिक, व संस्कृतचें जाणकार असल्यानें त्यांनीं उत्पन्न केलेल्या तामिळ लिपीची नागरीशीं पूर्वोक्त प्रकाराने एकवाक्यता असणें क्रमप्राप्त ठरतें. अगस्तींच्या दक्षिणदेशगमनाचा इतिहास काशीखण्ड वगैरे पुराणांतहीं मिळतो. या प्रमाणेंच तामिळ पुराणांत उल्लेखिलेलें शिव, विष्णु वगैरे देव तसेंच अगस्ति हे संस्कृत ग्रंथांत उल्लेखिलेल्या शिव, विष्णु वगैरे देवांहून व अगस्तींहून वेगळें नाहींत, वेगळे असू शकत नाहींत. ज्या शिवाचें काशीत पूजन होतें त्याच शिवाचें पूजन रामेश्वरांतही होतें.

तस्मात् काव्यं चिकीर्षूणां बुभुत्सूनां च धीमताम्। अवश्यं प्राकृतं ग्राह्यं यथैव किल संस्कृतम्॥ एवमेव विजानीहि द्रामिडं चापि भाषितम्। व्याकर्ता स हि सर्वज्ञो यस्यागस्त्यो महामुनिः॥ मामुद्दिश्य तपश्चक्रे पुरागस्त्यो महामुनिः। मया प्रदत्त–विज्ञानो द्रामिडीं प्राकृतीं। व्यधात्॥ अगस्त्य प्रार्थनातुष्ट ब्रह्मदत्तवरा इमाः। नापभ्रंशत्वदोषोऽस्ति द्रामिडीनां गिरां ततः॥ यथैव सांस्कृती भाषा प्रयुक्ता स्वर्गदायिनी प्राकृती द्रामिडी चापि तथैव स्वर्गदायिकेति॥ ( शम्भुरहस्य अध्याय २६७ श्लोक ३३–३७ )

या प्रमाणांत द्रामिडीला प्राकृती म्हटली आहे. प्राकृत व्याकरणांत प्राकृत शब्दाची व्युत्पत्ति ' प्रकृतिः संस्कृतं तस्मादागतं प्राकृतम् ' अशी केली आहे, अर्थात संस्कृतापासून आलेली प्राकृति असा अर्थ होतो.

या सर्वावरून असे दिसून येते कीं तामिळ लोकांचे पूर्वज, त्यांची संस्कृति, त्यांची लिपि, व त्यांची भाषा वेद–स्मृति–तंत्र संस्कृतापासूनच प्राप्त झाल्याचें मानीत होते. विद्वेषवर्धन अन्य कारणांकरितां मागाहून घडवून आणलेलें आहे. तें टाकून देणेच योग्य आहे, या प्रमाणें विचार केल्यास देवनागरीचा संस्कृतशी संबंध सर्वांच्या साक्षीनें सिद्ध होतो. ही गोष्ट आधुनिक शालेय व महाविद्यालयीन शिक्षणापेक्षां पूर्वीपासून चालत आलेली आहे.

---

प्रकरण १६ वे

# अशोकलिपि व देवनागरी

अशोकलिपि व देवनागरी विषयक कांहीं प्रश्नांचा विचार आधुनिक लिपिचिन्तकांनीं करणे जरूर आहे. ते प्रश्न असे–

१) अशोकलिपि व देवनागरी दोन्हीं एकाच बिन्दुस्फोटनापासून अनुक्रमें वामार्ध व दक्षार्ध घेऊन त्यामध्ये वर्णोद्धारतन्त्रोक्त 'सङ्गत रेषा' व 'ऊर्ध्वरेषा' जोडून आपापले 'अ' बनवितात. (सन्दर्भ प्रथम प्रकरण) अशा स्थितींत देवनागरी असतां अशोकलिपि नव्हतीच वा अशोकलिपि असतां देवनागरी नव्हतीच नव्हती असें कसें म्हणतां येईल ?

२) पुढें देखील इ–ई चे अवयव तीन बिन्दु तसेंच 'उ' पासून 'ओ' पर्यंत देवनागरींतील वर्णोद्धारतन्त्रवचनाने येणारा अंश घेऊन अशोकलिपि आपले उकारादि बनविते, तेव्हां वर्णोद्धारतन्त्रापूर्वीची अशोकलिपि आहे असें कसें म्हणतां येईल ?

३) उ, ऊ, क, ण, एवढे तर अशोकलिपींत देवनागरींतील वर्णोद्धारतन्त्रप्राप्त रेषाभाग तेवढाच घेऊन बनविलें जातात. तेव्हां उक्त वर्णोद्धारतन्त्रार्थ अशोकलिपीपूर्वीचा नाहीं असें कसें म्हणतां येईल ?

४) या प्रमाणें 'ग' चे मौलिक उद्भवांतील खालचा भाग घेऊन देवनागरी व वरचा भाग घेऊन अशोकलिपि 'ग' बनतो.

'झ' चे मौलिक उद्भवांतील ऊर्ध्व मात्रा आणि देवनागरीनें टाकून दिलेलें उजवीकडील वरचें अर्धवृत्त घेऊन अशोकलिपि 'झ' बनविते, तर ऊर्ध्वमात्रा व मौलिकांतील शेषभाग घेऊन देवनागरी आपला 'झ' बनविते–

'द' मध्यें एकाच बिन्दुस्फोटनांतील समोरासमोरचे भाग घेऊन अशोक लिपि व देवनागरी वेगवेगळेपणें आपला 'द' बनवितात.

'प' मध्येंही असाच प्रकार आहे. 'ह' मध्येही एकाच बिन्दुस्फोटनाचें वेगळालें अर्ध उचलून ऊर्ध्व रेषा देऊन देवनागरी व अशोकलिपि आपापले 'ह' बनवितात.

'ढ' दोहोंत एकच आहे. व 'छ' पृष्टलेखनाने एकच आहे. उर्वरित अक्षरांत बिन्दुस्फोटन व वर्णोद्धार–तन्त्रप्राप्त भाग या दोहींतील कांहीं उचलून अशोकलिपि बनते हें सर्व पूर्वींचे प्रकरणातून दाखविलेंच आहे. अशा स्थितींत आधुनिक लिपिचिन्तकांनीं अशोकलिपि पूर्वकाळांत वर्णोद्धारतन्त्रोक्तार्थ व देवनागरीचा अभाव मानणें प्रामाणिक कसें ठरेल ? (प्राचीन भारतीय लिपिमाला ग्रंथांत पं. गौरीशङ्कर ओझा यांनीं प्रकरण २ 'ब्राह्मी लिपीकी उत्पत्ति' या मध्यें अनेक युरोपियन विद्वानांचे मताचा संक्षेपानें परामर्श दिला आहे. त्यानंतर ते लिहितात– इस प्रकार कई एक युरोपियन विद्वान ब्राह्मी लिपी के उत्पत्ति का पता लगाने के लिए हिअरेटिक (मिसर की), क्युनिफॉर्म (असीरियाकी), फिनिशिअन, हिमिअरेटिक (सेबियन) अरमाइक और खरोष्ठी लिपियोंमें से अपनी रुचि के अनुसार किसी न किसी एककी शरण लेते हैं। ––– यदि ऊपर लिखी हुआी लिपियोंमे से किसी एककी ब्राह्मी के साथ वास्तविक कुछ भी समानता होती तो सर्वथा इतने भिन्न मत न होते, जिस लिपिमे समानता पाई जाती उसीको सब स्वीकार कर लेते, परन्तु ऐसा न होना ही उपर्युक्त भिन्नभिन्न कल्पनाओंका मूल हुआ जो साथ ही साथ उन कल्पनाओंमें हठधर्मी का होना प्रकट करता है। यह तो निश्चित हैं चाहे जिन दो लिपियोंकी वर्णमालाओंका परस्पर मिलान करनेका उद्योग किया जावें तो कुछ अक्षरोंकी आकृतियाँ परस्पर मिलही जाती हैं चाहे उनके उच्चारणोंमे कितनाही अन्तर क्यों न हो।')

(या वरून ब्राह्मी अशोकलिपिविषयीचें आधुनिक मत मनःकल्पना (conjecture) या स्वरूपाचें असल्याचें दिसतें. त्यामध्यें निश्चितता नाहीं. म्हणूनच अशा अनिश्चित प्रतिपादनावर (आधारित) आधारलेला आग्रह युक्तिसङ्गत नाहीं. अर्थात् वर्णोद्धारतन्त्राबद्दल आधुनिक निश्चित विरुद्ध प्रतिपादन करूं शकत नाहींत. तसेंच वरील प्रश्नांची निश्चयात्मक होकारार्थी उत्तरें देण्यास त्यांचे जवळ आधार नाहीं. म्हणून बिन्दुस्फोटन, वर्णोद्धारतन्त्र, यववराहाधिकरणन्याय व पृष्ट लेखन या एतद्ग्रन्थप्रतिपादित प्रक्रियेस अनुसन्धेय म्हणावें लागेल.)

संपादक

---

प्रकरण १७ वे

# ब्राह्मी (अशोकलिपी)ची उत्पत्ति

यापूर्वी आपण पाहिलेंच आहे कीं अशोकाचे शिलालेखांतून अधिक आढळणाऱ्या ( खरोष्ठी व्यतिरिक्त ) लिपीलाच आधुनिक लिपि समालोचक ब्राह्मी म्हणतात. या प्रकरणांत ब्राह्मीचे उद्भवाविषयीं आधुनिकांचें मताचा संक्षेपाने परामर्श घ्यावयाचा आहे.

**केवळ अशोकाचे शिलालेखांतील लिपि ब्राह्मी नव्हे.**

**जेम्स प्रिन्सेप** यांनीं १९ व्या शतकांत सर्व प्रथम अशोकाच्या शिलालेखांतील लिपींचें यशस्वीपणें वाचन केलें. युरोपियन विद्वानांनीं भारतीय लिपीस लाट, दक्षिणी, इंडियन पाली, इंडियन आणि मौर्य या नावांनीं उल्लेखिलें आहे. ब्राह्मी हें नाव केवळ अशोक–लिपीलाच असल्याचे पूर्वप्रसिद्ध नाहीं. बूलर ( Buhler ) याच लिपीला ब्राह्म वर्णमाला म्हणतो. ब्राह्मीचे उत्पत्तिविषयीं अनेक उपपत्ति आधुनिक लिपि समालोचकांनीं मांडल्या आहेत. त्यांचे मुख्य प्रतिपादनाचा सारांश खालीलप्रमाणें.

**अर्वाचीनांचें मतांचा संग्रह.**

१) **सर विल्यम जोन्स** ( सन १८०६ ) सेमिटिक पासून ब्राह्मी.
२) **प्रोफेसर कॉप** ( सन १८२१ ) सेमिटिक पासून ब्राह्मी.
३) **प्रोफेसर लेप्सियस** ( सन १८३५ ) सेमिटिक पासून ब्राह्मी.
४) **जेम्स प्रिन्सेप** ( सन १८३७ ) संस्कृतापासून जुनी ग्रीक व त्यापासून ब्राह्मी.
५) **ऑफ्रिड मूलर** ( सन १८३८ ) ग्रीकपासून ब्राह्मी.
६) **विल्सन**–युनानी अथवा फिनिशियन पासून ब्राह्मी.
७) **सेनार्ट**–ग्रीक अथवा युनानीपासून ब्राह्मी.
८) **प्रोफेसर बेनफे** ( स. १८४० ) फिनिशियनपासून हिन्दुस्थानी.
९) **स्टीफन्सन्** ( १८४९ ) फिनिशियन वा इजिप्शियन पासून हिंदुस्थानी.
१०) **प्रोफेसर ए. वेबर** ( १८५६ ) नॉर्थ सेमिटिक पासून हिन्दुस्थानी.
११) **एडवर्ड थॉमस** ( १८५८ ) आर्यांनीं द्रविडांपासून ब्राह्मी लिपि स्वीकारली.
१२) **डॉ. गिस्लर** ( १८५९ ) सेमिटिक पासून साऊथ अशोक
१३) **ख्रिश्चन लासेन** ( १८६७ ) एतद्देशीय अज्ञात लिपीपासून साउथ अशोक.
१४) **एम् लेनॉरमंट** ( १८७२ ) हिमिरियाटिक पासून साउथ अशोक
१५) **ए. सी. बर्नेल** ( १८७४ ) सेमिटिकपासून सुरुवात करून फिनिशियन, हिमियारिटिक व आर्मेनियन लिपी आपल्यात मिसळून घेऊन ख्रिस्तपूर्व चवथ्या व पाचव्या शतकांत हिंदुस्थानी लिपी झाली.
१६) **पॉट, वेस्टरगार्ड, मॅक्समूलर, फ्रेडरिक मूलर, साइस, व्हिटनी** या सर्वांनीं **वेबरचें** मत थोड्या फार मतभेदानें स्वीकारलेले आहे.
१७) **सर ए. कनिंगहॅम** .( १८७६ ) तन्त्र शास्त्रांतील यन्त्र लेखन पद्धतिवरून भारतीय लोकांनी भारतीय पाली वर्णमाला बनविली.
१८) **डेक** ( १८७७ ) असुरियन कुनिफॉर्म अक्षरांपासून ओल्ड साऊथ सेमिटिक व तिचेपासून भारतीय लिपि झाली.
१९) **डॉसन** ( १८८१ ) भारतीय लिपीचा उद्भव भारतांतच असून 'सूत्र काळापासून' भारतीय लिपि वापरू लागले.
२०) **इसाक टेलर** ( १८८३ ) साऊथ अरेबिकपासून हिमिरियाटिक व हिमिरियाटिकपासून भारतीय लिपि झाली.
२१) **आर्. एन. कस्ट.** ( १८८४ ) भारतीय लिपि परदेशांतून आली, ती अरेबियामधून आली असावी, फिनिशियनपासून हिमियारिटिक व हिमियारिटिक पासून भारतीय लिपि झाली. पश्चिम आशियांतून स्वर व्यञ्जन विभागणी भारतीयांनीं घेतली.
२२) **एम्. जें. हेल्वी.** ( १८८५ ) भारतीय लिपींतील आठ व्यञ्जनें अरमाइक पासून सहा व्यञ्जनें–स्वर आणि अनुस्वार आर्यनो पाली अथवा खरोष्टीपासूनआणि पांच व्यञ्जनें ग्रीक पासून आलीं.
२३) **पॅाल गोल्डस्मिथ** ( १८७७ ) फिनिशियनपासून सिंहली व सिंहली पासून भारतीय लिपि झाली.
२४) **एडवर्ड क्लॉड**–फिनिशियनपासून सेबिअन अथवा हिमियारिटिक व हिमियारिटिक पासून ब्राह्मी.
२५) **रामचंद्र भिकाजी गुंजीकर** ( १८९२ ) व्याकरणकारांनीं भारतीय लिपि केली. व्यवहारांतील वस्तूंचें आकारांवरून त्याचें नांवाच्या आद्याक्षरांचा ध्वनि संकेत करणारे आकार त्यांनीं तयार केलें.

२६) **जॉर्ज बूलर ( १८९४ )** ख्रिस्तपूर्व पांचव्या ते आठव्या शतकांतील नॉर्थ सेमिटिक पासून ब्राह्मी लिपि झाली.

२७) **मॅक्डोनल्ड, बार्नेट, रॅप्सन वगैरे बूलरचे** मत स्वीकृत करतात.

२८) **प्रोफेसर ह्रिस डेव्हिड्स (१९०७)** युफ्रेटिस नदीच्या खोऱ्यांत प्रचलित असलेल्या सेमिटिक पूर्वकालीन कुनिफॉर्म लिपीपासून ब्राह्मी लिपि झाली,

२९) **आर्. शामाशास्त्री** ( १९०६ ) तन्त्रशास्त्रांतील यन्त्रांच्या आकृतींमधील कांहीं भाग एकमेकांस जोडून घेऊन ब्राह्मी लिपि झाली.

३०) **डेव्हिड डिरिंजर (१९४७)** ब्राह्मणांनी ब्राह्मी लिपि निर्माण केली. अरमाइक वर्णमालेपासून ब्राह्मी झाली. ब्राह्मीचें सेमिटिकशींही साम्य दिसतें.

३१) **ए. बी. वालावलकर** ( १९५१ ) चिन्ह संकेतांवरून ( Crescent forms ) भारतीयांनीं ब्राह्मी लिपि केली.

३२) **एल. एस्. वाकणकर**– (१९५९) वालावलकरांचेच मत काही फरक करून **श्री. एल. एस.** वाकणकर स्वीकारतात. श्री गणेश विद्या (सन १९६८) या त्यांचें ग्रंथांत त्यांचें मत मांडलेले आहे व मराठी साहित्य पत्रिका मुंबई सन १९५९ ऑक्टोबर यामध्ये मांडले आहे.

श्री. वाकणकरांचे कार्यक्षेत्र epigraphy व typography हेच प्राधान्याने असल्याने phonetic periodicity ला घेऊन computerised peototypesetting वगैरेमध्ये त्यांचा रस अधिक आहे. उत्पत्तिस्थानाचा निर्णय यन्त्रसौकर्य या end use ला घेऊन श्री. वाकणकर करतात. ते त्यांचे यन्त्रशास्त्रानुसार ठीकच आहे. मीमांसा न्यायाच्या कसोटचा लावून उत्पत्तिनिर्णय आम्हांस अभिप्रेत आहे; यन्त्रसौकर्य हा आमचा विषय नव्हे.

### ब्राह्मीचे उत्पत्तिबद्दल एकवाक्यता नाही

यावरून असें दिसतें कीं आद्य भारतीय लिपीच्या उत्पत्तिविषयीं, जी ब्राह्मी आद्यलिपि असल्याचे सर्व आधुनिक लिपि समालोचक सांगतात, त्यांचेंतही एकवाक्यता नाहीं याचा परामर्श घेत असतां पं. गौरीशङ्कर ओझा 'भारतीय प्राचीन लिपिमाला' पृ. २० वर लिहितात.–

इस प्रकार कई एक युरोपिअन् विद्वान ब्राह्मी लिपी की उत्पत्तीका पत्ता लगानेके लिये हिअरेटिक (मिसरकी) क्युनिफॉर्म (असीरिआ की), फिनिशियन्, हिमिअरेटिक (सेबिअन), अरमइक और खरोष्ठी लिपियोंमेंसे अपनी अपनी रुचि के अनुसार किसी न किसी एक शरण लेते हैं।········· यदि ऊपर लिखी लिपियोंमेंसे किसी एक की ब्राह्मी के साथ कुछ भी वास्तविक समानता होती तो सर्वथा इतने भिन्न मत न होते; जिस लिपींमे समानता पाई जाती उसीको सब स्वीकार कर लेते, परंतु ऐसा न होना ही उपर्युक्त भिन्न भिन्न कल्पनाओंमें हठधर्मीका होना प्रकट करता हैं।'

या विषयी पं. गौरीशङ्कर ओझा यांचे पुढील विस्तृत प्रतिपादनाचा सारांश खालीलप्रमाणें–

### पौर्वापर्य निर्णयाच्या कसोटचा

१) ज्या दोन लिपींचे वर्णमालांच्या परस्परमेलनाचा प्रयत्न केला जातो, त्या दोन लिपीतील कांही अक्षरे एकमेकांशीं जुळतात. पण उच्चारण जुळत नाहीं.

२) केवळ आकृति साम्याचे आधारें उद्भव निर्णय करतां येत नाहीं कारण उच्चारण साम्य ही परस्परांचा संबंध ठरविण्याची एकमेव कसोटी आहे.

### अर्वाचीनांवर आक्षेप

३) इ. स. पूर्वी सातव्या शतकाचे आसपास फिनिशियन लिपीपासून ग्रीक (युनानी) लिपि बनली. सुरुवातीस ग्रीकलिपि उजवीकडून डावीकडे लिहिली जात असे. परंतु कालांतराने डावीकडून उजवीकडे लिहिली जाऊं लागल्याने तिच्यांतील कांही अक्षरांचे स्वरूप बदलले. या बदलानंतर त्यापासून जुनी लॅटिन व लॅटिनपासून इंग्लिश (रोमन) अक्षरें बनली. अशा प्रकारें आजची इंग्लिश अक्षरें व फिनिशियन मध्ये सुमारें २६०० वर्षापूर्वीचा संबंध असूनदेखील ही अक्षरांचे परस्पर मेलन केल्यास A, B, D, E, H, K, L, M, N, P, Q, R, आणि T ही १३ अक्षरें मूळ फिनिशियनशीं खूप जुळतात. या वरून जर अशोक काळातील ब्राह्मी हिअरेटिक, फिनिशियन वगैरे लिपीपासून निघाली असेल तर त्यांचेशी ब्राह्मीची समानता इंग्लिशपेक्षा जास्त असली पाहिजे. कारण इंग्लिशपेक्षां २२०० वर्षे पूर्वीचा ब्राह्मीचा फिनिशियनशी संबंध आहे परंतु अवलोकन करतां असे आढळत नाही.

४) हिअरेटिक लिपीचें ब्राह्मीशीं समान उच्चारण असणारें एकही अक्षर जुळत नाही.

५) असीरियन क्युनिफॉर्म ही प्रारंभी चित्रलिपि असून नंतर वर्णलिपि झाल्यानें व लेखणीनें लिहितां येत नसल्याने बिकट आहे म्हणून तिचेपासून फिनिशियन वगैरे सेमिटिकलिपि किंवा ब्राह्मी निघू शकत नाही.

६) फिनिशियन लिपीचे वर्णमालेत २२ अक्षरें आहेत. पैकी ' मोअब ' चे लेखांतील ' गिमेल ' (ग) हे एकच अक्षर ब्राह्मी ' ग ' शी जुळते. बाकीं कोणतीही अक्षरें जुळत नाहींत.

७) प्राचीन ग्रीक वर्णमालेतील ' गामा ' (ग) व ' थीटा ' (थ) ही दोनच अक्षरें अनुक्रमे ब्राह्मी ' ग ' व ' थ ' शी जुळतात. बाकी कोणतीही अक्षरे जुळत नाहीत.

८) हिमिअरिटिक् लिपीतील २२ अक्षरापैकी केवळ ' गिमेल ' (ग) हे अक्षर वाकविल्यावर ब्राह्मी ' ग ' शी जुळते. बाकी कोणतीही अक्षरे जुळत नाहीत.

९) अरमेइक् लिपींतील केवळ ' गिमेल ' (ग) हे अक्षर ब्राह्मी ' ग ' शीं जुळतें. बाकी कोणतीहीं अक्षरें जुळत नाहींत.

१०) खरोष्ठी लिपीचे वर्णमालेंतील एकही अक्षर ब्राह्मीशीं जुळत नाहीं.

### मनःकल्पित प्रक्रियेची तर्कदुष्टता

११) बूलर (Buhler) ने फिनिशियन पासून ब्राह्मीची उत्पत्ति सांगतांना अनेक प्रक्रिया केल्या आहेत. या संदर्भात पं. **गौरीशङ्कर ओझा ' भारतीय प्राचीन लिपिमाला '** पृ. २५ वर म्हणतात– ' बूलर के माने हुए अक्षरोंके ये फेरफार ऐसे हैं कि उनके अनुसार अक्षरोंका तोड़ मरोड करनेसे केवल फिनिशियनसे ब्राह्मी की उत्पत्ति बतलायी जा सकती है ऐसाही नही, किन्तु दुनियाभर की चाहे जिस लिपीसे किसी भी लिपि उत्पत्ति आसानीसे सिद्ध हो सकती हैं । उदाहरणके लिये तक्षशिला के अरमेइक लिपिके लेख के अक्षरोंसे तथा वर्तमान अंग्रेजी टाइप (छापे के अक्षरों) से ब्राह्मी लिपिके अक्षर कितनी आसानीसे बनाये जा सकते है यह नीचे बतलाया जाता है......... ' इत्यादि.

या सर्वांवरून पं. गौरीशङ्कर ओझा यांचा अभिप्राय असा कीं उच्चारणाची समानता असल्याशिवाय आकृति साम्य ओढाताण करून सिद्ध करणें निश्चयात्मक उपपत्ति होत नाहीं

### प्रमाणसिद्ध युक्तियुक्त लघु प्रक्रिया

ओझा यांना बूलरचे विस्तृत खण्डन करतांना आम्हीं प्रतिपादिल्यानुसार साम्याधिष्ठित सङ्गति लावतांना प्रक्रियेंत लाघव गौरवाचा विचार करावा लागतो हेच सुचवायचें आहे. ओझा यांचे ' तोड़ मरोड ' या शब्दाला घेऊन आमचे पूर्वार्धातील कांहीं प्रक्रियांवर आक्षेप केला जाईल, परंतु तो निराधार आहे. कारण आधुनिक लिपिसमालोचकांची प्रक्रिया दर्शनसाम्यावरून जन्मतें व ती मनःकल्पना मात्र असते. कारण दर्शन साम्याव्यतिरिक्त तसें करण्यास त्यांचेजवळ प्रमाण नाहीं; या उलट आम्हीं दाखविलेली प्रक्रिया करण्यास दर्शनसाम्य हेच कारण नसून बिन्दुस्फोटन, वर्णोद्धारतन्त्र आणि मीमांसेचा यववराहाधिकरणन्याय व तदुपयुक्त घृष्टलेखन प्रक्रियेने प्रत्यक्ष हीं प्रबळ प्रमाणें त्या मागें आहेत. (इतके असूनही आम्हीं दाखविलेली प्रक्रिया दिग्दर्शनमात्र आहे, त्याहून युक्तियुक्त लघुप्रक्रिया एकाद्यानें सुचविल्यास ती स्वीकारण्यास आमची हरकत नाहीं– संपादक)

१२) खरोष्ठी लिपि सेमिटिकपासून उत्पन्न झालेली आहे, ब्राह्मीचा मात्र सेमिटिकशीं संबंध नाही.

१३) निर्मात्याचे चुकीमुळें उलट लिहिले गेलेलें **' एरणचा शिक्का ' ' सातवाहन वंशीय शातकर्णी राजाचा शिक्का ' ' पार्थिअन् अब्दगसिस्चा शिक्का '** वगैरे प्रामाणिक आधार होऊ शकत नाहीत, कारण त्याच काळांतील सुलटे लिहिलेले अनेक लेख उपलब्ध आहेत.

१४) ब्राह्मी लिपि भारतवर्षीय आर्यांनी केलेला मौलिक आविष्कार आहे. भारताच्या प्राचीन इतिहासाची साधने विच्छिन्न असल्यानें उपलब्ध असणाऱ्या साधनांवरून ब्राह्मी कशी उद्भवली हें सांगणें कठीण आहे.

### अर्वाचीन लिपि समालोचकातील दोन प्रवाह

या सर्व विवरणावरून ब्राह्मीचे उत्पत्ति विषयी आधुनिक लिपि समालोचकांत दोन प्रवाह असल्याचें दिसते. १) ब्राह्मी परदेशी लिपि पासून बनली. २) ब्राह्मी भारतातील अज्ञात पूर्व लिपिपासून बनली. यापैकीं प्रथम पक्ष पाश्चात्य विद्वान आग्रहपूर्वक मांडतात. त्यांचे मतात बराचसा पूर्वग्रह, तर्कदुष्टता व गैरसमजूत आढळते. या दोन्ही ही पक्षांचे मत प्राय: खालील आधारावर मांडलेले आढळते–

१) साम्याधिष्ठित पौर्वापर्यावर आधारलेली सङ्गति–

२) आजमितीस लिपिविषयक असणारी प्रादेशिकता.

३) उपलब्ध पाश्चात्य संमत मानवी इतिहास व तेवढ्याची ऐतिहासिक प्रमाणें.

४) उपलब्ध शिलालेख वगैरे अवशेषांत आढळणाऱ्या लिपीतील कांहीं रेषांचें प्रमाण

५) वरील सर्वांचे आधारें अज्ञाताची सङ्गति लावण्याकरिता केलेला कल्पनाविलास.

**अनिश्चितपणा व पाश्चात्यांचें दडपण**

अशामुळें दोन्ही पक्षांचें प्रतिपादनांत अनिश्चितपणा राहतोच. साक्षेपी चिकित्सेनें असा विचार केला तरी वस्तुस्थितीचे बरेंच जवळ कोणीं क्वचित जातो हेंच Indigenous Origion of Brahmi, Crecent Forms वगैरे सांगणाऱ्या आधुनिक लिपिसमालोचकांचे प्रतिपादनावरून दिसून येते. (आज मितीस पाश्चात्य समालोचकांनी केलेल्या विचारांच्या दडपणाखाली बव्हंश भारतीय मंडळी वावरतांना असलेली दिसून येतात. व त्यांचें भरांत डिरिंजर, बूलर यांनी लिपीवर केलेल्या कामापेक्षां आॅर्किआॅलॉजिकल एव्हिडन्सचे आधारें आणखीपुढें काय काम होणार अशी साशङ्कताही व्यक्त करतांना भेटतात. डिरिंजरचे मताचा परामर्श यापुढें आहेच. हे लिहिण्याचा उद्देश एवढाच की, लिपीचे विषयाकडे पाहण्याचा एकच दृष्टिकोन आहे अशी भूमिका न घेतां आर्किआॅलॉजी व पॅलिओग्राफी या डिसिप्लिनचे व आम्ही प्रतिपादन करीत असलेल्या प्राचीन शास्त्रानुसारी भूमिकेतील मूलभूत फरक लक्षांत घेऊन आधुनिकांनी मोकळेपणानें या विषयाचा विचार करावा अशी प्रार्थना करणें हा आहे)–संपादक

**डेव्हिड डिरिंजर यांचे मतांचा परामर्श.**

डेव्हिड डिरिंजर यांचे मताचा परामर्श खालीलप्रमाणें.–

The Alphabet 2nd edition 1948 या पुस्तकांतील Indian Branch या सहाव्या प्रकरणांत पृ. ३२८ ते ३३४ वर लेखक David Diringer म्हणतात–

The problems connected with the origin & developments of the numerous Indian Scripts are so vast & complicated that it is impossible to deal with them in detail. The early history of Indian writing like the early history of India is still imperfectly known. Until recently most historians were disposed to date the bigining of Indian writing in the early centuries of the first millennium B. C. and no serious scholar dated the origin in India earlier than the influx of the first tribes speaking Aryan dialects, which probably took place in the latter half of the second millennium B. C.

However, the recent discovery of the Indus Valley civilization (Part I Chapter IV) much older than than the first Aryan settlements in India, came up on the world as a Surprise, and it gave rise to numerous problems including the relationship of the Indus valley culture to the early Indo ;Aryan civilization. Much is being written on this subject though little of it is of scientific value. For instance, the attempts of Fr H. Heras, S, J., to equate the most up to date. South Indian linguistic forms with the undeciphered seals belonging to thethird millennium B.C. might put the unwary on the wrong track. Not a single link ro cover the 2000, years'– gap between the Indus Valley Script & the Indian writing, though the possibility of connection between the two scripts cannot be rejected catagorically. A satisfactory answer to this problem will be obtained should strata bearing early Indian settlements be discovered, when their relationship to the Indus Valley Civilization wouid be proved. It is useless to discuss the whole problem until sites in the land of origin of the Rigveda Hymns have been sufficiently explored, excavated & studied. The whole history of India prior to the middle of the seventh century B. C. is indeed, still the province of archaeology." (Page 329)

### खरोष्ठी व्यतिरिक्त भारतीय लिपी ब्राह्मीपासून

हें सर्व विस्ताराने उद्धृत करण्याचें कारण डिरिंजर यांची भूमिका व ते कोणत्या गोष्टी प्रमाणास घेतात हे समजून यावें हें आहे. खरोष्ठी सोडून अन्य सर्व भारतीय लिपि ब्राह्मीपासून उद्भवल्या असल्याचा डिरिंजरचा अभिप्राय आहे.

"The question of the origin of Indian seripts is one of the most fascinating problems in the history of writing. Many Indian scripts & offshoots of Indian writing exist today used for tongues belonging to various linguistic groups. A great number of inscriptions have been found in India, engraved on rocks or stone monuments, on copper, bronze or iron, on precious metals, painted or engraved on pottery.

All these scripts seem to have descended from two proto-types, the Kharosthi & the Brahmi ( that is, "Lipi", "Script.") The latter may be considered as the national Indo Aryan system of writing and the true parent of the great majority of Indian scripts while the influence of the Kharosthi script on other Indian writings seems to have been negligible. On the other hand, while the origin of Kharosthi seems to be evident the origin of Bramhi is still uncertain & hotly discussed. (chapter V Non Semitic ofshoots of Armaic Branch) या वरून डेव्हिड डिरिंजर यांची भूमिका स्पष्ट होते. ते पृ. ३२८ वर म्हणतात.- "Indian Scholars who patriotically consider the Brahmi as the descendant of an indigenous prehistoric script may be remided of the following facts." असें म्हणून सहाव्या प्रकरणांत पृ. ३२९ ते ३३४ अखेर १० मुद्दे डिरिंजर यानीं ब्राह्मीच्या एतद्देशमूलकत्वाचे विरोधांत दिले आहेत त्यांचा सारांश खालीलप्रमाणें-

### डिरिंजर यांचें १० मुद्दे

१) एका देशांत दोन अथवा अधिक पूर्वापर लिपि असणें यावरून त्या पैकी एक लिपि अन्यावर अवलंबून असल्याचें सिद्ध होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ क्रीट देशांत वापरली जात असलेली सुरुवातीची ग्रीक लिपि, सुरुवातीच्या क्रीटन अथवा मिनोअन लिपीपासून निघालेली नाहीं.

२) जरी सिंधु घाटी चिन्हांचे आकारांत व ब्राह्मी अक्षरांचे आकारांत साधर्म्य सिद्ध करतां आलें, तरी दोन्हींतील चिन्हांचें उच्चारण साधर्म्य दाखविल्याखेरीज सिंधुघाटी चिन्हांपासून ब्राह्मी निघाली असें म्हणता येत नाहीं, या संदर्भात सुरुवातीचे ग्रीक अक्षरांचें मिनोअन लिपीशी व Cypiriote syllabary शीं रेखाटन साधर्म्य असलें तरी एकीपासून दुसरी निघालेली नाहीं.

### वर्णमाला निबद्धतेस महत्व.

३) वर्णोत्पत्तीचे संदर्भात चिह्नसंकेतांचे शोधास महत्व नसून लेखनाची वर्णमालानिबद्ध पद्धत स्थिर होण्यास महत्व आहे. उदाहरणार्थ- हें मेरोइटिक लिपींना लागू पडतें. सिंधुघाटी लेखन हें बहुतेक संक्रमणावस्थेंतील पद्धति (transitional system) अथवा चित्र चिह्न मिश्र लिपि (a mixed syllabic ideographic script) असावी, या उलट ब्राह्मी ही कांहीं अंशीं वर्णमालानिबद्ध ( Semi Alphabet ) आहे. कोणतीही चित्र चिह्न मिश्र लिपि, वर्णमाला निबद्ध लिपि बनण्यास तिच्यावर कोणत्यातरी अन्यवर्णमाला निबद्ध लिपीचा प्रभाव पडणें जरूर असतें. ऐतिहासिक दृष्ट्या अशा प्रभावांचा शोध घेणें चिन्हांची उत्पत्ति कशी झाली हें पाहण्यापेक्षां महत्वाचें आहे. कोणत्याहीं विद्वानानें सिंधुघाटीची इडिओग्राफिक स्क्रिप्ट वर्णमाला निबद्ध ब्राह्मींत कशी परिणत झाली हें दाखविलेलें नाहीं-

### वेद वाङमयात लेखनाचा उल्लेख नाही

४) पुरातन काळात लेखन आस्तित्वात असल्याविषयीं विस्तीर्ण वेदवाङमयांत कोणताही उल्लेख मिळत नाहीं. वैदिक काळांत मौखिक प्रक्रियेनें व स्मरणानेंच मन्त्र संरक्षित ठेवले जात असत. प्राचीन भारतीय देवतांत लेखनाचीं देवता नाहीं, सरस्वतीचा ज्ञान, अध्ययन व वक्तृत्व यांची देवता म्हणून उल्लेख आढळतो.

### बुद्धानंतर लेखनाचा प्रचार

५) केवळ बौद्ध वाङमयांत प्राचीन काळांतील लेखनाचा उल्लेख मिळतो. ख्रिस्तपूर्व पांचव्या शतकाच्या मध्यास झालेल्या सूत्रांत 'अख्खरिक' नांवाचे लहान मुलांचे खेळाचा उल्लेख आढळतो. अख्खरिक म्हणजे 'अक्षर काढणे.' बौद्धांचे प्रमाण ग्रंथांत 'लेख' प्रशस्ति आढळते. (विजय ४/७) तसेंच 'लेखक व्यवसायाची प्रशस्ति' आढळते. (विनय १।७७ व ४।२८) 'फलक' 'लेखं चिंदति' असे अनेक उल्लेख मिळतात. यावरून वैयक्तिक व सामाजिक व्यवहारांत लेखन प्रचारांत असल्याचें दिसतें. यावरून ख्रिस्तपूर्व पांचव्या सहाव्या शतकांत लेखनाचा विस्तृत प्रचार असल्याचें दिसतें. 'ललित विस्तर' या ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकाचे पूर्वार्धातील बुद्ध देवाचें बालपण सांगणाऱ्या ग्रंथांत आणि पाणिनीमध्यें (३।२।२१) (ख्रिस्त पूर्व पांचवें शतक) लिपि व लेंखन याचे उल्लख मिळतात. प्रोफेसर बेली यांचें मतानुसार लिपि शब्द मूळचा पर्शियन आहे.

६) ख्रिस्तपूर्व तिसऱ्या अथवा चवथ्या शतकाचे मागें शिलालेखादि उपलब्ध प्रमाणांवरून (On epigraphic grounds) भारतीय लेखनाचा काळ नेतां येत नसला तरी इ. स. पू. सहाव्या शतकांत ब्राह्मी लिपि असल्याचें मानण्यांत येतें. प्रोफेसर ह्रिस डेव्हिड्स वगैरे विद्वान पिप्रावा येथील शिलालेख सर्वांत (जुना) पूर्वीचा म्हणजे ख्रिस्तपूर्व ४५० चे आसपास मानतात; परंतु अर्वाचीन विचार प्रवाह व समीक्षण याबद्दल संशय घेण्यास भाग पाडतें. गोरखपूर जिल्ह्यांतील सोहगौरा येथील ख्रिस्तपूर्व चवथ्या शतकाचे उत्तरार्धातील शिलालेख अतिप्राचीन मानण्यांत येतो. यादृष्टीनें अशोकाचा काळ म्हणजे ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाचा मध्य हा महत्वाचा आहे.

### व्यापारामुळें लिपि प्रसार नाहीं

७) लिपीचे विषयावरील सर जॉर्ज डनबार, जे केनेडी, ह्रिस डेव्हिड वगैरे अधिकारी विद्वानांचें मतानुसार ख्रिस्तपूर्व ८०० ते ६०० या काळांत भारतांत उद्योग व्यवसाय व व्यापाराची मोठी प्रगति होऊन समुद्रमार्गे व्यापारही वाढला. (Maritime commerce) ख्रिस्तपूर्व सातव्या शतकाचे सुरुवातीस व आठव्या शतकांत समुद्रमार्गे व्यापार करणारे व्यापारी बॅबिलोनपर्यंत जात असत. हा व्यापार या काळाचे मागेंच सुरू झाला असावा. व्यापाराचे वाढीमुळे लेखन कलेच्या प्रसारास चालना मिळाली असावी याबद्दल सर्वांचें मतैक्य आहे. या विषयीं पुढें डिरिंजर संशय व्यक्त करतात.

" I do not think that much can be concluded for the subject we are here treating, from the fact of the ancient trade relation between India, including Dravidian India, with the western semitic world in the times of Soloman (tenth century B. C.), as suggested by the presence in early Hebrew and other Semitic languages, of some Indo-Aryan and Dravidian loanwords, such as pinnor, " guitar" (from Indian "Kinnari"?), almuggim (algummim), "Sandals", gophim, "Monkeys", tuppiyim "Peafowls," Sappir, "Sapphire," and a few other words (See– J. Kennedy, the early commerce of Babilon with India, "Journal of the Royal Asiatic Society," 1818, PP 241 H. G. Rawlinson, Intercourse between India and the Western world, Cambridge University Press, 1916 (2nd ed; 1926); W. Baumgartner Was wir hente vonder habraeischen Sprache und ihres Geoihichte wissen, "Anthropos". 1940–1941, P 612 n 104, with copious bibliography.)

### भारतीयांचा वेदकाल निर्णय अतिशयोक्ति पूर्ण

८) हिंदुस्थानांतील आर्यांच्या सुरुवातीच्या इतिहासाबद्दल फार थोडी माहिती उपलब्ध आहे. टिळकांनी ठरविलेला वेदांचा काळ (इ. स. पू. ७०००) व शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनी ठरविलेला वेदाचा काळ (इ. स. पू. ३८००) हे दोन्ही अतिशयोक्तिपूर्ण असून उपपत्तीही अगडबंब (fantastic) असून या उपपत्तींचा गांभीर्याने विचार करण्याची आवश्यकता नाही. सद्यःकालीन मतानुसार ख्रिस्तपूर्व दुसऱ्या हजार वर्षाचे उत्तरार्धात आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानात आल्या, आणि ख्रिस्तपूर्व एक हजार ते दोन हजार हा वेदांचा काळ आहे. ख्रिस्तपूर्व सहाव्या अथवा सातव्या शतकांत मगधाचा राजा बिंबिसाराचे काळांत लिपीचा प्रसार झाला असावा.

९) इसवी सनापूर्वी सहाव्या शतकांत जैन धर्माचा संस्थापक महावीर आणि बौद्ध धर्म संस्थापक गौतम बुद्ध यांचें कालखण्डात लेखनकलेचा प्रसार झाला असावा.

१०) या सर्वावरून आर्यांचें हिंदुस्थानात इ. स. पू. ८०० ते ६०० या कालखण्डात लेखन सुरू झाले असावें. सिंधुघाटी लिपीनंतर ब्राह्मी लिपि उद्भवली असावी.

या प्रमाणें संक्षेपत: डेव्हिड डिरिंजर यांचे विचार आहेत.

### डिरिंजर यांची अयोग्यानुपलब्धि

या विचारावरून असें दिसून येतें कीं– लिपींचा साकल्यानें विचार करीत असतांना आद्यलिपीचे उद्भवाविषयीं सूक्ष्म विचार त्यांनीं केलेला नाहीं. लिपींचे विषयीं उपलब्ध शिलालेख, नाणी, शिक्के, भांडी वगैरेंचे आधारानें क्रमविकास दाखवून उपपत्ति देण्यावर त्यांचा भर आहे. या पूर्वी नांव 'ब्राह्मी कां देवनागरी' आणि 'अशोक लिपि व देवनागरी' या दोन प्रकरणांत आम्हीं केवळ उत्खनन करून मिळणाऱ्या प्रमाणांवर अवलंबून राहणें कसें अयोग्य आहे हें दाखविलें आहे. अयोग्य अनुपलब्धीनें येणारे निर्णयही अयोग्यच असतात. तात्पर्य प्रथम लिपि ईश्वरोपदिष्टच आहे. 'लेखन प्रकार' व 'लेखनाच्या प्रकारभेदाचीं कारणें' या दोन प्रकरणात हा विचार विस्तारानें मांडला आहे. याच प्रकरणांत पूर्वी निर्दुष्ट निर्णयाकरिता साम्याधिष्ठित सङ्गतीस उच्चारणसाम्याची जोड असावी लागते हें सांगितलें आहे. आद्यलिपीशीं उच्चारणाचें ऐक्य ठेवून असणारें तितकेंच अन्य लिपींतील उच्चारण न्याय्य होय. आद्यलिपि देवनागरी असल्याचें पुढें प्रमाणांचा विचार करून दाखविलेंच आहे. म्हणून डिरिंजर प्रभृति अर्वाचीनांचीं भूमिका अपुरी व अनिश्चित वाटते. या उलट प्राचीन मतानुसार या ग्रंथात प्रतिपादिलेली भूमिका–

१) श्रुति–स्मृति–तन्त्रादिकांनीं सांगितलेलें बिन्दुस्फोटन २) वर्णोद्धारतन्त्र ३) मीमांसेचा यववराहाधिकरण न्याय व ४) तन्त्रोक्त लिपीचें तदुपयुक्त व तत्प्रेरित घृष्ट लेखनानें प्रत्यक्ष व उच्चारण साम्य या चार गोष्टींवर आधारलेली आहे. हा मुळांतील भूमिकाभेद ध्यानी आल्यावर तज्जात प्रतिपादनभेदाची सङ्गति लागते. या विषयीं अधिक विचार उत्तरार्धातील शेवटच्या 'चक्रसृष्टि' या प्रकरणांत येईल, प्रकृतिस्थ स्थितीचें सूक्ष्मताप्राप्त मनाने ज्ञान करून घेणें हें ही उत्खननच होय–अस्तु.

### गौरवयुक्त सङ्गति अन्याय्य

पूर्वी दिलेल्या डिरिंजर यांचे प्रतिपादनातील १) यामधील प्रतिपादन भारतीय लिपि भारताबाहेरून आली या आग्रहास बळी पडून आहे. एका देशांत दोन अथवा अधिक पूर्वापर लिपि असून त्यांचेमध्यें प्रमाणसाम्य, लेखनसाम्य व उच्चारणसाम्य तिन्हीं असल्यासच एक दुसऱ्यापासून असें म्हणणें शक्य आहे. तसेंच एका पित्यापासून अनेक अपत्यें होऊ शकतात त्याप्रमाणें एकाच लिपीपासून अनेक लिपि बनणें शक्य आहे. भारतासारख्या खण्डप्राय देशांतील लिपींचा विचार करितांना क्रीट सारख्या अत्यंत लहान भौगोलिक क्षेत्र असणाऱ्या देशाचे उदाहरण सर्वतया गैरलागू आहे, कारण आम्ही याच प्रकरणांत पूर्वी सांगितल्यानुसार साम्याधिष्ठित सङ्गतीचा विचार करितांना उच्चारणसाम्य व परिभाषा प्रदेशवैशिष्ट्य यांचाही विचार करावा लागतो, तात्पर्य बाह्य शास्त्रोक्तांशीं लाघवयुक्त सङ्गति उपलब्ध असतां ती सोडून गौरवयुक्त स्वीकारणें हें न्याय्य नाहीं– प्रत्युत भारतीय लिपींना, तन्त्रोक्त लिपीशीं समन्वित होणें, विनियुक्त होण्याकरितां, मीमांसान्यायानुसार अनिवार्य आहे, शास्त्रीय विधानांत शास्त्रपरिभाषितालाच अवलंबून विनियुक्त होतां येतें, अन्यथा नाहीं. हा सार्वत्रिक नियम ( कायदा, आयुर्वेद विज्ञान वगैरे प्रमाणें ) लक्षांत न घेतां डिरिंजर यांचा विचार मांडला गेला आहे. ग्रीक, क्रीटन, मिनोअन प्रमाणे सर्वांची गोष्ट नाही.

### सिंधुघाटी लिपि विषयीं विचार

२) मध्यें सिंधुघाटी लिपि व उच्चारण साधर्म्याविषयीं सांगितलें आहे. येथें वर स्पष्ट केलेल्या मूलभूत भूमिकांतील भेद नजरेस येतो सिंधुघाटीचे उत्खननांत शिक्के सापडलेले असून त्यावरील चित्रें व चिह्नें यांचे आधारें आधुनिक लिपिसमालोचकांचें सर्व प्रतिपादन आहे. या पूर्वीचे प्रकरणांत ब्राह्मी हा नागरीचा सांप्रदायिक प्रकार असल्याचें आम्हीं दाखविलेंच आहे, म्हणून ब्राह्मी लिपि व सिंधुघाटी चिह्नें यांच्या परस्पर संबंधाचे ऊहापोहांत पडण्याची आम्हांस आवश्यकता नाहीं, सिंधुघाटी चिह्नें लिपि संज्ञेंत मोडतात किंवा नाहीं या विषयीं ताम्रपट इ. विस्तृत लेखन मिळत नसल्यानें काहीं सांगतां येत नाहीं. ती लिपि ठरली आणि ती कोणा भारतीय लिपीशीं साम्य ठेवीत असल्यास ती तिचें घृष्ट लेखन म्हटलें जाईल अन्य परकीय लिपीशीं साम्य ठेवीत असल्यास तिची समष्टि लिपीत गणना होईल, हे दोन्हीही नसल्यास आदर्शाभास या सीमेंत तिची गणना राहील. उच्चारण साम्यासह आमची पूर्वोक्त चार वैशिष्टयें असतील तरच आम्ही यापैकीं ( तन्त्रोक्तापैकी ) असल्याचे मान्य करूं अन्यथा नाहीं लिपि असल्यास आदर्शाभास राहील. लिपिच नसल्यास केवळ अन्यान्य चिह्नें मानली जातील तेवढयानें ती कांही इतरांचा अभाव सिद्ध करण्याकरितां योग्यानुपलब्धि होऊं शकणार नाही. आज देखील प्रौढ लिपिलेखक व प्रौढ चित्रकार असताना सुद्धा अप्रौढ अपूर्ण लिपिलेखक व अप्रौढ चित्रकार, चित्र लिहिणारे वा कोरणारे आहेत, असेंच पूर्वीही असल्यास कोणती आपत्ति आहे ?

अर्थात उत्खनन प्राप्त एखाद्या प्रकारच्या वस्तूस घेऊन तत्कालीन प्रगति वा अधोगति ठरविण्याचा अथवा पृथ्वीतील स्तरांस भूगर्भातील नैसर्गिक हालचालीमुळें अधोर्ध्वत्व घडूं शकत असतांना प्रसिद्ध विद्याविरुद्ध तत्कालविषयक निर्णय करण्याचा आधुनिक पुरातत्वाभ्यासकांचा संप्रदाय तर्काच्या कसोटीवर टिकणारा असल्याचें दिसत नाहीं. अर्थात आधुनिकाएवढें सिंधुघाटी चिह्नांना महत्व देण्याची आव-

श्यकता आम्हांस भासत नाही, म्हणूनच डिरिंजर यांचे प्रतिपादनानुसार सिंधुघाटी व ब्राह्मी यांमधील कनेक्शन उत्खननद्वारा सापडण्याचें आम्हांस महत्त्व वाटत नाही.

**अनवस्था दोष परिहाराचा उपाय.**

३) मध्यें डिरिंजर यांनी लिपिचे उत्पत्तीविषयी चर्चा केली आहे त्यामध्यें सिलॅबिक, इडियोग्राफिक, पिक्टोग्राफिक स्क्रिप्ट इतर अल्फाबेटिक स्क्रिप्टचा प्रभाव पडल्याशिवाय अल्फाबेटिक होत नाही असें मत मांडलें आहे. तें पत्करल्यास अनवस्था दोष येतो, व तो आद्य अल्फाबेटिक स्क्रिप्ट कोठून व कशी आली हा प्रश्न अनुत्तरित राहतो, याचा परिहार उदयनाचार्यांनी सांगितल्याप्रमाणे ' स्वतन्त्रपुरुषविश्रान्त ' म्हणजे ईश्वर विश्रान्त ' म्हटल्या खेरीज कोणत्याही रीतीनें होऊ शकत नाही. Diringer यांचे प्रतिपादनास आधुनिक विकासवादिही विरोधी होतो. कारण अन्य " Alphabatic Script 'ची अपेक्षा त्यांचे प्रतिपादनांस आहे. तात्पर्य त्याला घेऊन अववस्थादोषपरिहार होत नाही,

येथे ही आद्य लिपि कशी उत्पन्न झाली या विषयी सूक्ष्म विचार केलेला दिसत नाहीं व विकास वादाचे दृष्टिकोनाचा आग्रह धरून विचार मांडण्याचा कल दिसतो, विकास वादाचा परामर्श आम्ही या पूर्वी ' वर्णोद्धारतन्त्राचा कर्ता कोण ? काळ काय ? ' या प्रकरणात घेतलाच आहे तात्पर्य आद्यलिपि ईश्वर सृष्ट व सर्वाङ्ग परिपूर्ण असल्याचे मानणें भाग आहे. या गोष्टीच्या अनुसन्धानाकडे आधुनिकांनी वळावे.

**सरस्वती हीच विद्यादेवता ' वीणापुस्तकधारिणी '**

४) मधील वैदिक वाङ्मयाविषयींची डिरिंजर यांची विधाने अपुऱ्या माहितीवर आधारलेलीं आहेत. पुढील ' भारतीय लिपि-लेखनाचें प्राचीनत्व ' या प्रकरणांत या प्रमाणांचा सविस्तर विचार करून आद्य लिपीचें ईश्वर सृष्टत्व दाखविलें आहे. सरस्वती ही विद्या देवता सांगितली असून ' अक्षमालाङ्कुशधरा वीणा पुस्तक धारिणी ' असें तिचें वर्णन आहे त्याच प्रमाणें योगांतील स्वाधिष्ठान चक्रामध्यें चतुराननाचें ( = ब्रह्मदेवाचें ) ध्यान ' पुस्तकाक्षमालाकमण्डलुत्रयधारिणे ' म्हणून करीत असतात, योग परंपरा हिरण्यगर्भापासून वेदोपनिषदद्वारा सृष्टींत आद्य मनुष्यांना मिळाली आहे, भारताबाहेरचा यांत काहींच संबन्ध नाहीं, तेथें आधुनिक विकासवादही नाही. पूर्वीप्रमाणें योगसिद्ध आज नसल्यानें ह्रासवाद आहे.

**चित्रगुप्ताचा विस्तृत उल्लेख**

वेदामध्ये ' यमं राजानं हविषा हुतस्य ' ' पितृलोके राज्यमनुशास्ति देवः ' ' शिवः शिवनाम शिवोऽशिवानाम् ' इत्यादिकांनी यम देवतेचा तिच्या अधिकारांसह निर्देश केला आहे. तेथें त्याचे ' यमादिचित्रगुप्तान्त ' शास्त्रोक्त १४ भेद सांगितले आहेत. ' शब्दकल्पद्रुमांत ' ही ' चित्राणां जीवकृत पापपुण्यादिविचित्राणां गुप्तं गोपनं रक्षणं यस्मात् । यद्वा चित्रं विचित्रं गुप्तं धर्मस्य रक्षणं यस्य । चतुर्दश यमान्तर्गत यमः । ' ' तस्य लेखकः ' । असा मेदिनीकोशाचा हवाला देऊन चित्रगुप्ताचा निर्देश आला आहे. तेथेंच ' आचार निर्णय तन्त्रांत चित्रगुप्त विषयक विस्तृत प्रमाण दिलें आहे. ' शब्दकल्पद्रुमांतच ' ' कायस्थ ' शब्दावरील तळटीपेत पद्मपुराण सृष्टिखण्डातील चित्रगुप्ताच्या उत्पत्तीचा भाग दिला आहे. तेथें– ' तच्छरीरान्महाबाहुः श्यामःकमललोचनः । कम्बुग्रीवो गूढशिराः पूर्णचन्द्रनिभाननः । लेखनीच्छेदनी हस्ती मसीभाजन संयुतः ॥ ' असें चित्रगुप्ताचे वर्णन केलें आहे. येथें लेखणी, चाकू व दौत यांचा स्पष्ट उल्लेख असल्यामुळें हा लेखन विषयक पुरावा आहे. ' वाचस्पत्यम् ' या कोशांतही ' स्कन्द पुराणातील प्रमाण देऊन चित्रगुप्ताची यमलेखकत्व कथा दिली आहे. ..........' सशरीरो महादेवी । यमादेशपरायणैः । स चित्रगुप्तनामाभूद्विश्वचारित्र लेखकः ॥ ' असा उल्लेख केला आहे. ' मन्त्र महोदधीत ' ही ' किरीटोज्ज्वल वस्त्र भूषा-भिरामं विचित्रासनासीनमिन्दुप्रभास्यम् । नृणां पापपुण्यानि पत्रे लिखन्तं भजे चित्रगुप्तं सखायं यमस्य ॥ ' असे चित्रगुप्ताचें ध्यान आले आहे.

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १० ११ ११ १२ १२ १३ १३

' यमाय धर्मराजाय मृत्यवे चान्तकाय च वैवस्वताय कालाय सर्वभूतक्षयाय च औदुम्बराय दध्नाय नीलाय परमेष्ठिने वृकोदराय चित्राय चित्र
१४
गुप्ताय वै नमः । ' ही यमाची १४ स्वरूपे भविष्यपुराणात सांगितली आहेत. व तिथितत्त्वाचे उद्धरण म्हणून शब्दकल्पद्रुमात दिले आहेत ' सचित्र चित्रं ' इत्यादि ऋचेला चित्रगुप्ताकरिता विनियोग करितात, या प्रमाणें चित्रगुप्त या लेखक देवतेचा विस्तृत उल्लेख मिळून येतो. या प्रमाणें ' विश्वकर्मा ' याचाही उल्लेख मिळतो म्हणून लेखक देवता वेदांत व पुराणादिकांत उल्लिखित नाही असे म्हणणें अज्ञान प्रदर्शन आहे.

पुस्तक– हे लेखनाशिवाय असू शकत नाही. वेदांतील प्रमाणाविषयी पण्डित गौरीशङ्कर ओझा यांचे तर्क पुढील प्रकरणांत दिलेच आहेत.

## लेखनकाळ शिलालेखनानें सीमित करणें अयोग्य

५) मधील डिरिंजर याचें उद्धरणाविषयी आमचा मतभेद नाहीं. त्यावरून लेखनाचा मात्र काळ सीमित करतां येत नाहीं. याचा अभिप्राय असा कीं बुद्धाचे काळी लेखन होतें. इतकेच नसून आम्हीं या ग्रंथांत अन्यत्र प्रतिपादिल्याप्रमाणें त्या पूर्वीही लेखनाची भरभराट होती या विषयी बौद्धवाङमयांतील उल्लेख स्वयंप्रमाण आहेत.

६) मधील सर्व प्रतिपादन 'शिलालेख' इतक्याच प्रमाणावरून आहे तें सर्व अयोग्यानुपलब्धि होय. यापूर्वी अशोक पूर्व काळांतील बर्ली येथील शिलालेखांचें प्रमाण आम्ही दिलेच आहे. त्यामध्यें 'वीराय' या शब्दातील चित्रविभागात दाखविलेली 'वी' अशोकलिपी पूर्वीच्या नागरीचे मात्रानुकरण दाखविणारी ई ची मात्रा आहे. शिलालेख त्या पूर्वीचा नाही म्हणून लेखन नाहीं हें म्हणणें केवढें आश्चर्य आहे ?

७) मधील लेखन कलेस चालना केव्हां मिळाली वा प्रसार केव्हां झाला हे महत्वाचे नसून लेखनकला केव्हापासून हे महत्वाचे आहे. तेवढेंच तेथें सांगण्याचे टाळले आहे. या पुढील प्रकरणांत त्याचा सविस्तर ऊहापोह आहे.

## पूर्वग्रहदुष्ट प्रतिपादन

८), ९), १०) मधील सर्व प्रतिपादन वैदिक कालनिर्णय, आर्यांचें निवासस्थान. या विषयींच्या पूर्वग्रहांतून लिहिलें गेलें आहे. अमुक एकाचें मत 'fantastic' म्हणून दूर टाकतां येत नाहीं. वेदाला खगोल शास्त्राचें व वैश्विक व्यवस्थेचे सूक्ष्म ज्ञान असल्याचें वेदातील अनेक सूक्तांवरून कळून येतें. खगोल शास्त्राचें दृष्टीनें टिळक व दीक्षित यांचे प्रयत्न योग्यच आहेत. तरी देखील आकाशीय ग्रहस्थिति पुनः पुनः येत असल्याने केवळ जवळच्या चक्रा (Recurring cycle) चें आधारें वेदांचा काल निर्णय सीमित करतां येणार नाही.

## लो. टिळकांची उपयुक्तता

"समान नामरूपत्वादावृत्तावप्यविरोधः" या वेदान्त सूत्रांत चक्रवत् अनादि कालापासून पुनः पुनः सृष्टि प्रवर्तित होते व स्रष्टा त्याची माहिती ठेवतो असें सांगितलें आहे तें येथें ध्यानीं घेणें जरुर आहे. उत्तर ध्रुवाकडे दृश्य होणाऱ्या खगोल स्थितीचें वर्णन वेदांत आल्यामुळें तिथल्या निवासी लोकांकडूनच तें वर्णन झालें पाहिजें असा निर्णय करता येत नाहीं. दुसरीकडे राहणारादेखील तेथील खगोल स्थितीला समजून लिहू शकतो. असें आज देखील घडतच आहे. असें असल्यामुळें, त्यावरून वर्णन करणारे उत्तर ध्रुव प्रदेशातील निवासी होते तेथून भारतात आले. असा निर्णय करण्यास हें निर्दुष्ट हेतु होऊं शकत नाहीं. एवढ्या अंशांत आम्हीं टिळककृत या निरूपणाचा उपयोग समजू कीं......टिळककृत त्या त्या स्थितीचें वर्णन करणारा त्या त्या देशांत वास्तव्य करणाराच असतो असें मानून मध्य आशिया वा इतर पाश्चात्य देशांत राहणारे भारतांत आले असा निर्णय देणारे पाश्चात्य इतिहासकार टिळकांचे म्हणण्यानें खण्डित होतात. तसेंच पाश्चात्यांनी ठरविलेल्या वेदकाळाचेंही खण्डन टिळकांचे प्रतिपादनावरून होतें. राजनैतिक धोरण असेंच असतें की एकाच वेळीं अनेक विरोधकांशीं लढा न पत्करतां एकाशीं तडजोड करून उरलेल्याशी लढा करावयाचा तदनन्तर तडजोड केलेल्याचा निरास करावयाचा.

## कुमारिलभट्टाचें उदाहरण

या न्यायास अनुसरूनच जेव्हां बौद्धांचे प्रचारामुळें "वेदप्रामाण्य आणि ईश्वर सत्ता" या दोहों विषयीं लोकांची दिशाभूल होऊं लागली, त्या वेळीं कुमारिलभट्टपादांनी प्रथम ईश्वर सत्तेकडे दुर्लक्ष करून वेद प्रामाण्याची प्रस्थापना करण्यावर लक्ष केन्द्रित केलें. या प्रमाणें वेदप्रामाण्यसिद्धि झाल्यावर सूज्ञ विचारवंत ईश्वरसत्तेची सिद्धि करूं शकेल असा श्री कुमारिलभट्टपादांचा अभिप्राय असल्याचें न सांगतां प्रसिद्ध आहे. याच रीतीने लोकमान्य टिळकांनी आर्यांचे मूळ वसतिस्थान उत्तर ध्रुव असल्याचें प्रतिपादन करून पाश्चात्य प्रतिपादित– आर्य मध्य आशियांतून आले– या प्रतिपादनाविषयी,– भारतांतीलच आद्य मानव होते– या सिद्धान्ताची प्रथम उपेक्षा, लोक मानसात संदिग्धता उत्पन्न केली. अशी संदिग्धता उत्पन्न झाल्यावर वास्तविक जिज्ञासू यथार्थ अन्वेषण करून 'आर्य भारतांतलेच होत' हा निर्णय प्रमाणांवरून करू शकेल असाच लोकमान्य टिळकांचा अभिप्राय पूर्वोक्त राजनिति धोरण पाहतां लक्षांत येतें. असे न मानलें तर त्यांचें सर्व लिखाण परस्पर– सुसङ्गत कसे होईल ?

## मन्वन्तरादिकांचा हिशेब

प्राचीन भारतीय कालगणना ब्रह्मदेवाच्या केवळ वर्तमान दिवसारम्भापासून मनुस्मृति व सूर्य सिद्धान्तांत दिली आहे. हीच गणना कर्मसंकल्पात '......वैवस्वतमन्वन्तरे अष्टाविंशतितमे कलियुगे......... .....' इत्यादि वापरण्यात येते. त्यानुसार गतमन्वन्तरे, गतमन्वन्तरसंधिवर्षे, गतमहायुगवर्षे, गतयुगे व गतकलि यांचा हिशेब केला असतां–

१ महायुग = १२,००० दिव्यवर्षे = ४३ लक्ष २० हजार मानव वर्षे.
कृतयुग = ४००० दि. व.+८०० सन्ध्यासन्ध्यांश = १७ लक्ष २८ हजार मा. व.
त्रेतायुग = ३००० दि. व. + ६०० स. स. = १२ लक्ष ९६ ह. मा. व.
द्वापर = २००० दि. व. +४०० स. स. = ८ लक्ष ६४ ह. मा. व.
कलि = १२०० दि. व. + २०० स. स. = ४ लक्ष ३२ ह. मा. व.

मन्वन्तरसन्धि = ४८०० दि. व. = १७ लक्ष २८ ह. मा. व. शके १८९९ आरंभी गतकलि = ५०७८ मा. व. १ मन्वन्तर = ७१ महायुगे. ६ मनु गत. ७ व्या मनुंतील २७ महायुगें गत. २८ व्या महायुगांतील कृत– त्रेता– व्यापार गत यावरून बेरजेने सृष्ट्यारंभापासून गत वर्षें येतात.

६ मन्वन्तरांची वर्षें = १ अब्ज ८४ कोटी ०३ लक्ष २० हजार.
७ मन्वन्तर सन्धि वर्षें = १ कोटी २० लक्ष ९६ हजार.
२७ गत महायुग वर्षें ११ कोटी ६६ लक्ष ४० हजार.
कृतयुग वर्षें = १७ लक्ष २८ हजार.
त्रेतायुग वर्षें = १२ लक्ष ९६ हजार.
द्वापर युग वर्षे = ८ लक्ष ६४ हजार.
गत कलियुग वर्षे = ५ हजार ७८.
या सर्वांची बेरीज १ अब्ज ९७ कोटी २९ लक्ष ४९ हजार ०७८ एवढी आहे.
शके १८९९ चैत्रारंभी १ अब्ज, ९७ कोटी, २९ लक्ष, ४९ हजार, ०७७ वर्षे गेलीं आहेत.

### आधुनिक मतानें पृथ्वीचें वय

त्याही पेक्षां आधुनिक भू गर्भ समालोचक व पुरातत्व समालोचक त्यांचे पद्धतीनें पृथ्वीचें वय ४ अब्ज वर्षांचे असल्याचें सांगतात. ( During the past 200 years geologists have been attempting to determine the age of the Earth since it solidified. According to their calculations, the age of the Earth may be put down at 4000 million years. (Manorama year-Book 1972 Page 67. Encyclopedia Britannica–1975 ed प्रमाणे घनीभूत पृथ्वीचे वय ४ अब्ज ६० कोटि वर्षे आहे. ( Macropaedia, Page 81, Earth Geology of.... )

### पृथ्वीचे वयाहून वेदकाळ पूर्वीचा

ब्रह्मदेवाचा उत्पत्ति काळ, पृथ्वीचें वय, आणि ब्रह्मदेवाचा वर्तमान दिवसारंभ या तीनही गणना वेगवेगळया आहेत. म्हणून " यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वेदाँश्च प्रहिणोति तस्मै " या प्रमाणें पृथ्वीचे वयापेक्षाही वेदकाल मागें जातो.

लो. टिळक व शङ्कर बाळकृष्ण दीक्षित यांनी ठरविलेला वेदांचा काळ आधुनिकांपेक्षां मागें जात असल्यामुळे त्या दोघांचीं fantastic म्हणून संभावना करावयाची असेल; तर तेंच सूत्र धरून आधुनिकांनी पत्करलेलें हें पृथ्वीचें वय fantastic कां म्हणू नये ? तात्पर्य तर्कशुद्ध विचार न करता fantastic म्हणतां. येणार नाहीं.

### आर्य– द्रविडांविषयीं विचार

या सर्वांवरून इतकें मात्र निश्चितपणें सिद्ध होतें कीं पृथ्वीवरील सर्वप्रथम वाङमय वेद आहेत. या करिता पाश्चात्यांची अशीं खोडसाळ विधानें गंभीरपणें विचारास घ्यावीं असें आम्हांस वाटत नाहीं. अशी विधानें तसेंच आर्य हिंदुस्थानाबाहेरुन आले. हा अभिप्राय आहे हा भेदनीतीतून जन्मलेला विषय विस्तृत असल्यानें आर्य हिंदुस्थानातीलच होत व आर्य आणि द्रविड हे प्रथम गुणकृत व द्वितीय प्रदेशबोधक आहेत. एवढें नमूद करून; या विषयी डॉ. सम्पूर्णानन्द यांचा 'आर्य कहाँ से आये? ' हा ग्रंथ आणि श्री. रामदास गौड यांचा 'हिन्दुत्व ' हा ग्रंथ पाहण्याची वाचकांस शिफारस करून, डिरिजर यांचा परामर्श संपवितों. आर्य व द्रविड या शब्दाचा शास्त्र प्राप्त अर्थ असा आहे– ' कुलं शीलं दया दानं धर्म सत्यं कृतज्ञता अलोभ इति येष्वेते तानार्यान्परिचक्षते । ' (कामन्दक) हा आर्य शब्दाचा अर्थ होय. द्रविड म्हणजे ' द्रविडो देशोऽभिजनोस्येति अण् ' देश विशेषतः यथा महाभारते ९।१२।१४ (शब्दकल्पद्रुमे) 'सात्यकिश्चेकितानश्च द्राविडैस्सैनिकैस्सह ' इत्यादि अर्थ या दोन शब्दाचा पूर्णप्राप्त आहे. कोठेंही मागाहून भारताबाहेरून आलेले ते आर्य व पूर्वीचे राहणारे ते द्रविड असा पाश्चात्य ऐतिहासिकांचा अर्थ कोठेंही, देशांत वा विदेशांत १८ वे शतकाचे पूर्वी न ऐकिलेली व न पाहिलेली, प्रमाणानें सिद्ध न होणारी गोष्ट आहे–

## आदिवासी व हरिजन

"आदिवासी" नांवाने सध्या वनविभाग, दुर्गम विभागांत राहणाऱ्या लोकांचा उल्लेख करणे हा रूढ व्यवहार बनला आहे. त्याचें तात्पर्य त्या लोकांचे वर्तमान शिक्षणपद्धतीचें दृष्टीनें वा वर्तमान जीवनमान पद्धतीचे दृष्टीने मागासलेपण सांगण्यांत असलें तरी त्यांचेखेरीज अन्य सर्व उपरे (आक्रमक!) आहेत हें त्यांतून ध्वनित होत असल्यानें अयोग्य होय.

तसेंच "हरिजन" शब्दाचेंही आहे. संपूर्ण मानव समाज "हरीचा" आहे– होऊं शकतो. साम्यवादी लोकांनी नसलेला वर्गविग्रह मनावर बिंबवून झगडे उत्पन्न करण्याकरितां अवलंबिलेली ही भेदनीति आहे.

### आमचे मन्तव्य

१) आद्य लिपि सृष्टचारंभी ब्रह्मदेवानें निर्माण केली.

२) वैदिक व तान्त्रिक प्रमाणावरून देवाचे नगरात उत्पन्न झालेली देवनागरी लिपि हीच ब्रह्मसृष्टा होय, ब्राह्मी हें तिचेंच नांव आहे.

श्रुति स्मृति वरून येणारें बिन्दुस्फोटन, वर्णोद्धारतन्त्र, मीमांसेचा व्यवहाधिकरण न्याय व तदुपयुक्त व प्रेरित उच्चारण साम्यासह घृष्ट लेखनांत प्रत्यक्ष या चार प्रमाणांनी आद्यलिपि व तिचे पासून बनणाऱ्या इतर लिपि सिद्ध होतात.

४) अशोकलिपि हा देवनागरीचाच एक सांप्रदायिक लेखनप्रकार आहे.

५) घृष्टलेखनानें ह्रास होत असल्यानें ईशसृष्ट लिपिविषयक विचारांत विकासवाद नसून ह्रासवाद आहे.

६) तन्त्रोक्त लिपीशी कोणत्याच रीतीनें एकता न होणाऱ्या लिपि आदर्शाभास या सीमेंत असल्याचें भास्कररायांनी अष्टादश-व्यष्टिलिपींत गणना केल्यावरून म्हणतां येतें.

७) भारतीय लिपीचे प्रभावानें युनानी लिपि बनली हें उत्तरार्धातील शेवटचे भागांत परिचित रोमन लिपीस घेऊन दाखविलें आहे.

---

प्रकरण १८ वे

# भारतीय लिपिलेखनाचें प्राचीनत्व

### पुरातन वाङ्मय साक्ष–

भारतीय लिपिलेखनाच्या प्राचीनत्वाविषयीं पुरातन वाङ्मय साक्ष आहे. आद्य लिपि सृष्टयारंभीं ब्रह्मदेवानें उत्पन्न केली. ब्रह्मसृष्टा म्हणून ब्राह्मी. आजचे लिपि समालोचक अशोकाचे शिलालेखांत आढळणाऱ्या लिपीस ब्राह्मी म्हणतात. ती आद्य लिपि नव्हे. सृष्टयारंभीं ब्रह्मदेवानें देवांचें नगरांत म्हणजे श्री चक्रात उत्पन्न केलेली लिपि म्हणजे ब्राह्मी वा देवनागरी. या विषयी वैदिक प्रमाण आहे.

### वैदिक प्रमाण.

' ......... अष्टाचक्रा नवद्वारा ।।२।। देवानां पूरयोध्या ' ......... ( तैत्तिरीय आरण्यक १।२७।५ )

सुदर्शने च क्रौञ्चे च । मैनाके च महागिरौ । सतद्वाट्टारगमन्ता । सँहार्यं नगरं तव ।।
(तैत्तिरीय आरण्यक १।३४।४)

### बृहस्पति वचन

आह्निकतत्व, ज्योतिष्तत्त्व, व्यवहारप्रकाश या ग्रंथांत खालील बृहस्पति वचन उद्धृत आहे–
' षाण्मासिकेऽपि समये भ्रान्तिस्सञ्जायते नृणाम् ।
धात्राक्षराणि सृष्टानि पत्रारूढान्यतः पुरा ।। '

सहा महिन्याचे काळांत देखील मनुष्यांना भ्रान्ति = ( विस्मृति ) होऊन जाते या करितां तशी विस्मृति न होण्यासाठीं ब्रह्मदेवानें पूर्वी निर्माण करून ठेवलेल्या अक्षरांना लोक पत्रारूढ करून ठेवतात. ( षाण्मासिके अपि समये नृणां भ्रान्तिः सञ्जायते अतः पुरा धात्रा सृष्टानि अक्षराणि ( नृभिः ) पत्रारूढानि ( क्रियन्ते )

### पत्र शब्दाचा अर्थ.

या श्लोकांतील ' पत्र ' या शब्दाचा अर्थ. केवळ ' झाडाची पानें ' अथवा ' झाडाची साल ' असा आधुनिक करतात, तें अयोग्य आहे. कारण शब्दकल्पद्रुमादि सर्वमान्य संस्कृत कोशांत ' पत्र ' शब्दाचे अर्थांत झाडाची साल, पाने, भूर्जपत्र, तालपत्र, धातूचा पत्रा, पार्चमेंट, कागद वगैरे सर्वांचा समावेश केलेला आहे.

### नारद स्मृति वचन

नाकरिष्यद्यदि ब्रह्मा लिखितं चक्षुरुत्तमम् ।
तत्रेयमस्य लोकस्य नाभविष्यच्छुभा गतिः ।।
( बृहस्पतीचें मनुवार्तिक ) ( नारद स्मृति १।५।७० )

लिखित अक्षर नांवाचे डोळे ब्रह्मदेवानें निर्मिले नसते तर या पृथ्वीवरील व्यवहार व्यवस्थित पार पडले नसतें. हेंही वचन लेखना विषयी प्रमाण आहे.

### चिनी विश्वकोष

इ. स. ६६८ मध्यें रचल्या गेलेल्या ' फा युअन् चु लिन् ' या चिनी विश्वकोषांत ' ललित विस्तर ' या बौद्धांचे ग्रन्थांत उल्लिखित ६४ लिपीची नांवें दिलेली आहेत.

### दैवीं शक्तिसंपन्न तीन आचार्य

या विश्व कोषांत वेगवेगळचा लिपींचे वर्णनांत लिहिलें आहे– ' लेखनकलेचा शोध तीन दैवी शक्ति सम्पन्न आचार्यांनी केला, त्यांचे मध्यें सर्वांत प्रसिद्ध ब्रह्मा असून त्याची लिपि डावीकडून उजवीकडे वाचली ( व लिहिली ) जाते.

### शुक्रनीति सार

याविषयी शुक्रनीतिसाराचेंही प्रमाण आहे.

भ्रान्ते पुरुषधर्मत्वाल्लेख्यं निर्णायकं परम्। ( २।२९१ )

अनुभूतस्यस्मृत्यर्थं लिखितं निर्मितं पुरा ।

यत्नाच्च ब्रह्मणा वाचा वर्णस्वरविचिह्नितम् ।। ( २।२९७ )

### वर्ण शब्दाचा अर्थ व तन्त्रसिद्धान्त

संस्कृत भाषेंत ' वर्ण ' या शब्दाचा ' शब्द ' आणि ' लिपि ' या दोन्ही अर्थानें प्रयोग केला जातो. श्रीचक्रामध्यें बीजरूपानें वर्णोत्पत्ति तन्त्रांत श्रुतिप्रामाण्यपूर्वक सांगितली आहे. ब्रह्माण्डाचे मुळाशी श्रीचक्र आणि पिण्डाचे मुळाशी षट्चक्रें असल्याचा तन्त्रशास्त्रांत सिद्धान्त आहे. तन्त्र शास्त्रानुसार या चक्रांचा व विशिष्ट बीजाक्षरें, विशिष्ट अंक, विशिष्ट रंग, विशिष्ट आकार व विशिष्ट नादाशी सम्बन्ध आहे. परावाणीचा उद्‌भव मूलाधार चक्रांत होत असल्याचें योगशास्त्रांत सांगितले आहे. म्हणून ' वर्ण ' हा शब्द ध्वनि व लिपि ( = रेखाकार ) यांचें प्रतिनिधित्व करणारा आहे. याच अभिप्रायानें भारतीय परम्परेंत ' वर्ण ' शब्दाचा वापर केला जातो. तपोबलानें सूक्ष्मता प्राप्त करून घेतलेल्या योगी मनांस या चक्रस्थ बीजाक्षरांचें प्रत्यक्ष दर्शन होऊं शकतें.

### स्वप्नांचें उदाहरण

जशी भावना करावी वा जसा मनावर संस्कार करावा तेंच दिसतें. असा आक्षेप कोणी करील तर तें ठीक नाही, कारण ज्ञात असलेलाच लिप्याकार वा कोणताही आकार दिसावा असा नियम नाही. या करितां सर्वांस अनुभवास येणारें व्यावहारिक उदाहरण म्हणजे स्वप्नामध्यें अज्ञात प्रदेश, अज्ञात लिपि वा आकार दिसू शकतात. या जन्मांत पूर्वानुभूत आकारच दिसतील असा नियम नाही. हें कोठून आलें, असा प्रश्न येतो. या प्रमाणेंच प्रकृतिस्थ लिपिरूप असून त्याचे दर्शनाची योग्यता शास्त्रानुष्ठानानें मिळविली असतां तें दृग्गोचर होऊं शकतें.

### मुखोद्‌गत वेदपठणावरील निर्मूल आक्षेप

मुखोद्‌गत वेदपठन पाठनाची परम्परा आज पावेतों आहे. याचा निर्देश करून, लेखन नसल्यामुळें ही परम्परा झाली असा आक्षेप कांहीं करतात. हा आक्षेप मुखोद्‌गत वेद पठन पाठनाची कारणमीमांसा व भूमिका लक्षात न घेतल्यानें आहे.

### मॅकडोनेल यांचा अभिप्राय

मॅकडोनेल– त्यांच्या " Indias Past " या पुस्तकात पृ. ५४ वर म्हणतात– " Indeed ! oral tradition offered a better guarantee for the preservation of the original text than the repeated copying of the manuscripts. "

### स्वरांचे शुद्धतेवर भर

" प्राचीन भारतीय लिपिमाला " ग्रथांत पं. गौरीशङ्कर ओझा लिहितात– ' प्राचीन हिन्दुओंके समाजमें वेद और यज्ञ ये दोनों वस्तु मुख्य थी और, सब सांसारिक विषय वहींतक सम्हाले जाते थे जहाँ तक वे इनके सहायक होते थे । यज्ञ में वेदके मन्त्रोंके शुद्ध प्रयोगकी बडी आवश्यकता थी । इसलिए उनका शुद्ध उच्चारण गुरुके मुख से ही पढ़ा जाता था कि पाठमें स्वर और वर्णकी अशुद्धि जो यजमानके नाश के लिए वज्र के तरह समर्थ मानी जाती थी बिल्कुल न होने पावे । ( दुष्टःशब्दःस्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुःस्वरतोऽपराधात् ।। व्याकरण महाभाष्य प्रथमाह्निक)

ऋग्वेद के समय में वेदोंको पढनेकी यही रीति थी और अब तक भी कुछ कुछ चली आती है । (यदेषामन्यो अन्यस्य वाचं शाक्तस्येव वदति शिक्षमाणः। (ऋग्वेद ७/१०३/५)

### लिखित पाठकाचा निषेध

परन्तु यह पठनशैली केवल वेदोंके लिए ही थी, अन्य शास्त्रोंके लिए नहीं । वेदोंके पठन की यही रीति, जिससे स्वरोका शुद्ध ज्ञान होता था, बनी रहे और श्रोत्रिय ब्राह्मणका आदर घट न जाय, इसी लिए लिखित पुस्तक परसे वेदोंका पढ़ना निषिद्ध माना गया है ।

—

" यथैवान्यायविज्ञाताद्वेदाल्लेख्यादिपूर्वकात् ।
शूद्रेणाधिगताद्वापि धर्मज्ञानं न सम्मतम् ॥
(कुमारिल भट्ट तन्त्र वार्तिक १अ/३पा/२अ)

परन्तु लिखित पाठकको अधम पाठक कहना ही सिद्ध करता है कि पहिले भी वेदके लिखित पुस्तक होते थे और उनपर से पढ़ना सरल समझकर लोग उधर प्रवृत्त होते थे । इसीलिए निषेध करना पडा कि प्राचीन रीति उच्छिन्न न हो और स्वर आदि की मर्यादा नष्ट न हो ।

" गीती शीघ्री शिरःकम्पी तथा लिखितपाठकः ।
अनर्थज्ञोऽल्पकण्ठश्च षडेते पाठकाधमाः ॥ (याज्ञवल्क्य शिक्षा)

इसलिए वेदके पुस्तक लिखनेका पेशा करना और पुस्तकोंको बेचना पाप माना गया है । वेदके पुस्तक विस्मृति में सहायता के लिए अवश्य रहते थे और व्याख्यान, टीका, व्याकरण, निरुक्त, प्रातिशाख्य आदिमें सुभीते के लिए उनका उपयोग होता था ।

" वेद विक्रयिणश्चैव वेदानां चैव दूषकाः ।
वेदानां लेखकाश्चैव ते वै निरयगामिनः ॥ " (महाभारत अनुशासन पर्व ६३/२८)

(" प्राचीन भारतीय लिपिमाला " पं. गौरीशङ्कर ओझा पृ. १३/१४)

**बूलरचे मत**

पं. गौरीशङ्कर ओझा यांनी पाश्चात्यांचेही एतद्विषयक मत दिलें आहे. " बूलर (Buhler) लिखता है कि इस अनुमानको रोकने के लिए कोई कारण नही है कि वदिक समयमें भी लिखित पुस्तक मौखिक शिक्षा और दुसरे अवसरोंपर सहायता के लिए काममें ली जाती थी ।"

**रॉथचे मत**

(Indian Palaeography; Page 4)……… रॉथ (Roth) लिखता हैं कि लिखनेका प्रचार भारतवर्ष में प्राचीन समयसे ही होना चाहिए क्यों की यदि वेदोंके लिखित पुस्तक विद्यमान न होते तो कोई पुरुष प्रातिशाख्य बना न सकता ।
(प्राचीन भा. लि. पृ. १५)

" यह सम्भव नही है कि यास्क अथवा पाणिनोने इतनें आचार्योंके एक विषय के ग्रन्थ कण्ठस्थ करके उनका तारतम्य विचार कर नया निरुक्त अथवा व्याकरण बनाया हो । यदि उस समय लिखना या लिखित ग्रन्थ न थे तो क्या पाणिनि और यास्क इन सब आचार्योंके ग्रन्थों को सूक्तोंकी तरह कण्ठस्थ करनेवालोंको सामने बिठाकर, उनके मत सुनते गये होंगे और अपना निबन्ध बनाकर स्वयं रटते और शिष्योंको रटाते गये होंगे ? " (प्रा. भा. लि. पृ. ८ टिप्पणी)

या प्रमाणें ओझा यांचे प्रतिपादन आहे.

**स्वाध्यायोऽध्येतव्यः**

या विषयीं शास्त्राचा सिद्धान्त असा– ' स्वाध्यायोऽध्येतव्यः ' असें विधान आहे. अर्थात ' स्वाध्यायाचे ' म्हणजे 'वेदांचे' अध्ययन करावे असा याचा अर्थ आहे.

" अध्ययन " म्हटलें म्हणजे अधीत वेदगुरूकडून ( म्हणजे विधिपूर्वक वेद शिकलेल्या गुरुकडून ) वेदोच्चारण ऐकून लगेंच त्या प्रमाणें उच्चारण करणें हें वेदाध्ययन होय. ( म्हणजे मुंज झालेल्यालाच ) याप्रमाणें वेदाध्ययन करीत असतां ब्रह्मचर्य व्रताने राहण्याचा नियम आहे. एवंविध अधीताकडूनच वेदोक्तकर्मात मन्त्रप्रयोग झाल्यानेंच त्या कर्मांचें फळ यजमानांस मिळत असते, अन्यथा नाहीं. यास्तव मन्त्र मुखोद्गत करण्याकडे अनादिकालापासून प्रवृत्ति आहे.

**धर्मत्यागामुळें वेदाध्ययन ह्रास**

आज देखील पोथीवरून कर्मकाण्ड चालविणाऱ्या उपाध्यायास कनिष्ठ समजलें जातें. हें कारण लक्षांत न घेतां, लिपि नव्हती म्हणून

मौखिक परम्परा पडली असें म्हटल्यास प्रश्न येतो कीं जेव्हापासून लिपिलेखन आहे तेव्हापासून तरी वेद मुखोद्गत करणें बंद व्हावयास हवें होतें, परन्तु प्रत्यक्षात तें चालूच आहे. आज वेदाध्ययनाचा ह्रास धर्मत्यागामुळे आहे, लिपीमुळे नाहीं म्हणून लिपि नव्हती यापेक्षां वेगळें कारण वेद मुखोद्गत करण्यास असले पाहिजे.

**निरुक्ताचा अभिप्राय**

याच गोष्टीचे उत्तर निरुक्तामध्यें प्रश्न करून दिलें आहे.

**" तत्र चतुष्टं नोपपद्यते युगपदुत्पन्नानां वा शब्दानामितरेतरोपदेशः शास्त्रकृतो योगश्च, व्याप्तिमत्वात्तु शब्दस्याणीयस्त्वाच्च शब्देन संज्ञाकरणं व्यवहारार्थं लोके, तेषां मनुष्यवद्देवताभिधानं पुरुषविद्यानित्यत्वात्कर्म सम्पत्तिर्मन्त्रो वेदे. "** ( निरुक्त खण्ड २/१५-१९ )

येथें प्रथमतः केवळ शब्दस्वरूपाविषयी शंका घेऊन उत्तर केलें आहे. त्या उत्तरांत प्रसंगाने लिपिचा विचार येतो.

' इन्द्रियनित्यं वचनमौदुम्बरायणः ' असा या पूर्वीच्या पहिल्या खण्डाचा शेवटचा भाग आहे. त्यानुसार वचन इन्द्रियनित्य आहे, असें औदुम्बरायण आचार्यांचें मत सांगितलें आहे. इन्द्रियनित्य म्हणजें कानांवर पडत आहे. तेवढाच काळ नित्य म्हणजे स्थिति असलेलें राहणारें.

त्या वरून येथें भाववचनता, द्रव्यवचनता. गुणभाव, प्रधानभाव, पूर्वापरीभाव, सामान्यवाचित्व, विशेषवाचित्व इत्यादि उपपन्न होत नाही कारण ' वचन ' अनित्य आहे. वाक्यांतील एकादा शब्द कानांवर पडत असतां, त्या वेळी त्या पुढील शब्द नसतो. वाक्य ही सम्पूर्ण झाल्यावर त्या पुढील काळांत नसतें, म्हणून एकाच वेळी उत्पन्न न झालेल्या शब्दांचा ( = अयुगपदुत्पन्नानां ) ' इतरेतरोपदेश ' ( विभक्ति प्रत्यय लावून रूप करणें, समास करणें, उपसर्ग करणें ) होऊं शकणार नाही. विनष्ट आणि अविनष्ट यांचें एकीकरण होऊं शकत नाही.

' युगपदुत्पनानां ' असा पाठ घेतल्यास- कूटस्थ शब्द अविनाशी असतात, हे कूटस्थ शब्द कल्पान्ती हिरण्यगर्भाचे ठिकाणी त्याचे बुद्धीच्या आश्रयानें त्याच्यासह ' युगपत् ' म्हणजे एकदम अभिव्यक्त होतात, असा विचार आहे. असें असलें तरी ' सहावस्थित ' म्हणजे एक-मेकाबरोबर असणारांना इतरेतरगुणप्रधान भाव प्राप्त होऊं शकत नाही, अर्थात् व्याकरण निरुक्तादि शास्त्रकारांचा इतरेतरोपदेश असंभव ठरतो.

अशी शंका घेऊन उत्तर दिलें आहे.

शब्दाला व्याप्तिमत्व असल्यानें वाक्यचतुष्ट्व उपपन्न होते. 'व्यापन म्हणजे व्याप्ति, ती ज्यांचे ठिकाणी आहे तो व्याप्तिमान्- असा शब्द आहे. व्याप्तिमानाचा भाव म्हणजे व्याप्तिमत्व. शरीमध्यें अभिधान अभिधेयरूप असणारी बुद्धि हृदयान्तर्गत आकाशात प्रतिष्ठित असते.

या अभिधानाभिधेयरूपा बुद्धींत अभिधानरूपा, शास्त्राला अभिमत असणाऱ्या प्रयोजनाची जिज्ञासा विशेषरूपाने करणारी जी बुद्धि तिच्या अभिव्यक्तीस समर्थ असणारा पुरुष, स्वगुणरूपानें प्रयत्नानें उरःकण्ठादि वर्णस्थानांतून शब्द बाहेर टाकितो, तो अविनाशी शब्द व्यक्ति भावापन्न होऊन श्रोत्रद्वारानें प्रवेश करून प्रत्याय्याची (ऐकणाऱ्याची) सर्वार्थरूपा सर्वाभिधानरूपा बुद्धि व्यापितो. म्हणून शब्द व्याप्तिमान आहे,

या ठिकाणी टेपरेकॉर्डर प्रमाणें कालिक पौर्वापर्याने मांडणी होते. त्यावर शास्त्रोक्त इतरेतरोपदेशादि सर्व प्रक्रिया होतात. एवढें आधुनिकांनी लक्षांत घेतलें असलें तरी त्यांना लेखरूपानें मांडणीचा मौलिक सिद्धान्त व्याकरण व निरुक्त प्रक्रियेचे मूळाशी असलेला समजूत आला असता. हेंच तें प्रसंगानें लिपिविषयीचें पूर्वोक्त दिग्दर्शन आहे.

तसेंच प्रकृतिस्थ लिपिरूपच सृष्टचारंभी ब्रह्मदेवानें व्यक्त केलें. शब्दांना अणीयत्व म्हणजे थोडक्यांत विशिष्ट वस्तु वा विशिष्टार्थ बोधकत्व असतें. म्हणूनच लोक व्यवहारात त्यांचा उपयोग केला जातो असे उत्तर अभिनयाला ही व्याप्तिमत्व असते अशी शङ्का घेतल्यावर तिचे निराकरणार्थ दिले आहे. म्हणून ' अणीयस्त्वाच्च शब्देन संज्ञाकरणं व्यवहारार्थं लोके ' असें म्हटलें आहे. एवढें प्रतिपादन करून पुढें दुर्गाचार्य आपल्या भाष्यांत ' वेद अध्येतव्य आहेत ' असा पूर्वोक्तनिरुक्त वाक्यांचा निष्कर्ष काढतात.

**दुर्गाचार्यांचे प्रतिपादन**

संस्कृतही देवांची भाषा देवांकरितां आणि मनुष्यांकरिता एकाच प्रकारची आहे असें " तेषां मनुष्यवद्देवताभिधानम् ' येथें सांगितलें आहे. यावर असे असतां वेद कण्ठस्थ करून यज्ञादिकांत प्रयुक्त करण्याची आवश्यकता काय ? संस्कृत भाषेंत बोललें म्हणजे पुरे ! अशी शंका उपस्थित केली आहे. त्याचें नैरुक्त उत्तर दुर्गाचार्य भाष्यांत देतात-

**' पुरुषेषु मनुष्येषु विद्याया विज्ञानस्यानित्यत्वम् । तस्मात्पुरुषविद्यानित्यत्वाद्धेतोः कर्म संपत्तिः फलसंपन्नमेवं कर्म भविष्यतीत्येवमर्थ वेदे मन्त्रः समाम्नात इति वाक्यशेषः । इतरथा हि पुरुषेषु विज्ञानस्यानित्यत्वाद्यथार्थ नाभिदधते, देवान्नामाख्यातोपसर्ग निपातैः । अशिक्षित त्वान्मन्दशिक्षितत्वाद्विस्मरणशीलत्वाद्वादेवानामपराध्येयुरयथावत्प्रयुञ्जानानामाख्यातोपसर्गनिपातान् । ते ततश्च सर्वार्थंप्रत्यक्षदृशः देवाः स्वल्पमप्यपराधं न मर्षयन्ति । विगुणमेतदिति विद्यानित्यत्वात्तदभावे नेयुः कर्मणि । ततश्च देवताहीनं कर्माफलं संपद्यते । न च केवलं फलासंपत्तिः किं तर्हि । दुरिष्टहेतुको दोषोऽपि स्यात् । तस्मादेत एव नामाख्यातोपसर्गनिपाताः प्रयोगानुपरिपाटीविनिमयार्थ मंत्रत्वेन वेदे समाम्नाताः । न हि नामाख्यातोपसर्गनिपातान्परित्यज्य मंत्राःसन्ति । एतदेव हि चतुर्विधं पदजातं प्रयोगानुपरिपाट्या कयाचिदवस्थितं मंत्रा– इत्युच्यन्ते ।**

याचा मथितार्थ असा– " मनुष्याचे ठिकाणी असणारी विद्या व विज्ञान अनित्य असल्यानें केव्हां चुकीचें वाक्य उच्चारिलें जाईल जाईल म्हणून कण्ठगत केल्यानें फलरूपानें कर्मसंपत्ति आहे. दोषरहित कर्मसंपत्ति मिळविणेंच फलसंपन्न करतें, या करितांच वेदांतील मन्त्र आहेत, अर्थात् त्यांनी दोषरहित कर्मसम्पत्ति प्राप्त करतां येते. " वेदेमंत्र समाम्नातः " हा वाक्यशेष आहे. नाम, आख्यात, उपसर्ग, निपात वगैरेंनी देवतोद्देशानें कर्म पुरुषाचे ठिकाणी असणाऱ्या विज्ञानाचे अनित्यत्वामुळें यथार्थ होऊं शकत नाही. अडाणीपणा, अपुरी माहिती, विस्मरण इत्यादिकांमुळें व अयथार्थपणें होणारे नाम–आख्यात–उपसर्ग–निपात वगैरे मनुष्यास देवांचा अपराधी करतात. सर्व गोष्टी व त्यांचा अर्थ पाहणारे देव थोडकाही अपराध मान्य करीत नाहीत. विद्यानित्यत्व नसल्यानें, दोषयुक्त कर्म म्हणून, ते कर्माचे ठिकाणी येत नाहीत– देवताविहीन कर्म फलदायी होऊं शकत नाही फल न मिळणें इतकेंच नव्हें तर यथार्थ कर्मानें ' दुरिष्टहेतुक ' म्हणजे ' अनिष्ट घडविणारा ' दोषही निर्माण होतो. या करितांच यथार्थ कर्म करण्यासाठी त्यांत प्रयोग करावयाचे मन्त्र वेदांत आहेत. याला सोडून वेदमन्त्र नाहीत. या प्रमाणें नाम–आख्यात–उपसर्ग–निपात असे चतुर्विध पदजात प्रयोगाच्या परिपाटीनुसार अवस्थित आहेत, यालाच मन्त्र म्हणतात. याप्रमाणें लिपिविषयक व उच्चारणविषयक शास्त्रीय प्राचीन भूमिका आहे. "

वेदासंबंधीचे व त्यावरून केलेले लिपि संबंधीचे आधुनिकांचे निष्कर्ष युक्तिसङ्गत नाहीत कारण लिखित शब्द; भले मग तो कांही चिह्ने वापरून असो. उच्चारणाविषयी संपूर्ण ज्ञान करून देऊं शकत नाही. वैदिक, अनुष्ठानांत स्वर व त्यांचें यथाशास्त्र निर्दोष उच्चारण यांना असाधारण महत्व असल्यानें वेदविद्या मौखिक परम्परेनें जतन केली गेली. आज मितीसही वेदाध्ययनांत पोथीचा आग्रह नसून सन्था व पोथीशिवाय पाठांचा आग्रह असतो.

याप्रमाणें पूर्वी उद्धृत प्रमाणांनुसार वेदाध्ययनाचें संदर्भात लेखनाचा निषेध असल्यानें मौखिक परम्परा बलिष्ठ असल्याचें दिसून येतें. या वरून भारतांत लेखनकला नव्हतीच असा निष्कर्ष काढणें अनुचित आहे. वर सांगितल्याप्रमाणें बुद्धीत शब्दांची देशिक क्रमानें मांडणी, लेखनाचा निषेध आणि लिखित पाठकाचे अधमत्वप्रतिपादन हे तिन्ही लेखनाच्या अस्तित्वाविषयीचे सबळ पुरावे असतांना आधुनिक त्याकडे कानाडोळा करितात. ही मोठीच आश्चर्याची गोष्ट आहे.

**वेदवाङ्मयांतील लेखनविषयक पुरावे**

खुद्द वेदवाङमयांतच लेखनविषयक अनेक पुरावे मिळतात. " **भारतीय प्राचीन लिपिमाला** " या ग्रंथांत पृ. ९ व १० वर **पं. गौरीशङकर ओझा** यांनी खालील प्रमाणें उद्धृत केली आहेत.

**हूंकार ईति त्र्यक्षरं प्रस्ताव इतित्र्यक्षरं तत्समं ।१। आदिरिति व्यक्षरं** (छान्दोग्य उपनिषद् २।१०)

**अग्निरीकारः आदित्य ऊकारो निहव एकारः** (छान्दोग्य उपनिषद् १।१३)

**' सर्वेस्वरा इन्द्रस्यात्मानः सर्व ऊष्माणः प्रजापतेरात्मानः सर्वे स्पर्शा मृत्योरात्मानः यदि स्वरेषूपालभेदेन्द्रं शरणं...... '**

(छां. उ. २।२२।३)

' अक्षर ' शब्द तो संस्कृत के प्राचीन साहित्य में दोनों अर्थो मे मिलता है अर्थात ध्वन्यात्मक (उच्चारित) और सङ्केतात्मक (लिखित), परन्तु ' वर्ण ' शब्द केवल सङ्केतात्मक चिह्नके लिए (वर्ण धातुसे = रंगना या बनाना) आता है और ईकार, ऊकार आदिमें ' कार' (कृ धातुसे = करना) केवल वर्ण के लिये, अतएव ' वर्ण ' और ' कार ' प्रत्ययवाले शब्द लिखित सङ्केतोंके ही सूचक है ।

**" वर्णः स्वरः । मात्रा बलम् "** (तैत्तिरीय उपनिषद १।१)

**" तस्यैतस्यात्मनः प्राण ऊष्मरूपमस्थीनि स्पर्शरूपं मज्जानः "**

**स्वररूपं मांसं लोहितमित्येदन्यच्चतुर्थमन्तःस्था रूपमिति ' ह स्माऽऽह ह्रस्वो माण्डूकेयः '** ( ऐतरेय आरण्यक ३।२।१ )

' तद्वा इदं बृहतीसहस्त्र संपन्न तस्य यानि व्यञ्जनानि तच्छरीरं यो घोषः स आत्मा य ऊष्माणः स प्राणः ' ( ऐ. आ. २।२।४ )

' स यदि विचिकित्सेत्सणकारं ब्रवाणी उँ अणकारा उँ इति सणकारमेव ब्रूयात्सषकारं ब्रवाणी उँ अषकारा उँ इति सषकारमेव ब्रूयात् । ( ऐ. आ. ३।२।६ )

अथ वयं ब्रूमो निर्भुजवक्त्रा इति ह स्माऽऽह ह्रस्वो माण्डूकेयः पूर्वरुपमुत्तरमुत्तररुपं योऽ वकाशः पूर्वरूपोत्तररूपे अन्तरेण येन सन्धि विवर्तयति येन स्वरास्वरं विजानाति येन मात्रामात्रं विभजते संहितेति ' ( ऐ. आ. ३।१।५ )

' तेभ्योऽभितप्तेभ्यस्त्रयो वर्णा अजायन्ताकार उकारो मकार इति तानेकधा समभरत्तदे तदोमिति ' ( ए. ब्रा. ५।३२ )
( कौषीतकी ब्राह्मण ( २६।५ ) आश्वलायन श्रौतसूत्र ( १०।४ )

' अथो वेदेकवचनेन बहुवचनं व्यवायानीति ' (शतपथ ब्राह्मण १३।५,१।१८ )

' त्रेधा विहिता इष्टका उपधीयन्ते पुंनामन्यः स्त्रीनामन्यो नपुंसकनामन्यस्त्रेधा विहितानि एवेमानि पुरुषस्याङ्गानि पुंनामानि स्त्रीनामानि नपुंसकनामानि ' ( शतपथ ब्राह्मण १०।५।१।२ )

' वाक् ह एवैतत्सर्वं यत्स्त्रीपुमान् नपुंसकं ' ( श. ब्रा. १०।५।१।३ )

' वाग्वै पराच्यव्याकृतावदत् । ते इन्द्रमब्रुवन् " इमां नो व्याकुरु " इति सोऽब्रवीद्वरं मह्यं चैवैष वायवे च सह गृह्याता इति तस्मादैन्द्र वायवः सह गृह्यते । तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत्तस्मादियं व्याकृता वागुद्यते । तस्मात्सकृदिन्द्राय मध्यतो गृह्यते. '

( तैत्तिरीय संहिता ६।४।७ )

### लेखनाशिवाय व्याकरण अशक्य.

या नन्तर पुढें पं. गौरीशङ्कर ओझा म्हणतात ' उपर्युक्त प्रमाणोंसे पाया जाता है कि उपनिषद्, आरण्यक, ब्राह्मण और संहिता के समयतक व्याकरण के होने का पता चलता है । यदि उस समय- लिखनेका प्रचार न होता तो व्याकरण और उसके पारिभाषिक शब्दोंकी चर्चा भी न होती क्योंकी जो जातियां लिखना नहीं जानती वे छन्दोबद्ध गीत और भजन अवश्य गाती है, कथाएँ कहती है परन्तु उनको स्वर, व्यञ्जन. घोष, सन्धि, एकवचन, बहुवचन, लिङ्ग आदि व्याकरण के पारिभाषिक शब्दोंका ज्ञान सर्वथा नहीं होता । इसका प्रत्यक्ष उदाहरण हिंदुस्थानमेंही भली भांति मिल सकता है, जहाँ ३१३४१५३८९ मनुष्योंकी आबादीमे से केवल १८५३९७८ मनुष्य लिखना पढना जानते है बाकी के २९४८७५८११ अभी तक लिखना पढना नही जानते । उनमें किसी को भी व्याकरणके पारिभाषिक शब्दोंका कुछ भी ज्ञान नही है। व्याकरण की रचना लेखन कलाकी उन्नत दशामेंही होती है और उसके लिए भाषा का सारा साहित्य टटोलना पडता है और उसके प्रथम रचयिता को उसके पारिभाषिक शब्द गढ़ने पडते हैं– '

### लेखनाशिवाय छन्दशास्त्र अशक्य.

या नंतर पं. गौरीशङ्कर ओझा यांनीं संहिता व ब्राह्मणांत मिळणाऱ्या गायत्री, उष्णिक्, अनुष्टुभ्, बृहस्ती, विराक् त्रिष्टुज्, जगति पंङ्क्ति वगैरे छन्दांचा उल्लेख करून म्हटलें आहे–

' छन्दशास्त्रका प्रथम रचयिता ही छन्दोबद्ध साहित्य समुद्र को मथकर छन्दके अक्षर या मात्राओंकी संख्याके अनुसार उनके वर्ग नियत कर उनके नाम अपनी तरफसे स्थिर करता है, तभी लोगोंमें उनकी प्रवृत्ति होती है। लिखना न जाननेवाली जातियों में छन्दोका नाम ज्ञान नहीं होता । वैदिक तथा लौकिक संस्कृत का छन्दशास्त्र बडाही जटिल है, एक एक छन्दके अनेक भेद है और उन भेदोंके अनुसार उनके नाम भिन्न भिन्न है । ब्राह्मण और वेदोंमें मिलनेवाले छन्दोके नाम आदि उस समय में लेखन कला की उन्नत दशाके सूचक है । '

वेदामध्यें लेखन कलेच्या आस्तित्वाविषयी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असे अनेक उल्लेख मिळतात–

' उतत्वः पश्यन्न ददर्श वाचमुतत्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् । '
( ऋग्वेद १०।६।७१।४ )

' चतुरश्चिद्दमानाद्बिभीयादा निधातोः न दुरुक्ताय स्पृहयेत् । '
( ऋग्वेद १।८।४१।९ )

' सहस्त्रं मे ददतु अष्टकर्ण्यः श्रवो देवेष्वक्रत । '
( ऋग्वेद १०।५।६२।७ )

' अग्रं नयत्सुपद्यक्षराणामच्छा रवं प्रथमा जानती गात् । '
( यजुर्वेद ३३।५९ )

' अक्षरः पङ्क्तिः छन्दः । '
( शतपथ ब्राह्मण ११।४।२।२नें०२५ )

' परि तृन्धि पणीनामारया हृदया कवे । अथेदमस्मभ्यं रन्धय ॥ '
( ऋग्वेद ६।५।५३।५ )

' यां पूषन्ब्रह्मचोदनीमारां बिभर्ष्याघृणे । तया समस्य हृदयमारिख किरा कृणु ' ॥
( ऋग्वेद ६।५।५३।८ )

' को अद्धा वेद क इह प्र वोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः । '
( ऋग्वेद ६।५।५३।८ )

' नावष्टभ्यो——न स्त्रियमुपगम्य नोल्लिख्य नावलिख्य इति । '
( ऐतरेयारण्यक ३।३।१४ )

' यजैषं त्वा सल्लिखितमजेषमुत संरुधम् ' ।
( अथर्ववेद ७।५०।५)

' ग्रामण्यगणकमभिक्रोशकं तान्महसे ' ।
( यजु-वाज. सं. ३०।२० )

' यद्युत्तमं लिखितमर्णेन ' । ( अथर्व वेद १२।३।२२ )

' अः इति ब्रह्म तत्रागतमहमिति । ' ( ऐतरेयारण्यक २।३।८ )

' स यो ह वै सावित्रस्याष्टाक्षरं पदं श्रियाभिषिक्तं वेदश्रिया हैवाभिषिच्यते । '
( तैत्तिरीय ब्राह्मण ३।१०।१३ )

' कस्मै देवाय । कस्मै काय प्रजापतये देवाय । प्रजापतिर्वाकः तस्मै हविषाविधेम । '
( शतपथ ब्राह्मण ७।४।१।१९ )

या प्रमाणें वैदिक वाङ्मयांत लेखनाचा, वर्णांचा प्रत्यक्ष निर्देश करणारीं वचनें मिळतात. अप्रत्यक्ष निर्देश करणारीं म्हणज लेखनकलेशिवाय ज्या क्रिया करणें सहज साध्य नाहीं अशा क्रियांचा निर्देश करणारीं म्हणजे व्याकरण, छन्दशास्त्र, मोठ्या सङ्ख्यांची गणना, जुगारांचे हिशेब, लेखनाची प्रशंसा जनावरांचे कानावरील चिह्ने इत्यादीविषयीची वचनें प्रचुरतेनें मिळतात. या सर्वांवरून श्रुतींचे प्राकट्यापासून भारतीयांना वर्णलिपि व अङ्कलिपि यांचें ज्ञान व काम असल्याचें सिद्ध होते. या संदर्भात ' भारतीय प्राचीन लिपिमाला ' या पुस्तकांत पृ. १३ वर पण्डित गौरीशङ्कर ओझा म्हणतात—

" लिखना न जाननेवालों न तो परार्धतक की सङ्ख्या का ज्ञान होता है और न उनको ' प्रयुत, ' ' अयुत, ' आदि बडी संख्याओंके सूचक शब्दोंके गढने या जानने की आवश्यकता होती है । --- ऋग्वेद, यजुर्वेद, और सामवेद जैसे पुस्तकोंके जो १००० पृष्ठ में भी लिखकर पुरे नही होते और जिनके सुननेमें कई दिन लग सकते हैं, अक्षरोंकी तथा उनसे बन सकनेवाले छन्दोंकी गिनती बिना लिखित पुस्तक की तथा गणित की सहायता के करना मनुष्यके शक्ति के बाहर है । अत एवं यह मानना पडेंगा की जिसने तीनों वेदोंके अक्षरो की सङ्ख्या और उनसे बननेवालें बृहती और पंक्ति छंदों की संख्या बतलायो है उनके पास उक्त तीनों वेदोंके लिखित पुस्तक अवश्य होंगे --- । '

' लिखना न जाननेकी दशामे भी छंदोबद्ध मन्त्र, गीत, भजन, आदि बन सकते है परन्तु उस दशामें बडे बडे ग्रन्थोंका बनना और सैंकडो बरसोतक उनका अक्षरशः कण्ठ रहना किसी तरह संभव नहीं । वेदोंकी संहिताओं में कितना एक अंश और ब्राह्मणोंका बहुत बडा भाग गद्य ही है और वे वेदोंके टीकारूप हैं । लिखना न जानने और वेदोंके लिखित पुस्तक पास न होनेकी दशा मे ब्राह्मण ग्रन्थों आदि की रचना व की कल्पना भी असंभ है । '

या सर्वांचा अभिप्राय स्पष्ट आहे–

### अन्य वाङमयांतील लेखनविषयक पुरावे

वेदाखेरीज अन्य वाङमयांतही लेखनविषयक भरपूर पुरावे मिळतात. लिप् या संस्कृत धातूपासून 'लिपि' शब्द बनला आहे. त्याचा अर्थ माखणें, थर देणें असा आहे. पाणिनीचे अष्टाध्यायीमध्ये लिपि, लिबि व लिपिकार असे शब्द आढळतात. लिपि शब्दाचा वरील अर्थ भट्टोजी दीक्षितांनाही सम्मत आहे. पहा – –

**' दिवाविभानिशा ........लिपिलिबि......... बाह्यर्यत्तद्धनुररुष्षु । '**

**( अष्टाध्यायी ३।२।२१ )**

**' लिपिर्लिबिरुभौ स्त्रियौ । ' ( अमरकोश २।८।१६ )**

**' लिप्यते । लिप्युपदेहे । इक् कृष्यादिभ्यः । '**

**( भट्टोजी दीक्षितांचे वार्तिक ३।३।१०८ )**

वेदांतील गायींचे कानांवर अङ्कादि चिह्न लिहिण्याच्या उल्लेखाचें पाणिनीही अनुमोदन करतो –

**' कर्णो वर्ण लक्षणात् । ' ( पाणिनी अष्टाध्यायी ६।२।११२ )**

**' कर्णे लक्षणस्य विष्टाष्ट पञ्चमणिभिन्नच्छिन्नच्छिद्रस्रुवस्वस्तिकस्य '**

**( पाणिनी अष्टाध्यायी ६।३।११५ )**

### देवांची नगरी

वेदामध्यें नागरी अथवा देवनागरी या शब्दांची स्पष्ट उपपत्ति मिळते. – 'देवानां नगरे भवा' म्हणून 'देवनागरी' देवनगर म्हणजे श्री चक्र होय,

**' अन्येषामसाध्यं देवतानिवासभूतं श्रीचक्रनगरम् '**

**( नित्याषोडषिकार्णव विश्राम ६ श्लोक ११ सेतुबन्ध )**

या देवनगराचा वैदिक वाङमयांत खालीलप्रमाणें उल्लेख मिळतो–

' अष्टाचक्रा नवद्वारा ॥२॥ देवानां पुरयोध्या । तस्या हिरण्मयः कोशः । स्वर्गो लोको ज्योतिषाऽऽवृत्तः । योवैतां ब्रह्मणोवेद । अमृतेनावृतां पुरीं । तस्मै ब्रह्म च ब्रह्माच । आयुः कीर्ति प्रजां ददुः । विभ्राजमानां हरिणीं । यशसा संपरीवृतां । पुरं हिरण्मयी ब्रह्मा ॥३॥ ( तै. आ. १।२७ ।

' सुदर्शनेच क्रोञ्चेच । मैनाके च महागिरौ । स द्वट्टारगमन्ता । स हार्यं नगरं तव ॥२॥ ( तैत्तिरीय आरण्यक १।३१ )

' अष्टचक्रा नवद्वारा देवानां पूरयोध्या । तस्यां हिरण्मयः कोशः स्वर्गो ज्योतिषावृतः ॥३१॥ तस्मिन्हिरण्मये कोशे त्र्यरे त्रिप्रतिष्ठिते तस्मिन्यव्द्येकाक्षं आत्मन्वैतत्तद्वै ब्रह्मविदो विदुः ॥३२॥ बभ्राजमानां हरिणीं यशसा संपरीवेवृतां । पुरं हिरण्मयीं ब्रह्माविप्रेशा परा जिताम् ॥३३॥ ( अथर्ववेद शौनक शाखा १०।२ )

या सर्व प्रमाणांवरून लिपि व्यवहार प्राचीन काळापासून असल्याचें सिद्ध होतें. तसेंच भास्कररायांचे वरिस्यारहस्य, श्रीमदाद्यशङ्कराचार्यांची सौन्दर्य लहरी व तिची लक्ष्मीधर व्याख्या अघोरशिवाचार्यकृता सिद्धान्तसारावली, प्रत्यभिज्ञातन्त्र, त्रिपुरोपनिषद्, त्रिपुरातापनी उपनिषत्, नित्याषोडषिकार्णव सेतुबन्ध, तन्त्रराजतन्त्र, योगिनी हृदय वगैरे तान्त्रिक ग्रंथांतही लिपिलेखनाविषयी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असे पुरावे मिळतात. यावरूनही लिपिलेखनाचें प्राचीनत्व समजून येतें

### पौराणिक प्रमाण–पद्मपुराण

पद्मपुराण पाताळखण्ड अध्याय १०० श्लोक ४२ ते ५० व उत्तर खण्ड अध्याय २१७ श्लोक १ ते १० (आनन्दाश्रमपुणेंप्रत) यामध्यें अनुक्रमें देवनागरी लिपिविषयीं व नकाशे काढण्याविषयीं उल्लेख मिळतो. (कलकत्ता येथील मनसुखराय मोर यांनीं प्रकाशित केलेल्या प्रतींत अध्याय १०४ व २२१ येतो) तो असा –

' पुराणावरून प्रश्न कसा पहावा हा विषय चालला असतां, शम्भू ब्राह्मण श्री रामचन्द्रास सांगतो –

**' शम्भुरुवाच । पुराणजीवी पूजार्हः स्वशाखाध्ययनः शुचिः । '**

मीमांसातत्वविज्ञानः श्रोत्रियोनृतदूषकः ।।४२।। देवेषुच समस्तेषु समदृष्टिः शिवेरतः । शतरुद्रिय जापि च साग्निकश्चातिवाचकः । ।।४३।। यजुर्वेदी विशेषेण पूजयेत्पुस्तकं सुधीः । श्रीतालपत्र लिखितंदेव लिप्यन्वितं शुभम् ।।४४।।

'बन्धाद्यंति प्रचंपट्टयुगला प्रणवाक्षरम् ।

(बन्धाद्यति प्रपंचयद्युगपत्प्रणवाक्षरम् । ) प्रागूर्ध्वं रेखयोः प्रान्ते. प्रणवस्याग्रयोजिका ।।४५।। रेखैकातु भवेदेवमकारस्तस्य पार्श्वः: (रेखाभवेदेवमेका अकारस्तस्य पार्श्वतः ।) शिरोभागमुपक्रम्यसकोणाधः प्रलम्बिनी ।।४६।। आकारः सहि विज्ञेया पट्टिकादक्ष (श) रेखया । वामे षड्वक्रबिन्दू द्वाविकार इति कीर्तितः ।।४७।। तस्य वाम शिरोरेखालम्बिन्या ई उदाहृतः । सर्वाक्षरे शिरोरेखा अवक्रा प्रणवं विना ।।४८।। तस्यां तु लम्बरेखा स्यात्तदन्तेच लवित्रवत् । (तस्यां तु लम्बरेखान्या तदन्ते च लवित्रवत्) उकारः सहि विख्यातो लवित्रद्वयतस्तद्रू ।।४९।। एवमन्यानि सर्वाणि ह्यक्षराण्याह भारती ।

(एवमन्यानि सर्वाणि अक्षराण्याह भारती ।)

लिप्या ऽ नयैव लिखितं पुराणं तु प्रशस्यते ।।५०।।

(कंसामध्य मनसुखलाल मोर प्रतींतील पाठभेद दिले आहेत )

## देवलिपि असा स्पष्ट उल्लेख

येथें देवलिपि असा स्पष्ट उल्लेख आहे आणि प्रणव, अकार, आकार, इकार, ईकार, उकार व ऊकार या अक्षरांचा आकार सांगितला आहे. तो तसा देवनागरींतच आहे, इतर कोणत्याही लिपींत नाहीं. पद्मपुराणाच्या बहुतेक सर्व छापींल प्रतींत असेच श्लोक आहेत. येथें श्लोक ४५ ते ४७ या मध्ये कांहीं लेखाक्षरविप्लव असल्याचें वाटतें, शब्दार्थ लागत नाहीं. या करितां योग्य ऊहानें ज्ञातपाठभेद घेऊन शोधून अर्थ करावा असें आम्हांस वाटते. असें करणें वर्णोद्धारतन्त्र प्रतिपादित अर्थाचे दृष्टीने असल्यास आम्हास इष्ट वाटतें.

## श्लोकार्थाचा विचार–एक पक्ष

अर्थ– बन्धेत्यादि श्लोक भागः लेखकप्रमादिप्लुताक्षर इति भाति । अतः अर्थबोधो न जायते । वर्णोद्धार तन्त्रोक्त अर्थानुसन्धानपूर्वक अर्थः कर्तव्यः । तत्र लिखितपाठस्यान्वेषणे कृते वाराणस्यां श्री सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालयस्य सरस्वतीभवने हस्तलिखित पद्मपुराणे– पुराणविभाग पुस्तक संख्या मु. १४३६२, १४३९५ अत्र प्रसङ्गे– "देवलिप्यन्वितं शुभम्" ।।४४।। इत्यतः परं "बन्धाद्यति" इत्यतः पूर्वं पार्श्वतः तत्रत्यपाठः 'स बिन्दुरेखार्ध चन्द्रयुगलं प्रणवाक्षरम् ।' इति लिखितः उपलब्धः । अतः तावत्यंशे तमेव पाठं गृहीत्वा अर्थः कर्तुमुचितः तत्र च " सबिन्दुरेखार्धचन्द्रयुगलं प्रणवाक्षरम् । प्रागूर्ध्वं रेखयोः प्रान्ते प्रणवस्याग्रयोजिका ।।" इत्यस्यार्थः– सबिन्दुरेखा अर्धचन्द्रयुगलमितीह छेदः । अर्धचन्द्रयुगलं प्रणवाक्षरम् प्राक्, ऊर्ध्वं रेखयोः प्रान्ते सबिन्दुरेखा प्रणवस्याग्रयोजिका । इत्यन्वयः । तथाच अर्धचन्द्रयुगलम् प्रणवाक्षरम् = यथा चित्रे प्रदर्शितं प्राक् लिखितं भवति । ऊर्ध्वं = अनन्तरं यथा चित्रविभागे दर्शितम् = सबिन्दुरेखा, अत्ररेखा प्रधानत्वादग्रयोजिका बिन्दुप्रधानत्वात्तद्विशेषणमात्रम् अतः तयोः पूर्वोत्तरक्रमसिद्धिः । अतः प्रणवस्याग्रयोजिका = यथा चित्रे प्रदर्शितं इति । रेखेतीह उपस्थितत्वादर्धचन्द्र रेखैवेति सङ्गच्छते । चित्रदर्शिता रेषा स्थितिविशेषतः = सबिन्दु रेखा । एवं च सिद्धे यथा चित्रे प्रदर्शिता इत्येतावति प्रणवरूपे नादबिन्दुरेखे अपि यदि प्रतिपादनीये तर्हि सबिन्दुरेखैत्यस्यावृत्या ऊर्ध्व सबिन्दुरेखा सबिन्दुरेखा प्रणवस्याग्रयोजिका इत्यन्वयार्थः कर्तव्यः तथाच ॐ इति सबिन्दुरेखायुगलं कार्यम् । इति.

ततःपरं रेखैका तु भवेदेवमित्यत्र पूर्ववाक्यार्थ विशेषत्वेन प्रधानत्वात् अर्धचन्द्रयुगलरूपरेखैव रेखैकेति परामृश्यते इति सङ्गतिः । भाण्डारकर प्राच्यविद्या संशोधन मन्दिरस्थ प्रतिपाठे- Manuscript No. 159/1884–87 शक 1673 इत्यत्र चन्द्रेति अक्षरद्वयं अस्येव पाठस्य समर्थकम् ।

बन्धाढ्यं प्रतिपच्चद्रयुगलं प्रणवाक्षरम् ।

तिर्यगूर्ध्वं रेखयोः प्रान्ते प्रणवस्याग्रयोजिका ।।

अत्र 'कुञ्चिता वामतस्त्वध' इति लक्षण वाक्यानुसारेण अक्षररूपे बिन्दुर्वक्ररेखारूपः शून्यबिन्दुः । नादबिन्दुस्तु लाघवाद् शून्य बिन्दू मात्रमिति विवेकः । इति सर्वसामञ्जस्यम् ।

ततः 'रेखैका तु भवेदेव मकारः' । एवं एका रेखा = पोक्ता अर्धचन्द्रयुगलरूपैव = इति रूपा त्वकारः भवेत् । कथं भूता सती? तस्य पार्श्वतः (दक्षतः) 'शिरोभागमुपक्रम्य सकोणाधःप्रलम्बिनी' यथा चित्रे प्रदर्शिता इति रेखा (ततोर्ध्वसङ्गता ऊर्ध्वा, चेति रेखा रूपा) लिखिता सती = यथा चित्रविभागे दर्शितम् अ इत्यकार इत्यर्थः ।

तदनन्तर ' आकारः स हि विज्ञेय घट्टितादक्षरेखया ' इति पाठे आ आकारः भवति। दक्षरेखाघट्टितेति अकार रेखेत्यर्थः। ततः परं ' वामे सद्वक्र बिन्दुद्वाविकार इति कीर्तितः ' इति चेत्पाठः शुद्धः तदा वामे = पार्श्वे सन्तौ वक्रबिन्दू = कुब्जिता मध्ये रेखा तत्सञ्ज्ञता चेति प्रोक्ते तयोः कुब्जितत्वस्थाने बिन्दू द्वौ इकारः द्रष्टव्यं। परस्तात्तस्य (इकारस्य) नामशिरोरेखा लम्बिन्या (सहिता) ई इति रूपा चेत् ई उदाहृतः। ' सर्वाक्षरे शिरोरेखा अवक्रा प्रणवं विना '

– ॐ अ, आ, इ, ई इति। इतः परं उ, ऊ। यथा तस्यां तु (शिरोरेखायां) इति लम्ब रेखास्यात् तदन्ते (लम्बरेखान्ते) च लवित्र-वत् इति उकारःस हि विख्यातः। ततः परं लविगद्वयतः (लम्ब रेखान्ते इति यावत्) इति-रूपेण तत् ऊ भवति इत्यर्थः।

### मराठी सारांश

(पण्डित गणपति शास्त्री हेब्बार यांच्या वरील संस्कृत विवरणाचा मराठी सारांश खालील प्रमाणें–

मूळ संस्कृत श्लोकातील काही भाग लेखन प्रमादामुळे ' विप्लुताक्षर ' झाल्याने वर्णोद्धार तन्त्रोक्त अर्थाचें अनुसन्धान करून त्याचे आधारे पाठ शोधून अर्थ केल्यास तो लावता येतो. सबिन्दुरेखार्धचन्द्रयुगलं प्रणवाक्षरम्। प्रागूर्ध्व रेखयोः प्रान्ते प्रणवास्याग्रयोजिका ॥ ' असा पाठ ' बन्धाद्यंति प्रचंपट्ट युगलात्प्रणवाक्षरम्। प्रागूर्ध्व रेखयोः प्रान्ते प्रणवस्याग्रयोजिका ' ॥ याचे ठिकाणी वर उल्लेखिलेल्या पोथीत बाजूला लिहिलेला सापडल्याने घेतला आहे

अर्धचन्द्रयुगलं प्रणवाक्षरं प्राक् = प्रथम दोन अर्धचन्द्र प्रणवाक्षर म्हणून अशी लिहा. ऊर्ध्व = नंतर या प्रणवापुढें योजिका म्हणून ' सबिन्दुरेखा ' म्हणजे बिन्दुसहित रेखा लिहा– रेषा म्हणून अर्धचन्द्र रेखाच येथें उपस्थित असल्यामुळें घ्यावयाची आहे. या प्रमाणें लहिल्यावर ॐ अशी आकृति होते. बिन्दु रेखा अशी ' अग्रयोजिका रेखा ' आहे. ॐ असें लिहून वर नादबिन्दूही प्रतिपादन करावयाचे असल्यास नादबिन्दुरेखेला ' सबिदुरेखा ' या पदाची आवृत्ति करून दुसऱ्याने तिचें प्रतिपादन करावें म्हणजे ॐ असें प्रणवाक्षर सिद्ध होते. पुढें ' रेखैका तु ' म्हणून प्रथम सांगितलेली अर्धचन्द्र युगल रेखाच प्रधान असल्यामुळें घ्यावयाची म्हणजे ठीक अर्थ लागतो, ' रेखैका ' या शब्दानें पूर्वी सांगितलेंली अर्धचन्द्र युगल रेखा घ्यावयाची आहे. तस्य पार्श्वतः तिच्या उजवीकडे ' शिरोभागमुपक्रम्य सकोणाधः प्रलम्बिनी ' म्हणजे डोक्याकडून सुरुवात करून जिच्या मध्यें कोण आहे अशी चित्रातील आकाराची (वर्णोद्धार तन्त्रोप्रमाणें ततोर्ध्वसञ्ज्ञतारेखा दक्षोर्ध्वा) रेषा वर अ असा अकार तयार होतो.

' आकारःसहि विज्ञेयः घट्टितादक्षरेखया ' असा पाठ ' आकारः स हि विज्ञेयः पट्टिकादक्ष रेखया ' याचे ऐवजी घेतल्यावर अकाराचें उजवीकडे रेषा काढून आकार होतो. त्या नंतर ' वामे सद्वक्रबिन्दू द्वाविकार इति कीर्तितः ' असा पाठ ' वामे षडवक्रबिंदू द्वाविकार इति कीर्तितः ' याचे ऐवजी घेतल्यावर वामे म्हणजे डाव्या बाजूला ' सन्तौवक्रबिन्दू ' म्हणजे असणारे वक्रबिन्दु द्वौ म्हणजे दोन ( कुब्जितत्त्वाचे ठिकाणी होणारे दोन बिन्दू ) कांढल्यावर इ कार होतो. नंतर तस्य म्हणजे पूर्व वर्णित इ कारास वामशिरोरेखालम्बिनो केल्यावर दीर्घ ई होतो. प्रणव वगळून सर्व अक्षरांची शिरोरेखा अवक्र म्हणजे सरळ असते. तस्यांतु म्हणजे त्या शिरोरेखेखाली लम्बरेखास्यात् तिला लम्ब रेषा द्या. त्या लम्ब रेषेचे शेवटी म्हणजे तदन्ते लवित्रवत् म्हणजे कोयत्याचे आकाराची रेषा काढल्यावर उकारः स हि विख्यातः उकार होतो. लवित्रद्वयतः म्हणजे लम्बरेखेचे शेवटी दोन रेषा कोयत्याच्या आकाराच्या दिल्यावर तत् ऊ म्हणजे तो दीर्घ ऊकार होतो. याप्रमाणे अर्थ केला आहे. ( संपादक )

### श्लोकार्थाचा विचार–दुसरा पक्ष

( पं. गणपति शास्त्री हेब्बार यांनी सुचविले आहेत तेवढे पाठभेद विचारास न घेतां ही अर्थ लावता येतो. हा अर्थ पण पदरचे कांही शब्द आणावे लागतात. वाचकांचे समोर तोही विचारार्थ ठेवीत आहे. पद्म पुराणाच्या हस्तलिखित सर्व प्रती पाहतां न आल्याने हा सर्व ऊहापोह आमचे कल्पनेनुसार आहे. विद्वानांनी या विषयी बोधन केल्यास ते आम्हांस इष्टच आहे. )

' बन्धाद्यंति प्रचं पट्टयुगलात्प्रणवाक्षरम्। ' या ठिकाणी ' बन्धाद्यति प्रचण्ड पट्टयुगलात्प्रणवाक्षरम्। ' असा पाठ घेऊन अर्थ केला आहे. बन्धादि–अति प्रचण्डपट्टयुगलात् प्रणवाक्षरम् अशी पदें घ्यावयाची आहेत. बन्ध म्हणजे ' पाश ' फांस (Noose) बन्धाचा आरंभ सुरुवात म्हणजे हाती धरण्याचे टोक म्हणजें ' बन्धादि, ' हे अतिप्रचंड म्हणजे फार मोठ्या आकाराच्या, पट्टयुगलात् म्हणजे दोन पट्ट्यांच्या जोडीपासून निघणारें आहे, एवढे केल्यावर प्रणवाक्षराची अशी आकृति सिद्ध होते. या आकृतीत १ नें प्राग्रेखा व २ नें उर्ध्वरेखा दाखविली आहे. या दोन्ही रेषांचे मधल्या भागांत म्हणजे प्रागूर्ध्व रेखयोः प्रान्ते ' प्रणवाची दोन टोंके ( ' = अग्रे ) जोडणारी रेषा ( = अग्रयोजिका) असते हें ' प्रणवस्याग्रयोजिका ' या पदानें सांगितले आहे, इतकें केल्यावर पूर्ण प्रणव होतो. ॐ या प्रमाणें. रेखैका तु भवेदेवम् ' यानें 'अग्रयोजिका ' रेषा घ्यावयाची आहे, ' अकारस्तस्यपार्श्वतः ' यानें या अग्रयोजिकेचे डावींकडे असणारा अकाराचा भाग सांगितला आहे. शिरो-

भागमुपक्रम्य सकोणाधः प्रलम्बिनी म्हणजे डावीकडील अकाराच्या भागास शिरोभागापासून सुरुवात करून खाली जाणारी, जिच्यामध्यें कोण आहे अशी या प्रमाणें रेषा दिल्यावर असा अकार होतो. येथें श्लोकाचा पूर्वार्ध क उत्तरार्ध चित्रात दाखविलेले भाग सांगतो. अ काराचे उजवीकडे पट्टी प्रमाणें असणारी रेषा म्हणजे 'पट्टिका' तिचा 'दक्ष' उजवीकडील भाग तो 'पट्टिकादक्ष' पट्टिकादक्ष या रेखा सा 'पट्टिका-दक्षरेखा' म्हणजे पट्टिकादक्षांत असणारी रेखा तिने अकारास जोडल्यावर आकार होतो. 'आ' प्रमाणें 'वामे षड्वक्रबिंद्र द्वौ इकार इति कीर्तितः' म्हणजे प्रत्येकी दोन बिन्दूंनी होणाऱ्या सहा वक्ररेषांनी इकार बनतो.

चित्रात दाखविल्याप्रमाणे प्रमाणें अथवा दोन बिन्दूंचे डावीकडे असणाऱ्या सहा वक्ररेषांनी इकार बनतो.

ईकार, उकार, ऊकार यांची प्रक्रिया पं. गणपती शास्त्री हेब्बार यांनी दाखविल्या प्रमाणेंच आहे.

–संपादक

नकाशांचा उल्लेख.

या प्रमाणें पुराणांतही लेखनविषयक प्रत्यक्ष उत्पादन आहे. पद्मपुराणांत उत्तरखण्ड अध्याय २१७ मध्यें नकाशांचा उल्लेख आहे तो असा– श्री नारद उवाच ।

इत्युक्ता सा कला राजंस्तया नृपतिभार्यया ।
स्वकोशात्स्वर्णवर्णामञ्जूषामानाय्य विदधे पुरः ॥१॥

उवाच सा महाराज भार्येऽस्यां महदद्भुतम् ।
पुस्तकं वर्तते देवि तत्र चित्राणि सन्ति वै ॥२॥

उद्घाट्य दृश्यतां किंचित्किं किमस्त्यत्र पुस्तके ।
रंस्यते ते मनो नूनं तत्रस्था लेख्यदर्शने ॥३॥

श्री नारद उवाच.

इत्युक्ता भूपपत्नी सा दास्या तामुदघाटयत् ।
मञ्जूषा तत्र संस्थं च पुस्तकं पाणिनाऽग्रहीत् ॥४॥

तत्रावलोकयामास साऽवतारान्समासतः ।
पूर्वं ततस्तु भूगोलं पञ्चाशत्कोटि योजनम् ॥५॥

तत्रान्धकार संयुक्ता भूमिर्दृष्टा च काञ्चनी ।
एतयोरन्तरे राजल्लोकालोकश्च पर्वतः ॥६॥

सप्तद्वीपास्ततो दृष्टाः समुद्रैः सप्तभिर्वृताः ।
एतेषु नद्यः शैलाश्च खण्डानि तु महामते ॥७॥

एतद्भारतखण्डं सा पश्यन्ती भूपतिप्रिया ।
यमुना जाह्नवीमुख्याः सरितः समवैक्षत ॥८॥

यमुनातीरगं राजन्निन्द्रप्रस्थमिदं शुभम् ।
ददर्श सा महाभागा तीर्थव्रजयुतं नृप ॥९॥

यत्र तीर्थमिदं दृष्ट्वा प्रयागं ब्रह्मनिर्मितम्
पूर्वजन्मकृतं कर्म सा सस्मार मनस्विनी ॥१०॥
(आनन्दाश्रम प्रत पुणें)

नकाशावरून अज्ञात प्रदेशाचा बोध केवळ चित्रावरून होत नाहीं. तर त्यामध्यें अक्षरेंही असावी लागतात. पूर्वोद्धृत उल्लेखा-वरून देवलिपीत लिहिलेली माहितीही तेथें असली पाहिजे. अर्थात् येथें ब्रह्माण्डाच्या भौगोलिक ॲटलास चास्पष्ट निर्देश आहे. हा लेखनविषयक अप्रत्यक्ष पुरावा आहे. या सर्व प्रमाणावरून देवनागरीलिपि जशी आज आहे तशीच सृष्टचारंभी ब्रह्मदेवाने उपदेशिली, त्यामध्यें क्रमविकास

वगैरें कोणत्याही प्रकाराने नाहीं असे सिद्ध होतें. Padma Purana a Study या कलकत्ता संस्कृत कॉलेज रिसर्च सेरीज क्र. ५८ मधून प्रकाशित झालेल्या ग्रंथांत लेखक अशोक चतर्जी यांनी पद्मपुराण पूर्वी असलेलें लुप्त झाले व त्याचा कांही भागच आज उपलब्ध असणाऱ्या पद्मपुराणात समाविष्ट असल्याचें म्हटलें आहे. जुन्या पद्मपुराणाचा काळ त्यांनी सौर पुराण वगैरेंतील निर्देशांवरून इ. स. पू. ६०० चे अगोदरचा म्हटला आहे. या वरूनही अशोकलिपिपूर्वी देवनागरी असल्याचें सिद्ध होतें. (संपादक)

### वाल्मीकि रामायणात लेखन

श्री वाल्मीकि रामायणांत श्री हनुमंत सीता शोधार्थ निघताना त्याला श्री रामचन्द्राने स्वनामाङ्कित मुद्रिका (म्हणजे सिलाची आंगठी) सीतेला ओळख पटावी म्हणून दिल्याचा उल्लेख आहे. आंगठीवर नांव कोरणें तत्पूर्वी अतिप्राचीन काळापासून लेखन भारतवर्षात प्रचारात असल्याचे दर्शवितें, अतः हे एक लेखन विषयक बलवत्तर प्रमाण आहे.

ददौ तस्य ततः प्रीतः स्वनामाङ्कोपशोभितम् ।
अङ्गुलीयमभिज्ञानं राजपुत्र्याः परंतप ॥१२॥
(किष्किन्धा काण्ड सर्ग ५४ श्लोक १२)

श्री हनुमान सीतेला ओळख सांगतांना म्हणतो–

वानरोऽहं महाभागे दूतो रामस्य धीमतः ।
रामनामाङ्कितं चेदं पश्यदेव्यङ्गुलीयकम् ॥२॥
(सुन्दर काण्ड सर्ग ६३/श्लोक २)
(गीताप्रेस, गोरखपूर प्रत)

या ठिकाणीं सीतेकडे असलेली तिची अत्यंत परिचित राम नामाङ्कित आंगठी रामाकडे राहिली होती असें दिसतें.

### जैमिनीयाश्वमेधांतील उल्लेख

अश्वमेध हा वैदिक राजाचा एक विश्वविजयी यज्ञ आहे. त्यामध्यें एक वर्षभर घोडा स्वैरपणें फिरण्यासाठी विश्वविजयार्थ सोडण्याचे विधान आहे. त्यावेळीं घोडयाच्या कपाळावर, सोन्याच्या पत्र्यावर, घोडा सोडणाऱ्या राजाची प्रशस्ति लिहिण्याचेहि विधान आहे. जैमिनी याश्वमेधांत धर्मराज युधिष्ठिराचे अश्वमेधाचा प्रसंग वर्णन करीत असतां म्हटले आहे.

(जैमिनी हे पूर्व मीमांसासूत्रकर्ते व महाभारतकार व्यासांचे शिष्य होत.)

ललाटे तुरगस्यापि पत्रं संलिख्य काञ्चनम् ।
बद्ध्वा स्वनाम–संयुक्तं स्वप्रतापसमन्वितम् ॥
(अध्याय १ श्लोक ५० गीताप्रेस गोरखपूर प्रत)

त्याच ग्रंथांत उदाहरणादाखल प्रभु श्री रामचन्द्राच्या अश्वमेधाची कथा आली आहे, त्यांत म्हटले आहे–

भाले बद्ध्वाच सौवर्णं पत्रं तस्य हरेः पुनः ।
तस्मिन् पत्रे विलिखितं रामो दशरथात्मजः ॥
एकवीराच्च कौसल्या तस्याः पुत्रो महाबलः ।
तेन मुक्तं हरिवरं गृह्णातु बलवान् नृपः ॥
(अध्याय २९ श्लोक ५६–५७)

हाच विधि महाभारताच्या आश्वमेधिक पर्वांत '' यथाशास्त्रं मुमोचाश्वम् '' असें म्हणून सांगितला आहे. या सङ्क्षेपाने केलेल्या उल्लेखावरून ही गोष्ट अतिप्रसिद्ध असल्याचे दिसतें. म्हणून इतरांनी सांगितलेल्या गोष्टींची पुनरुक्ति अनावश्यक समजली आहे. महाराष्ट्रातील प्रसिद्ध, संतकवि श्रीधर कवि (नाझरेकर) आपल्या रामविजय व पाण्डव प्रताप ग्रंथांत हाच भाग विस्ताराने सांगतात–

सुवर्ण पत्रिका ते वेळीं । बांधिली शामकर्णाचे भाळीं ।।
वशिष्ठें त्यावरी लिहिल्या ओळी । ऐका सकळ श्रोते हो ।।
अयोध्याप्रभु दशरथनन्दन । रावणान्तक सुरबन्धमोचन ।।
सकलनृपश्रेष्ठ रविकुलमण्डण । शामकर्ण सोडिला तेणें ।।
जो कोणीं असेल बळवंत । तेणें हा घोडा धरावा यथार्थ ।।
षोडशपद्मे दळांसहित । शत्रुघ्न राखीत पाठीशी ।।
(रामविजय अध्याय ३७ ओंवी १८४ ते १८७ यशवंत प्रकाशन पुणें प्रत)

" तो तेणे देखिला श्यामकर्ण । पत्र वाचू लागला धरून । सोमवंशी विजयध्वज पूर्ण । पण्डुराज प्रतापी ।। ' (पाण्डवप्रताप अ ५९ श्लोक ५ हनुमान प्रेस पुणे, प्रत)

आता या संदर्भात आमचे कांहीं निष्कर्ष विस्ताराने सांगून हे प्रकरण संपवितों.

### ऋग्वेदातील " अक्षराणां ……रवं "

विदद्यदी सरमा रुग्णमद्रेर्महि पाथः पूर्व्यं सध्र्यक्कः । अग्रं नयत्सुपद्यक्षराणामच्छा रवं प्रथमा जानतीगात् ।।

(ऋग्वेद ३/२/६) (यजुर्वेद ३३–५९) याचे उव्वट भाष्य ' अक्षराणां अकारादीनां रवं शब्दं जानती प्रथमा अच्छ आभिमुख्येन अगात् गच्छति । ' असे आहे. सरमा ही इन्द्राचे दौत्य करणारी, तिला लेखज्ञान असणें अनिवार्य असल्यामुळें हा अर्थ योग्यच आहे. येथें ' अक्षराणां रव ' म्हटल्याने ' लेखाचें वाचन ' हाच अर्थ योग्य आहे. नाही तर अक्षररूपी रव असे म्हटले असते.

### वाचं पश्यन्– लेखनाचे प्रमाण

' उतत्व पश्यन्न ददर्श वाचमुतत्व श्रृण्वन्न श्रृणोत्येनाम् ' (ऋग्वेद १०।६।७१)

येथे ' वाचं पश्यन् ' असें म्हटले आहे. कोणत्याही काळात ' वाक् ' ही स्वतः डोळ्यांनीं दिसणारी वस्तु नाही. मनाने विचार करणे हे ' श्रृण्वन् ' यावरून देखील होऊ शकत असल्यामुळे त्याचे अगोदर 'पश्यन्' म्हणणें मनाविषयी होऊ शकत नाहीं. म्हणून 'पश्यन्' याचा अर्थ 'डोळयानीं पाहून' तदनुसार ' वाचम् ' याचा अर्थ ' लिखित अक्षरें असाच केला पाहिजे. अर्थात 'मनाने विचार करणे' 'ददर्श' याचेशीं अविरोधास्तव फलितार्थ आहे. मन्त्रद्रष्टयाचे दृष्टीने दर्शन असा अर्थही येथें करतां येत नाही. कारण निरुक्तामध्यें ' इत्यविद्वांसमाहार्ध्दं ' असे म्हणून या अर्धऋचेत अविद्वानाविषयीं सांगितल्याचे म्हटलें आहे. अविद्वानच लिखितावरून पठत असतो. म्हणून हे लेखनाचेच प्रमाण आहे.

### श्रियाभिषिक्तं वेद

स यो ह वै सावित्र्यस्याष्टाक्षरं पदं श्रियाभिषिक्त वेद श्रिया हैवाभिषिच्यते (तैत्तिरीय ब्राह्मण ३।१०।१३) यामध्ये ' मन्त्र श्रीबीजेंन उभयतः संबद्धं वेद उपास्ते ' असा अर्थ सायणाचार्यांनी केला आहे, ' अभितः सिक्त' 'अभिषिक्तं' असाच मुख्यार्थ असल्यामुळें 'उभयतः संबद्धं' म्हणजे तदनुसार पुढे मागें उभयतां व आजू बाजू उभयता संबद्ध असेच करावे लागतें. अर्थात् मंत्र लिहून त्याचे चारी बाजूला श्री बीज लिहून त्यामध्यें पूजा करून मंत्रोच्चारण व स्वस्वरूपानुसन्धानपूर्वक उपासना करणें हाच तान्त्रिकांना अभिमत मुख्यार्थ आहे. ही गोष्ट लेखना वाचून होत नाही, म्हणून हेहीं लेखनाचेंच प्रमाण आहे. सूर्यतापनी उपनिषदात यन्त्र आणि बीजोद्धार सांगितलेलें पहावे.

### आरा–लोहदण्ड लेखनी

'परि तृन्धि पणीनामारया हृदया कवे । अथेमस्मभ्यं रन्धय ।।' ( ऋग्संहिता ६।५।५३।५ ) आणि ' यां पूषन्ब्रह्मचोदनीमारां बिभर्ष्याघृणे । तया समस्य हृदयमारिख किरा कृणु ।। ' (ऋग्संहिता ६।५।५३।८)

या मध्यें ' आरेने ' हृदयाला ' आरिख ' असें म्हटलें आहे. यद्यपि अक्षर लिहिणें येथें सांगितले नाहीं तथापि ' आरा ' ही अक्षर कोरून लिहिण्याकरितां वापरण्याची अणुकुचीदार टोंकाची लोहदंड लेखनी आहे. ' सूक्ष्मलोहाग्रोदंडः प्रतोद इत्यारेति' चाख्यायते असें सायण भाष्य आहे. ' लिख् अक्षरविन्यासे ' असें धातुपाठ सांगतो. पूषा ही देवता लेखणी हातांत घेऊन असते म्हणून तिला आरेनें हृदय

कोरून मृदु करण्यास प्रार्थना केली आहे. दुसऱ्या आयुधाने हृदय कोरूं नये असें तात्पर्य नाहीं. परंतु 'आरा' हे अक्षर कोरून लिहिण्याचेंच साधन आहे. या सूक्ताचे विचारांत ही ' आरा ' लेखनी आणि अक्षरविन्यासाचा ' लिख् ' धातु घोळून राहिला असल्याचें दिसत आहे. यावरून वारा घेण्यासाठी पंखा हाती घेतलेल्याला जवळ येणाऱ्या हिंस्र पशूपासून वाचण्याकरिता त्या पंख्याचे दांडीनेंच मार असें म्हटल्याप्रमाणें आरेनें आरिख म्हणण्याची सङ्गति जुळते. म्हणून दुसऱ्या साधनानें कोरूं नये असें म्हणण्याचा प्रसंग आला नाहीं. यावरून या ऋचेंत अत्यधिक लेखनव्यापृति दिसत असल्यानें हेंही लेखनकलेचेंच प्रमाण आहे.

### जेव्हांपासून स्वाध्याय धर्म तेव्हांपासून लेखन

' **नावष्टब्धो – – – –न स्त्रियमुपगम्य नोल्लिख्यनावलिख्य** ' । – इति ( ऐतरेयारण्यक ३।३।१४)

यावरील सायणाचार्याचें भाष्य– '— — — लिप्यक्षराद्युल्लेखनावलेखनानि कृत्वा नाधीयीत् । '

असें आहे. याचें सुरुवातीस ' अथातः स्वाध्यायधर्मं व्याख्यास्यामः ' असें मुळांत म्हटलें आहे. अर्थात् श्रौतसूत्रकार पूर्वीपासून चालत आलेल्या स्वाध्यायधर्मालाच सांगत असतात. जेव्हांपासून स्वाध्याय आहे. तेव्हांपासूनच हा स्वाध्यायधर्म म्हणून निश्चित होतो. सृष्टयारंभीं सप्तर्षींनी ब्रह्मदेवापासून या स्वाध्यायधर्मानें अध्ययन केले असा सिद्धान्त आहे. मध्येच कोणी नवीन केल्यास त्याला कोणीं स्वीकार करणार नाहीं. आज प्रत्यक्षच आहे कीं पूर्वीपासून चालत आलेले देखील लोक स्वीकार करावयास तयार नाहींत, असें असतां पूर्वी मग नवीन कोण स्वीकार करील ? म्हणून स्वाध्यायधर्म जेव्हां पासून आहे तेव्हापासून लेखन देखील असल्याचें सिद्ध होते.

### अथर्ववेदांतील लेखन प्रशस्ति.

सर्वापेक्षा तन्त्रातील श्रीचक्र व षट्चक्रें आदींतील उपासना जे योगी व उपासक करतात तें श्रीचक्र वेदापासून असल्याचें सौंदर्य लहरीचे लक्ष्मीधर व्याख्येंत ऐतरेयारण्यक, तैत्तिरीयारुणकेतु उपनिषद आणि साक्षात् संहितेंतील प्रमाण देऊन सिद्ध केले आहे. या विषयीं तन्त्रालोक तृतीय व चतुर्थाह्निक, वरिवस्यारहस्य, सेतुबन्ध, भावनोपनिषद् इत्यादिकांतही प्रबळ प्रमाण आहे. अथर्ववेदांतही ' **यद्युत्तमं लिखित-मर्णेन** ' ( १२।३।२२ ) अशी लेखनाची प्रशस्ति आहे. लेखनज्ञान अस्तित्वांत असल्याशिवाय लेखनाची प्रशस्ति संभवत नाहीं.

### तन्त्रालोक – विसर्गशक्ति.

त्याचप्रमाणे " **विसर्गशक्तिर्विश्वस्य कारणं च निरूपिता ऐतरेयाख्यवेदान्ते परमेशेन विस्तरात्** '। ( तन्त्रालोक ३।२२६ )

यामध्यें " **विसर्गता च सैवास्या यदानन्दोदयक्रमात्स्पष्टीभूतक्रियाशक्तिपर्यन्ता प्रोच्छलत्स्थितिः** "

अशी व्याख्या केली आहे व समर्थनार्थ ' **अक्षरं ब्रह्म परम विसर्गकमःसंज्ञितः** '

याचा उल्लेख केला आहे. नासदीय सूक्तांत ' **को अद्धा वेद क इह प्रवोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः** ' (ऋग्वेद १०।११।१३०) येथें विसृष्टि शब्दाने विसर्ग शक्तीचा उल्लेख आहे. विविध सृष्टि शब्दमयी, अर्थमयी, चक्रमयी, देहमयी सर्वच, विसर्गशक्तीनेंच होते. या सर्वांना एकवाक्यतेनें, आरंभीं दाखविल्याप्रमाणें कामेश्वरबिन्दु, विसर्ग आणि कामकला ( = बिन्दु स्फोटन ) या स्वरूपांत लेखन करून तान्त्रिक प्रक्रियेंत उल्लेखिलें जातें. त्या पासूनच पुढें शब्दसृष्टि, अर्थसृष्टि वगैरे आहे. याचा विस्तार मूळ ग्रंथांत पहावा–

बौद्ध वाङ्मयांतील लिपिविषयक पुष्कळ प्रमाणें उद्धृत करून, त्या पूर्वी भारतात लेखनकला नव्हती असें सूचित करण्याकडे पाश्चात्य लिपिसमालोचक व त्यांचा अनुवाद करणारे एतद्देशीय यांचा कल दिसून येतो. बौद्ध काळी लेखनाचो भरभराट असल्याविषयीं प्रमाणें द्यावयाची व तत्पूर्वी लेखन नव्हतें म्हणावयाचें ही विसङ्गति कशी लक्षांत येत नाही ?

### लिपि बुद्ध पूर्व काळात होतीच.

याचा अर्थ बौद्धांनीच लिपि बनविली असा आहे काय ? असे बौद्ध वाङमय म्हणतें काय ? प्रत्युत ब्राह्मी ब्रह्मसृष्ट असल्याच्या चिनी विश्वकोशातील उल्लेखावरून बृहस्पति व नारदाच्या उक्तीच्या अर्थाचेंच ते समर्थन करीत असलेले दिसतात. बुद्धदेवाचे बाळपणांतील अक्षराभ्यास सांगणारा ललितविस्तर ग्रंथ पूर्वप्रसिध्द ६४ लिपींची नांवें व पन्नावणा सूत्र १८ लिपींची नावे देते. तेव्हां त्यापैकी आधुनिकांना मान्य असणाऱ्यः सर्व लिपि त्याच वेळी बनल्या की पूर्वीपासून होत्या ? या विषयी आधुनिकांचें काय म्हणण आहे ? एवढचा लिपींचा आढळ होत असतांना आधुनिक लिपिसमालोचकांना बुध्दपूर्वकाळांत लिपि असल्याचें दिसत नाही हें केवढें आश्चर्य आहे ?

### राजनीति शास्त्रांत लिप्युल्लेख

ब्रह्मदेवा पासून अनेक राजनीति ग्रंथकारांचे नाव व ग्रंथांचे आधार घेऊन आपण अर्थशास्त्र रचलें असें कौटिल्यानें म्हटलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्र शासनाधिकार पहा. त्यामध्यें शासनलेखनाविषयी विस्तृत विवरण देऊन शेवटी लिहिलें आहे की–

' सर्वं शास्त्राण्यनुक्रम्य प्रयोगमुपलभ्य च ।
कौटिल्येन नरेन्द्रार्थे शासनस्य विधिः कृतः ॥ '

( शासनाधिकार अ १० सू. ६५ )

ब्रह्मदेवापासून सर्व राजनीति ग्रंथांत, शासनाधिकारांत विस्तृतपणें लेखनविचार केलेला आहे, त्यांत

' तस्मादमात्यसम्पदोपेतः सर्वसमयविदाशुग्रन्थश्चार्वक्षरो लेखनवाचनसमर्थो लेखकः स्यात् ॥ ' असें म्हटले आहे.

( शासनाधिकार अ. १० सू. ४ )

तसेंच विद्यावृद्धसंयोग नावाचे दुसऱ्या अध्यायांत बालकाला चौल संस्कार झाल्यापासून ' लिपिं संख्यानं चोपयुंजीत ' असें अक्षर शिक्षा करावयास सांगितलें आहे. अक्षरच नसेल तर पूर्वीचे राजनीति ग्रंथकारांचे वेळी असें अक्षरशिक्षण कसें झालें असेल ? वैदिकांचे बालकांना गर्भाधान, पुंसवन इ. ४० संस्कार श्रुतिस्मृतींत सांगितले आहेत. त्यात चौल झाल्यावर विद्यारंभ करीत असतांना लिपीचा अभ्यासच मुख्य कर्तव्य असतो, कारण वर्णाभ्यास बोलण्याच्या अभ्यासाबरोबरच झालेला असतो म्हणून विद्यारंभाचे वेळी लिपीचें शिक्षणच मुख्यतः दिलें जातें. तर पूर्वीचे वैदिकांचे बालकांना विद्यारंभ करवीत नव्हते म्हणायचें काय ? कालिदासानें ' लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं नदीमुखेनेव समुद्रमाविशत् ' असें लिपि शिक्षणाचें महत्व सांगितलें आहे तें त्यांचें स्वकपोलकल्पित मानण्यास प्रमाण आहे काय ?

### सरस्वती देवता व सरस्वती नदी–

वेदामध्यें एक तृच ' पावका नः सरस्वती ' इत्यादि आहे. याचा विनियोग सर्वांनीं समानरूपानें प्रमाणित केला आहे. त्या मधील पहिल्या दोघांचें सरस्वती देवतापरक भाष्य आणि तिसरी ' महोअर्णः सरस्वती ' हिचें सरस्वती नदीपरक भाष्य निरुक्त, सायण आणि उव्वट वगैरे सर्व भाष्यकारांनीं केलें आहे. कारण अर्ण हा शब्द निघण्टूमध्यें पाणी याचा पर्यायवाचक म्हणून आला आहे. संस्कृतामध्यें अक्षर असाही अर्ण शब्दाचा अर्थ आहे. म्हणून महाकवि कालिदासानें अक्षर आणि पाणी अशा दोन्हीं अर्थानी या ऋचेंतील अर्ण शब्दाला घेतलें आहे. आश्वलायनानें सरस्वती– रहस्योपनिषदांत या ऋचेसह दहा ऋचांचा अनुष्ठान प्रयोग सांगून फलश्रुतींत सांगितलें आहे कीं ' अश्रुतो बुध्यते ग्रन्थः ' श्रीकृष्ण दैवज्ञानें ब्रह्मदेवाच्या लिपिसृष्टीचा लौकिक उपयोग सांगताना ' स्वयम्भू विस्मरणे अन्यनिरपेक्षं तस्स्मरणाय, अश्रुतपरकृत ग्रन्थावगमाय च वर्ण-ज्ञापक लिपीः ससर्ज ' असें म्हटलें आहे. –

या सर्वांनीं ऋचेचा प्रामाणिक अर्थ सांगितला आहे. सर्व अर्थांचीं सरस्वतीच्या प्रत्येक रूपांत सङ्गति आहे. सरस्वती देवता, मध्यमा वाक् आणि सरस्वतीनदी ही सर्व एकाच देवतेची रूपें आहेत. एका अंशाशी दुसऱ्याचा विरोध नाही. जो कोणी विरोध मानीत असेल त्याला देखील, एका विनियोगांत विनियुक्त झाल्यामुळें– ' ऐन्द्रचा गार्हपत्यमुपतिष्ठते ' च्या न्यायानें सर्व अर्थांचे एका अर्थांत पर्यवसान करावेंच लागेल. पर्यवसान करण्याची रीति अप्रस्तुतप्रशंसेची पद्धति आहे. ' अप्रस्तुतप्रशंसा स्यात्सा यत्र प्रस्तुताश्रया ' या लक्षणवाक्यानुसार ही पद्धति प्रतिपादित आहे. जसें एक सज्जन आपल्या मित्राला निरोप देतांना म्हणतात–

" सखेति मत्वा प्रसभम् यदुक्तं हे कृष्ण ! हे यादव ! हे सखेति । अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि। यच्चावहासार्थमसत्कृतोसि विहारशय्यासनभोजनेषु । एकोऽथवाप्यच्युत तत्समस्तं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् । " हा गीता श्लोक श्री कृष्णाची अर्जुनानें केलेली प्रार्थना आहे. या ठिकाणी त्याची सङ्गति काय आहे ? काय हें म्हणणें असङ्गत मानतां येईल ? याची सङ्गति अप्रस्तुत प्रशंसेची पद्धति एवढी एकच आहे. त्या प्रमाणेंच महो अर्ण येथें देखील सर्व अर्थ प्रस्तुताश्रय आहेत. या करितां महाकवि कालि-दासानें ' लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं नदीमुखनेव समुद्रमाविशत् ' येथें सर्वार्थसमन्वितं निरूपण केलें आहे. नदीस्वरूप सरस्वती देखील तिच्या समुद्रसङ्गमरूपमुखानें, समुद्रांत ज्या प्रमाणें प्रवेश करविते त्याप्रमाणें देवतारूप सरस्वती, लिपिरूप केतु = ज्ञापक चिन्ह, मेधा, बुद्धि, स्मृति वगैरेंनी संपूर्ण वाङ्मयांत प्रवेश करविते. या प्रमाणें लिपीची अधिष्ठात्री देवता सरस्वती ' महो अर्णः सरस्वती ' या ऋचेचा अर्थ आहे, हें सर्व समन्वयानें सिद्ध होतें– म्हणून ही ऋचा देखील लिपीची अधिष्ठात्री देवता सरस्वती आहे, याविषयी वैदिक प्रमाण आहे. कालिदासा-पर्यंत सर्वांच्या समोर वरीलप्रमाणें अर्थ होण्यासाठी. Diringer वगैरेंची अनुमति अपेक्षित नाही–

## प्रथमप्राप्त प्राचीन आचार

संस्कारांपैकीं नामकरणही एक संस्कार आहे. त्यात " ततः आचारात्तण्डुलान्कांस्याद्यन्यतमे पात्रे प्रसार्य सुवर्णशलाकया श्री गणपतये नम इति लिखित्वा नामानि लिख्येत् । –––– एतानि नामानि लिखित्वा मातुरुत्संगस्य बालस्य दक्षिणे कर्णे उक्त्वा " इत्यादि नामकरण प्रयोग संस्काररत्न मालेंत व अन्य प्रयोग ग्रंथांत आहे. येथें नामाचें लेखन प्रयोगप्राप्त आहे. हा " आचारःप्रथमो धर्मः सर्वागमानामाचारः प्रथमं परिकल्प्यते " यावरून आगमापेक्षांही प्रथम प्राप्त प्राचीन आचार आहे. या आचाराला त्या काळीं लेखन न करितां करीत होते असें म्हणाल तर ' अध्वर्युः यजमानं वापयति ' या श्रौतयागदीक्षा प्रकरणांत किंवा चौल प्रसङ्गी पूर्वी आपण स्वतः क्षौर करीत नव्हते म्हणून न्हाव्याकडून यजमानाचें किंवा मुलाचें क्षौर करून घेत होते, त्या प्रमाणें येथें आपणाला स्वतः नाम लिहिण्याचे ज्ञान नव्हतें म्हणून कोणा फिनिशियन, अरमाइक वगैरेंचें आवाहन करून लिहून घेत होते काय ? विदेशी लोकांचें तरीं लिपिज्ञान कोठून आलें ? हें विदेशी लोकांना ठाऊक आहे काय ? स्वतःची त्रुटि दिसत नाहीं सबब दुसऱ्या संबंधीं विचार करण्याचा अधिकार काय ? शिकविल्याशिवाय मनुष्याला वर्णमाला आली या विषयीं कांहीं आर्कियॉलॉजीचा पुरावा सांपडला आहे काय ? प्रो.बेलो ' लिपि ' शब्द संस्कृतांत पर्शियन पासून आला असें म्हणतात त्यास काय पुरावा आहे ? पुराव्याशिवाय म्हणावयाचे असेल तर सर्वच संस्कृत शब्द विदेशी भाषेपासून आले म्हणण्यास हरकत काय?

## मीमांसेचें आर्यम्लेच्छाधिकरण

निरुक्तकार आणि व्याकरणकार संस्कृत भाषेंत बिघाड करूनच अन्य भाषा निघाल्याचें सांगतात. मीमांसेतील आर्यम्लेच्छाधिकरणही यास साक्ष आहे. याचें कारण भारतांतूनच विदेशांत बाहेर टोळ्या जाऊन त्या त्या देशीं राहिल्यानें संस्कृत शब्दाचें साम्य त्यांचे भाषेंत असण्याची उपपत्ति सांगितली गेली आहे.

मनुष्य सृष्टीची सुरुवात मनुचें वचनानुसार, चक्रसृष्टि या पुढें येणाऱ्या प्रकरणी सांगितल्यानुसार ' एतद्देशांतच ' झाली. प्रथम युगामध्यें त्या एतद्देशप्रसूत लोकांची सन्तति सर्व भूमंडळांत पसरून राहिली. या संदर्भांत प्रियव्रत राजवंशाचा इतिहास पुराणांतून पहावा. त्यांची प्रथम भाषा, ब्रह्मदेवानें शिकविल्यानुसार संस्कृतच सर्वत्र होती. ' यज्ञेन वाचः पदवीयमायन्तामन्वविन्दन्नृषिषु प्रविष्टां तामाभृत्या व्यदधुः पुरुत्रा ' या ऋग्वेदांतील ऋचेनुसार वरील प्रतिपादन आहे. काळाच्या ओघांत भारतेतर त्या त्या देशातील लोकांना कर्महीनत्व प्राप्त होऊन व्रात्यता आली. भाषा विकृत झाली– तरीही मूळ भाषेंतील प्रसिद्ध शब्द प्रयोग त्या त्या देशांत राहिले. म्हणून पूर्वमीमांसेच्या आर्यम्लेच्छाधिकरणावरून व पिकनेमाधिकरणावरून सिद्ध होतें कीं जैमिनीचे काळांतच वेदांतील कांही शब्द म्लेच्छ झालेल्यांचे भाषेंतच रूढीनें राहून गेले असल्यानें त्यांचा अर्थ त्या वेळच्या म्लेच्छांमध्यें प्रसिद्ध असल्या प्रमाणेंच वेदांत करावा, अर्थान्तर करूं नये असा जैमिनीनें सिद्धान्त केला आहे. निरुक्त व व्याकरण, महाभाष्यांतूनही हाच विचार प्रमाणित आहे.

याला पुरातत्त्वप्रमाणदेखील युरोपादि देशांत झालेल्या उत्खननांत हस्तगत अवशेषांना घेऊन कांहीं आधुनिक इतिहासाभ्यासकांनीं देऊन हाच प्राचीन सिद्धान्त पुनः प्रतिपादन केला आहे. (संदर्भ– ' लोकसत्ता ' मुंबई १६।१।७७ पु. ना. ओक यांचा लेख) तेव्हां पर्शियन शब्द संस्कृतांत आले म्हणण्यांत काय अर्थ आहे ? तात्पर्य बौद्धांनीं लिपि निर्माण केली अशा तऱ्हेच्या सूचक लिखाणास कोणताच सबळ आधार नाहीं.

## मूळ लिपि कोणती ?

प्रायः सर्व लिपिचिंतकांची सर्व भारतीय लिपि एकाच मूळापासून उत्पन्न झाल्या या सिद्धान्ताविषयीं एक वाक्यता आहे, ती मूळ लिपि कोणती ? असा प्रश्न निघाला असतां, सर्वात प्राचीन अशा उपलब्ध असणाऱ्या शिलालेखाचे आधारें अशोक लिपि होय. असें उत्तर आधुनिक देतात पण शिलालेख असें म्हणत नाहींत. या अशोक लिपीपासून इतर सर्व लिपि उद्भवल्या या विषयीं कोणतेंही प्रमाण आधुनिक लिपि चिन्तक देऊ नाहींत. अशोक लिपि तरी कोठून आली ? या प्रश्नाचें निश्चयात्मक व प्रमाणाचें आधारें दिलेलें उत्तर आधुनिकलिपिचिन्तकाजवळ नाहीं.

केवळ शिलालेख एवढ्याच पुरातत्व प्रमाणास घेऊन निर्णय करणे सुयोग्य ठरणार नाहीं, कारण लेखन प्रकार सांगणारे ग्रंथ आणि प्राचीन प्रसिद्धि हीं देखील पुरातत्व प्रमाणेंच होत; समन्वयाखेरीज सुयोग्य निर्णय होऊं शकत नाहीं. वेद व तन्त्र यांच्यावरून, देवनागरी, देवनागरीचा एकदेश अशोक लिपि. व देवनागरीपासून घृष्टलेखन प्रक्रियेनें इतर लिपि असलेल्या प्रत्यक्ष दिसतात, हें पूर्वार्धांत दाखविलेंच आहे. या विषयीं वर्णोद्धार तन्त्र मीमांसेचा यववराहाधिकरणन्याय प्रमाण आहे. अशोक लिपीचा महायानपन्थादिकांत तन्त्रोक्त कार्यांत वापर होत असेल तर तिला तन्त्रोक्त लिपीशीं समन्वित असणेंच प्राप्त आहे. या प्रमाणें प्रमाणांचा आधार घेतल्यावर आधुनिक लिपिसमालोचकांचे चन्द्रकोरी वगैरे प्रतिपादन जुळतें. बिंदुस्फोटनांतील चार चन्द्रकोरी वर्णोद्धार तन्त्रात सांगितल्याप्रमाणें घेऊन, यथोक्त योजक रेषा निवेशित केल्यावर देवनागरी होते. वर्णोद्धार तन्त्रोक्त प्रक्रिया अशोकलिपीत देवनागरीपेक्षां कमी जुळते. ' फा– युअन्– चु– लिन् ' या चिनी विश्व

कोशांत ब्रह्मसृष्टा म्हणून जी लिपि सांगितली आहे, ती पूर्वोक्त बृहस्पति, नारदादिकांचें प्रमाणावरून 'देवाना पूर्वोऽत्रा' इत्यादि श्रुतिवचनांशी तन्त्रोक्त प्रक्रियेचा समन्वय करून देवनागरीच असल्याचें सिद्ध होतें. देवनागरी हीच ब्रह्मसृष्टा असल्यानें तिला मुख्यार्थीनें ब्राह्मी हे नांव आहे.

### ललित विस्तरांत उल्लिखित ब्राह्मी म्हणजेच नागरी

असें ध्यानीं घेतल्यावरच ललित विस्तरकारांनी देवनागरी असा उल्लेख न केल्याची उपपत्ति लागते. असें न मानल्यास 'भारतीय प्राचीन लिपिमाला' ग्रंथाच्या पृ. ७७ वरील पं. गौरीशङ्कर ओझा यांचे खालील प्रतिपादनाची सङ्गति लागत नाहीं.

" बंगला लिपि भारतवर्षके पूर्वी विभाग अर्थात् मगध के तरफ की नागरी लिपीसे निकली हैं. और बिहार, बङ्गाल, मिथिला, नेपाळ, आसाम, तथा उडियासे मिलनेवाले कितने एक शिलालेख, दानपत्र, शिक्कों या हस्तलिखित पुस्तकोंमें पायी जाती है। बङ्गाल के राजा नारायणपाल के समय अर्थात इसवी सन की दसवी शताब्दि तक तो उधर भी नागरी लिपीकाही प्रचार रहा। "

यावरून ललित विस्तरांत वङ्ग लिपीचा उल्लेख येणें व नागरीचा न येणें याचा समन्वय लागत नाहीं. पं. गौरीशङ्कर ओझा पुढें म्हणतात.– " तेलगु, कन्नडी, लिपीका प्रचार बम्बई इहातेके उत्तरपूर्वी विभाग में इसवी सन की पांचवी शताब्दि के आसपास में पाया जाता है।" (पृ. ८४).

" ग्रंथ लिपिका प्रचार मद्रास इहाते के उत्तरी वा दक्षिणी अर्काट, सेलम, त्रिचनापल्ली, मदुरा और तिरुनेलवेली जिलों में तथा त्रावणकोर राज्य में इसवी सनकी सातवी शताब्दि के आसपास मिलता है।" (पृ. ८९).

" तामिळ लिपि मद्रास के जिन हिस्सोंमें ग्रंथलिपि प्रचलित थी वहाँ के तथा उक्त इहाते के पश्चिमतट अर्थात् मलबार प्रदेश के तामिळ भाषा के लेखोंमें पल्लव, चोल, राजेंद्रचोल आदि चालुक्य राष्ट्रकूट वंशोके शिलालेखों तथा दानपत्रों में एव साधारण लेखों में इसवी सनकी सातवी शताब्दि से मिलती है।" (पृ. ९४).

या प्रमाणें विचार करतां बंगाली, कन्नडी, द्रविड, इत्यादि लिपींचे उल्लेख करणारा ललित विस्तर ग्रंथ नागरीचा उल्लेख करीत करीत नाहीं. याचा समन्वय करण्याकरितां उपर्युक्त पूर्वोक्त प्रमाणांवरून 'ब्राह्मी' या नावानें नागरीच ललितविस्तरास अभिप्रेत असल्याचें मानणें भाग आहे.

### अशोक लिपि हा नागरीचाच साम्प्रदायिक प्रकार

अन्यथा ललितविस्तरांतील इतर लिपींचें उल्लेखाविषयीं समाधान करितां येत नाहीं. म्हणून समन्वयाची गोष्ट हीच कीं भास्कररायांचे कथनानुसार अशोकलिपि हा नागरीचाच एक सांप्रदायिक लेखन प्रकार आहे. आधुनिक लिपि समालोचक अशोक लिपीलाच ब्राह्मी म्हणत असले तरी अशोकाचे शिलालेखांत तो कोणत्या लिपींत लिहितो याचा उल्लेख नाहीं. या विषयीं डॉ. राजबली पाण्डेय म्हणतात–

" The inscriptions of Aśoka contain the words 'Lipi' 'Libi' 'Dipi' all meaning script. At least two types of scripts – Brahmi & Kharoshthi were prevalent in the time of Aśoka, but their names are nowhere mentioned in his edicts " ( Indian Palaeography 1952 ed CH. 2 P. 22 )

अशोक लिपीपूर्वी अन्य कोणतीही लिपि नव्हती या विषयीं डॉ. पाण्डेय स्पष्टपणें त्याचेविरुद्ध मत नोंदवतात–

" Like modern provincial scripts of India, there must have been provincial Scripts current, side by side with the Brahmī, either its varients or derivatives or derived from the proto Brahmī or some independent scripts. Except the Varīants of the Brahmī all others perished in course of time." ( (H.) –2P 25 )

म्हणून तन्त्रोक्त बिन्दुस्फोटन आणि वर्णोद्धारतन्त्रानुसार येणारी देवनागरी लिपि मूळ मानून, मीमांसेचे यववराहाधिकरणाचे प्रमाणानें तिचें घृष्टलेखनानें अन्य लिपि झाल्याचें प्रत्यक्ष असल्यानें हेंच युक्त होय, असा सर्वसमन्वित ऐतिहासिक विचार सोडून, पूर्वीचा शिलालेख मिळत नाहीं म्हणून ज्याचा मिळतो त्याला सर्वांचा जनक प्रामाणिक होऊं शकत नाहीं.

---

प्रकरण १९ वे

# अङ्कलेखनपद्धति

### वेदांत शब्दांनी अंकगणना

लिपिसंबंधीं विचार केल्यावर अङ्कासम्बधीं विचार करणे आवश्यक आहे. अङ्कलेखन भारतीयांना फार प्राचीन काळापासून ज्ञात होते, असे उपलब्ध प्रमाणावरून दिसते. वेदामध्यें दशमान गणना सांगितली आहे. यजुःसंहिता, मैत्रायणी संहिता, कठसंहिता, तैत्तिरीय संहिता यांमध्ये एक ते दहा आणि दहा ते परार्ध $(१०)^{१८}$ येथ पावेतो संख्यांचा उल्लेख मिळतो. वेदामध्यें शब्दांनीं संख्या दाखविलेल्याही आढळतात. शतपथ व तैत्तिरीय ब्राह्मणांत+ '४' या करितां 'कृत' हा शब्द, कात्यायन लाट्यायन श्रौतसूत्रांत '२४' या करितां 'गायत्री' हा शब्द, व '४८' या करितां 'जगती' हा शब्द, आणि वेदाङ्ग ज्योतिषांत १, ४, ८, १२ व २७ या करितां अनुक्रमे रूप, अय, गुण, युग, व 'भसमूह' हे शब्द वापरलेले आढळतात.

+चतुष्टोमेन कृतेन अयानां (शतपथ १३।३।२।१)
ये वै चत्वारः स्तोमाःकृतं तत् (तैत्तिरीय ब्राह्मण १।५।११।१)
दक्षिणा गायत्री संपन्ना ब्राह्मणस्य जगत्या राज्ञः (कात्यायन श्रौतसूत्र २१)

(गायत्री संपन्ना गायत्र्यक्षरसमानसंख्या चतुर्विंशतिर्गावो दक्षिणा। जगत्यक्षरसमानसंख्या अष्टचत्वारिंशद्गावो भवन्ति ।। अशी या वरील टीका आहे.)

गायत्री संपन्नां दक्षिणां ब्राह्मणो दद्यात् जगति सपन्ना राजा ( लाट्यायन श्रौतसूत्र ९।४।३१ ) ( गायत्री संपच्चतुर्विंशतिः जगति संपन्ना अष्टचत्वारिंशत् । अशी यावरील टीका आहे.

रूपोनं षड्गुणीकृतम् (याजुष २३ आर्च ३१)
द्विगुणं चायसंयुतम् (याजुष १३ आर्च ४)
श्रविष्ठाभ्यो गुणाभ्यस्ताम् (आर्च १९)
युगलब्धं सपर्वास्यात् (याजुष २५)
विभज्य भसमूहेन (याजुष २०)

पिङ्गलछन्दसूत्रात या पद्धतीने कित्येक ठिकाणीं अंक दिले आहेत. गणित ग्रंथ व त्यांतील विषय ध्यानीं ठेवण्यास ही पद्धत विशेष अनुकूल आहे. 'भारतीय प्राचीन लिपिमाला' ग्रंथांत पृ १२० वर पं. गौरीशङ्कर ओझा यांनीं अशा अङ्कबोधक साङ्केतिक शब्दांची एक मोठी यादी दिली आहे. ती जिज्ञासूंनी पहावी. ज्योतिष, गणित, वैद्यक व कोश या विषयांचें संस्कृत ग्रंथांत अशीच सांकेतिक अङ्कसंख्या आढळते.

### ज्योतिष ग्रंथातील अङ्क

ज्योतिष विषयांत इ. स. ४९९ मध्यें रचल्या गेलेल्या आर्यभटीय (आर्यसिद्धान्त) या पहिल्या आर्यभटाच्या ग्रंन्थात अंक सांगण्याची खालील पद्धत सांगितली आहे–

वर्गाक्षराणि वर्गेऽवर्गेऽवर्गाक्षराणि कात् ङ्मौ यः ।
खद्विनवके स्वरा नव वर्गेऽवर्गे नवान्त्यवर्गे वा ।।

या पद्धतींत स्वरांत ह्रस्व दीर्घाचा भेद नाहीं. व्यञ्जन जेथें स्वरसंयुक्त असेल तेथें व्यञ्जनाने दाखविल्या जाणाऱ्या अंकास स्वरानें दाखविल्या जाणाऱ्या अंकानें गुणावयाचें आहे. जोडव्यंजन जेथें स्वरसंयुक्त असेल तेथें व्यञ्जनानें दाखविल्या जाणाऱ्या अङ्कास स्वराने दाखविल्या जाणाऱ्या अंकानें गुणून त्या दोन गुणाकारांची बेरीज करावयाची आहे. स्वर आणि व्यञ्जनांचे किंमतीचा तक्ता असा–

क् १ ट् ११ प् २१ ष् ८० अ १
ख् २ ठ् १२ फ् २२ स् ९० इ १००

ग् ३ ड् १३ ब् २३ ह १०० उ १०,०००
घ् ४ ढ् १४ भ् २४ ऋ १० लक्ष
ङ ५ ण् १५ म् २५ लृ १० कोटि
च् ६ त् १६ य् ३० ए १० अब्ज
छ् ७ थ् १७ र् ४० ऐ $(१०)^{११}$
ज् ८ द् १८ ल् ५० ओ $(१०)^{१३}$
झ् ९ ध् १९ व् ६० औ $(१०)^{१५}$
ञ् १० न् २० श् ७०

उदाहरण– कै = क्+ऐ = $१×(१०)^{११} = (१०)^{११}$
णि = ण्+इ = १५X१०० = १५००
स्यु = स्+य्+उ = ९०X१०,००० + ३०X१०,००० = १२,००,०००

### कटपयादि पद्धति

लल्ल आणि ब्रह्मगुप्तापूर्वी होऊन गेलेल्या दुसऱ्या आर्यभटाने त्याचें ग्रंथांत कटपयादि पद्धत सांगितली आहे. ती खालील प्रमाणें–

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | ० |
| क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ |
| ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | न |
| प | फ | ब | भ | म | | | | | |
| य | र | ल | व | श | ष | स | ह | ळ | |

या पद्धतीत संस्कृत ग्रन्थकारांची 'अङ्कानां वामतो गतिः' म्हणजे उजवीकडून डावीकडे गणती करण्याची पद्धति नियमानें स्वीकारलेली नाहीं. उदा. राघवाय = १४४२ असें नसून २४४१ असा वापर आर्य सिद्धांतांत आहे. शिलालेख, दानपत्रें, पट्ट, पुस्तकें यांत ही पद्धत कोठें कोठें 'अङ्कानां वामतो गतिः यास अनुसरून वापरलेली आढळतें. आर्यभटापूर्वी पाणिनीनें कात्ययानाचीं वर्णपद्धति संख्या दाखविण्यासाठीं घेतलेली आढळतें. (पाणिनी सूत्र १।३।११ कात्यायन वार्तिक व कैयट) या सर्वांवरून वेदांपासून ज्योतिष करण ग्रंथापर्यंत भारतीयांना फार पूर्वीपासून अङ्कगणना माहीत असल्याचें दिसून येते.

### प्राचीन व नवीन अंक : ओझा

'भारतीय प्राचीन लिपिमाला' कार पं. गौरीशङ्कर ओझा अंकांचें संदर्भात लिहितांना 'प्राचीन शैलीचें अङ्क' व 'नवीन शैलीचे अङ्क' अशी विभागणी करतात. ते पृ. १०३ वर म्हणतात– 'प्राचीन शिलालेखों, दानपत्रों, सिक्कों तथा हस्तलिखित पुस्तकोंके देखनेसे पाया जाता हैं कीं लिपियों की तरह प्राचीन और अर्वाचीन अङ्कोमें भी अन्तर है। यह अन्तर केवल उनकी आकृतिमें ही नहीं किंतु अङ्कोंके लिखने की रीतिमें भी हैं। वर्तमान समयमें जैसे १ से ९ तक अङ्को और शून्य इन १० चिह्नोंसे अङ्कविद्या का संपूर्ण व्यवहार चलता हैं वैसे प्राचीन काल में नहीं था। उस समय शून्य का व्यवहार ही न था और दहाइयों सैकडें, हजार आदिके लिए भी अलग चिन्ह थे। अङ्कोंकें संबन्ध में इस प्राचीन शैली को "प्राचीन शैली" और जिसमें शून्यका व्यवहार हैं उसको नवीन शैली कहेंगे."

(अशोकाचे शिलालेख, नानाघाट लेख, कुशाण लेख, क्षत्रप व आन्ध्र यांचे लेख यातील अङ्कलेखन परिशिष्टांत पहावे.)
१– आदि, चन्द्र, भू, गो, तनु, पितामह, नायक–वगैरे.
२– यम, अश्विन. नासत्य, बाहु, जङ्घा, कर्ण, चक्षु–वगैरें.
३– राम, गुण, लोक, भुवन, अग्नि, कृशानु, होतृ–वगैरे.
४– वेद, समुद्र, वर्ण, दिक्–वगैरे.
५– बाण, पाण्डव, तत्त्व, इन्द्रिय, रत्न–वगैरे.
६– रस, अङ्ग, शास्त्र, तर्क–वगैरे.

याप्रमाणें पुष्कळ आहेत. ते सर्व निश्चित सङ्ख्या असणाऱ्या व्यवहारप्रसिद्ध वस्तूंची नांवें घेऊन बनलेले आहेत.

### आद्य भारतीय अङक एतद्देशीयच

या नंतर पृ. १०३ ते ११४ त्यांनीं प्राचीन शैलीचें विवरण केलें आहे. तें जिज्ञासूंनीं मूळांतूनच वाचावें. हे प्राचीन शैलीचे अंक परदेशांतून भारतांत आले या मताचा पं. गौरीशङ्कर ओझा यांनीं विस्तृत परामर्श घेऊन निःसन्दिग्ध शब्दांत इन्कार केला आहे. ते म्हणतात– अशोकके समय अर्थात् इ. स. पूर्व की तिसरी शताब्दि में २०० के अंक एक दुसरेसे बिलकुल भिन्न के रूपोंका मिलना यही प्रकट करता हैं कि ये अंक सुदीर्घ कालसे चले आते होंगे। ऐसी दशामें यही मानना पडता हैं कि प्राचीन शैलीके भारतीय अङ्क भारतीय आर्योके स्वतंत्र निर्माण किये हुए हैं। पृ. ( ११४)

तात्पर्य आद्य भारतीय लिपीप्रमाणेंच आद्य भारतीय अंकही डाहेरून आलेले नाहींत. ( भारतीय प्राचीन लिपिमाला पृ. ११३ वर प्राचीन शैलीचे अङ्क व अङ्कसूचक शब्दांचे कोष्टक दिलेलें आहे. प्रस्तुत पुस्तकाचें परिशिष्ट पहा. )

नवीन शैली ' असें म्हटले जाणारे अंक १ पासून ९ पर्यंत आणि रिकामें स्थान ० नें दाखविणारे असतात. उजवीकडून डावीकडे स्थानमूल्य वाढत जाते. या संदर्भात ' भारतीय प्राचीन लिपिमाला ' ग्रंथांत पं. गौरीशङ्कर ओझा म्हणतात– यह अङ्क क्रम भारतवर्षमें कबसे प्रचलित हुआ इसका ठीक ठीक पता नहीं चलता। प्राचीन शिलालेखों तथा दानपत्रों में इ. स. की छठी शताब्दि के अन्तके आसपास तक तो प्राचीन शैलीसे ही अंक लिखे मिलते हैं। नवीन शैलीसे लिखे हुए अङ्क पहिले पहिल कळ्चूरि सं. ३४६ ( इ. स. ६९५ ) के दानपत्रमें मिलते हैं जिसके पीछे इ. स. की १० वी शताब्दि के मध्यके आसपास तक कही प्राचीन और कही नवीन शैलीके अङ्कोंका व्यवहार हैं। उसके बाद नवीन शैली ही मिलती है। ( पृ. ११५ )

या पूर्वीपासूनच नवीन शैलीचे अङ्क ज्योतिष ग्रन्थांत प्रचारांत असल्याचें दिसते. वराहमिहिराचार्यांच्या पञ्चसिद्धान्तिकेंत ( इ. स. ५०५ ) सर्वत्र नवीन शैलीच्या अङ्कांचा वापर आहे. वराहमिहिराचार्यांच्या बृहत्संहितेंवरील आपल्या टीकेंत भटोत्पलाचार्यांनीं ' पुलिशसिद्धान्त ' व ' मूळ पुलिशसिद्धान्त ' यांचीं वचनें उद्धृत केलीं आहेत, त्या मध्यें नवीन शैलीचे अङ्क आढळतात, या वरून भारतीयांना वराहमिहिराचार्यांचें पूर्वी पासन नवीन शैलीचे अङ्क माहीत असल्याचें दिसतें.

### प्राचीन व नवीन अशी विभागणी अयोग्य

या सर्वांव रून विशिष्ट कालापर्वी प्राचीन शैली व नंतर नवीन शैली असें मनानेंच सीमित करणें हा समजुतीचा घोटाळा आहे असें दिसतें. एकाद्या विशिष्ट काळी उपलब्धि असून, त्या पूर्वी त्या प्रकाराचा कोणीं प्रथम आविष्कर्ता झाल्याचें प्रमाण मिळेल तरच तेव्हां त्या प्रकाराचा आरंभ झाला असें म्हणावें लागेल, न मिळाल्यास सृष्टयारंभापर्यन्त मागें जाऊन तत्पूर्वी अव्यक्तस्थितीच सत्कार्यवादाप्रमाणें राहील.

वर्णलिपि मालेमध्यें भारतांत जसे लिपिवैचित्र्य आढळतें तसें अंकलेखनांतही आढळतें. परंतु अंक लिपीविषयी वर्णोद्धारतन्त्र अजून उपलब्ध नसल्यानें घृष्टलेखतप्रक्रिया अगर आद्य अङ्कलिपीविषयीं कांहीं विशेष प्रतिपादन करतां येत नाही.

### तन्त्रोक्त अङकयंत्रें

एवढें मात्र निश्चित म्हणतां येतें की अङ्कलेखन देखील तन्त्रोक्त असल्यास त्या मुळेंच आजही तन्त्रोक्त अङ्कयन्त्रांत विविध प्रांतांतील लोक त्यांचें त्यांचे अङ्क लिहूनही कार्यसाफल्य मिळवितांना दिसतात. अर्थात् मीमांसान्यायसिद्ध घृष्ट लेखनानें तन्त्रोक्त मूळापासून विविध अङ्क लिपि बनत असल्या पाहिजेत. या तर्काचे आधारें असेंही म्हणतांयेईल की– नागरी लिपी प्रमाणेंच आजचे नागरी अङ्क तन्त्रोक्त असावेत. परिशिष्टांत प्रमुख भारतीय लिपीतील अङ्कलेखन दाखविलें आहे. त्यावरून परस्परसाम्य आढळून येईल. अङ्कलेखन सांगणारें तन्त्र अजून उपलब्ध नसल्यानें या विषयी विशेष प्रक्रिया निरूपणादि ऊहापोह कल्पनाविलासमात्र ठरणार असल्यानें करणें टाळीत आहोंत.

### शून्यलिपि व स्थानमूल्यनिर्धारण

भारतीय अङ्कलेखनांत शून्यलिपि व स्थानमूल्यनिर्धारण याला अनन्यसाधारण महत्व आहे. हें सर्व येथूनच विदेशांत प्रसृत झाल्याविषयी एकवाक्यता आहे. या विषयी पं. गौरीशङ्कर ओझा म्हणतात ' शून्य की योजना कर नव अङ्कोंसे गणित शास्त्र को सरल करनेवाले नवीन शैलीके अङ्कोंका प्रचार पहिले पहिल किस विद्वानने किया इसका कुछ पता नहीं चलता। केवल यही पाया जाता है की नवीन शैलीके शैलीकें अङ्कोंकी सृष्टि भारतवर्षमें हुई। फिर यहांसे अरबोंने यह क्रम सीखा और अरबोंसे इसका प्रवेश युरोपमें हुआ, जिसके पहिले खाल्डियन हिब्रू, ग्रीक, अरब आदि एशिया और युरोप की जातियाँ वर्णमाला के अक्षरोंसे अङ्कों का नाम लेती थी। अरबोंके यहाँ खलीफ वलीद के समय ( इ. स. ७०५-७१५ ) तक अङ्कोंका प्रचार न था जिसके बाद उन्होने भारतवासियोंसे अङ्क लिये ' ( प्राचीन भारतीय लिपिमाला पृ. ११७ )

### भारतापासून अरबस्तानांत अङ्क

यावरुन अङ्कलेखन भारतापासून इतरांनी स्वीकारल्याचें दिसतें. आजच्या युरोपांतील अङ्कास 'अरेबिक' म्हणतात. या संदर्भांत एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिका मध्यें लिहिलें आहे कीं आजची दशमान अङ्कलेखन व अङ्कगणन पद्धति भारतीयांची आहे. इ. स. ७७३ मध्यें बगदादमध्यें गेलेल्या भारतीय राजदूताबरोबर खगोलशास्त्रीय सारण्यांसमवेत अङ्कक्रमही अरबस्तानांत गेला असावा. इसवीसनाच्या नवव्या शतकाच्या सुरवातीस अबुजफर मुहम्मद अल् खारिज्मी याने या पद्धतीचें विवरण केलेलें आढळतें. व तेव्हांपासून त्याचा प्रसार अरबांकडे वाढला. ( आणखी संदर्भ महाराष्ट्रीय ज्ञानकोश डॉ. श्री. व्यं. केतकर )

अरबांकडून अङ्क स्पेनमध्यें व तेथून सर्व युरोपखण्डात पसरले. आज प्रचारांत असणाऱ्या अङ्कलेखनाचा उगम भारतीय अङ्कात आहे, कारण युरोपांत प्रचारांत असणाऱ्या रोमन लिपींतील अंक पूर्णतया मागें पडल्याचें आढळतें. डॉ. रघुवीर यानीं 'इंडियन न्यूज क्रॉनिकल' मधील त्यांच्या लेखांत असाच अभिप्राय नमूद केला आहे. या संदर्भांत– " Europe is greatly indebted to India in the matter of science. The number signs which are being used all over the world were discovered by the Hindus. It is impossible to estimate the influence of decimal system of notation on the human civilisation." असे प्रो. ए. ए. मॅकडोनेल यांनी म्हणून ठेवले आहे. तात्पर्य प्रचलित अङ्कलिपि, स्थानमूल्य आणि शून्याचा वापर सर्वप्रथम भारतात उद्‌भवल्या विषयी सर्व प्राचीन व अर्वाचीन अभ्यासकांची एकवाक्यता आहे. (संदर्भ–इंडियन टायपोग्राफी व्हॉल्यूम फर्स्ट, चॅप्टर फाइव्ह-बी. एस. नाईक)

### २ हिंदसे

अरब लोक अङ्कांना हिंदसे म्हणतात. याचा अर्थ हिंदुस्तानापासून प्राप्त झालेले असा आहे. या संदर्भांत 'प्राचीन भारतीय लिपि-माला' कार पं. गौरीशङ्कर ओझा यांनीं पृ. ११९ वर 'अल्बेरुणी' या प्रसिद्ध प्रवाशाचें प्रवासवर्णनावरुन त्याचे प्रतिपादनाचा सारांश दिला आहे तो असा– 'हिंदु लोग अपनी वर्णमालाके अक्षरोंको अङ्कोंके स्थानमें काममें नही लाते है. जैसे कि हम हिब्रु वर्णमालाके क्रमसे अरबी अक्षरोंको काम मे लाते है। हिंदुस्तानके अलग अलग हिस्सों में जैसे अक्षरोंकी आकृतियाँ भिन्न है वैसे ही सङ्ख्यासूचक चिह्नों की भी, जिनको अङ्क कहते है। जिन अङ्कोको हम काममें लाते है वे हिंदुओंके सबसे सुंदर अङ्कोंसे लिये गये है।'

### भास्करीय बीजगणित नवाङ्कुरा व्याख्या

या विषयी भास्करीय बीजगणिताच्या नवाङ्कुराव्याख्येचे आधारे शास्त्रसिद्धांत मन्तव्य सांगतो.–

भास्करीय बीजगणितग्रन्थस्य श्रीकृष्णदैवज्ञरचितायां नवाङ्कुर व्याख्यायां– " इह किल सकलचराचरनिर्माता परमकारुणिकः स्वयम्भूः तत्क्रमविशेषविशिष्ट वर्णमयानि शास्त्राणि सृष्ट्वा अथाल्पमेधसां तदुपस्थितये मेधाविनां तु तदुपस्थितिलाघवाय सति विस्मरणेऽन्यनिरपेक्षं तत्स्मरणाय च अश्रुतपरकृतग्रन्थावगमाय च यथा वर्णज्ञापक लिपीः ससर्ज तथा सङ्ख्योपस्थितिलाघवाय तज्ज्ञापकानङ्कानप्यसृजत। तत्र प्रतिवर्णं लिपिसर्गे वर्णानामियत्तया तज्ज्ञापकलिपिष्वपि सास्तीति लिपिषु सङ्केतग्रहः सुशकः। इह तु प्रतिसङ्ख्यमन्तसर्गे सङ्ख्यानामानन्त्यात्तज्ज्ञापकाङ्केषु वर्षशतेनापि अशक्यः सङ्केतग्रहः। तथाहि इह कुशाग्र बुद्धेरपि प्रतिदिनं यथाकथञ्चित् शतपर्यन्तमपि सङ्केतग्रहे तदेकचित्ततया शतवर्षपर्यन्तम भ्यासेन षट्त्रिंशल्लक्षपर्यन्त सङ्केतग्रहः स्यान्मेधाविनः। न तु तदधिकसङ्ख्यापकाङ्केष्विति। अतः परमकारुणिको भगवानतिचतुरः नवैवाङ्कान्स सर्ज। १,२,३,४,५,६,७,८,९ अपि च अभीष्ट स्थानाद्वामक्रमेण द्वितीय तृतीयादिस्थानान्युत्तरोत्तरं दशगुणानां सङ्ख्यानां संज्ञाभिः दशशतादिभिर सङ्केतयत् प्रथमं स्थानं चैकगुणसङ्ख्यास्थानत्वादेकसंज्ञया। तथा सति नवैवाङ्काः तत्तत्स्थानसम्बन्धात् स्थानानि वा तत्तदङ्कसम्बन्धाद्यथा स्वं तां तां सङ्ख्यां ज्ञापयेयुरिति सकलसङ्ख्यावगमः सुगम इति। यथाभीष्टस्थाने निवेशितोऽयमङ्क '३' एकगुणायास्त्रित्वसङ्ख्याया ज्ञापको भवति। ततो वामतो द्वितीयस्थाने निवेशितः स्वसङ्ख्याया दशकज्ञापको भवति। यथा दशकद्वयज्ञापकोऽयं २३ ( वामतो द्वितीयस्थानस्थः २ अङ्कः ) एवं वामतस्तृतीयचतुर्थपञ्चमादिस्थाननिवेशितोऽङ्कः उत्तरोत्तर दशगुणानां शतसहस्त्रायुतादीनां यथास्वं ज्ञापको भवति तत्राभीष्टसङ्ख्याया यथा संभवमेकदशकादिसङ्ख्याभावे तत्स्थानपूरणार्थमभावद्योतकाङ्कःशून्यसंज्ञको लिपिविशेषो निवेश्यते। यथा अष्टोत्तरशतसङ्ख्यायां दशकाभावाद्द्वितीय स्थाने शून्यनिवेशनं १०८ यथा वा अष्टोत्तर सहस्त्रसङ्ख्यायां दशकशतकयोरभावाद्द्वितीयतृतीयस्थानयोस्तत् १००८ इति। अनयोरुदाहृत-सङ्ख्ययोर्यथाक्रममष्टकशतकयोरष्टकसहस्त्रकयोरेव वा निवेशने १८ द्वितीयस्थान निवेशितस्य दशकज्ञापकत्वादष्टादशत्वं प्रतीयेत नाभीष्टसङ्ख्या अत एवात्रायुतलक्षादीनामभावेऽपि तत्स्थाने शून्य निवेश्यते। तेन विनाप्यभीष्टसङ्ख्यास्थानपूरणात्। अतोऽभीष्टसङ्ख्यामुत्तरावधिभूताङ्कस्थाना दृक्षिणस्थानानां पूरकत्वात्तत्रोक्तरीत्या शून्यनिवेशनमावश्यकम्। वामस्थानानां तु अपूरकत्वात् आनन्त्याच्च न तत्तथेति। नन्वस्ति लिपिषु स व्यक्रमः शिष्टसंमतो माङ्गलिकत्वादादरणीयश्च। तत्कथं तमपहायापसव्यक्रम आदृत इति चेन्न शतसहस्त्रायुतादिसङ्ख्याया उत्तरोत्तरमभ्यर्हित-त्वात् तत् सव्यक्रमस्योचितत्वादेतत्क्रमस्य युक्तत्वात्। न चाभ्यर्हितङ्ख्यातः सव्यक्रमार्थमुत्तरावधितः प्रदक्षिणक्रमेणैव द्वितीयादिस्थानानां

संज्ञास्त्विति वाच्यम् । उत्तरावधेरभावात् । परिच्छिन्नसङ्ख्यासु तत्सत्त्वेऽपि तस्यानियतत्वात् । प्रथमावधेस्तु नियतत्वात्तत्स्थानमारभ्य स्थानसंज्ञा युक्ततरेति । अलं पल्लवितेन ।

(भास्करीय बीजगणितं नवाङ्कुरव्याव्ययासहितं आनन्दाश्रम पुणे सन १९३०)
याचा संक्षेपानें मराठी सारांश खालीलप्रमाणें–

### ब्रह्मसृष्ट व्यवस्था

वर्णलिपि, अङ्कलिपि व शून्यलिपि या तिन्हीं स्वयम्भूने म्हणजे ब्रह्मदेवानें उत्पन्न केल्या. वर्णांची सङ्ख्या मोजकी असल्यानें वेगवेगळ्या चिह्नसङ्केतांनी ते शिकविले गेले. सङ्ख्या अनन्त असल्यानें १ ते ९ या अङ्काकरितां चिह्नसङ्केत करून आणि शून्य लिपि करून स्थानमूल्यव्यवस्थनें बाकीच्या संख्यांची व्यवस्था लावणें ब्रह्मदेवाने शिकविले.

### उजवीकडून डावीकडे

या स्थानमूल्यव्यवस्थेत उजवीकडून डावीकडे दशगुणोत्तर प्रमाणाने एकं, दहं, शतम् इ. स्थानमूल्य वाढत जाते. ज्या स्थानांत सङ्ख्या नसेल तेथें शून्य लिहून अभाव दाखविला जातो. उदा. १८ म्हणजे १×१०+८×१ = १८, १०८ म्हणजे १×१००+०×१०+८×१ = १०८

### अङ्कलिपीत अपसव्य क्रम का ?

अशी व्यवस्था आहे. या पद्धतीने अनन्तसङ्ख्या लाघवयुक्त रीतीने स्मृतीला ताण न पडतां जाणतां येतात. याप्रमाणे परमकारुणिक अतिचतुर भगवान् ब्रह्मदेवाने व्यवस्था शिकविलेली आहे. वर्णलिपि सव्यक्रमाने म्हणजे डावीकडून उजवीकडे असतानां अङ्कलिपींतील स्थानमूल्याचा अपसव्य म्हणजे उजवीकडून डावीकडे असा क्रम का ? असा प्रश्न उपस्थित करून श्रीकृष्णदैवज्ञांनी उत्तर दिले आहे. सामान्य व्यवहारातही ज्येष्ठापासून सुरुवात करून कनिष्ठाकडे जाण्याचा प्रघात आहे. अर्थात ज्येष्ठाला सर्वप्राथम्य किंवा अग्रस्थिति असली पाहिजें असा सर्वमान्य सङ्केत आहे.

### अङ्कानां वामतो गतिः आणि ज्येष्ठप्राथम्य

स्थानमूल्याच्या "अङ्कानां वामतो गतिः" या प्रमाणे अर्थात् अपसव्य क्रमव्यवस्थेने दशांशस्थळाचे डावीकडें सर्वांत मोठ्या सङ्केतास अग्रस्थिति येते. तसेंच दशांश स्थळाचे उजवीकडेही दशविभक्तोत्तर पद्धतीने लहानाला अनन्तर स्थिति येते. दशांश चिह्नाला सर्वाधिक नियामकत्व आहे. दशांश चिह्नाचे कोणत्याही बाजूला पूर्णाङ्क व उलट बाजूस अपूर्णाङ्क घेतले तरी एका बाजूस "अङ्कानां वामतो गतिः" स्थानमूल्य निश्चित करण्याकरितां अनिवार्यतेनें पत्करावी लागते. म्हणून वेद हाच क्रम अनुसरून प्रतिपादन करितो. उदा० २४.७५ चोवीस पूर्णांक पंच्याहत्तर शतांश) दशांश स्थळाचे डावीकडे २×१०+४×१ = २४ असें स्थानमूल्य दशगुणोत्तर प्रमाणानें असल्यानें मोठ्याकडून लहानाकडे हा सव्यक्रम साधला जातो. व "अङ्कानां वामतो गतिः" असेंही होतें. दशांशस्थळाचे उजवीकडे $\frac{७}{१०}+\frac{५}{१००}$ असें स्थानमूल्य दहाचे पटीत भागून म्हणजे दशविभक्तोत्तर प्रमाणानें आहे. येथें लघुत्तम साधारण विभाज्य घेऊन मांडल्यास $\frac{७०}{१००}$ व $\frac{५}{१००}$ असें येतें. येथेंही मोठ्याकडून लहानाकडे हा सव्यक्रम साधला जातो व "अङ्कानां वामतो गतिः" असेंही होतें,

दशांश स्थळाचे डावीकडे अपूर्णाङ्क व उजवीकडे पूर्णाङ्क असें करावयाचें म्हटल्यास २.४७५ हे ५७.४२ असें लिहावें लागेल. येथेंही अपूर्णाङ्क भागाला "अङ्कानां वामतो गतिः" च मूल्यनिर्णायक आहे. कारण $\frac{७}{१०}$ ठरल्याशिवाय $\frac{५}{१००}$ लिहिणें ठरूं शकत नाही.

### पूर्णाङ्कात अपसव्य क्रमच

तात्पर्य अङ्कलेखन सव्यक्रमानेंच आहे. मूल्यनिर्धारणास मात्र पूर्णाङ्कांत अपसव्यक्रम आहे. म्हणूनच वेदही तसेंच बोलतो– "एकादश च मे, द्वादश च मे." 'एकशतमध्वर्युशाखा,' 'द्वादशशतं गावः,' वगैरे. सामान्य व्यवहारांतही उजळणी पाठ करतांना पंधरा साते पाचोदरशे (१०५), अठ्ठावीस आठे चोवीसदोन (२२४), एकोणतीस नव्वे एकसठदोन (२६१), असेंच म्हणण्याची रीत आजही शाळेंत आहे.

## भारतीय अङ्कलेखन अचूक व सहज

स्थानमूल्य निर्धारण क्रमानुसार सङ्ख्या लिहितांना फारसा विचार करण्याचे कष्ट घ्यावे लागत नाहीत, सहजपणें अचूक लिहितां यतें, बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार विनासायास बिनचूक होतात. असें असल्यामुळें तोच क्रम प्रथम वेदोपदेशकाच्या उपदेशानें वेदापासून भारतीयांनी शिकला आहे. तात्पर्य वर्णलिपि, अङ्कलिपि, व शून्यलिपि ब्रह्मदेवाने निर्मिली आहे. येथूनच परदेशात त्यांचा प्रसार झाला. (सन्दर्भ– 'विक्रम' हिन्दी विशेषाङ्क–उज्जैन, संवत् २००० ईश्वरदत्त शर्मा पृ. २०१–२०२) उज्जैन येथून प्रसिद्ध होणाऱ्या विक्रम मासिकाच्या हिन्दी विशेषाङ्काच्या संवत् २००० च्या हिन्दी विशेषांङ्कात ईश्वरदत्त शर्मा यांनी पृ. २०१–२०२ वर एक कविता उद्धृत केली आहे. ही प्रथम ज्ञानेन्दु देव सूफी यांनी उजेडांत आणली आणि सन १९३२ मध्ये कलकत्त्याहून निघणाऱ्या, 'विशाल भारत' मध्यें छापली. "सियार उल् उकुर्" या नावानें तुर्कस्तानच्या सुलतान सलीमनें आज्ञा केल्यावरून प्राचीन अरबी वाङमयांतील या कवितेची हस्तलिखित प्रत सन १७४२ मध्यें केली गेली. ही प्रत "मकतब इ जमहुरिया" या इस्तंबूलमधील ग्रंथालयांत सुरक्षित आहे.

## मयूर पिच्छाग्रगत चन्द्रकाकार

शून्याचा आकार मयूरपिच्छाग्रगत चन्द्रकाकार असा वरिवस्यारहस्य १/४२ श्लोक टीकेंत सांगितला आहे.

"तार्तीयीके रेफस्थाने बिन्दौ च रोधिन्याम् ।

नादान्तव्यापिकयोश्चन्द्रक तुल्यानि पञ्चशून्यानि" ।।

## आर्यभटीय (२) आर्य सिद्धान्त

स्थानमूल्याविषयी आर्यभटीय (२) आर्यसिद्धान्तात खालील विवरण आले आहे.

"अत्र गणितपादे सामान्यगणितमेव प्रतिपाद्यते । तच्च युक्तिमात्रपरम् । कालक्रियागोलपादयोः पुनः ग्रहगतौ तदतिदेशः क्रियते। तत्र कृत्स्नस्यापि गणितस्य सङ्ख्यामूलत्वात्प्रथमं तत्स्वरूपं प्रतिपाद्यते–

एकं दशं च शतं च सहस्रमयुतनियुते तथा प्रयुतम् ।

कोट्यर्बुदं च वृन्दं स्थानात्स्थानं दशगुणं स्यात् ॥२५॥ इति ।

शतं चेत्यत्र चकारस्य पादान्तत्वाद्गुरुत्वर्थं "गन्ते" इति पिङ्गल स्मरणात् । नेदमपि सङ्ख्याविशेषाणां संज्ञाप्रदर्शनपरं सूत्रम् । किन्तु दशगुणोत्तरत्वप्रतिपादनपरम् । अतः स्थानात्स्थानं दशगुणं स्यादिति वाक्यार्थः । तस्य पारिभाषिकतानिरासार्थम् । लोकवेदमूलत्वेन नित्यत्वमेकं दशचेत्यादिभिः पदैः प्रदर्श्यते ॥२५॥ (आर्यभटीय (२) आर्य सिद्धान्त गणितपाद, त्रिवेन्द्रम् संस्कृत सीरीज)

## पं. दीनानाथ चुलेट

अङ्कलेखन सर्वप्रथम भारतात सुरू झाले हें वेदांतील अनेक प्रमाणांवरून अप्रत्यक्षतया दिसून येतें. या संदर्भात इन्दूर येथील ज्योतिष सम्मेलनांत पं. दीनानाथ चुलेट यांनी वाचलेला रुद्राच्या अकराव्या अनुवाकावरील प्रबन्ध आणि गोवर्धन (पुरी) पीठाधीश्वर ब्रह्मीभूत जगद्गुरु श्रीशङ्कराचार्य भारतीकृष्णतीर्थ स्वामीमहाराज यांचा Vedic Mathematics हा ग्रंथ द्रष्टव्य आहे. यामध्यें वर्णिलेल्या विविध गणिती प्रक्रिया अङ्कलेखनाशिवाय अशक्य आहेत. या ग्रन्थांत अथर्ववेद परिशिष्टांतील एकाधिकेन पूर्वेण. आनुरूप्येण, निखिलं नवतश्चरमं दशतः, शिष्यते शेषसंज्ञः, ऊर्ध्वतिर्यग्भ्याम्, आद्यमाद्येनान्त्यमन्त्येन, परावर्त्य योजयेत्, केवलैः सप्तकं गुण्यात्, शून्यं साम्यसमुच्चये, वेष्टनम्, (आनुरूप्ये) शून्यमन्यत्, यावदूनं तावदूनम्, सङ्कलनव्यवकलनाभ्याम्, यावदूनं तावदूनीकृत्य वर्गं च योजयेत्, पूरणापूरणाभ्याम्, अन्त्ययोर्दशकेऽपि, चलनकलनाभ्याम्, अन्त्ययोरेव, यावदूनम्, समुच्चयगुणितः, व्यष्टिसमष्टिः, लोपनस्थापनाभ्याम्, शेषाण्यङ्केन चरमेण, विलोकनम्, सोपान्त्यद्वयमन्त्यम्, गुणितसमुच्चयः समुच्चयगुणितः, एकन्यूनेन पूर्वेण, गुणितसमुच्चयः आणि गुणकसमुच्चयः या सूत्रांवरून गुणाकार, भागाकार, फॅक्टरायझेशन, महत्तम साधारण, क्वाड्राटिक व क्यूबिक इक्वेशन्स, इंटीग्रल कॅल्क्युलस–पार्शल फ्रॅक्शन्स, रिकरिंग डेसिमल्स, ऑक्झिलिअरी फ्रॅक्शन्स, वर्गमूळ, घनमूळ, पायथागोरस थिअरम, अपोलोनियस थिअरम, ॲनॅलिटिकल कोनिक्स हे सर्व हे सर्व गणित विषय येतात हें उदाहरणांसह दाखविले आहे. अङ्कलेखन विद्यमान असल्याखेरीज हे होऊंच शकत नाही.

तात्पर्य सृष्टयारंभीच वर्णलिपि, अङ्कलिपि, व शून्यलिपि ब्रह्मदेवानें निर्माण केल्या. अङ्कलेखन भारतांतून अरबस्तानांत व अरबांकडून स्पेनमार्गे युरोपांत गेलें.

---

# चक्रसृष्टि

अर्वाचीन आलोचक – ज्या प्रमाणें लौकिक प्रत्यक्ष अनुमानादिकानी विचार व सिद्धांत बनतात आणि कालांतराने ते विचार सुसंगत स्वरूपात एकत्र करून, पद्धतशीरपणें मांडल्यावर त्यांचे शास्त्र बनते असें जसें मानतात, तशाच रीतीनें क्रमविकास प्रक्रियेनें वेदादिक व अन्य सर्व वैदिक शास्त्रांची उत्पत्ति झाली असें मानून अर्वाचीन–प्रतिपादन करतात; पण असें प्रतिपादन अविचारपूर्वक ठरेल कारण अशा रीतीनें बनलेल्या शास्त्रांचे अस्तित्व " Proof without certainty " या कक्षेंतच राहील, कारण प्रकृतीतील सर्व समन्वयानें झालेला हा निर्णय नव्हे.

### शास्त्रांचे दोन प्रकार.

शास्त्रें दोन प्रकारची आहेत– (१) लौकिक प्रत्यक्षानुमानगम्य पदार्थांचा कार्यकारणभाव प्रतिपादन करणारी आणि (२) तसें प्रत्यक्षानुमानास प्रथम अगम्य अशा कार्यकारणभावांचें प्रतिपादन करणारी.

दुसऱ्या प्रकारच्या शास्त्रांतही यथोपदिष्ट कार्य करून सफल झाल्यावर तें शास्त्र सांगत असलेला कार्यकारणभाव प्रत्यक्षानुमानगम्य होणारच, परंतु सुरवातीस ते तसें नसल्यानें ' प्रत्यक्षानुमानास प्रथम अगम्य ' असें म्हटलें आहे.

### शास्त्र परिभाषा.

भारतीय चिकित्सत्वाप्रमाणें इहपर बलवदनिष्टाचा अननुबन्धी, इष्टसाधन व कृतिसाध्य ही तीनही विशेषणें जुळत असतील, तरच तो विषय सदाचरणीय शास्त्र म्हटला जातो. अन्यथा तो न्यायसम्मत सदाचरणीयशास्त्र परिभाषेंत घेतला जाऊं शकत नाही.

### आधुनिक विज्ञानाची अनिश्चितता

आजचे विज्ञानाबाबत अनिश्चतता पुष्कळ आहे. वैज्ञानिक स्वतःच विज्ञानाचे दुष्परिणाम ( = अनिष्टानुबन्ध ) पाहतात व सांगतात. विज्ञानसाधित बाबीत कृत्रिमता व आभासमयता भरपूर आहे. यामुळें आजचे विज्ञानास ही तीनही विशेषणें जुळत नाहीत. तशा विज्ञानाची कास धरून सर्वांना इष्ट वस्तु यथेष्ट पुरविण्याचा लोभ दाखवून तसा पुरविता येत नाही म्हणून जनसंख्या कमी कशी होईल याचा विचार करावा लागतो, म्हणून आधुनिक विज्ञान वरील शास्त्र परिभाषेंत बसत नाही.

यावर कोणी असें म्हणतील कीं भारतीय शास्त्रेंदेखील " Certainty Without Proof " असतात. म्हणून वरील तीन विशेषणांनीं युक्त शास्त्र म्हणविण्यास तीं योग्य नाहींत पण हें क्षणभर पत्करलें तरीही त्यामुळें आधुनिक विज्ञानाचें शास्त्रत्व सिद्ध होईल काय ? होत नाहीं.

### कार्यापूर्वी कारण

किंच वैज्ञानिकांचेही सर्वच प्रयोग " proof with Certainty " या सदरात मोडणारे असे नसतात. त्यांना ही कांहीं प्रयोगात " Certainty Without Proof " असेंच गृहीत करावे लागतें. कारण सर्वत्र कार्यापूर्वी कारण असावें लागतें. जर कोणी म्हणेल पीक काढून आणल्यावर बीं पेरीन तर तें तसें विज्ञानांनही होऊं शकत नाहीं. कार्यकारणभावावर भरंवसा ठेवून घरचें बी प्रथम पेरून मशागत राखण वगैरे केल्यावर फलाची वाट पहावी लागते. फलप्राप्तीची खातरजमा नसते, केव्हां केव्हां निष्फळताही येते. फलप्राप्तीची खात्री म्हणून पावती सुद्धा हातीं मिळत नाहीं. कार्यकारण भावावर अथवा व्याप्यव्यापकभावावर भरंवसा ठेवणे म्हणजे न कळत उत्तरदायी, सफल जगत्कर्तृत्वावरील श्रद्धा व्यक्त करणेंच होय. आपल्या मनानेंच केलेली असल्यास अंधश्रद्धा आहे, मग ती किती कां प्रयोग सिद्ध असेना ! जगत्कर्तृत्वाकडूनच बोधित असेल तर त्या कार्य कारण भावावर भरंवसा, ही मात्र डोळस श्रद्धा आहे, आपल्याच प्रयोग व अनुभवावरून पत्करलेल्या नवीन प्रयोगवृत्तींत, खरें बोलायचें तर, आधुनिक वैज्ञानिक सर्वाधिक अन्धश्रद्ध आहेत असें म्हणावें लागतें. प्रस्तुत उदाहरणांत तरी फलप्राप्तीपर्यंत वैज्ञानिकांसही हातीं घेतलेल्या प्रयोगास ' Certainty '(फलोपधायकत्वनिश्चय) वास्तविक कोठें आहे ?

म्हणून आधुनिक विज्ञान म्हणजे सर्वत्र अगोदर गृहीत न धरतां Certainty आहे असें समजणें हा केवळ दुरभिमान आहे. सर्वांना कारणांचा प्रयोग करीत असतांना " Certainty without Proof " (फलोपधायकत्व) पत्करूनच जावें लागतें. म्हणून या क्षेत्रातील या प्रकृतींतील कार्यकारणभावांचा फलोपधायकत्वांश प्रथम प्रत्यक्षानुमानांस अगम्य असण्याचा स्वभावच आहे.

### पहिल्या प्रकारची शास्त्रे

वरील दोन प्रकारच्या शास्त्र प्रकारांपैकी पहिल्या प्रकारांत, कांहीं पाहिलेल्या वा अनुभवलेल्या उदाहरणांवरून वा प्रत्यक्ष प्रयोग करून व्याप्ति ठरवून केले जाणारे निर्णय असतात. म्हणून व्याप्ति ठरविणाऱ्यांना सर्वज्ञता नसल्यास अशा शास्त्रांत सर्वसमन्वय होणें शक्य नाहीं. अशा शास्त्रांचा वापर करून "प्रत्यक्षानुमानास (प्रथम) अगम्य" असणाऱ्या प्रकृतीतील कार्यकारणभावांचा विचार करूं गेल्यास निर्दुष्ट निर्णय = (दोषरहित निर्णय) होऊं शकत नाहीं. म्हणून प्रत्यक्षानुमानांस (प्रथम) अगम्य" असणाऱ्या प्रकृती भागांतील कार्यकारण भावनिर्णयास अशा शास्त्रांचा वापर करणें वेदान्तात "तर्काप्रतिष्ठानात्" या सूत्रानें अयोग्य ठरविलें आहे.

" तर्काप्रतिष्ठानादप्यन्यथानुमेयमिति चेदेवमप्यविमोक्षप्रसंगः " (ब्रह्मसूत्र २।१।३।११)

यावरील भामतीव्याख्येंत श्री वाचस्पतिमिश्र " न वयमत्र तर्कमप्रमाणयामः किन्तु जगत्कारणसत्वे स्वाभाविकप्रतिबन्धवन्न लिङ्गमस्ति। यत्तु साधर्म्यवैधर्म्यमात्रं, तदप्रतिष्ठादोषान्न मुच्यत इति। कल्पान्तरेणनिर्मोक्षपदार्थमाह— अपि च सम्यक् ज्ञानान्मोक्ष इति। भूतार्थगोचरस्य हि सम्यग्ज्ञानस्य व्यवस्थितवस्तुगोचरतया व्यवस्थानं लोके दृष्टं, यथा प्रत्यक्षस्य। वैदिकं चेदं चेतनजगदोपादानविषयं विज्ञानं वेदोत्थतर्केतिकर्तव्यताकं वेदजनितं व्यवस्थितम्। वेदानपेक्षेण तु तर्केण जगत्कारणभेदमवस्थापयतां तार्किकाणामन्योन्यं विप्रतिपत्तेः तत्वनिर्धारण कारणाभावाच्च न ततः तत्त्वव्यवस्थेति न ततः सम्यग्ज्ञानम्। असम्यग्ज्ञानाच्च न संसाराद्विमोक्ष इत्यर्थः।"

असें स्पष्टपणें सांगतात, समस्त अदृश्यकार्यकारणभावाविषयीं हें सांगणें लागू आहे.

### कुमारिलभट्टांचे श्लोकवार्तिक

साध्या डोळ्यांनीं न दिसणारी वस्तु दुर्बिणीने दिसते. साध्या कानानें ऐकूं येणारा न मन्द शब्द Loudspeaker नें आणि दूरचा शब्द टेलिफोननें ऐकूं येतो वगैरें पाहून हें प्रत्यक्षानुमानास अगम्य पदार्थांचें पाहणें व ध्वनीचे ऐकणें झालें असें कोणीं म्हणेल तर ती भ्रान्ति आहे; कारण– "यत्राप्यतिशयोदृष्टः सस्वार्थानतिलङ्घनात्" असें कुमारिभट्टपादांनीं श्लोकवार्तिकांत सांगितलें आहे त्याचा अर्थ असा– साधनाचा वापर केल्यानेंसुद्धां तें तें इन्द्रिय असतानांच त्या त्या इन्द्रियाला योग्य विषयच प्रत्यक्षच होणार आहे. अर्थात् डोळ्याला ऐकू येणें व कानाला दिसणें होणार नाहीं. म्हणून साधनद्वारा घडणाऱ्या या सर्व गोष्टी प्रत्यक्षानुमानगम्य या कक्षेतच येणाऱ्या आहेत.

### दुसऱ्या प्रकारच्या शास्त्रांचा कर्ता सर्वज्ञ

अर्थात् पहिल्या प्रकारचें शास्त्रांचा कर्ता असर्वज्ञ व तत्प्रतिपादित शास्त्रांत सर्वसमन्वित विचार सांगणारा नाहीं. परंतु दुसऱ्या प्रकारचें शास्त्राचा कर्ता सर्वज्ञ आहे. त्या शास्त्राचा प्रथमोपदेष्टा ( = प्रथम सांगणारा ) आहे व तत्प्रतिपादित शास्त्रांत सर्वसमन्वित विचार सांगणारा आहे, हा दोहोंतील महत्वाचा फरक आहे.

### प्रकृतिस्थ न्याय्य व्यवस्था

या दुसऱ्या प्रकारचें शास्त्राचा कर्ता सर्वज्ञ, प्रथमोपदेष्टा आणि प्रतिपादित शास्त्रांत सर्वसमन्वित विचार सांगणारा नसल्यास अथवा इतर कोणतेंही साधन सर्वसमन्वित विचार समजण्याकरितां प्रकृतिदत्त नसल्यास व्यवहारांत कोणतीही व्यवस्था करणें प्रकृतिस्थ न्याय्य होणार नाहीं. अल्प ज्ञानावर आधारलेल्या कोणींही केलेल्या व्यवस्थेचें स्वरूप आणि परिणती केवळ "बळी तो कान पिळी" अशीच राहील. या संदर्भात खालील प्रश्न उद्भवतात–

या सर्व ब्रह्माण्ड पिण्डाण्डादिकांचा–ज्यामध्यें सर्व वैज्ञानिकांसह यच्चयावत् पदार्थांचा उत्पत्ति–स्थिति–लय केला जात आहे–कोणीं समर्थ कर्ता, धर्ता, संहर्ता, ज्ञाता आहे असें कां मानावें ?

असा कर्ता, धर्ता, संहर्ता, ज्ञाता असेल त्यानेंच प्रत्यक्षानुमानांस ( प्रथम ) अगम्य असणारा प्रकृति भागांतील कार्यकारणभाव उपदेशिला. हें पूर्व परम्पराप्राप्त कथन कां मानावें ?

जर उपदेशिला असेल तर तो उपदेश पूर्व परम्परा प्राप्तच आहे असें तरी कां मानावें ?

### आक्षेप परिहार

या प्रश्नांचें थोडक्यांत समाधान असें– ह्या जगातील समस्त दृश्यादृश्य– प्रपञ्च, जड आणि चेतन ( = प्रकृति–पुरुष ) या दोन तत्वांनी घटित, व्याप्त, निर्मित आणि नियमित असा समोर आहे. जड आणि चेतन अथवा प्रकृति आणि पुरुष जगाच्या निर्मितीमध्यें आणि नियमनामध्येंही हीच तत्वें अनुभवास येतात. जगातील सर्व कार्यकारणभाव आणि व्याप्यव्यापकभाव ह्या दोघांच्या पोटांत अर्वाचीन वैज्ञानिक काहीं त्यांना निर्माण करीत नाहीं. तो केवळ शोधून पाहत असतो. स्वतःच्या उपकरणांच्या गुण दोषाप्रमाणें त्याला यथास्थित किंवा विपरीत दिसत असतें. पण या कार्याकरितांही प्रकृति–पुरुषांनींच दिलेलीं उपकरणें, चक्षु, श्रोत्र, आदि इन्द्रियें प्रत्यक्षाकरितां आणि मन, बुद्धि, परामर्श वगैरे अनुमानाकरितां वापरावीं लागतात. हीं उपकरणेंही अदृश्य प्रपञ्चाविषयीं काम देत नाहींत. प्रकृति पुरुषांनीच जर हीं इन्द्रियादि उपकरणें दिलीं नसतीं तर कांहींही दिसणें वा संशोधन करणें शक्य नव्हतें. तीं हीं उपकरणें अत्यल्प एकदेशातच योग्य आहेत. त्यानें सर्व-समन्वित निर्णय होईल असें समजणें किती अनधिकारचेष्टा आहे ?

### वैदिक दीर्घ दर्शन

म्हणून अदृश्य इह–पर सर्व प्रपञ्चाचा सर्वसमन्वित विचार करण्याकरितां त्याच प्रकृति पुरुषाने दिलेलीं उपकरणें लागतात. त्या-करितां त्यांनीच सृष्टीच्या आरंभापासूनच "वैदिक दीर्घदर्शन" दिलें आहे. म्हणूनच ह्या दर्शनाची परम्परा अन्य सर्व परम्परांच्या अपेक्षेनें प्राचीनतम आहे. ही गोष्ट त्यांची उपेक्षा करणाऱ्यांनाही माहीत आहे. ह्याच वैदिक दीर्घ दर्शनाच्या बळावर नीति, मर्यादा, शान्ति, समाधान आणि सदाचारांतील यम, नियम पूर्वज पाळीत आले आहेत. लाखो वर्ष शोध करूनसुद्धां स्वतन्त्रपणें तें प्राप्त करणें शक्य नाही. ती परम्परा अजूनही थोडीबहुत संरक्षित आहे.

### विकृत शिक्षण पद्धति

सायन्स आणि टेक्नॉलॉजीच्या कासेस लागलेल्यांना गेल्या चार पांचशे वर्षांच्या इतिहासांतच स्वकृतीनें निष्पन्न अनिष्ट परिणाम (बलवदनिष्टानुबन्धित्व) प्रत्ययास येत आहे व ते स्वतःच ओरडून सांगत आहेत.

पारतंत्र्यांत भारतातील परकीयांनीं या "वैदिक दीर्घदर्शनास" त्यागून विकृत शिक्षणक्रम प्रचलित केला. स्वातंत्र्योत्तर काळातही तसाच शिक्षणक्रम त्यांतील विकृतींस प्रोत्साहित करून चालू ठेवला गेला हें देशाचें दौर्भाग्य आहे.

वरील प्रश्नांचा विस्तारभयास्तव येथें ऊहापोह यापेक्षां अधिक करीत नाहीं. पण असा एक कर्ता, धर्ता, संहर्ता, ज्ञाता आहे; त्यानें वरील प्रकारचा उपदेश केला आणि तो परम्पराप्राप्त आहे या आधारभूत भूमिकेवरून पुढील विवेचन केलें आहे.

### चार प्रकारची सृष्टि

तन्त्रामध्ये चार प्रकारची सृष्टि सांगितली आहे. अर्थमयी, शब्दमयी, चक्रमयी, व देहमयी. श्रीमद् भास्करराय वरिवस्यारहस्य १/५ मध्यें म्हणतात–

" सावश्यं विज्ञेया यत्परिणामादभूदेषा ।

अर्थमयी, शब्दमयी, चक्रमयी, देहमय्यपि च सृष्टिः ॥ "

चक्रमयी सृष्टि म्हणजे विश्वाचा ईश्वरानें काढलेला आराखडा आहे. श्रीमद् भास्करराय वरिवस्यारहस्य २/६७–६८ श्लोक टीकेंत म्हणतात–

"चक्रमयी देहमयी चेति सृष्टिद्वयं तु बालक्रीडनकार्ये स्थूलगृहसमानाकारत्वेन सूक्ष्मगृहनिर्माणतुल्यमर्थसृष्टावेवान्तर्गतं न पुनरत्यन्तं भिद्यते ॥ "

म्हणून अर्थसृष्टीचे बरोबर ती असतेच, जसें इमारत बनल्यानन्तर आराखडा इमारतीच्या रूपानेंच राहतो त्याच अनुरोधानें–

" यदासा परमाशक्तिः स्वेच्छया विश्वरूपिणी ।

स्फुरत्तामात्मनः पश्येत्तदा चक्रस्य सम्भवः ॥ "

असें नित्याषोडशिकार्णव ६/९ मध्यें म्हटलें आहे. हा येथे चक्रसृष्टीचा काळ सांगिला आहे. या चक्रांत 'अ'कारा पासून 'क्ष'कारा-पर्यन्तचीं सर्व बीजाक्षरें त्या त्या तत्त्वाचीं बोधक म्हणून अंकित असतात. शास्त्रोक्त श्रीचक्राची आकृति सबीजच असते. या श्रीचक्रांतील वर्णमालेच्या सृष्टीस अनुलक्षूनच–

"षाण्मासिकेऽपि समये भ्रान्तिस्सञ्जायते नृणाम्।

धात्राक्षराणि सृष्टानि पत्रारूढान्यतः पुरा॥"

असें वीरमित्रोदय व्यवहार प्रकाशांतील बृहस्पति उद्धरणांत व–

"नाकरिष्यद्यदि ब्रह्मा लिखितं चक्षुरुत्तमम्।

तत्रेयमस्य लोकस्य नाभविष्यच्छुभा गतिः॥"

असें नारदवचनांत म्हटले आहे.

यांचा योग्य अर्थ पूर्वी दिलाच आहे. भास्करीय बीजगणित नवाङ्कुरा व्याख्येचे आधारें वर्णलिपि, अङ्कलिपि व शून्यलिपीचें ब्रह्म-सृष्टत्वही पूर्वी दाखविलेंच आहे.

### ब्रह्म सृष्टलिपि :– व्यष्टि–समष्टि--आदर्शाभास

या ब्रह्मसृष्ट लिपींचाच व्यष्टि समष्टि वा आदर्शाभास या पैकीं कोणत्यातरी रूपाने आजही व्यवहारांत वापर मोठ्या प्रमाणावर केला जात आहे. याप्रमाणें चक्रसृष्टींतील ब्रह्मसृष्ट लिपिस्वरूपाला जसेंच्या तसें शिवानें वर्णोद्धारतन्त्र वगैरे मध्यें सांगून तन्त्र स्वरूपाने बोधन केलें आहे. तन्त्रोक्त लिपिस्वरूपाचा अनुभव योगी जनांस समाधिबलानें होऊं शकत असल्याचें तन्त्रात सर्वत्र सांगितलें आहे. या विषयीं श्रीमद्-भास्करराय म्हणतात–

"ते द्वे अपि सृष्टी स्थूल-सूक्ष्म-सूक्ष्मतर-सूक्ष्मतम भेदात्प्रातिस्विकं चतुर्विधे। श्रोत्रमनसोस्त्वर्थान्तःपातित्वादेव चातुर्विध्यम्। एवं च स्थूल श्रोत्रेण स्थूलशब्दश्रवणात्स्थूलार्थस्य स्थूलमनसा ज्ञानं, सूक्ष्मश्रोत्रेण सूक्ष्मशब्द श्रवणात्सूक्ष्मार्थस्य सूक्ष्ममनसा ज्ञानमित्यादि द्रष्टव्यम्। श्रोत्र मनसोः सूक्ष्मत्वादिकं तु शास्त्राभ्यास योगाभ्यासादिपाटवजन्यम्। तदेतद्योगशास्त्रे" निर्विचार वैशारद्येऽध्यात्मप्रसादः" इतिसूत्रे "ऋतंभरातत्रप्रज्ञा" इतिसूत्रे च स्पष्टम् (वरिवस्या रहस्य २/६७–६८ श्लोकटीका)

### बिन्दु स्वरूपाचे अनुभव

भ्रू मध्याचें ठिकाणीं बिन्दुस्वरूपाचा अनुभव आल्याचें आंग्लशिक्षित स्वामी विवेकानन्दांचे चरित्रातही नमूद आहे. (सत्येन्द्र नाथ मजुमदार यांनी लिहिलेल्या मूळ बंगाली चरित्राचा स्वामी शिवतत्त्वानन्द कृत मराठी अनुवाद पृ. १५ श्री रामकृष्ण आश्रम, नागपूर प्रकाशन) याप्रमाणे ब्रह्मसृष्ट शून्य लिपीचा अनुभव येत असल्याचें अर्वाचीनांना मान्य होणारें प्रमाण आहे. तसेंच प्रसिद्ध वैदर्भीय सत्पुरुष श्री गुलाबराव महाराज बालपणापासून अंध असून व नवीन शिक्षण न झालेले असूनही, आंग्ल शिक्षित डॉ. मुंजे, खापर्डे प्रभृतींचे प्रश्नांना उत्तर देत असतां अनेक पुस्तकांचा संस्कृत, मराठी, इंग्रजी वगैरे पृष्ठसंख्येसकट संदर्भ देऊन तेथें पहा म्हणजे तुमच्या प्रश्नाचें उत्तर मिळेल असें स्पष्ट सांगत असत असें नमूद आहे. (मधुराद्वैताचार्य श्री गुलाबराव महाराज– ले. राजेश्वर उत्तर त्रिपुरवार मधुर प्रकाशन नागपूर) हा प्रत्यक्ष घडलेला अलीकडील इतिहास असल्यानें आधुनिकांनाही त्याचा अपलाप करतां येणार नाहीं, ही घटना देखील चर्मचक्षूंपेक्षां वेगळे असे आणखी चक्षु असतात हें दाखवून देणारी आहे.

### समाधिबलाने अनुभूयमान

चक्रसृष्टींतील इतर ब्रह्मसृष्ट लिपीही समाधिबलानें अनुभूयमान आहेत. ब्रह्माण्डाचें मुळाशीं श्रीचक्र आणि पिण्डाण्डाचें मुळाशी षट् चक्रें असल्याचें तंत्रांचें प्रतिपादन आहे. (ब्रह्माण्डाचे संदर्भात "शक्ति" यास 'Energy' व पिण्डाण्डाचे संदर्भात "षट्चक्रांना" Plexi in autonomous nervous system" असें कांहीं आधुनिक तन्त्रसमालोचक वर्तमान 'Thermodynamics' व 'Anatomy' ला घेऊन मर्यादित करतात, एकरूपता मांडतात वा सूचित करतात. तें तसें होऊं शकत नाहीं. कारण अर्वाचीन विज्ञानांतील 'Energy' या शब्दानें उल्लिखित वस्तु स्थूल जगतांतील आहे व तन्त्रांतील "शक्ति" सूक्ष्म कारण जगतांतील आहे. त्यांचे कार्यांत स्थूलकार्य व सूक्ष्मकार्य असा फरक आहे. तसेंच मानव (प्राणि) शरीरान्तर्गत 'Plexi' ही स्थूल शरीरांतील वस्तु असल्यानें अर्वाचीन वैज्ञानिक उपकरणांचा विषय

आहे. तर " षट्चक्रे " ही सूक्ष्मशरीराचे मूळांतील वस्तु असल्यानें अर्वाचीन वैज्ञानिक उपकरणांचा विषय ती होऊं शकत नाहींत. तीं योगगम्यच आहेत. याप्रमाणें तन्त्रांचें निगूढ मन्तव्य नीट समजून घेणे जरूर आहे.)

कामकलाविलास चिद्वल्ली टीका.

कामकलाविलास श्लोक २५ मध्यें म्हटलें आहे.

" एवं कामकलात्मा त्रिबिन्दुतत्त्वस्वरूपवर्णमयी ।

सेयं त्रिकोणरूपं याता त्रिगुणस्वरूपिणी माता ॥ "

यावरील चिद्वल्ली टीकेंत–

" एवमिति ! एवं पूर्वोक्त प्रकारेण, कामकलात्मा, कामः प्रकाशकैक स्वभावः अनुत्तराक्षरात्मा परमशिवः कला तु अखिलवर्णान्त्य परमहंसाक्षरमयी विमर्श विग्रहा ।···सेयं त्रिकोणरूप मापन्ना चिदानन्दघन परमार्थां सकलाम्नायसारभूता इयं विश्वाहं भावनाशालिभिः महायोगिवर्यैः आत्मसाक्षित्वेनानुभूयमाना, त्रिगुणा इच्छाज्ञानक्रियामयी सत्वरजस्तमांसि तत्स्वरूपिणी । " असें म्हटलें आहे.

भूतलिपीचा उल्लेख

" कामकलाविलासाचे–

" द्विविधाहि मध्यमा सा सूक्ष्मा स्थूलाकृतिस्थिति सूक्ष्मा ।

नवनादमयी स्थूला नववर्गात्मा च भूतलिप्याख्या ॥

या २७ व्या श्लोकाच्या टीकेत–

" भूतलिप्याख्या, भूताश्च ते लिपयश्च भूतलिपयः । अत्र लिपीनां भूतत्वं नाम चेष्टाविशेषाक्षरविन्यासाभिव्यङ्ग्यत्वम् । तच्च कल्पना मात्रमेव । अक्षराणां तेजोरूपशक्त्यात्मकत्वात् । " असें म्हटलें आहे.

यावरून कोणाला भ्रान्ति होईल कीं चक्रस्थ लिपीचें आणि नादादि स्वरूपाचें अस्तित्वच खोटें आहे. अशी भ्रान्ति होऊं नये म्हणून स्पष्टीकरण असे–

या ठिकाणीं " चेष्टाविशेषाक्षरविन्यासाभिव्यङ्ग्यत्वम् " म्हणजे चेष्टाविशेषानें ( = विशिष्ट हालचाल करून उदा. हाताने ) अक्षरन्यास करून लिपीस व्यक्त करण्याची कृति म्हणजे भूतत्व–एवढ्यालाच कल्पनामात्र म्हटलें आहे. अक्षर, नाद, प्रकृतिस्थ लिपिस्वरूप काल्पनिक म्हणण्याचे तात्पर्य नाहीं. हस्तपादादिकांवरील रेषा व चिन्हे, ऐच्छिक स्नायुपेशींवरील रेषा वगैरे हस्तक्रियाजन्य नाहींत, तरी सुद्धां त्याचे स्वरूपाचा अपलाप कोणी करूं शकत नाहीं म्हणून टीकाकारांचा प्रकृतिसिद्ध लिपिस्वरूप असण्यास विरोध नाहीं. ज्याप्रमाणे ढगांमध्ये पावसाळ्यात विजेची रेषा हस्तक्रियेवाचून उमटते त्याप्रमाणें तेजोरूपात्मकत्व असणारीं अक्षरें हस्तक्रियेवाचून प्रकृतिनियत लिपिस्वरूपांत असतात, जर लिपिस्वरूपच कल्पित असेल तर " महायोगिवर्यैं आत्मसाक्षित्वेनानुभूयमाना " असें टीकाकार म्हणणार नाहींत.

तेजोरूपानें लिपिरेखा

तसेंच कामकलाविलासाच्या–

" स्फुट शिवशक्तिसमागमबीजाङ्कुररूपिणी पराशक्तिः ।

अणुतररूपानुत्तरविमर्शलिपिलक्ष्यविग्रहा भाति ॥ "

या तिसऱ्या श्लोकावरील टीकेत " अत्रेदमतिरहस्यमनुत्तरलिपिरकारः विमर्शलिपि हकारः ताभ्यां लक्ष्यं विग्रहं स्वरूपं यस्याः सा तथोक्ता । अत्र अनुत्तर विमर्शलिपिलक्ष्यविग्रहा इत्यनेनाहमात्मिकान्तर्गर्भित समस्तवर्णकदम्बकापरा वागकारादिहकारान्तं पञ्चाशदक्षररूपिणी वर्णपदमन्त्रकलातत्वभुवनात्मकसमस्तप्रपञ्चजनयित्रीपराभट्टारिका समस्त भूतान्तरात्मा सर्वत्र वेदान्ते अहमहमित्येयमाकारेण प्रतीयमाना दृश्यत इत्युक्तं भवति । " असें कधींच म्हणणार नाहींत. तात्पर्य लिपिरेखा श्रीचक्रांत तेजोरूपाने अङ्कित आहेत.

### स्वप्नातील दृश्य व श्रीहर्ष

लिपिरेखा चक्रसृष्टिस्थ असूं शकणार नाहींत अशी धारणा कां करावी ?

प्रकृति, स्वयंभू किंवा परमेश्वर लिपिरेखासृष्टि जाणूं वा करूं शकत नव्हता म्हणून ?

( " समाधिबलानें चक्रसृष्टीपर्यंन्त जाण्याची काय जरूर आहे ? आम्हांलाही स्वप्नामध्ये स्थल, पत्र, पट्ट, पुस्तक वगैरेवरील लिपि रेषा केव्हां, केव्हां कोठें, कोठ दिसतातच. स्थूल जगतातील वीज तेथे नसताही स्वप्नामध्ये लखलखित प्रकाश दिसूं शकतो. ज्ञात संकेत वा अज्ञात संकेत नाना प्रकारच्या लिपि दृश्य होतात. श्री हर्ष म्हणतात– " अदृष्टमन्यर्थमदृष्टवैभवात्करोति सुप्तिः जनदर्शनातिथिम् । ")

अशा स्वप्नांत दिसणाऱ्या लिपींचा लेखक कोण ? स्वप्न पाहणारा जागृत अवस्थेंत लिहिलेलेंच पाहतो काय ? हाताने लिहिलेल्या अक्षरांनीं बनलेलेंच तें लेखन असतें काय ? स्वप्न पाहणाराच लिहीत असेल तर अज्ञातलिपि कशी लिहील ? सिंधुघाटीतील अज्ञात- सङ्केत जागृतींत दिसूं शकतात, मग स्वप्नांत कां नाहीं ?. दिसणाऱ्या लिपीची तेथें लेखन सामग्री असते काय ? प्रकृति, स्वयम्भू किंवा परमेश्वरास अशक्य असे लेखन जीवच करतो असे कोणी म्हणेल तर ही किती अज्ञानाची गोष्ट आहे ?

### मोहम्मद पैगम्बर

असे म्हणावें लागत असतां त्या आधुनिक कल्पित अतिप्राचीन अविकसित लोकांना त्यां युगात लेखनाची कल्पना कशी व कोणाकडून प्राप्त झाली ? ही प्रसिद्ध व प्राप्ति सिद्ध करण्यास पुरातत्त्वाचा (Archaeological) कांहीं पुरावा आहे काय ? आधुनिकांपाशीं याचें काय समाधान आहे ? मोहम्मद पैगम्बर विषयीं ' दि ग्लोरियस कुरान ' चे प्रस्तावनेंत प्रकाशका.........कडून समाचार उल्लिखित आहे कीं एक परी आकाशात उभी राहून गुहेंत ध्यानस्थ पैगम्बरला ' पढ ' म्हणून तीनदां जोरानें प्रेरणा देऊन पढायला लावते. या वरून मनुष्यापेक्षां वरच्या योनीतही लेखन पठनाचा पुरातत्त्व आहे.

### गंधर्वराज पुष्पदन्त

या प्रमाणें गंधर्व योनींत गंधर्वराज पुष्पदन्तांनीं स्वनिर्मित ' महिम्नः स्तोत्रामध्यें ' असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिन्धुपात्रे सुरतरुवर-शाखालेखनीपत्रमुर्वी लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकालं तदपि तव गुणानामीश पारं न याति ' म्हणून लेखनाचें पुरातत्त्व उल्लेखिलें आहे. आज पिशाचयोनि पाश्चात्यांना नाकारतां येत नाहीं असें होऊन बसलो आहे म्हणतात त्या पेक्षां उत्कृष्ट ही परीप्रमाणें गंधर्व योनि तर त्या सर्वात लेखन कलेचें पुरातत्त्व शिलालेख हुडकून पाहिले आहे काय ? ऑर्कियालॉजिस्ट व पेलियोग्राफिस्टांजवळ त्याकरितां उपकरण आहे काय ? श्लोकांत- लिहिणारी म्हणून शारदा त्यांत सांगितली आहे. मग डेव्हिड डिरिंजर साहेब सरस्वती लेखनाची देवता नाहीं असें कसें म्हणतात ? ' तथा लिखितवान् प्रातःप्रबुद्धो बुधकौशिकः ' रामरक्षेंत आहे. तेव्हां बुध कौशिका ( विश्वामित्रा ) च्या वेळीं लेखन नाहीं असें आधुनिक कसें म्हणतात ? वा ठोकून सांगतात ? एकंदर मनांत येईल तसें बोलायचें म्हणजे संशोधन आहे काय ?

### मूर्त मूर्ति संबंध

लिपि रेखास्वरूप असल्याचें प्रत्यक्ष आहे. तरीही इतर रेखाटनापेक्षां तिचा वेगळेपणा आहे. वर्ण आणि लिपीचा मूर्त–मूर्ति सम्बन्ध आहे. याचे मौलिक रूपांचे संकेत– ' औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन सम्बन्धः तस्य ज्ञानमुपदेशः ' ( मीमांसा सूत्र ) या प्रमाणें असल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. कारण ब्रह्मसृष्ट व प्रकृतिस्थ वस्तूंचे सम्बन्ध असेच असतात म्हणून वर्ण आणि लिपि सारख्याच प्रकारची अकारादिहकारान्त असते. वर्ण तशीच लिपि. एवढेंच नव्हे, तर सर्व संसार वाचारम्भण अर्थात् शब्दाबरोबर मूर्त-मूर्ति सम्बन्धानें संबद्ध आहे. सर्व संसार, या संसारातील आकृति, अथवा मूर्ति–मूर्ति निर्मिति परम्परारूप आहेत. सर्व जागतिक व्यवहार मानस किंवा बाह्य अशा कोणत्यातरी दृश्य किंवा अदृश्य आकृति निर्मिती रूपाचाच आहे. निराकार एक परब्रह्मच केवळ आहें. इतर सर्व अमूर्त म्हणविणारे देखील ' परिच्छेद कल्पना विषय' या अर्थानें मूर्त होतातच. कांहीं त्रिविध भेदशून्य होत नाहीं. स्वाभाविक निष्प्रकार होत नाहीं. परब्रह्मातिरिक्त सर्वांना समसत्ताक प्रकार म्हणजे मूर्ति आहेच. म्हणूनच ' आकाशशरीरं ब्रह्म ' वेद आहे. ' यस्मिन् इदं जगदशेषविशेष मूर्तौ रज्ज्वां भुजङ्गमइव प्रतिभासितं वै ' भगवत्पादांनीं म्हटले आहे. परब्रह्माचे सर्वच जग प्रलयकाळीं भक्ष्य आहे. अन्न आहे. ऐतरेयोपनिषदांत ' अमूर्च्छयत् ' मूर्तिरजायत, अन्नं वै तत् या वाक्यांनीं सृष्टीबद्दल हीच गोष्ट सांगितली आहे.

### रूपनिर्धारिका प्रकृति

स्थावर जंगमात्मक सर्व सृष्टींत अनिवार्यपणें असाधारण आकृति अथवा मूर्तिनियमन आढळते. त्याचा व्यवस्थापक अथवा नियामक ईश्वर नाहीं तर शेवटीं कमींत कमी प्रकृति तरी मानावीच लागेल !! अर्थात झाडाचा असा आकार, पशूचा असा, पक्ष्याचा असा, किड्याचा

असा, पतंगाचा असा, मनुष्याचा असा वगैरे नियम प्रकृतीनें केलेलें रूपनिर्धारण म्हणून मानावें लागेल, अन्यथा त्याचा नियामक कोण ? तात्पर्य प्रकृतीला रूपनिर्धारिका मानावीच लागते.

म्हणून म्हणावें लागतें कीं चक्रसृष्टीप्रमाणें हीं स्रष्ट्याच्या सृष्टीपैकीं आहे. तेव्हां स्वप्नसृष्टीपेक्षां समाधिबलाने अनुभवास येणारी चक्रसृष्टीतील लिपि ही अधिक प्रामाणिक आहे हें वैलक्षण्य आहे.

### तन्त्रोक्त देवनागरीच ब्राह्मी.

असल्या लिपीला भावना करावी. भावना करावी या शब्दानें जें ठिकठिकाणीं लिहितात ते तसें लिहिणें, लिपिस्वरूप नसल्यामुळें नाहीं, परंतु समाधिबल प्राप्ति झाल्याशिवाय अनुभवास येणार नाहीं म्हणून लिहिलें जात आहे, असे समजलें पाहिजे. उदा. सप्तस्वरांचें स्वरूप असलेलेंच अभ्यासावाचून प्रत्यक्ष होत नाहीं, काच आणि हिरा अभ्यासभावना करूनच तेजोभेदानेंच ओळखावे लागतात. या प्रमाणें उपदेशाची व भावनेची समाधिबलाला प्रत्यक्ष करून देण्यास अपेक्षा असते. या प्रमाणें चक्रसृष्टींत ब्रह्मसृष्ट असलेल्या लिपीला शिवाने पार्वतीस वर्णोद्धारतन्त्रांत उपदेशिलें आणि ती तन्त्रोक्त एकच लिपि ब्राह्मी आणि देवनागरी या दोन्हीं नावांनीं अन्य लिपींचीं उपपादक असल्याचें पूर्वार्धात दाखविलेंच आहे.

### ब्रह्माडाची मूळ प्रकृति

दुसरें असे कीं– या ब्रह्माण्डाचें मूळ प्रकृतींत सर्वथा विद्यमान नाहीं अशी कोणतीही वस्तु पुढें कोणापासून होऊं शकणार नाहीं. या करितां कोणीही कार्य करूं इच्छिणारा त्या कार्याचें कारणांचे शोधास लागतो, कारण तो कारणाशिवाय शून्यापासून कोणतेंही कार्य होऊं शकत नाहीं हें पक्कें जाणीत असतो. संपत्तीचा असो वा विपत्तीचा असो जो शोध लागतो तो काय वंध्यापुत्राचा शोध लागत असतो काय ? मूळांत जें विद्यमान असेल त्याचाच शोध लागूं शकतो. तेव्हां सर्वांचें मूळ असणाऱ्याशीं स्पर्धा करूं शकेल ?

### आधुनिकांचे वैय्यर्थ.

केल्यास– आधुनिकांचा एका ग्रहाच्या स्फोटनानें वर्तमान ग्रहमाला झाली हा सिद्धान्त तरी कशाला ? आज असें कांहीं होत नाहीं म्हणून कोणा ' असिद्ध ' व्यक्तीचेंच ' ग्रहमाला ' हें अविष्करण असल्याचें कां न मानावें ? तो एक ग्रह तरी कोठून आला ? वास्तव म्हणाल तर साक्षात् प्रकृति–पुरुष बिन्दूंच्या बिन्दुस्फोटनानें सर्व जगाची सृष्टि वेदप्राप्त आहे. ती गोष्ट या ग्रंथांत दाखविली आहे. तीच खरी आहे म्हटलें पाहिजे. आजच्या लोकांना मनसोक्तच मानावयाचे आहे. कारण पूर्वीच्या सर्वांना आपल्यापेक्षां मूर्ख म्हणावयाचें आहे. एवढेंच तत्व आहे.

### सृष्टीतील आकार नागलिंग पुष्प

जरी सृष्टीमध्यें सन्तानोत्पत्ति, फुलें–फळें वगैरेंचें वेगवेगळे आकार, (नागलिङ्ग या नांवाचे फुलाचा वृक्ष. (Coropitus Gvinensis) आहे. त्याचे फुलांत मध्यभागीं शिवाचे पिण्डी प्रमाणें आकार व त्यावर नागफडी आणि भोंवताली पाकळचा असतात. हें मोठें अपूर्व स्वरूप वैशिष्टच सृष्टीत स्वभावतःच मिळन येणारें आहे. कृत्रिमशिल्प रचनेप्रमाणें दिसणारी अकृत्रिम नैसर्गिक रचना देखील पाहायला मिळते. यावरून कृत्रिमाचें सादृश्य दिसलें म्हणजे तें सर्व कृत्रिमच-पौरुषेयच असतें व अकृत्रिमाचें सादृश्य दिसत असल्यास तें सर्व अकृत्रिम-अपौरुषेयच असतें असा नियम नसतो. हा विचार चटकन् लक्षांत आणून देत आहे म्हणून या फुलावर विशेष प्रकाश टाकला आहे. परिशिष्टात या पुष्पाचें छायाचित्र आणि स्वरूप वैशिष्टचदर्शक रेखाचित्र दिलें आहे. पुण्यांत हा वृक्ष डेक्कन कॉलेज, महापालिकेचें एरंडवण्यांतील कमला नेहरू उद्यान वगैरे ठिकाणीं आहे. पुण्याच्यां ' सकाळमध्यें ' २८ जून १९७७ चे अंकांत या वृक्षाचें वर्णन आलें आहे.) शालग्राम शिलेंतील चक्राकार रेषा, हातापायावरील सामुद्रिक रेखा, जमीन, पाणी इत्यादिकांत कीटकांचें रेखाटन, आकाशांतील वीज क्वचित् घुणाक्षर हीं स्वभावतः मिळतात, तरी वर्णलिपिबुद्धीनें सम्पूर्ण वर्णमातृकांची प्रकृतिस्थ स्वरूपकल्पना तसेंच ( मूर्त–मूर्ति–सम्बन्ध ) ज्ञानपूर्वक रेखाङ्कनाची मौलिक स्थिर कल्पना बाह्य जगतात कोठेंही स्वभावतः आढळून येत नाहीं.

### आद्य शिक्षक अनिवार्य

शिक्षणाशिवाय आणि लेखनाशिवाय एवढें ज्ञान मानवांस होऊ शकत नाहीं. हें प्रयोगसिद्ध आहे. क्वचित् देवता, सिद्ध वगैरेंचें अनुग्रहानें झाले असल्यास तेंही शिक्षणाचा प्रकारच आहे क्रमविकास नाहीं. ज्याला अक्षर ज्ञान सिद्ध आहे त्यालाच घुणाक्षराचें अक्षरत्व कळेल, ओळखता येईल. अन्यथा नाहीं. यामुळे ऐकल्याखेरीज बालकांस प्रथम बोलतां येत नाहीं. शिकल्याखेरीज लिहितां येत नाहीं. विशेष कारण नसतां हाच सामान्य नियम नियम प्रत्यक्ष आहे. शिक्षणाकरितां मोठीच व्यवस्था करावी लागते. जन्मापासून बहिरा असलेल्यास बोलता येत

नाहीं. अशिक्षितास लिहितां येत नाही. म्हणून आद्यभाषण ऐकूनच येतें. व आद्य लेखन शिकूनच येतें. प्रथम एक वर्णमाला व तिची लिपिमाला शिकल्यावर वेगवेगळ्या कल्पना करतां येतात. म्हणून स्थिर वर्णमाला व तिची मौलिक लिपिमाला प्रकृतिस्थ असल्यानेच स्थिर म्हटली जाते आणि तिची परम्पराही.

### औपनिषदिक व गीतोक्त नियमः

अन्तरस्मिन्निमे लोका अन्तर्विश्वमिदं जगत् । ब्रह्मैव भूतानां ज्येष्ठं तेन को ऽ र्हति स्पर्धितुम् । " (तैत्तिरीय ब्राह्मण, अष्टक २, अध्याय ८, अनुवाक ८, दशक ९।१०) ही तैत्तिरीय श्रुति हेंच सांगते. " कथमसतः सज्जायते " " नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः " हा नियम वैज्ञानिकांचे डोक्यावरही स्वार आहे. म्हणूनच वैज्ञानिक पेट्रोल संपल्यावर सूर्यापासून ऊर्जा करण्याचा मार्ग चोखाळू लागलेले दिसतात, शून्यापासून कार्य करण्याचें मार्गें ते लागत नाहींत. " शून्यं-शून्यं " असें म्हणणारे बौद्ध देखील त्या प्रमाणें कार्य करीत नाहींत अति प्राचीन पाश्चात्यही " Ex nihilo nihil fit " म्हणून त्याच नियमाचा अनुवाद सांगतात. वरील औपनिषदिक व गीतोक्त नियमांजवळ फौजफाटा कांहीं नसून ही वैज्ञानिकादि सर्व जण त्याचेंच अनुकरण करीत असलेले आढळतात.

### ब्रह्म सृष्टीची क्रमिक गति

ज्या प्रमाणें फिल्ममध्यें नसणारी प्रतिमा प्रोजेक्टरद्वारा सिनेमाचे पडद्यावर दाखवितां येऊं शकत नाहीं. फिल्ममध्यें विद्यमान असणारी प्रतिमाच लहान मोठ्या आकारांत बाह्य उपायानें पडद्यावर अभिव्यक्त केली जाऊं शकते. प्रोजेक्शन बीममध्यें अडथळा उत्पन्न केल्यास कमी अधिक खण्डित प्रतिमा पडद्यावर येते. तसेंच फिल्मच्या क्रमानेंच प्रतिमांचा पडद्यावरील क्रम असतो, एकदम सर्व येत नाहींत. पूर्वोद्धृत तैत्तिरीय श्रुतीचा अभिप्राय असाच आहे कीं सर्वजग मूळांत अव्यक्तरूपानें आहे. तें ब्रह्मसृष्टीचे गती प्रमाणे क्रमाक्रमानें व्यक्त होतें.

### अव्यक्त प्रकृति हेच पुरातत्व

आद्यलिपि ब्रह्माण्डाचे मूळांत आहेच. त्याच आद्यलिपीला घृष्टलेखनादि प्रक्रिया अथवा विविधभावना वैचित्र्याने अनेक विचित्र रूपाने पाहिलें जाऊं शकतें. अर्थात सर्वांना मूळ रूपाचा पुरवठा करणारी एकच लिपि तन्त्रोक्त आहे. (देवनागरी) तन्त्रोक्त लिपीचे घृष्ट लेखनानें अठरा व्यष्टिलिपि व अठरा व्यष्टिलिपींचे अंशास वेंऊन असंख्य समष्टिलिपी होंतात. 'रेखा वर्णसङ्केत आहेत' एवढ्याच आदर्शाला घेऊन आदर्शाभास लिपि होतात. या तीन प्रकारांतच जगांतील सर्व लिपींची गणना आहे. हा सिद्धांत आहे. सृष्टयारंभापासून शिक्षित असल्यामुळें अव्यक्त प्रकृति हेच एक पुरातत्व प्रमाण आहे.

### लिपि शब्दाचा मुख्यार्थ व गौणार्थ

वर्णसङ्केत हा लिपि शब्दाचा मुख्यार्थ आहे. अङ्कलिपि वगैरे सर्व गौणार्थ आहेत. वरिवस्यारहस्यांत श्रीमद्भास्कररायांनी उच्चारण योग्य अर्थाच्या बिन्दूसही वर्णत्व साधून सांगितले आहे. अनुस्वार, विसर्ग वगैरे करितां बिन्द्वादिक चिह्नांचा जेथें उच्चारणयोग्य शब्दस्वरूपांचे बोधक म्हणून वापर केला जातो. तेथे बिन्दु वगैरे मुख्यार्थानेच लिपि म्हटले जातात, पण अङ्कलिपि इत्यादिकांत शून्यादिकांचें काम करीत असतां गौणार्थानेच लिपि म्हटले जातील. +, –, √, × ÷ वगैरे परिकर्माचे सङ्केत मागाहून कल्पना केले गेलेले असून आदर्शकल्पित आहेत. पुढें आणखी वेगळ्या प्रकारचें कल्पिले जाऊं शकतात. म्हणून ते कल्पितसङ्केतमात्र असून, कोणत्याही प्रकारची लिपि वर्णसंकेत स्वरूपांत नाहींत.

### स्वतन्त्र पुरुष विश्रान्त– लिपि

याप्रमाणें प्रथमलिपि ईश्वर सृष्टच आहे असें श्रीमदुदयनाचार्यांनीं त्यांच्या न्यायकुसुमाञ्जलीमध्ये " कार्यायोजन धृत्यादेः पदात् प्रत्ययतःश्रुतेः । वाक्यात्संख्या विशेषाच्च साध्यो विश्वविदव्ययः ॥ " याचे संदर्भात सांगितले आहे– लिपि तत्क्रमव्यवहारश्च बालानां, स सर्वैः स्वतन्त्रपुरुष विश्रान्तः व्यवहारत्वात् पत्राक्षरवदिति । अतोऽपीश्वर सिद्धिः । अस्त्वर्वाग्दर्शी कश्चिदेवात्र मूलमितिचेन्न तेनाशक्यत्वात्कल्पादावादर्शाभासस्याप्यसिद्धेः ॥ "

म्हणजे– " वर्णमाला, तिचा क्रम आणि तिची आद्यलिपि सर्वप्रथम ईश्वराने निर्माण केली. त्याचे आदर्शावरून ( = त्याचे उदाहरण समोर ठेवून) इतर सर्व लिपी झाल्या. आदर्शाखेरीज दुसऱ्या लिपी होऊ शकत नाहीत. एक आदर्श असताना त्याचें आधारे नव्या नव्या कल्पना होऊं शकतात.

### विश्वनाथ न्यायपञ्चानन

या प्रकारानेच सिद्धान्तमुक्तावलीकार विश्वनाथ न्यायपञ्चानन गुणनिरूपण १५० कारिका टीकेत लिहितात– "स्वकल्पित लिप्यादिप्रवृत्तौ यौवने कामोद्भेदादिना संभोगादौ च तदभावात्" म्हणजे आपण कल्पना केलेल्या लिपींत प्रथमतः कृतिसाध्यता पाहिलेली नसतें, दुसऱ्या लिपींतील कृतिसाध्यता पाहूनच इतर लिपी करावी लागतें.

आदर्शकल्पिताचें मूळ हें अपूर्ण ज्ञान असणाऱ्याचें संपूर्ण स्वतंत्रपणें केलेले प्रथम सृजन असू शकत नाहीं.

### अर्वाक्दर्शींची अपेक्षा नाहीं

वैदिक व्यवहारास अर्वाक्दर्शीनें त्याचें बुद्धीनें स्वतंत्रपणें आविष्करण केलेल्या कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नाही. सर्व वैदिक व्यवहार ईश्वरोपदिष्टच आहेत. यन्त्रे, बीजाक्षरे वगैरे सर्व वेदांपासूनच असल्याचें तान्त्रिकांनी आपल्या ग्रंथांत दाखविलें आहे.

या प्रमाणें अक्षर लिपीसह अंकलिपि, अंकांचे स्थानमूल्य, शून्य लिपि वापरून त्यांच्या लेखनाची व्यवस्था हे सर्व वेदापासून भारतीयांस प्राप्त झालें आहे. या संबंधांत सर्वांची एकवाक्यता योग्य आहे.

### अर्वाचीनांची तर्कदुष्टता

अशोकलिपीचें तुलनेत देवनागरी प्राचीन अंशी आहे, तर मग देवनागरीचा अशोकपूर्वकालीन शिलालेख का मिळत नाहीं ? असा प्रश्न अर्वाचीन पुरातत्वसमालोचक विचारतात. शिलालेख मिळणें वा न मिळणें यावरूनच प्राचीनत्व ठरतें कीं काय ? शिलालेखनिर्विष्ट बनण्यापूर्वी त्या लिपीचा प्रसार नसतो कां ? शिलालेखाचा काळ हाच त्या लिपीचा उत्पत्तिकाळ समजावयाचा का ? शिलालेखनिर्विष्ट होण्यापूर्वी अमुक एक काळ लिपी अस्तित्वात येते असा नियम आहे कां ? असेल तर तो कशावरून ?

शिलालेखच विश्वसनीय व श्रुति स्मृति तन्त्रादिक अविश्वसनीय असे कोणत्या आधारावर सीमित केले जाऊं शकतें?

प्रकृतिस्थ पुरातत्त्व सङ्ग्रह हा सर्वाहून अधिक प्रमाण आहे. सोयीचें असेल तेंव्हा अनुमान व तर्क आणि नसेल तेंव्हा प्रत्यक्षावर भर देण्याची अर्वाचीनांची पद्धत पाश्चात्यप्रतिपादित मताचें दुराग्रहांतून आलेली आहे. 'अनुपलब्धि' प्रमाणाचा सर्वाङ्गीण विचार न करतां देवनागरीचें अशोकपूर्व अस्तित्त्वाबद्दल सर्व लिपिसमालोचकांनी मतप्रदर्शन केले आहे.

यास्तव प्रकृतिस्थ सङ्ग्रहाचें भान ठेवून सर्वसमन्वित निर्णयाची आवश्यकता आहे, तो केल्यावर देवनागरीचें प्राचीनत्व ठरते.

### मनूचा अभिप्राय

या वरून थोडें मनुचें मन्तव्य सांगतां येतें–

"एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।

स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन्पृथिव्यां सर्वे मानवाः ॥"

असें मनु वचन आहे हें साक्षी आहे. त्यानुसार ज्या प्रथम जन्मलेल्या शिक्षकापासून साक्षात् अथवा परम्परेने सर्व अगांतील मानव 'स्व स्व चरित्र' शिकले आणि शिकतील, तो प्रथम जन्मलेला शिक्षक 'एतद्देशप्रसूत' होता. "अग्रजन्म' म्हणजे" प्रथम जन्मलेला 'शरीरीं पैकीं प्रथम जन्मलेला 'हिरण्यगर्भ' प्रजापति "हिरण्यगर्भस्समवर्तताग्रे" "स वै शरीरी प्रथमः" वगैरे श्रुतींत सांगितला आहे. प्रजेपैकीं प्रथम जन्मलेले म्हणून 'सप्तर्षि मन्वादिक' "महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवः तथा। मद्भावा मानस्वः जाताः येषां लोक इमाः प्रजाः ॥' या भगवद्गीता वचनानें सांगितलें आहेत.

### वैदिक भारतीयांचे पूर्वज भारतीयच

या वरून असें दिसतें कीं वैदिक भारतीयांचे पूर्वज भारताबाहेरून भारतांत आले या आधुनिकांचे मताला मनु जाणीतच नव्हता. दोन तीनशें वर्षांपूर्वी आलेल्या या मताचा तत्पूर्वी कोणीही देशी वा विदेशी विचारवन्तानें उल्लेख केलेला अजिबात आढळत नाहीं. आधुनि-

कांचे मत पत्करल्यास " प्रथम जन्मलेला मानव शिक्षक एतद्देश प्रसूत " असल्याची मनूची साक्ष निष्कारण खोटी ठरेल. (या [वरील विस्तृत विवरण परिशिष्टांत पहा)

हिरण्यगर्भ वैज्ञानिक

यांत सांगितलेल्या हिरण्यगर्भालाच श्रीकृष्ण दैवज्ञांनीं " स्वयंभू " असें म्हणून त्याचेपासून वर्णलिपि, अङ्कलिपि व शून्यलिपि सृष्टि झाल्या असें म्हटलें आहे. हिरण्यगर्भ हा स्थूलप्रपञ्चान्तर्गत सूक्ष्म प्रपञ्चाचा शरीरी कर्ता-धर्ता चैतन्यरूप आहे. तो सर्वप्रथम महान् वैज्ञानिक आहे. त्यानें केलेलें ब्रह्माण्ड व पिण्डाण्ड हे दोन्हीं महान् वैज्ञानिक प्रयोग सर्वांसमोर काम करीत आहेत. त्याच्या प्रयोगांतील कांहींची नक्कल ' बायॉनिक्स ' (Bionics) वगैरे नांवानें करण्याचा प्रयत्न आज वैज्ञानिक म्हणविणारेही सोयीस्करपणें करून राहिले आहेत. पूर्वी सूक्ष्म प्रपञ्चातील विज्ञानाशी परिचित असलेले व त्यांतील प्रयोग करण्याची सहजसिद्ध आवड असलेले लोक असत. सूक्ष्म प्रपञ्च विज्ञानानें स्थूल प्रपञ्च विज्ञानावर सहज ताबा ठेवतां येत असल्यानें त्याच मार्गानें प्रवृत्त होऊन लोकोत्तर इहपरोन्नति साधीत असत. त्या मार्गांत न्याय, नीति, यम, नियम, संयम आदि देखील विज्ञान असें.

अनर्थकारी जडविज्ञान

आज प्रकृतींतील तामस भागाचें स्थूल जडभौतिक विज्ञान केवळ प्रगति समजून सर्वतया सेविलें जात आहे व यमनियमादिकांची सर्वतया उपेक्षा होत आहे, त्या मुळेंच अशान्ति व कलह आहे. पूर्वीचे लोक अशा आधुनिक जड विज्ञानास अनर्थकारी समजून त्याचें अतिसेवन त्याज्य समजत होते. याच अभिप्रायाने ' महायन्त्र प्रवर्तन ' हें मनूनें उपपातक म्हटलें आहे.

आतां सूक्ष्म प्रपञ्चांतील विज्ञानास आवश्यक सामर्थ्य, बल, बुद्धि, विद्या यांचा ह्रास उत्तरोत्तर होत असून स्थूल प्रपञ्चांतील जड-विज्ञानाकडे ओढा वाढून जीवन अनीतिप्रधान बनत आहे. पूर्वीचें सर्व विज्ञान नाहींच वा खोटेंच आहे असें ठरविलें जात आहे. अतितामस भागांत गढून गेल्यानें असा परिणाम होणे स्वाभाविकच आहे. एवं च आधुनिक वैज्ञानिकांचें सूक्ष्म प्रपञ्चाविषयीं आकलन तेवढेंच आहे. तरी देखील नकळत त्यांचे तोंडून तो वैज्ञानिकांचा जनक असणारा हिरण्यगर्भ महावैज्ञानिक ' अज्ञात म्हणून निघून येतोच. जसें कीं–

The invention of cipher made " place value " easy, accurate and reliable. Just as wheel may be regarded as the greatest invention in mechanics, so nought may be regarded as the greatest invention in mathematics. The inventors of both are quite unknown.

(LONGMANS SENIOR ARITHMETIC... By T. F. G. DEXTOR
AND A. H. GARLIC ... 1914 EDITION PAGE 5)

अनेक चक्रगर्भित ब्रह्माण्डप्रयोग

चक्राला देखील प्रथम सृष्टि करणारा स्वयम्भूच करितो–

" द्वादशारं न हि तज्जरायवर्वर्ति चक्रं परिद्यामृतस्य, "

" सप्त युञ्जन्ति रथमेकचक्रम् " (अस्य वामीय सूत्र)

" त्रिबन्धुरेण त्रिवृता रथेन त्रिचक्रेण सुवृतायातमर्वाक् "

(ऋक् संहिता १।८।१८) इत्यादि अनेक चक्रांनीं गर्भित हा त्याचा ब्रह्माण्ड प्रयोग प्रत्यक्ष आहे. त्याला सर्वथा ' अज्ञात ' म्हणणें भौतिक विज्ञानांत गढलेल्यांना त्यांचे बौद्धिक क्षमतेनुसार उचितच–

हैरण्यगर्भ योगपरम्परा

योगपरम्परा शास्त्रांत " हैरण्यगर्भ परम्परा " म्हटली जाते " हिरण्यगर्भो योगस्य वक्ता नान्यः पुरातनः ' अशी याज्ञवल्क्य स्मृति आहे, " हिरण्यगर्भ प्रणीत मन्त्रयोग समीक्षा " असा ताडपत्रावर लिखित ग्रन्थही खापरी येथे उपलब्ध आहे.

### आद्यशिक्षक हिरण्यगर्भ

म्हणून प्रथम मानवाला हिरण्यगर्भानें सर्व शिकवून योगसिद्ध केलें. या करितां चक्रज्ञान, वर्णज्ञान, लेखनज्ञानादि अनिवार्य असल्यानें सृष्टयारंभापासून भारतांत लिपि व लिपिलेखन आहे. वैदिक व्यवहारास म्हणजे अष्टादशविद्यास्थान व्यवहारास अनिवार्यतया अपेक्षित असणाऱ्या सर्व गोष्टी त्यांच्या पूर्ण विकसित स्वरूपांतच सृष्टिकर्त्यांकडून प्रवर्तित होऊन कालक्रमानें त्याचेच इच्छेनुरूप जीवाचे भाग्याप्रमाणें त्यांचा ह्रास होतो तो प्रत्यक्ष आहे.

### वैदिक व्यवहारानपेक्षितांचा विकास

वैदिक व्यवहारास अनिवार्यतया अपेक्षित नसणाऱ्या आणि म्हणूनच ब्रह्मदेवाकडून पूर्वी एतावदेव म्हणून प्रवर्तित न झालेल्या सर्व तामस प्रकृति भागांतील गोष्टींचा तेवढाच क्रमिक विकास सिद्धान्तास मान्य आहे. त्या विकासवादास वैदिक व्यवहारास लावणें ही भ्रांति आहे.

### चक्रसृष्टीचा अधिकारी

या प्रमाणे आद्यलिपिचे उत्पत्तिबद्दल वैदिक सिद्धांत आहे. ज्यांना या सिद्धान्त व विषयाबद्दल रुचि आहे त्यांचे करितां हें चक्र सृष्टि प्रकरण आहे.

याचा सारांश असा–

१) प्रत्यक्षानुमानांस (प्रथम) अगम्य अशा शास्त्रांचा कर्ता सर्वज्ञ, प्रथमोपदेष्टा आणि प्रतिपादित शास्त्रांत सर्वसमन्वित विचार सांगणारा आहे. त्यानें केलेला उपदेश परम्पराप्राप्त आहे.

२) आद्यलिपि; तिचा क्रम व तिची वर्णमाला स्वतंत्रपुरुषविश्रान्त आहेत.

३) सृष्ट्युत्पत्तिकाल हाच चक्रसृष्टीचा काळ असून श्रीचक्रांत बीजाक्षरें ब्रह्मसृष्ट काहेत. ब्रह्मसृष्ट एकच लिपि तन्त्रोक्त आहे.

४) तन्त्रोक्त लिपीचे घृष्टलेखनानें अठरा व्यष्टिलिपि व अठरा व्यष्टिलिपींचे अंशांस घऊन असंख्य समष्टिलिपि होतात.

५) याहून जगांतील इतर सर्व लिप्या आदर्शाभास होत.

---

### प रि शि ष्ट

# सिंधुघाटी लिपीविषयी विचार

मोहेंजोदारो व हराप्पा येथें झालेल्या उत्खननांत सर जॉन मार्शल या इंग्लिश पुरातत्ववेत्याला नागरसंस्कृतीचे प्रचुरतम अतिप्राचीन पुरावे-शहररचना, वस्तु, भांडीं वगैरे सांपडले. यामध्यें चित्रमुद्रांचा समासेश आहे. या चित्रमुद्रांच्या खालीं असणारीं रेखाटनें हिला " सिंधु-घाटीलिपि " असें अर्वाचीन आलोचक म्हणतात.

या रेखाटनांचे संगति सहित स्पष्टीकरण करण्याचा अनेक अर्वाचीन आलोचकांनीं त्यांचे परीनें प्रयत्न केला आहे. लँग्डन आणि हंटर कनिंगहॅम, ब्युलर ॲन्ड फ्लीट, एस. आर. राव, श्री. गोळेगांवकर वगैरे आलोचकांचा नामनिर्देश यां संदर्भात विशेष महत्वाचा आहे. लँग्डन आणि हंटर यांनीं अशोकलिपि (अशोकन ब्राह्मी) आणि सिंधुघाटी लिपि यांचेंमधील जोडचिन्हें ( Conjunct signs ) आणि विभिन्न अक्षरें (Diacritical signs) यांचेंतील साम्यावरून सिद्धान्त मांडला आहे. कनिंगहॅमचे मतानें सिंधुघाटी लिपीपासून अशोकन ब्राह्मी उद्भवली असावी असें आहे.

या सर्व समालोचकांचें मतांचा आधार खालीलप्रमाणें आहे.– The evolution of script generally takes place in the following order : PICTOGRAPHIC, IDEOGRAPHIC, LOGOGRAPHIC, SYLLABIC and finally alphabetic. The transition from IDEOGRAPHIC to PHONETIC is a fundamental transition where the order LOGOGRAPHIC--SYLLABIC--ALPHABETIC is seldom broken. If any one element is missing, it could safely be presumed that there is a borrowal.

या सर्वांचें तात्पर्य असें– कीं एका विशिष्ट क्रमाचीं आणि म्हणूनच क्रमांतरित त्रुटि भरण्यासाठीं पूर्वोपलब्धीची आवश्यकता सर्व अर्वाचीन आलोचकांस वाटते. यापूर्वी उत्तरार्धातील चक्रसृष्टि प्रकरणांत ब्रह्म–सृष्टा–ब्राह्मी हें दाखविलें आहे. प्रसंगोपात्त आधुनिक विकास-वाद्यांच्या सृष्टिक्रमाला Palaeontology आणि कल्पना या खेरीज अन्य आधार नसल्याचेंही दाखविलें आहे. पुरातत्व अभ्यासकांपैकीं कोणींही वैदिक अथवा पौराणिक संदर्भ केलेला नाहीं. विशेषत: वेदाङ्ग ज्योतिष वेदांतील आणि भारतादिकांतील खगोलीय उल्लेखांचा अर्वाचीन चक्राला घेऊन, मागोव्यानें वचनवाक्यें आणि उत्खनन प्राप्त वस्तु यांचेशीं सांगड घालण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. त्यामुळें त्यांचा दृष्टिकोन पत्करून (श्री. गोळेगांवकर वगैरे) प्रस्तुत ग्रंथांतील प्रतिपादनाशीं मेळ घालणें व्यर्थ परिश्रम ठरणारें आहे. कारण मानव चरित्र आणि सप्तर्षिमन्वादय यांचें द्वारा प्राप्त शिक्षा आप्तवाक्य प्रमाणानें आम्हीं घेतली आहे; त्याचें तुलनेत विसंगतिपूर्ण विकासवाद पत्करून समन्वित निर्णय होऊं शकत नाहीं.

चित्रमुद्रांमध्यें ५२७ चित्रें आहेत. सजीव प्राण्यांचें चित्रामध्यें एकूण ८ प्रकार असून त्यांत ९९ खुणा आहेत. १९ वस्तूंचीं चित्रें असून त्यांमध्यें १३२ खुणा आहेत. प्रा. एस. आर. राव यांचें मते यापैकी २२ चिन्हे मूलभूत असून तीं वेस्टर्न सेमिटिक लिपीच्या प्रभावा-खालीं आहेत. आणि म्हणून सिंधुघाटीलिपि ही अल्फाबेटिक आहे. राव यांनीं एकंदर १८४० चित्रमुद्रांचें वाचन त्यांचें पद्धतीनें केलें आहे.

राव यांचें आलोचनाचा निष्कर्ष अशोकन ब्राह्मी पूर्वी कोणतीतरी लिपि होती एवढा ठरतो. हा महत्वाचा आहे. कारण राव यांचें दिग्दर्शनानुसार हराप्पा येथें सांपडलेल्या मुद्रांचें वाचन करून आणखी कांहीं स्पष्टता अर्वाचीन दृष्टिकोनातून होऊ शकेल. कांहीं अर्वाचीन आलोचकांना हराप्पा याचा संबंध ऋग्वेदांतील ' हरि युपिया ' म्हणजे ' हरीची भूमि ' याचेशी लावला आहे. आणि सिंधुघाटी चिन्हांवर आढळणाऱ्या– Syncretic, Unicorn– अर्थात ६ आऱ्यांचें चक्र (कालचक्र) याचेशीं हरिवंश कालाचा संबंध लावला आहे. (संदर्भ– प्रा. टी. एम. पी. महादेवन्).

सिंधुघाटी संस्कृतीचे शिल्पकार आंगिरस आणि ऋभु असून तेथील संस्कृति अथर्ववेदांतील असावी असें श्री. एस्. बी. रॉय या आधुनिक समालोचकांचें म्हणणें आहे.

हरिवंशापैकीं जैन शाखा ऋषभदेवापासून प्रसिद्धीस आली. जैन वणिक्–पुत्र मोहेंजोदारो येथील होते, असेंही श्री. रॉय यांचें म्हणणें आहे. तात्पर्यार्थानें मोहेंजोदारो ही विमिश्र संस्कृति असल्याचे अर्वाचीन आलोचकांचें म्हणणें आहे.

या सर्वांचा सारांश आणि निष्कर्ष येणें प्रमाणे–

१) मोहेंजोदारो आणि हराप्पा येथील चिन्हें सीमित अशा त्या प्रदेशांत तेवढ्यापुरतीच मिळत असल्यानें आणि सदहू प्रदेश सीमावर्ति असल्यानें अर्वाचीन विचारधारेनुसार देखील अमुक एका लिपीशीं सांपडलेल्या चिन्हाचें साधर्म्य पहाणें युक्तियुक्त ठरत नाहीं.

२) उत्खननप्राप्त शिक्क्याबाबत अर्वाचीन आलोचकांत मतभेद आहे. उदा. 'पशुपति' या चिन्हाबाबत खुद्द सरजॉन मार्शल हाही शङ्का व्यक्त करतो, सदरहू चिन्ह चतुरानन प्रजापति ब्रह्माचे असावे असें कांहीं अर्वाचीन आलोचकांचें मत आहे.

३) लिपीमध्यें मूळाक्षराचा एक आधारभूत गट, त्यात स्वर मात्रांचा प्रयोग करून बनणारीं विभिन्न अक्षरे आणि मूळाक्षर संयोगानें होणारीं जोडाक्षरें यांचा समावेश असतो. अर्थात् लिखित मजकूर ज्यास आज सिंधुघाटी लिपि असें म्हटलें जातें त्यांत दिसत नाहीं. म्हणून सिंधुघाटी लिपीसंबंधीं इतर बलवत्तर निर्णायक प्रमाणाच्या अभावांत कोणताही विचार कल्पनामात्रच ठरतो.

४) रेडिओ आयसोटोप पद्धतीनें केलेला सिंधुघाटी संस्कृति विषयींचा अर्वाचीनांचा काल निर्णय आणि महाभारत काळाच्या खगोलीय वेधांच्या उल्लेखावरून केलेला कालनिर्णय मध्यें बरेंच मोठे अंतर पडतें. यावरूनही सिंधुघाटीलिपि मौलिक–लिपि रूपाचें नंतरची असावी असें म्हणावें लागतें. म्हणून निश्चित निर्णय शक्य नाहीं तेथपर्यंत सिंधुघाटीलिपि आदर्शाभास या कक्षेंतच ठेवणें युक्तियुक्त ठरतें. उत्तरार्धात प्रदर्शित चक्रसृष्टीपर्यंत सर्व विचार ध्यानीं घेतल्यावर "धात्राक्षराणि सृष्टानि" असा सृष्टिकर्तृत्वाविषयीं अर्थनिर्देश असताना तद्विरुद्ध स्वतन्त्र संशोधन उत्खननाद्वारा करूं पाहणाऱ्यांनीं संस्कृत भाषा लिपि ही केवळ मनुष्यांपुरतीच नसून देवलोकांकरितांही आहे हें ध्यानीं घेणे जरूर आहे. "तेषांमनुष्यवद्देवताभिधानम्" असें निरुक्तप्रमाणही आहे. मनुष्येन्द्रियांना आकलन न होणारी सृष्टीही असल्यानें केवळ उत्खनन प्राप्तीवरून केलेलें निर्णय सीमित व अनधिकृतच राहणार.

---

## परिशिष्टः

# अतिप्रश्नाः तदुत्तराणि च

**तृतीय चतुर्थ प्रकरणे तत्तत्प्रसङ्गे संभाविताः केचन अतिप्रश्नाः तदुत्तराणि च।**

(आंग्लाङ्कानि तत्तत्प्रकरणनिविष्टानि चित्राणि बोधयन्तीत्यवज्ञातव्यम् ।)

**प्रश्न १–** शिवशक्तिसमष्टिसङ्केतः बिन्दुरूपः कस्मात् ?

**उत्तर –** कामबिन्दुः कामेश्वरबिन्दुरित्यादि नाम्ना तन्त्रेषु तस्य निर्देशात् ।

**प्रश्न २–** रेखापि बिन्दव एव धारयाऽवस्थिता इति रेखागणितसिद्धान्तः, तस्माद्रेखाऽपि क्वचिद्बिन्दुरिति सङ्केतोऽस्तु ?

**उत्तर –** दीर्घायामत्वादिरहितं हि अस्तित्वमात्रं बिन्दुरिति तत्र लक्षणमुच्यते । न तथा रेखा भवति ।

**प्रश्न ३–** " तार्तीयीके रेफस्थाने बिन्दौ च रोधिन्याम् ।
नादान्तव्यापिकयोः चन्द्रकतुल्यानि पञ्चशून्यानि ॥ "

(वरिवस्यारहस्य अंश १ श्लोक ४२)

इत्युक्तम् । " चन्द्रकं च–चन्द्रको मयूरपुच्छाग्रगतं चन्द्राकारं शून्यम् । तदुक्तं स्वच्छन्दसङ्ग्रहे " शिखिपिच्छचित्ररूपैर्मण्डलैः शून्यपञ्चकम् । ध्यायतोनुत्तरं शून्यं परं व्योमतनुर्भवेत् " ॥ इति ॥ (वरिवस्यारहस्य भास्करराय टीका)
तस्मादस्तित्वमात्रं बिन्दुरिति प्रकृते कथमुच्यते ?

**उत्तर –** 10 इत्यादादिव यदा शून्यबिन्दुः । अग्रे ' शून्याकारौ परस्पराश्लिष्टौ,' इत्यत्र तु तथैव क्रियते ।

**प्रश्न ४–** शिवशक्ति व्यष्टिसङ्केतः 2 बिन्दुद्वयं समष्टिबिन्दोर्दक्षत कस्माल्लिख्यते ?

**उत्तर –** क्रमान्तरस्यानुक्तौ सव्यक्रम इति वैदिकानां लेखनियमात् ।

**प्रश्न ५–** तयोर्मिथः सव्यक्रमः कुतो नाश्रितः ?

**उत्तर –** 2 विसर्ग इति नाम्ना तन्त्रेषु व्यवहृतः । विसर्गे च बिन्द्वोः क्रमस्तु ' द्विबिन्दुरध ऊर्ध्वतः ' इति विशेषेणोक्तः । अतो न सव्यक्रमः ।

**प्रश्न ६–** एवमपि स्थूलशून्याकारयोस्तयोः परस्पराश्लिष्टयोः सव्यक्रमोस्तु ?

**उत्तर –** विसर्गे क्लृप्तस्य दैशिकक्रमस्य परित्यागे कारणाभावात् । क्लृप्तेन कार्यसम्भवे कल्प्यमसिद्धमिति न्यायात् ।

**प्रश्न ७–** लम्बवद्बिन्दुस्फोटनं कुतः ? कुतो न तिर्यगादि ?

**उत्तर –** तिर्यक्स्फोटने पूर्वसिद्धं परस्पराश्लिष्टयोर्विश्लेषणमात्रं फलति । तदा स्फुटितभागयोर्न शिवशक्त्युभयरूपत्वम् । तथाच शिवशक्तिभ्यां सृष्टिरुक्ता नानुरुध्येत । पार्श्वलम्बितया स्फोटने वामदक्षिणपार्श्वयोरेकत्र विनिगमनाविरहाल्लम्बवत्स्फोटने लघुतमत्वात्तथेत्युच्यते ।

**प्रश्न ८–** एवं तर्हि (चित्रविभागे अकारे द्रष्टव्यम्) इति समार्धभागेन लेखनीयः अः । लेखकाः पुनः कथं (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इत्यादिवैषम्येणापि लिखन्ति प्रायशः ?

**उत्तर –** घृष्टलेखनप्रक्रिययेति ।

**प्रश्न ९–** बिन्दुस्फोटने आश्लेषरेखांशाः सन्धिबन्धाः कुत्र गताः ?

**उत्तर –** नह्यत्र छेदनमेव स्फोटनं किन्तूच्छूनत्वेन स्फोटनम् । यथोक्तं – ' उच्छूनकाले बिन्द्वात्मा तस्मादक्षरसम्भवः । बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानां च समुद्भवः ॥ ' (महामन्त्रतत्वप्रकाशिनी) इति । अतः विश्लिष्टसन्धिबन्धं वृत्तार्धचतुष्टयमेव उपर्यधोभावेन शेषितं गृहीत्वा वर्णोद्धारतन्त्रे वर्णोद्धारप्रक्रिया निर्दिश्यते । अत एव तत्र यथावश्यकं क्वचित्कुञ्चितत्वं कार्यमिति विधीयते । विभागस्तु वृत्तार्धयोः क्वापिनोच्यते ।

ति मूलसम्बन्धि अतिप्रश्नाः तदुत्तराणि ।

### अकारेऽतिप्रश्नोत्तराणि

**प्रश्न १०–** 'दक्षत' इत्यस्य दक्षमभिमुखीकृत्येत्यर्थः। तथा 'वामत' इत्यस्य वाममभीत्यादीत्याद्यर्थे क्रियते तर्हि (चित्रे द्रष्टव्यम्) इति अशोकाकारे कथं समन्वयः। तत्र वामं प्रत्यारम्भः दक्षं प्रत्यन्तगतिर्दृश्यते ?

**उत्तर –** (चित्रविभागे द्रष्टव्यम्) तत्रैतावत्यंशे प्रारम्भे उपरि वाममभिमुखीभूय प्रवृत्तापि रेखा वृत्तार्धस्य मध्यादनन्तरं कुञ्चनार्थं दक्षमभिगच्छत्येव। एवं कुञ्चिता सती सा वाममभिनिर्गच्छत्येव यावदधस्तनवृत्तार्धस्य मध्यम्। (चित्रविभागे द्रष्टव्यं) इत्यत्र च पूर्वतोवैपरीत्येन उपरिवृत्तार्धमध्यात्पूर्वं दक्षतः अन्ते तु मध्यात्परस्ताद्वामत गच्छतीति उभयत्रापि तावतैव समन्वयः।

**प्रश्न ११–** कुञ्चितत्वं नाम किम् ?

**उत्तर –** उत्क्षेपणाकुञ्चनप्रसारणगमनानीति पञ्चविधकर्मसु मध्ये आकुञ्चनाख्या क्रिया कुञ्चनम्। तस्याः कर्मत्वं कुञ्चितत्वम्। वक्रत्वसम्पादकमाकुञ्चनमिति दीपिका टीका। तदेव च कुब्जितत्वमपि। अस्य स्पृष्ट्वा अस्पृष्ट्वा छित्वेत्यादि भेदाः पूर्वोक्ताः अन्येप्यूह्या।

**प्रश्न १२–** नन्वेवं दक्षतः कुण्डली भूत्वा कुञ्चितेत्यत्र विपरीत दिशि अन्यथा वा कुञ्चनमपि कुञ्चितत्वमेव। तत्कुतो न स्यात् ?

**उत्तर –** एवं तर्हि (चित्रविभागे द्रष्टव्यम्) एवं कुञ्चनस्य कृते (चित्रविभागे द्रष्टव्यं) एवं करणे कुञ्चनत्रयं भवति। अन्यथा चेदपि इति कुञ्चनद्वयमिति गौरवमेव। एकेनैव निर्वाहे गौरवं नादरणीयम्। अत एव मीमांसकैः त्रित्वेनैव बहुवचनोपपत्तौ कपिञ्जलानां चतुष्ट्वादिकं गौरवान्नादृतम्।

**प्रश्न १३–** सङ्गतरेखा मध्ये तिर्यग्गता सरला च कुतो लिख्यते ?

**उत्तर –** ययोः वामदक्षपार्श्वस्थयोः सङ्गतये सा लिख्यते। तयोर्मध्ये तिर्यग्गता सरलैव तदर्थं लघुतमा भवति। अन्यथा गौरवमेव।

**प्रश्न १४–** तयोरेव सङ्गतये इति कुतः ? यत्रक्वापि येन केनापि सङ्गतये अस्तु ?

**उत्तर –** तयोर्ध्वसङ्गतोक्तेः तत् इति नामतो लिखितांशः उपस्थितः। ऊर्ध्वपदार्थो वक्ष्यमाणदक्षोर्ध्वा रेखा। तयोस्सङ्गत इत्यर्थात्।

**प्रश्न १५–** कुण्डल पदार्थः कः ?

**उत्तर –** परितः परीतं क्षेत्रं मुख्यः कुण्डलपदार्थः। वृत्तत्रिकोण चतुरादिकोणः अनियताकारो वा कथमप्यस्तु। तथापि प्रकृते अर्धकुण्डलिद्वयमात्रं बिन्दुस्फोटनादागतं यदुपतिष्ठते शेषस्य हकारार्थत्वात्तत्रार्धकुण्डल्यपि कुण्डल्येव। छिन्ने पुच्छे लूने कर्णे श्वा श्वैव नाश्वो न गर्दभ इति न्यायात्। एवमादिरीत्या पदवाक्यप्रमाणपारावारपारीणैः सर्वत्रातिप्रश्नाः ऊह्याः समाधेयाश्च। किञ्चित्किञ्चित्तत्र प्रदर्श्यते। सर्वस्यानन्तत्वात्।

### आकारेतिप्रश्नोत्तराणि।

**प्रश्न १६–** 'दक्षक्रोडायतात्वध' इत्यत्र कथं विग्रहः को वा अन्वयार्थः ?

**उत्तर –** सर्वमते दक्षमन्तरं दक्षक्रोडपदार्थः कृतः। तत्र अधः दक्षक्रोडे सति आयता इति विग्रहे (चित्रविभागे दर्शित) इत्येवं लेखः प्राप्नोति। तत्र प्रथमे सम्पूर्णस्य द्वितीये अधस्तनार्धस्य, दक्षक्रोडपदार्थस्य रेखाध आगतत्वात्समन्वयः। परन्त्वेतत्पक्षेऽधस्पदस्य समासानिविष्टस्य नियताकाङ्क्षां विनैकदेशे दक्षक्रोडे विशेषणे अन्वयः कृतः। स च न व्युत्पन्नः। दक्षक्रोडस्याध आयतेत्यन्वये दक्षक्रोडपदेन समं आयतपदस्य समासानुपपत्तिः असमर्थत्वात् दक्षक्रोडाध आयतेति पाठः अधतः कर्तव्यः स्यादिति। तथापि प्रथम पक्षो नैव सिध्येत् (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इत्यपि सिध्येत्। अथाधः दक्षं क्रोडं यस्याः सेति बहुव्रीहिं कृत्वा ततस्तया सति आयतेति पृथक्पदत्वे कर्मधारयेणैकपदत्वे वा पूर्वदोषे सत्येव बहुव्रीहिलक्षणाऽप्यतोऽधिका। अधः दक्षं क्रोडं यथा भवति तथाऽयतेति अव्ययीभावोत्तरं समासे समासस्याव्युत्पन्नत्वमप्याधिकम्। तथाप्यसमासे

दक्षक्रोडमायतेतिपाठे स्थितपाठासिद्धिरक्षराधिक्यं च। उक्तवक्ष्यमाणसर्वपक्षसमुच्चयेन पक्षक्रोडे अध आयतेति मुख्यपक्षमपि संगृह्याक्षरस्याप्यध इत्यध्याहृत्य (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इति। (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इति पक्षे कृते पूर्वोक्तास्सर्वे क्लेशाः अध्याहारोप्यधिक इति। अतः दक्षक्रोडे अध आयतेति अधस्पदस्य विशेष्येणान्वयं स्वीकृत्य 'आ' इतिपक्षः अधिकं व्युत्पत्तिनियमानुसारी (According to rules of interpretation) देवनागर्यां स्वीकृतः। अत्राध आयतेत्यत्राधस्त्वं स्वारम्भापेक्षयाऽधोदिगभिमुखत्वम्। नाध्याहारमपेक्षते औत्सर्गिकत्वादिति। तथा च (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इत्यत्र बिन्दुर्दर्शितांशः पृष्ठलेखनादागतः न वचनादिति समाधाने वरम्।

### इ–ई कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न १७– इ, ई इत्यत्र (चित्रविभागे द्रष्टव्यम्) इति कस्मान्न क्रियते ?

उत्तर – (चित्रविभागे द्रष्टव्यम्)

यथा चित्रे दर्शितवत्सम्भवत्स्वेतावत्प्रकारेषु (१), (२), प्रकारद्वये लक्षणानुगमादिष्टत्वम् । तत्रापि (२) युक्ततरमन्ते वामतः कुञ्चनापत्तिपरिहारार्थं प्रथमप्राप्तं वामोपरिवृत्तार्धं परित्यज्य अग्रे आरम्भार्थं दक्षोपरिवृत्तार्धं प्रतिगतेन त्यक्तस्यापि कारणसद्भावेन पुनरुपादानाभावात् । तत्रैव तर्ह्येव वामाधोवृत्तार्धस्य ' अधोगता पुनरधोगता कोणशीर्षा कुञ्चिता दक्षतः शुभा ' इत्येतत्कर्तुं सन्निहितस्य सौलभ्यात् । तथा सति बिन्दुस्फोटन प्राप्तरेखाभिरेव निर्वाहे लाघवात् । वामोपरिवृत्तार्धस्य त्यक्तस्य परिग्रहेऽपि व्यवहितत्वेन गौरवानपायात् । ' गुरुमुखी ' पक्षस्य तु (१) सङ्ग्राहकः । (३), (४) प्रकारयोस्तु 'दक्षताकुञ्चिता शुभा' नास्तीति त्याज्यत्वम् । (५) प्रकारस्यातोपि त्याज्यत्वम् । किंच (६) प्रकारः कुतो न ? उकारे यथा ऊर्ध्वाधो मध्यतः कुब्जा रेखेत्युक्ते तथा तद्दक्षार्धवृत्ताभ्यामेव सम्पाद्यताम् ।

एवं कृते इकारे ई कारे च ' ऊर्ध्वाधः कुञ्चिता मध्ये त्रिकोणा ' इत्युक्तं मध्ये त्रिकोणत्वं न सङ्गच्छते । ईकारोक्तं मध्ये त्रिकोणत्वं इकारेप्यन्वेति । उक्तमेव बिन्दुद्वयारूढ इकार एव ईकार इति । तथा च बिन्दुस्फोटनादागत वृत्तार्धत्रयमादायैव इकारस्यापि मध्ये त्रिकोणत्वं सम्पादनीयं भवति । तथा च बिन्दुस्फोटनात्कोणत्रयं ( वक्रत्रयं ) आदाय त्रिकोणा विवक्ष्यते. (६) प्रकारे तु मध्ये कुञ्चने एक एव कोणः । (५) एक एव कोण इत्यपि त्याज्यत्वे हेतुः ।

प्रश्न १८– इकार मात्रायाः शीर्षाधः कुञ्चितत्वं. ( चित्रविभागे द्रष्टव्यम्)

८ रेखायां दक्षोर्ध्वत्वं ७ रेखायामक्षराद्वामतः मात्रालेखने एव सम्भवतीत्युपपादितम् । उच्चारणक्रममनुसृत्य दक्षत एव मात्रा लिख्यताम् । दक्षोर्ध्वत्वं च ७ इत्यस्य (चित्रविभागे द्रष्टव्यम् ) एवं लेखने सम्भवति तथा कुतो न लिख्यते ?

उत्तर – ( चित्रविभागे द्रष्टव्यम् ) स पक्षः तत्र ९ रेखाभागस्य गौरवापादकत्वादुपेक्ष्यते । किं च एवं करणे उपरिमात्रालेखनविषये एव आक्रोशन्ताः यन्त्रपरतन्त्राः दृश्यन्ते । अस्मिन्प्रकारे उच्चतरमात्रालेखन कल्पनात्तेषां किं समाधानं वक्ष्यसि ?

### उ कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न १९– तर्हि उ कारेपि एवमेव वृत्तार्धत्रयेण मध्यतः कुब्जारेखा क्रियताम् ?

उत्तर – तत्र त्रिकोणेति नोच्यते । अतः लाघवादेककोण एवेति इ कारे तु मध्ये त्रिकोणत्व प्रोक्तम् ।

प्रश्न २०– उ कारे सव्यक्रमेण प्रथम प्राप्ते उपरि वामवृत्तार्धे आरम्भोस्तु ?

उत्तर – ' रेखा वामगता शुभा ' इत्युक्ता मात्रा न सिध्येत् ।
मध्यतः कुब्जा सति वामाधोवृत्तार्धं कवलीकृत्य कथं वामगता रेषा सम्भवेत् ?

### ऊ कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न २१– ऊ कारे अधोर्ध्वगामिनी सव्यक्रमेण कुतः ?
कुब्जिता वामत शुभेतित्युक्तं कस्मान्न ?

उत्तर – (चित्रविभागे द्रष्टव्यम्) 2 कुब्जिता वामत शुभा इति जनितान्वयबोधं निराकाङ्क्षम् ! अतः अधोर्ध्व-गामिनी इत्यत्र तेन अन्येन वा क्रमान्तराप्राप्तेः औत्सर्गिकः सव्यक्रम आदृतः । तेन ह्रस्वोकारमात्रापेक्षया स्फुटवैलक्षण्यमपि ।

प्रश्न २२– तद्रूपाद्यतः कुतोपि निर्गत्याधोगताऽस्तु ?

उत्तर – उपर्यधोभाग इत्यत्र प्रमाणाभावान्मध्यत इति ।

### ए कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न २३– एकारे यथा चित्रेदर्शितरीत्यैतावदेव श्लोकोक्तं लक्षणं बिन्दुस्फोटने अधो वृत्तार्धाभ्यां कुतो न ?

उत्तर – प्रथमप्राप्तस्य वामोपरिवृत्तार्धस्य परित्यागे कारणाभावात् तथा कर्तव्यमिति (चित्रदर्शितरीत्या) इत्यत्र अधोवृत्तार्धयोजनया बोध्यते । तमिल ए, ऐ प्रभृतिषूपयुज्यते च ।

### क कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न २४– क कारे वामरेखेत्यादिना बिन्दुस्फोटने वृत्तार्धयोर्मध्ये एव वामत्वाधस्त्व क्रमस्य स्वीकारोस्तु ?

उत्तर – (चित्रविभागे दर्शितचित्रे) १ वामरेखा २ दक्षिण रेखिका ३ अधोरेखा ४ सरस्वती मात्रा इति करणे कुण्डली चाङ्कुशाकारेति न सङ्गच्छेत । अतः अधोरेखा पृथक्कार्या । सा च तथा कार्या यथा अङ्कुशदण्ड स्यात् ।

प्रश्न २५– एवं तर्हि चित्रदर्शितवताङ्कुशाकारसम्भवे तत्रैव यथाप्रदर्शितं १, २, रेखाकल्पनं किमर्थम् ?

उत्तर – तर्हि कदम्बगोलकाकारो न स्यात् । अतः १, २, रेखयोः सिद्धिः ।

प्रश्न २६– तर्हि अधोरेखा इति ३ कथम् ? मध्या हि सा तर्हि भवति ?

उत्तर – स्वारम्भादधोगन्त्री रेखाऽधोरेखेत्यर्थः । वक्ररेखाणां नैवैकदिगभिमुखीगतिऽर्नाधो एव । न पूर्ववत् बिन्दुस्फोटने उपरिवृत्तार्धापेक्षया अधः स्थितेति । एवं च वामत्वं दक्षिणत्वं च तेष्वधिकम् ।

प्रश्न २७– एवं ककार उपरिवृत्तद्वये बिन्दुस्फोटनेऽपि शक्यम् तथैव कस्मान्न क्रियते ?

उत्तर – सत्यं शक्यम् । तथापि तमिल प्रभृतयः अधोवृत्तार्धद्वयलिखितं मौलिकोद्भवं ककारस्यानुरुन्धानास्तथैव तन्त्रोक्त वर्णोद्धारः पूर्वसृष्टो• दृष्ट इति साक्ष्यं ददति इति । तथा दर्शितम् ।

### ख कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न २८– ख कारे मध्ये अधोरेखा न कल्प्यते कुतः ? तत्रापि वामरेखा, दक्षरेखा, अधोरेखा इत्याद्युक्तेः ककार वाक्येन समान त्वात् ।

उत्तर - तत्र न पृथक्कल्पनीयत्वम् । तथैव सामञ्जस्यात् । अधोरेखाप्रसिध्यर्थं बिन्दुस्फोटनस्य ऊर्ध्वाधः क्रम आश्रयणीय परम् । तावतैव निर्वाहात् । एवमाद्यतिप्रश्नानां समाधानानि पदवाक्यप्रमाणान्यनुसृत्य विद्वद्भिरूह्यानि ।

### ङ कारेति प्रश्नोत्तराणि

प्रश्न २९– ङ्कारे दक्षार्धवृत्ताभ्यां १, २, रेखाकृते । ङ कारे दक्षार्धवृत्तेन कुतो न क्रियेते ?

उत्तर – ङ लक्षणवाक्ये मध्यपदं नास्ति यदनुरोधेन उर्ध्वाध इति दैशिकक्रमबद्धयोः दक्षार्द्धवृत्तयोः ऊर्ध्वाध इति नियोजनीयता स्यात् । ड कारे तु तथा वर्तते । एवं च मध्यपदसत्त्वे वामोपरिवृत्तं मध्यं कृत्वा तदनुरोधात् ऊर्ध्वाधः क्रमबद्धयोः दक्षवृत्तार्धयोः विनियोगः, यथा इकारे ई कारे तथा डकारेऽपि अन्यथा वामोपरिवृत्तार्द्धं सव्यक्रमेण ऊर्ध्वं कृत्वा ततः यथोक्तं शेषाणां विनियोजनमिति ।

### ण कारेतिप्रश्नोत्तराणि

प्रश्न ३०– अत्र पक्षपञ्चकम् बिन्दुस्फोटने यत एव मध्यतः तत एवोर्ध्वतः तत एव च वामात् तत एव चाधोगता इत्येकः पक्षः । तथाच षष्ठयर्थे सार्वविभक्तिकस्तसिः । एवं विवक्षितार्थः बोधयितुमेव तत इत्युक्त उत्तरत्रानुषज्यते । साकाङ्क्षत्वात् । आनन्तर्यं बोधयितुं तत इति नापेक्ष्यते । पाठक्रमादेव लाभात् । तथा च ततः = तयोर्वामात् तयोरेवाधोगतत्वाय तृतीयरेखां यावदधोनयनमिति । तयोर्वामादारभ्येत्यर्थः । तयोरेखाधोगतत्वस्यारम्भोपादानं तत् । (तयोरेववामादारभ्य) 'तयोरेवाधोगता सैव तयोरेव पुनरूर्ध्वं गतेति' एतावद् कुण्डलीत्वगतेत्यनुवर्तमानस्यैव भागस्य विवरणात्मकोऽर्थवाद एव स्वतंत्र विधौ गौरवादिति एकः पक्षः । 88, 89 चित्रयोः यथा प्रदर्शितम् । तत्र 88 चित्रे ३ रूपेण अधस्तनवृत्तार्द्धद्वयमेवैवं रीत्या संगृह्यते लाघवात् । द्वितीयः पक्षस्तु अधोगतेत्यत्र तत इति नानुवर्तनीयः । वामादिति श्रुतत्वात् । केवलं वाम (भाग) मपेक्ष्याधोगता इत्यर्थात् । मध्यादर्वागेव मध्यं यावदेवाधोगतेति ।

ल्यब्लोपे पञ्चमी । तृतीयः पक्षस्तु द्वितीय पक्ष एव विशेषः बिन्दुस्फोटने केवलमुपरि वामार्धवृत्तमात्रादधोगता (ननुवामभागमपेक्ष्य ) वामाधस्तनार्द्धवृत्तरूपा सैव पुनरुर्ध्वं गतेति इति कन्नड तेलगु प्रभृति णकार पक्षः । चतुर्थः पक्षः तमिळ्. ग्रंथमलयाळ प्रभृतीनां 'अधोगता सैव पुनरूर्ध्वं गता ' बिन्दु स्फोटनेऽधस्तन वृत्तार्द्धद्वयं 'वामाद् ' पूर्वोक्तांशस्य वामाद् इति कर्तव्येति शेषः । तदनुसारेण अधस्तनवृत्तार्द्धद्वयं यथा (चित्रविभागे द्रष्टव्यम्)

पञ्चमोपि पक्षे वङ्गेषु (चित्र विभागे द्रष्टव्यम्) १ कुण्डलीत्वंगतारेखा, ततः १, ३ योः १, ४ योश्च मध्यतः वामादूर्ध्वत अधोगता २ रेखा ३ सैवाधोगता ४ पुनरूर्ध्वं गतेति। अत्र पक्षे शिरोरेखया नकारो भिद्यते इत्यालोचनीयम् ।

### ह कारेतिप्रश्नोत्तराणि

**प्रश्न ३१**– ऊर्ध्वादाकुञ्चिता, मध्ये कुण्डलीत्वं गतात्वधः पुनरूर्ध्वं गता सैव मात्रा इति लक्षणवाक्यम् । लक्ष्या हकारलिपिः ।
तत्र ऊर्ध्वपदस्य कोर्थः ? पञ्चम्याश्च ?

**उत्तर** – बिन्दुस्फोटनमात्रेण वर्णानांच समुद्भव इति सर्वत्रोपस्थितेः तत्राकारोपयुक्तावशिष्टः व्युत्क्रमपक्षे तस्य वामार्द्धभाग उपतिष्ठते स उपर्यधोभावेन वामार्द्धवृत्तद्वयमिति तावत्प्राप्तम् । तत्रोपरितनं वृत्तार्धमूर्ध्वपदार्थः । ऊर्ध्वादिति ल्यब्लोपेपञ्चमी । तथा चोर्ध्वमारभ्येत्यर्थः । अत्र ऊर्ध्वमिति प्राप्तमेवानूद्य वृत्तार्धयोः प्राप्तयोर्मध्ये इति मध्यत्वं विशेषितम् । तथा च ऊर्ध्वं आरभ्येति काले तयोर्धयोर्मध्ये इति देशे आकुञ्चिता इत्यप्राप्ताकुञ्चनस्य विधिः । अतः 'ऊर्ध्वादाकुञ्चितामध्ये ' इत्येतावदेकं वाक्यम् ।

**प्रश्न ३२**– अनन्तरं शेषांशस्य कोर्थः ?

**उत्तर** – तदनन्तरमधः कुण्डलीत्वंगता इत्येतावतोऽधस्तनवृत्तार्धरेखैव प्राप्ता अर्थः । सैवेति तमर्थमनूद्य पुनरूर्ध्वं गतेत्य प्राप्तोर्ध्वरेखांशस्य विधानम् । चित्रदर्शितेत्येवं विधेयद्वयमेवेति वाक्यद्वयमेव । अधस्तनवृत्तार्द्धोर्ध्वरेखयोर्मध्ये योजकरेखावैशद्येनाविच्छेदेनच लेखनारंभवि हिताप्यागच्छति । योजकरेखाया अभावेऽपि चित्रदर्शितरीतित इति हकारः लिख्यत एव ।

**प्रश्न ३३**– यदि चोर्ध्वादाकुञ्चितेति एकं वाक्यं क्रियते तेनाप्राप्ताकुञ्चितत्वमूर्ध्वार्द्धवृत्तादुपरि विधीयते तर्हि को दोषः ?

**उत्तर** – तर्हि एकमुपर्याकुञ्चितत्वं विधातुमूर्ध्वादाकुञ्चितेति वाक्यं, मध्ये आकुञ्चितत्वं विधातुमन्यद्वाक्यम् । सैवोर्ध्वंगतेति तृतीयं वाक्यं इति वाक्यत्रयं कल्पनीयं स्यात् । वाक्यद्वयेन सम्भवे वाक्यभेदत्रयकल्पनं दोषः । किं च चित्रप्रदर्शित इति चोपर्याकुञ्चितत्वे निर्णयाभावाद्विधिरस्पष्टः न निराकाङ्क्षो भवितुमर्हति । किं च वृत्तार्धयोर्मध्ये आकुञ्चितत्वविधानार्थं तत्पदस्य सकृदवगमितार्थत्वान्नोपयोगः । अन्यस्यावृत्तौ गौरवम् । यदि मध्ये कुण्डलीत्वं विधीयते— मध्ये कुण्डलीत्वं गतेति वाक्यमादाय तर्हि यथा चित्रे दर्शितं इति निर्णयाभावाद्विधिरस्पष्ट एव । न ह्यत्र कुण्डलीत्वविधाने अ कारे दर्शित कुञ्चितत्वद्वयत्रयरूपं गौरवमत्र प्रसज्जते । कुण्डलीत्वस्योभयथापि एकत्वात् । अतः कुण्डलीत्वशब्दस्य कुञ्चितत्वार्थ करणे लक्षणादोषः। इत्येवमादयो दोषाः पदवाक्यप्रमाणपारावारपारीणैः सुधीभिरूह्याः । अनन्ता बुद्धिः अनन्ताश्चातिप्रश्नाः । समाधानान्यपियथोचितमनन्तानि । विदुषां बुद्धौ निर्मत्सराणामवश्यंभावीनि इति साञ्जलिबन्धं प्रार्थये ।

---

## परिशिष्ट

# भाषा आणि वर्णलिपिमाला या विषयींचे आधुनिक मताचा परामर्श

विकार विचार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति या निबंधांत इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे लिहितात– " अक्षर-संस्थानाचा हा असा समाम्नाय म्हणजे परम्परा आहे. १) सबंध प्रसंगाचे मिश्र चित्र. २) सुटें चित्र. ३) चित्राचा भाग. ४) सरळ रेषा. ५) वक्ररेषा. ६) शब्दरेषा. ७) शब्दावयव दर्शक रेषा व ८) शेवटीं साध्या मूळ ध्वनीच्या सरळ वक्र रेखामय खुणा ऊर्फ मूळ अक्षरे अशी लांब परम्परा आहे. चित्रणें व लिहिणें यांची प्राक्सिद्धी झाल्यावांचून मूळाक्षरांची सिद्धि शक्य नाहीं. मूळाक्षरांच्या पूर्वी चित्र काढणें व रेषा काढणें या क्रियांचें ज्ञान मनुष्याला अवश्य आहे. अर्थात ज्यांना मूळाक्षरें माहीत आहेत ते लोक स्वतः तरी किंवा ज्यांच्या-पासून मूळाक्षरें उसनीं घेतलीं ते लोक लिहिण्याच्या टप्प्यावरून अगोदर गेले असले पाहिजेत."

यामध्यें दिल्याप्रमाणे आठ पायऱ्यावरुन गेल्यावर न बदलणारें अक्षररूप हुडकलें असें राजवाडे सांगतात. हे सर्व प्रतिपादन चित्रें मिळतात व लेख मिळतात इतक्याच पुरातत्व प्रमाणांवर आधारलेले आहे. चित्रापासून लेखनकला आली असें सांगणारें प्रमाण नाहीं तात्पर्य परम्पराप्रसिद्धी डावलून अयोग्यानुपलब्धीवर आधारलेलें हें प्रतिपादन आहे. चित्र काढण्याची प्रक्रिया अनुकरणात्मक आहे. प्रथम अक्षर लेखन मात्र केल्यावांचून येत नाहीं. आजही प्रत्यक्ष असणारी गोष्ट पूर्णतया नजरेआड करून अयोग्यानुपलब्धीवर भरंवसा ठेवल्याने विकासवादावर येणारे सर्व आक्षेप येथेंही येतात त्यावरून हें प्रतिपादन निर्णयात्मक नसून कल्पनामात्र असल्याचे दिसते–पुढे याच निबंधांत राजवाडे लिहितात " शेकडों टक्के टोणपे खाऊन हजारों प्रयोगांत फसून मनुष्याला या चार नित्योपयोगी कला परम कष्टानें व निढळच्या घामानें साध्य झाल्या. कोण्या काल्पनिक स्वर्गांत किंवा नरकांत राहणाऱ्या देवासुरांनी दिल्या अशांतला बिलकुल भाग नाहीं. शंकराच्या डमरूंतून ध्वनि निघाले, चित्रलेखानामक 'गंधर्वकन्येने चित्रें काढण्याचें कसब शिकविलें, कोण्या किन्नरानें अभिनय पढविला, किंवा विश्वकर्म्यानें भांडी बनविण्याचा धडा घालून दिला. वगैरें बोलणीं केवळ भाकडकथा आहेत. ह्या सर्व भाकडकथांचा अर्थ इतकाच आहे कीं भाषा, अक्षरमालिका अभिनय, व भांडीं, निर्माण करण्याची परम्परा काय आहे याचा ऐतिहासिक उलगडा करण्याचें ज्ञान परवांपर्यंत भारतीय मनुष्यांत नव्हतें. ज्या बाबींचा उगम, घटना, वृद्धि व परिणति कळत नव्हत्या, त्या बाबी कोणातरी दैवी शक्तीच्या प्रसादानें प्राप्त झाल्या, असा अर्थ अज्ञ मनुष्य सदैव व सर्वत्र लावीत असलेला दृष्टीस पडतो. हें सर्व आपलेंच स्वतःचें कर्तृत्व आहे, हा शोध मनुष्याला परम कष्टानें लागलेला आहे. आतां शंकराच्या डमरूचें किंवा देवांच्या विश्वकर्म्यांचें किंवा वागधिष्ठात्र्या सरस्वतीचें किंवा पशुपक्ष्यांचें नामकरण करणाऱ्या नोहाचें दैवी अर्थानें कांहीं एक प्रयोजन उरलेलें नाहीं. ऐतिहासिक दृष्टीनें त्यांच्यातूनही इतिहास निघण्यासारखा आहे."

याचा अर्थ पूर्वी सांगितल्या आठ पायऱ्या मनुष्य समजत नव्हता म्हणून दैवी उपपत्ति लावली गेली, आतां त्याची जरुरी नाही. त्या भाकडकथा आहेत म्हणजे काय ? परवा परवां पर्यंत भारतीय मनुष्यांपैकीं त्यांच्या परम्परेतील आद्य मानवांनांदेखील पूर्वी सांगितलेल्या या आठ पायऱ्या समजत नव्हत्या ? कां त्यांनीं त्या झोपेंत पार केल्या असें समजायचें ? कां ते मूळ आविष्कर्ता लपवून भाकडकथा सांगत सुटले ? कां स्वतः सिद्ध असल्यामुळें पायऱ्यांवरून गेलेच नव्हते ?

हें एकीकडे म्हणतांनाच 'ऐतिहासिक दृष्टीनें यांच्यातूनही इतिहास निघण्यासारखा आहे.' असें म्हणून आपण करीत असलेल्या प्रतिपादनाला त्यांचाच आधार घ्यावयाचा हीं मोठीच विसंगति व परस्परविरोध आहे. याचा अर्थच असा कीं सर्व प्राचीन उल्लेखांचा माझाच अर्थ व संगति खरी या अभिनिवेशानें हें लिखाण केलेलें आहे. कोणतेंच प्रमाण नसतांना, पूर्वी सांगितल्या नुसार अयोग्यानुपलब्धीवर आधारलेला, हा कल्पनाविलासमात्र आहे. आणखी वर ऐतिहासिक दृष्टि म्हणून आपली पाठ थोपटणे आहेच. 'निढळच्या' घामानें जें जें मिळतें त्याचा आविष्कर्ता सुप्रसिद्ध असतो किंवा नसला तर होतो हे आज प्रत्यक्ष आहे असें असतां या अतिउपयुक्त गोष्टीचा प्रथम आविष्कर्ता असा अंधारांत कसा राहिला ? एक तर तो आविष्कर्ता नसावा किंवा धूळफेक करण्याकरितां त्याने 'दैवी उपपत्ति' पुढें आणली असावी, त्या आविष्कर्त्यानें आपलें नांव "निढळचा घाम" गाळूनही काय कारणानें व कसें गुप्त ठेवलें अथवा तें कसें गुप्त राहूं शकलें या विषयीं 'ऐतिहासिक प्रमाण' नाहीं. या उलट परम्परा प्राप्त प्रसिद्धी "दैवी उपपत्तीस" विस्तृत आहे. म्हणून राजवाडे यांची "ऐति-हासिक दृष्टि "आविष्कर्ता नसणाऱ्यावर बळेंच लादण्याचा प्रयत्न करतात असे म्हणावें लागतें. "दैवी उपपत्तीस" भाकडकथा ठरविण्याच्या नादांत परस्पर विरोधी विधानें व विसंगति टाळतां न आल्यानें 'ऐतिहासिक दृष्टी' चे बुरख्याआड दडलेल्या स्वकल्पना मात्र एकदम व्यक्त होतात, हा कोणता बुद्धिवाद आहे ? कळत नाहीं.

याच निबंधांत "ध्वनींच्या अनुकरणांतून भाषोत्पत्ति" या मथळ्याखालीं आर्यांचें भ्रमणाला घेऊन संस्कृत भाषेंतील शब्द वैचित्र्याचा उलगडा राजवाडे करूं पाहतात. पूर्वी आम्हीं इतरत्र दाखविल्याप्रमाणें प्रथम जन्मलेले मानव 'सप्तर्षि मन्वादिक' असल्याची सबळ प्रमाणा-वरून परम्परा प्राप्त प्रसिद्धि आहे त्यांनाच राजवाडे डावलतात. सप्तर्षि मन्वादिक आर्यांचे अक्षरांची "दैवी उपपत्ति" लावून सांगतात–

" शब्द इति चेन्नातःप्रभवात्प्रत्यक्षानुमानाभ्याम् " (ब्रम्हसूत्र १।३।२८).

याचे शांकरभाष्यांत 'शब्द पूर्वक सृष्टि' असल्याचें स्थापिलें आहे. व तेथें 'यज्ञेनवाचःपदवीयमायन्' इत्यादि वैदिक आणि 'सर्वेषां सतु नामानि कर्माणि च पृथक् पृथक्! वेद शब्देभ्य एवादौ पृथक्संस्थाश्च निर्ममे ।। (मनुस्मृति १।२१) इत्यादि प्रमाणें दिलीं गेलीं आहेत. त्यावरून 'ध्वनींच्या अनुकरणानें भाषोत्पत्ति' या मथळ्याखालचें राजवाड्यांचें प्रतिपादन लटकें ठरतें कारण ज्या प्रथम मानवांचा निर्देश करून ते प्रतिपादन करतात त्या प्रथम मानवांचीच साक्ष त्यांच्या विरुद्ध जात आहे. हा देखील अभिनिवेशास बळी पडून प्रमाणांकडे डोळेझांक करण्याचा वा होण्याचा मासला आहे.

पूर्वोक्त आठ पायऱ्यांनीं वर्णलिपिमालासिद्धि सांगताना राजवाडेदेखील अनुकारणात्मक आविष्कृतीवर भर ठेवतातच. पण तें अनुकरण प्राण्यांचें असो कीं मनुष्याचें–मनुष्याचें अनुकरण विचारांत घेतल्यास "स्वतःसिद्ध प्रथम शिक्षक' न मानल्यास अनवस्था दोष ओढवतो. पशु वा पक्ष्यांना तसा ध्वनि करण्यास कोणीं शिकविलें हा प्रश्न "स्वतः सिद्ध कर्ता ज्ञाता असा प्रथम शिक्षक" न मानल्यास उरतोच. या संदर्भात 'प्रथम जन्मा' मनु म्हणतो 'यं तु कर्मणि यस्मिन्स न्ययुङ्क्त प्रथमं प्रभुः । स तदेव स्वयं भेजे सृज्यमानः पुनः पुनः ।। (मनुस्मृति १।२८)

कोणत्या प्राण्यांनीं कोणतें कर्म करावें, कसे जीवन जगावें? या विषयीं सर्व प्रथम ब्रह्मदेव किंवा प्रकृतीनें नियुक्ति केलेली आहे. त्यानुसार प्रथम प्राणी त्या त्या कर्मात प्रवृत्त झाले आणि परम्परेनें तींच कर्मे पुढें शिक्षण रूपानें परम्परित झालीं. म्हणून बऱ्याचशा गोष्टी माता, पिता वा पालक संरक्षकाद्वारा शिकूनच नूतनास येतात. हे आजही प्रत्यक्ष आहे.

पूर्वी 'मानव चरित्र' या विषयावर लिहितांना मनुष्य प्रकृति वा ब्रह्मदेवापासून साक्षात् वा परम्परेनें काय काय शिकला ह्याचा विस्तृत ऊहापोह केला आहे. त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं. पशू बाबतही हेंच आहे. 'जीवनक्रमरूप' चरित्र पशुपक्षीही पालक संरक्षकापासूनच शिकतात आणि त्या त्या कर्माचें, प्रवृत्तीचें आद्य प्रवर्तन मनुस्मृतीचें प्रमाणापासून ब्रह्मदेव वा प्रकृतीनें केल्याचे निश्चितपणे समजतें–

माणसांत मुला मुलीस नांव ठेवतात. व त्याच नांवाचा अहंकार धारण करून मानवांची संतति जीवनभर आपलें नांव सांगतें. कोणीं कोणीं टोपणनांव घेतो. तसें करणें म्हणजे साक्षात् वा परम्परेनें प्राप्त नामकरणाची कलित आवृत्तीच होय. त्यास स्वतंत्र अस्तित्व नाहीं. हेंच मनु पूर्वोक्त वचनानें सांगत आहे. त्यावरूनच असें दिसतें कीं-'शब्दपूर्वक सृष्टि असल्यानें प्रकृति दत्त 'काक' या नांवामुळें कावळा 'कावकाव' शब्द करतो. असें नसेल तर एकादा मुलगा 'मी देवदत्त आहे' असें म्हणाला म्हणून त्याचे नांव 'देवदत्त' ठेवलें गेलें असे होईल. तेव्हां ध्वनींच्या अनुकरणांतून भाषोत्पत्ति' या मथळ्याखालील राजवाडे यांचे प्रतिपादन चूक ठरते. प्रकृतिस्थ भाषा संस्कृत व लिपि देवनागरी आहे. 'वर्णात्मक वाणी' असणारे मानवादि 'व्यक्तवाक्' म्हटलें जातात, त्यांना प्रकृतिस्थ भाषा व लिपि आद्यशिक्षित आहे. वेगवेगळ्या भाषा व लिपि, प्रकृतिस्थानाचा वापर करण्याच्या त्यांच्या अशक्ततेमुळें 'व्यवकीर्णता' व धृष्टता येऊन झाल्या आहेत. 'पशुपक्ष्यादि वर्णात्मक वाणी नसणारे' 'अव्यक्तवाक्' म्हटले जातात. त्यांचे ध्वनि त्यांच्या प्रकृतिदत्त ध्वनींचाच शुद्ध वा अशुद्ध रूपांतला परिपाक आहे. याप्रमाणें प्रकृतिस्थ व्यवस्था आहे.

मानवांचें परम्पराप्राप्त शुद्ध उच्चारण त्यांचीं बालकें एकदम करूं शकत नाहींत. बोबडें बोलतात. पुढें शक्ति वाढल्यावर, शिकून शुद्ध उच्चारण करूं लागतात. ही गोष्ट प्रत्यक्ष आहे. यावरून असें स्पष्ट होतें कीं 'स्वतःसिद्ध शिक्षका' वाचून त्या त्या अवस्थांतील उच्चारण विवेक करतां येत नाहीं. राजवाड्यांनीच 'उष् दाहे' हें उदाहरण घ्या तेथें 'हुश्' अशुद्ध व 'उष्' शुद्ध हा निर्णय 'ऐतिहासिक प्रतिपादन' म्हणून कसा झाला? 'स्वतःसिद्ध शिक्षक' न मानतां तो होऊंच शकत नाहीं. तो मानल्यावरच 'हुश्' हे बोबडे बोल शिक्षणानें बरोबर होऊन 'उष्' हें म्हणतां आलें असें म्हणतां येतें. तात्पर्य सर्व संस्कृत भाषा 'ज्ञाता, समर्थ व शक्तियुक्त' अशा 'स्वतःसिद्ध शिक्षकाच्या' उच्चाराने सिद्ध आहे. स्वतःसिद्धाच्या वाणी व लेखनांत व्यवकीर्णत्व व धृष्टत्व नाहीं. अर्थात आद्य उच्चारण शुद्धच होय. राजवाडे मनःकल्पनेवर विसंबून उलट सांगतात. यावर कोणीं विचारील कीं स्वतःसिद्ध काय प्रमाणानें असें बोलतो? हें विचारणें म्हणजे ऑक्सिजन व हैड्रोजन (हायड्रोजन) मिळविल्यास पाणी कां होतें विचारण्यासारखेंच आहे. या विषयीं 'पदात् प्रत्ययतः श्रुतेः' म्हणून उदयनाचार्यांनीं न्यायकुसुमाञ्जलीत विस्तृत विवरण केलें आहे. तें पहावें. प्रस्तावनेंत दिलेंच आहे. यानें 'अध्वनि पदार्थवाचक नामें व जातिवाचक' नामे या मथळ्याखालील राजवाड्यांचें सर्व प्रतिपादन निरस्त होतें.

पुढें मूलभूत अनेक ध्वनि परंपरा असल्याचें राजवाडे सांगतात. हेंही चुकीचें आहे. यज्ञेन वाचः पदवीयमायन् तामन्वविन्दन् ऋषिषु प्रविष्टाम् । तामाभृत्या व्यदधुः पुरुत्रा तां सप्तरेभा अभिसंनवन्ते ।। " अशी श्रुति (ऋग्वेद) आहे. तदनुसार ऋषींत असलेल्या वाणीला घेऊन सर्वत्र भाषा प्रवृत्ति झाल्याचे सांगितलें आहे. (ब्र- सू- १।३।१८ वरील शांकर भाष्यांत हा विषय विस्तारानें आला आहे. तेथेंच महाभारताचेही उद्धरण आहे.)

" अनादि निधना वेदा वागुत्सृष्टा स्वयंभुवा । आदौ वेदमयी दिव्या यतः सर्वाः प्रवृत्तयः ॥ "
या विषयी **" एतद्देश प्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन्पृथिव्यां सर्वमानवाः ॥ "**

अशी मनूचीही साक्ष आहे. मनू 'प्रथम जन्मलेला' असल्याचें सांगितलेंच आहे. यावरून असें स्पष्ट कळतें कीं 'एक ईश्वर, एकाच काळांत सृष्टि आरंभ करतो. सर्व प्रजा त्याच्या पासूनच क्रमानें उत्पन्न आणि साक्षात् वा परम्परेनें शिक्षित होत असल्यानें **मूळ ध्वनि परम्परा एकच** आहे. व सर्व भेद अशक्तीमुळें प्रवृत्त झालेले आहेत- भाषेबाबत व्यवकीर्णता व लिपीबाबत धृष्टत्व हें भेदांचें कारण आहे– **मूळ अनेक ध्वनि परम्परा हें नव्हे.** मीमांसेतील आर्यम्लेच्छाधिकरण, निरुक्त, व्याकरण– महाभाष्य वगैरेत देशभेदानें संस्कृत भाषेंत वेगवेगळया ठिकाणीं वेगवेगळे शब्द अधिक रूढ असल्याचें सूचित केलें आहे. जगांतील सर्व भाषांत संस्कृतचा मोडका तोडका अंश आजही विद्यमान असल्याचें प्रत्यक्ष आहे. वेदशास्त्र पुराणादिकांत भारतेतर देशांतील म्लेच्छ हे कर्महीनता, शाप, पापजन्म वगैरे अनेक कारणांनीं होऊन त्या त्या देशीं गेल्याचें निरूपित आहे. तात्पर्य बाहेरून येथें कोणीं आले नसून येथूनच पातित्यादिवशात् बाहेर गेले आहेत. इतकेंच विस्तार भयास्तव पुरे तात्पर्य **ध्वनि परम्परा मूळ एकच आहे. शास्त्रेषु संस्कृतादन्यत् अपभ्रंशतया स्मृतम्** अशी दण्डीची घोषणा आहे. व तीच सिद्धान्त वेदशास्त्रानुमत इतिहासाचा आहे.

'अव्यक्त वाक्' पशूपक्ष्यांचें अनुकरणानें 'व्यक्तवाक्' मानवांची भाषा होऊं शकत नाहीं. तथापि पशूपक्ष्यांचें भाषाज्ञान देखील योगजसन्निकर्षानें होऊं शकत असल्याचें महर्षि पतञ्जलि सांगतात– '**शब्दार्थप्रत्ययानामितरेतराध्यासात्संकरस्तत्प्रविभागसंयमात्सर्वभूतरुत ज्ञानम्** ।' (विभूतिपाद सूत्र १७)

या प्रक्रियेनें पूर्वीच्या महायोग्यांना पशुपक्ष्यांचे भाषाज्ञान असें रामायणांत भरताचा मातामह केकयराजास मुंग्यांची भाषा समजत असल्याचा उल्लेख आहे. यावरून शकुनादिकांचें निरूपण शास्त्रसम्मत आहे. " अत्रिगर्गगुरुशुक्रवसिष्ठव्यासकौत्सभृगुगौतममुख्याः । ज्ञानिनो मुनिवरा हितभावात्संविदं निजगदुः शकुनानाम् ॥ वेदः पुराणानि तथेतिहासाः स्मार्तानि शास्त्राणि तथापराणि । सत्याधिकं शाकुननामधेयं ज्ञानं समस्तानि समाश्रितानि ॥ स्वयं त्रिनेत्रो भगवान्गणानामुपादिशच्छाकुनमुत्तमं यत् । केन प्रकारेण तदप्रमाणं फलाविसंवादि वदन्ति जिह्माः ॥ " (वसन्तराजशाकुन १/२७–२९)

यावरून 'निढळच्या घामानें शोध' इत्यादि राजवाडयांचें सर्व प्रतिपादन उपपत्तिशून्य आहे.

प्रस्तुत ग्रंथांत भाषा विषयक विचार प्रधान नसल्यानें हा संक्षेपात्मक परामर्श परिशिष्टरूपानें देत आहोत.

**परिशिष्ट :**

# लोकमान्य टिळक व आर्यांचे मूलस्थान

लोकमान्य टिळकांचे "The Arctic Home in Vedas" आणि 'Orion' हे ग्रन्थ पाहून, त्यांचें आधारावर कांहीं लोक आर्य हिन्दुस्तानाबाहेरून आले' या मताचे लोकमान्य होते, असें प्रतिपादन करतात. परंतु लोकमान्यांचे प्रतिपादनाचा नीट विचार केल्यास हें म्हणणें बरोबर नाहीं असें ध्यानीं येतें. ती कारणमीमांसा खालील प्रमाणे–

वेदातील खगोलशास्त्रीय व प्रदेशपरिचायक उल्लेख लोकमान्य टिळक उद्धृत करून आपलें प्रतिपादन मांडतात. एकाद्या प्रदेशाचे वर्णन करणारा, त्या वर्णनावरून तेथील रहिवासी आहे असा निश्चित निर्णय करतां येत नाहीं. कारण त्या प्रदेशाचा प्रवास करून आलेला मनुष्यही त्या प्रदेशाचें व तेथील खगोलिक स्थितीचें वर्णन करूं शकतो, दुसरें असें कीं– ग्रहांचे चार पुनः पुनः आवृत होणारे असल्यानें कोणत्या चक्रास घेऊन कालनिर्णय करावा याविषयीं आधाराला कांहीच नाहीं. अर्वाचीन अभ्यासक जवळचे चक्रास घेतात तें त्यांचें मनानें वा त्यांचे सोयीनुसार आहे. फा हि यान्, ह्यू एन त्संग, अल्बेरुणी, मेगेस्थेनिस, टॅव्हर्नियर' इत्यादींनी त्यांचे ग्रंथांत हिन्दुस्तानचें सविस्तर वर्णन केलें आहे. तेवढ्यावरून ते हिंदुस्तानचे रहिवासी होतात काय ? मुळींच नाहीं. याच दृष्टिकोनांतून वैदिक उल्लेखाचा मागोवा घेत-ल्यास, तेवढ्यावरून आर्यांचें त्या ऋषींचे मूळवसतिस्थानाचा निर्णय घेतां येत नाहीं हें दिसतें. आर्य बाहेरून आले कां येथूनच बाहेर गेले याचा निश्चित निर्णय करण्याजोगें प्रमाण पाश्चात्यां जवळ नाहीं.

वेद हे परमेश्वराचे निःश्वसित आहेत व परमेश्वर सर्वज्ञ आहे म्हणून त्याला कोणतीच गोष्ट अज्ञात नाहीं. यावर कांहीजण म्हणतील कीं मग विवक्षित भागांचेंच वर्णन कां केलें ? याचें उत्तर असें कीं यज्ञीय विनियोगांत, देवताप्रीत्यर्थ ज्याची आवश्यकता आहे तेवढाच भाग सांगण्याकरितां वेदाची मुख्यत्वें करून प्रवृत्ति आहे. म्हणून विनियोग पर्यवसानावरून निर्णय करावा लागतो. हा सर्व भाग लोकमान्य जाणत नव्हते असें नाहीं, तर त्यांचें लेखन त्यांचे पूर्वीच्या पाश्चात्य लेखकांचे जें मत 'आर्य मध्य आशियातून आले–' त्या विषयीं संदिग्धता निर्माण करण्याचा उद्देश ठेवून असावें असें आम्हांस वाटतें. अत्यंत परकीय प्रभावाचा निरास सर्वतया विरुद्ध प्रतिपादनानें होत नाहीं तर परकीय मतांत संदिग्धता निर्माण करून तद्वारा इष्ट मतात हळू हळू पर्यवसान करून होतो. याच धोरणी विचारानें लोकमान्यांचें लेखन आहे असें आम्हांस वाटतें. गीता रहस्याबाबतही असेच आहे, गीता रहस्याची प्रवृत्ति शांकरमत निराकरणार्थ नसून वेगळचा वळणाने शांकरमतांत पर्यवसान करण्यासाठींच आहे.

लोकमान्य 'चित्पावन' होते व चित्पावनांची उत्पत्ति परशुराम द्वारा आहे, असें स्कंद पुराणांत सह्याद्रिखण्ड वगैरे सांगतात. हिंदू-पैकीं कोणाचेही– पूर्वज मध्य आशिया वा ध्रुवप्रदेशावरून हिंदुस्तानात आल्याची परम्पराप्राप्त प्रसिद्ध नाहीं. लोकमान्य हें जाणीत नव्हते वा एतद्विरुद्ध होते असे आम्हांस वाटत नाहीं. कारण गीतारहस्यांत '**महर्षयः सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा। मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः॥**' या श्लोकावर लोकमान्य लिहितात "म्हणून हल्लीच्या मन्वन्तरातलेच सप्तर्षि घेतले पाहिजेत. त्यांचीं नांवें मरीचि, अंगिरस, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु अणि वशिष्ठ अशीं महाभारताच्या शान्तिपर्वात नारायणीयोपाख्यानांत दिलीं आहेत– (म. भा. शां. प. ३३५, २८, २९, ३४७, ६४ व ६५) व तींच या ठिकाणीं विवक्षित आहेत असें आमचें मत आहे." तसेच मनूबद्दल लोकमान्य लिहितांत– "पहिल्या सातांचीं नांवें स्वायंभुव, स्वारोचिष, औत्तमी, तामस, रैवत, चाक्षुष आणि वैवस्वत अशीं असून यास स्वायंभुवादि मनु असें म्हण तात. (मनुस्मृति १।६२ व ६३) या पैकीं ६ मनु संपून हल्लीं ७ वा म्हणजे वैवस्वत चालू आहे." पुढें लोकमान्य लिहितात– सात महर्षि, पूर्वीचे, चार तसेंच मनु, ज्यांच्यापासून (या) लोकामध्यें ही प्रजा झाली, ते माझेच मानस म्हणजे मनानें निर्माण केलेले भाव होत." यावरून 'मानवाचे उत्पत्तीबाबतचा आधुनिक विकासवाद्यांचा दृष्टिकोन लोकमान्यांस मान्य नव्हता असें दिसतें– आणखी असें कीं याच सप्तर्षि मन्वादिकांचा उल्लेख पहिला मनु जो स्वायंभुव त्याचे मनुस्मृतींतही येतो. तेथें तो सदाचारधर्मलक्षण सांगताना शिष्य भृगूद्वारा सांगतो–

सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम्।
तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते।।
तस्मिन् देशे य आचारः पारम्पर्यक्रमागतः।
वर्णानां सान्तरालानां स सदाचार उच्यते॥

(म. स्मृ– २। १७ व १८)

सप्तर्षि आणि मनु 'ब्रह्मावर्त' देशांत ( = हिंदुस्तानांतच) झाले नसतील आणि अन्यत्र कोठून येथें आले असतील तर 'पारम्पर्य

क्रमानें आलेला ब्रह्मावर्तातला आचार ' कोठून असेल ? अशा रीतीनें मनुवचनास वैय्यर्थ येईल. लोकमान्यांना असें अपेक्षित असल्याचें आम्हांस वाटत नाहीं कारण पूर्वोक्त गीतारहस्याचा भाग त्यास सर्वस्वी विरुद्ध पडतो. म्हणून–

एवं सर्वं स दृष्ट्वेदं मां चाचिन्त्यपराक्रमः ।
आत्मन्यन्तर्दधे भूयः कालं कालेन पीडयन् ॥

(मनुस्मृति १/५१)

अशी सृष्टयुत्पत्ति प्रकरणाची मनुस्मृतींतील समाप्ति लक्षांत घेतां ' आर्य हिंदुस्तानाबाहेरून आले ' हा लोकमान्य टिळकांचा अभिप्राय असावा असें आम्हांस वाटत नाहीं. याविषयी आणखी एक प्रमाण असें—

भाईजी पावन स्मरण. भगवान की विशिष्ट विभूति सार्वभौम गृहस्थ संत प्रवर नित्यलीलालीन भाईजी श्री. हनुमान प्रसाद पोद्दार की पुण्यस्मृति प्रधान सम्पादक – म. म. डॉ. गोपीनाथ कविराज सम्पादक – पं. चिम्मनलाल गोस्वामी डॉ. भगवती प्रसाद सिंह प्रकाशक – श्री. राधामाधव सेवा संस्थान पो. गीतावाटिका, गोरखपूर सं. २०२८ प्रथम आवृत्ति. पृ. ४४८ जीवन यात्रा मध्ये खालील भाग आला आहे.

## लोकमान्यसे नैकट्य

" उन दिनों श्री बाळ गंगाधर तिलक की राजनीतिक विचार धारा श्री भाईजीके मनोऽनुकूल पड़ती थी । कलकत्ता में क्रांतिकारी जीवन व्यतीत करनेके समयसे ही ये उनके प्रशंसक थे । बम्बई आनेपर राजनीति क्षेत्रमें कार्य करते हुए उनके अत्यंत निकट आ गयें । उनके साथ घरपर घंटों बैठकर राजनीतिक चर्चा करते रहते । तिलक महाराजकी मृत्यू १ अगस्त १९२० इ. को हुई । उस समय भाईजी उनके पास थे । उनके शरीर छोडने के पूर्वका एक संस्मरण सुनाते हुए भाईजीनें कहा था– ' आर्योंके आदिनिवासके विषयमें तिलक महाराजने पुनः एक पुस्तक तैयार की थी, जिसमें उन्होंने, अपनी पुरानी मान्यताओंका (तिलक महाराजने अपनी प्रसिद्ध पुस्तक ' ओरायन ' में सिद्ध किया था की आर्य उत्तरी ध्रुव के निवासी थे । ) खण्डन किया था । नयी मान्यता के अनुसार आर्य भारतवर्षकेही थे । इस पुस्तककी पाण्डुलिपि मैंने देखी थी, परंतु उसे प्रेसमें छापनेके लिये देनेसे पहलेही तिलक महाराजका देहान्त हो गया । इसके पश्चात् उस पुस्तककी पाण्डुलिपि क्या हुई, कुछ पता नहीं चला । मैंने उनके उत्तराधिकारियोंसे उस पुस्तक के सम्बन्धमें पूछताछ की, किन्तु कोई सन्धान न मिल सका ।"

लोकमान्य टिळक हे राजकारणपटु तसेंच शास्त्रीय विचार करणारे असल्यामुळें त्यांनीं धोरणीपणाने प्रथम अनिष्टनिवृत्तीचा प्रयत्न केला– ते जाज्वल्य निष्ठावंत भारतीय असल्याने ते आमचेच आहेत, त्यांचेशीं विरोध नाहीं–त्यांना अभिप्रेत असणारे शास्त्रीय पर्यवसान मात्र दाखविण्याकरितां हें परिशिष्ट जोडलें आहे.

---

## प रि शि ष्ट :

# मनूचे मन्तव्य

" एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥ " २।२०

इति मनुस्मृतिवचने एवं मीमासा –

" सरस्वतीदृषद्वत्योः " इत्यारभ्य " म्लेच्छदेशस्ततःपरः " इत्येतावत्पर्यन्तं ७ श्लोकाः " एतान् द्विजातयो देशान् संश्रयेरन् प्रयत्नतः " इत्यग्रिमविधिशेषा अर्थवादा इत्याह मेधातिथिः । यथा " तस्मादेतान् द्विजातयो देशान् संश्रयेरन् इत्येतद्विधिशेषा देशप्रशंसार्थवादा एते " इति । तथैव एतान् द्विजातयो देशानित्यत्राह स एव– यदर्थं देशसंज्ञाभेदकथनं तमिदानीं विधिमाह– " एतान् ब्रह्मावर्तादीन् देशान् " इति च । अर्थवादवाक्यार्थबोधोऽपि क्वचित् तात्पर्यविषयीभूत एव जन्यत इत्याह विधिवादेऽन्ते भाट्टरहस्यकारः । यथा एवंविधस्तुतिनिन्दे क्वचित् " वायुर्वै क्षेपिष्ठा देवता " इत्याद्यर्थवादपदैः स्वशक्यार्थज्ञानजन्यशाब्दबोधविषयीभूतवाक्यार्थसम्बन्धादेव लक्ष्यते । स च वाक्यार्थः क्षेपिष्ठत्वादि गुणको वायुः स्वदेवताककर्मजन्यं फलं शीघ्रं प्रयच्छतीत्येवं रूपः । शाब्दबोधश्च तात्पर्यविषयीभूत एव जन्यते । गङ्गा पदेन प्रवाहोपस्थितिवत् " इति । अत्र क्वचिदिति अविरोधे भूतार्थवादे । "विरोधे गुणवादः स्यात् अनुवादोऽवधारिते ।" "भूतार्थवादस्तद्धानात्" इत्युक्तेः । अत्रोत्तरमीमांसापि देवताधिकरणे विग्रहसाधने इममर्थं प्रतिष्ठापयति । ततश्च पृथिव्यां सर्वमानवाः स्वं स्वं चरित्रं यस्य सकाशात् साक्षात् परम्परया वा शिक्षेरन् सोऽग्रजन्मा एतद्देशप्रसूत इति वाक्यार्थः प्रकृते । " शिक्षेरन् " इतिविधिरिति पक्षेऽपि तदर्थघटित उक्तवाक्यार्थ अविरोधाद् भूतार्थवादो भवेदेव देशस्योत्कर्षातिशयसाधकः । उत्कर्षातिशयसाधनात् मानवानां सर्वत्वविशेषणं पृथिव्यामिति स्वं स्वं चरित्रमिति तात्पर्यविषयीभूतमेव तदुपपादकं सर्वं भूतार्थवादे अस्त्येव । स्थितिनिबन्धनं स्वं स्वं चरित्रं हिरण्यगर्भप्रजापति सकाशात् शिक्षितमाह वात्स्यायनः " प्रजापतिर्हि प्रजाः सृष्ट्वा तासां स्थितिनिबन्धनं त्रिवर्गस्य साधनमध्यायानां शतसहस्रेणाग्रे प्रोवाच । "

" तस्यैकदेशं स्वायम्भुवो मनुर्धर्माधिकारिकं पृथक् चकार । बृहस्पतिरर्थाधिकारिकम् । महादेवानुचरश्च नन्दी सहस्रेणाध्यायानां पृथक् कामसूत्रं प्रोवाच " इति । किञ्च प्रवृत्तिनिबन्धनं निवृत्तिसाधनमिति विभज्याह गीताशाङ्करभाष्यारम्भे श्रीमानाचार्यः–

" स भगवान सृष्ट्वेदं जगत् तस्य स्थितिं चिकीर्षुः मरीच्यादीनग्रे सृष्ट्वा प्रजापतीन् प्रवृत्तिलक्षणं धर्मं ग्राहयामास वेदोक्तम् । ततोऽन्यांश्च सनकसनन्दनादीनुत्पाद्य निवृत्तिलक्षणं धर्मं ज्ञानवैराग्यलक्षणं ग्राहयामास " इति ।

मनुरप्याह–

" कर्मणां च विवेकार्थं धर्माधर्मौ व्यवेचयत् ।
एवं सर्वं स दृष्ट्वेदं मां चाचिन्त्य पराक्रमः ।
आत्मन्यन्तर्दधे भूयः कालं कालेन पीडयन् " ॥ इत्यादि ॥

तस्मात् भूतार्थवादे सप्तर्षीणामिव प्रजापतिमन्वादीनामपि शिक्षकत्वे क्रोडीकरणं, तत्सम्बन्धादेतद्देशस्य प्राशस्त्यातिशयश्च ऐतिहासिकः प्रदर्श्यते–

' हिरण्यगर्भः समवर्तताग्रे ' ' स वै शरीरी प्रथमः ' इति च शरीरिषु अग्रजन्मा हिरण्यगर्भ उक्त. । तत्प्रजासुच मानसऋष्यादि सृष्टिमारभ्य मानवान्तानां मध्ये अग्रजन्मानः ' महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ' इत्यादयः उक्ताः । सर्वमानसऋष्यादिमानवान्तानां हिरण्यगर्भप्रजापति सकाशात् शिक्षितत्वं प्रदर्शितम् । एवं साक्षात् परम्परया वा शिक्षकत्वं हिरण्यगर्भस्येव मन्वादीनामपीति ' अब्राह्मणादध्ययनमापत्काले विधीयत ' इति, ' इदं शास्त्रं तु कृत्वाऽसौ मामेव स्वयमादितः । विधिवत् ग्राहयामास मरीच्यादींस्त्वहं मुनीन् ' इति,

अश्वपते राज्ञः सकाशात् ऋषीणां विद्याग्रहणं प्रकृत्य छान्दोग्ये ५।११ मध्ये ' वैश्वानरं सम्प्रत्यध्येषि । तमेव नो ब्रूहीति ' प्रार्थितो राजा ' तान् हानुपनीयैव प्रोवाच ' इत्यादि परामर्शे ज्ञायते । अत्र ' अनुपनीय ' इत्यस्य ' पापयोनिपातनमकारयित्वा ' इत्यानन्दगिरिणाऽर्थः प्रदर्शितः । ' शिक्ष विद्योपादाने ' इति धातुपाठात् ' अन्त्यादपि परां विद्याम् ' इति ' स्त्रियोरत्नान्यथो विद्या धर्मः शौचं सुभाषितम् विविधानिच शिल्पानि समादेयानि सर्वतः ' इति स्मृतेश्च शिक्षकत्वं विद्यावत एव । वृत्तिस्तु ब्राह्मणस्यैव गुरुत्वं वेदाध्यापकत्वं गुरुशुश्रूषेत्यादिकं चेत्यन्यदेतत् ।

तथाच शिक्षकवर्गे शास्त्रानुमत्या प्रविष्टानां सर्वेषां साधारण्यायात्र श्लोकेऽग्रजन्मपदं यौगिकम् अर्थवादे घटकं यथादर्शितं वाच्यम् । सर्वथा अयोनिजानां सीता, द्रौपदी, धृष्टद्युम्न, द्रोणादीनामिव मानस प्रजानांमृषीणां प्रजापतेः हिरण्यगर्भस्य देशस्य चैतद्देशप्रसूतत्वं ' षूङ् प्राणि प्रसवे ' इति मुख्यं न भवेत्येवेति सृष्टत्वमिहार्थो ' वाच्यः । तथाच बहुव्रीहितत्पुरुषाभ्यां सर्वसङ्ग्रहः । एतद्देशः सृष्टो येनेति बहुव्रीहिः हिरण्यगर्भे । एतद्देशे सृष्ट इति तत्पुरुष इतरेषाम् । एवं पृथिव्यां सर्वमानवानामेतद्देशप्रसूताग्रजन्मशिक्षितत्वम् अवच्छेदकावच्छेदेन दृश्यते देशप्रशंसोत्कर्षाय । हिरण्यगर्भ ब्रह्मैव केवलं यदि बहुव्रीहिणा एतद्देशप्रसूतः अग्रजन्मेति गृह्यते तर्हि एतद्देशप्रशंसायां प्रकरणप्राप्तं पर्यवसानं न स्यात् सर्व देशस्य तत एव प्रसूतत्वाविशेषात् । अतः पृथिव्यां सर्वमानव तत्तचरित्र शिक्षकाग्रजन्मस्थानत्वेन रूपेण एतद्देशस्य सृष्टत्वं बहुव्रीहौ विवक्षणीयम् । तथाच अनितरसाधारण्यं प्राशस्त्यस्योपपद्यते । एवं चाग्रजन्मेति...... एतद्देश प्रसूत इति च सप्तर्षिमन्वादयोऽपि ग्राह्याः । ब्राह्मणमात्र ग्रहणे एत द्देश प्रसूतः पृथिव्यां सर्वमानवान्तर्गतः प्रथमो ब्राह्मणोऽपि; स एतद्देशे प्रसूतस्य ब्राह्मणस्य सकाशात् शिक्षित इति न सम्भवति । तस्य स्वशिक्षितत्वासम्भवात्, अनन्तरशिक्षितत्वे प्रमाणाभावात् । अत्र एतद्देश इति भू-भाग इव तदुपरि अन्तरिक्षपर्यंतमपि उच्यत एव । ' एतद्देशे मेघः ' एतद्देशे व्योमयानम् ' इत्यादि व्यवहारात् । ततश्च आद्यसृष्टप्रजानां ब्रह्मशिक्षितत्वम्, इतरेषां पृथिव्यां सर्वमानवानाम् आद्य सृष्टशिक्षितत्वमिति तदर्थः । तदर्थं मन्वादिसाधारण्यार्थं च इहाग्रजन्मशब्दो यौगिक एव भूतार्थवादे प्रविष्टः । वर्णेषु ज्यैष्ठचाद् ब्राह्मणस्य तथात्वम् । टीकाकारैः रूढचर्थं प्रदर्शनम् अवयुत्यानुवादमात्रमिति मन्तव्यम् । अतः बहुव्रीहिणा तत्पुरुषेण च ऐतद्देशप्रसूतेति शरीरिषु प्रजासु वा यौगिकाग्रजन्मना पूर्वभाविनां सर्वेषां ग्रहणम् । साक्षात् परम्परया वा तच्छिक्षितत्वं पृथिव्यां सर्व मानवानामिति । तथाच प्रजास्वग्रे जन्म येषां ते एतद्देश प्रसूता इति देश प्रसंसा । ' यद्वै किञ्च मनुरवदत्तद्भेषजम् ' इति श्रुतेः मनोः शिक्षकत्वमिष्टमेव । एवं चोपधर्मपथेषु-सर्वतः प्राचीनतमस्यास्य वैदिक प्रसिद्धिप्रसिद्धस्य सृष्टि विषयस्य-

' उत्पद्यन्ते च्यवन्ते च यान्यतोऽनिकानिचित् ।<br>
तान्यर्वाक्कालिकतया निष्फलान्यनृतानि च ॥

इति शद्वान्तरेण विकृतैकदेशानुवादो बोध्यः । तथाच पृथिव्यां सर्वमानवाः साक्षात्परम्परया वा एतद्देशप्रसूताग्रजन्मनःसकाशात् स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन्निति प्रमाणप्राप्तमेव विस्मृतानपि बोधयति मनुः । तत्र च प्रथमजन्मा मानवः एतद्देशप्रसूत इति मनोः साक्ष्यं वैदिक पूर्वजनांना भारतादन्यतः कुतश्चिदागतत्वमिति, आधुनिकोत्प्रेक्षाया विरुद्धमेवोपलभ्यते प्रमाणमिति ।

इदं च मानवचरित्रं द्विविधं- जीवनक्रमरूपं पुरुषार्थविशेषसाधनरूपं च । तत्र सर्वमानवसाधारणं मानवजीवनक्रमरूपं मातापित्रादिसका शान्छिशुभावादारभ्यैव बालकैः शिक्ष्यमाणम् । अशन-पान-वसन-निवसन-वचनादान-विसर्ग-गति-बन्धुव्यवहारादिकम् अद्यापि पालनपोषणसमकालमेव सर्वत्र शिक्ष्यते प्रथमम् । द्वितीयं तु धर्मार्थकाममोक्षसाधनरूप अष्टादशविद्यास्थानद्वारा आन्वीक्षिकी-त्रयी-वार्ता-दण्डनीति-चतुःषष्टिकलाद्वारा एतद्देशप्रसूताग्रजन्मभिः सृष्टिकर्तृः सकाशाच्छिक्षितव्यम् । अस्य ह्रासवाद-विषयत्वं प्रत्यक्षमेव । यथा संस्कृतस्य प्रथम शिक्षितस्य व्यवकीर्णीकृतस्य सर्वभाषान्तररूपापत्तिः तथैव अष्टादशविद्यास्थानद्वाराशिक्षितस्य पुरुषार्थसाधनव्यवहाहास्य अशक्तैर्व्यवकीर्णीकृत्यविविध विरूपव्यवहारस्वरूपता जगति सर्वपुरुषार्थकार्यक्षेत्रेषु न्यूनाऽधिका वा आसीदेव । सर्वस्यापि जगतः एकेश्वरत्वान्मूले शिक्षितस्य यथाधिकारं यथाशास्त्रं एकरूपत्वम् । तथैवाष्टादशविद्यास्थानद्वारा शिक्षितव्यवहारे कालक्रमेणाग्रे तत्र निर्मूलस्य अनपेक्षितस्य तद्विरुद्धस्य च व्यवहारस्याधुनिकविकासवादविषयत्वमिति सिद्धान्तः । तत्रोपर्युक्तं द्विविधमपि स्वं स्वं चरित्रमिति तच्च यथाशिक्षितं घृष्टत्वाद्विरूपं च तत्तत्सात्म्यङ्गतानामेव न्याय्यव्यवहाररूपं भाषावदिति । अनपेक्षितानां विरुद्धानां वा निर्मूलकल्पितानां तु पुरुषार्थाभासरूपत्वमिति विवेकः । तत्र पुरुषार्थव्यवहाराभासानां शान्तिसमाधानानाधायकत्वमिति ।

एवं च ब्रह्मावर्तस्य सदाचारलक्षकत्वं ब्रह्मर्षिदेशस्य स्वस्वचरित्र शिक्षकत्वं विशेषेण प्राशस्त्यमुक्तम् । यज्ञीयदेशत्वं ब्रह्मावर्त-ब्रह्मर्षि देश- मध्यदेशाऽऽर्यावर्त- स्वाभाविक कृष्णसारमृगचरणदेशानां समानमिति विवेकः ।

## मराठी सारांश

" हिरण्यगर्भ समवर्ततताग्रे " " सर्वशरीरी प्रथमः " या श्रुतिवाक्यांनीं शरीरींमधील प्रथम हिरण्यगर्भ असल्याचें सांगितलें आहे.

" महर्षयः सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा " या भगवद्‌गीता वचनानुसार सप्तर्षि आणि मनु वगैरे हे मानसऋषिप्रभृति मानवापर्यन्त प्रजेपैकीं प्रथम जन्मलेले असल्याचें सांगितलें आहे.

मानवापर्यन्त प्रजेपैकीं प्रथम जन्मलेल्यांनीं हिरण्यगर्भापासून शिक्षण घेतलें आहे. सर्व सामान्यतया पूर्वी जन्मलेले नंतर जन्मलेल्यांकडून-कांहीं अपवाद वगळतां-शिक्षण घेतील हें संभवनीय नाहीं. यावरून मनुस्मृति वचनांतील " अग्रजन्मा " शब्द मानवापर्यन्त सर्व प्रजेचा शिक्षक प्रतिपादन करण्याकरितां हिरण्यगर्भ मन्वादिसाधारण यौगिक आहे असें म्हणावें लागतें.

अर्थात् हिरण्यगर्भाबावत ' एतद्देशप्रसूत ' हा शब्द बहुव्रीहि समास आहे व इतरांचे बावत तत्पुरुष समास आहे. येथें प्रसूत शब्दाचा अर्थ सृष्ट समजावा.

सर्व देश हिरण्यगर्भापासून सृष्ट असल्यानें "एतद्देशप्रसूताग्रजन्मा" म्हणून एकटा हिरण्यगर्भ बहुव्रीहि समासानें घेतल्यास मनुस्मृतीचे संदर्भांत एतद्देशप्रशंसेंत प्रकरणप्राप्त पर्यवसान होणार नाहीं.

म्हणून " एतद्देशप्रसूत अग्रजन्मा " यानें हिरण्यगर्भ व सप्तर्षि मन्वादि सर्व शिक्षक ग्राह्य आहेत. पृथ्वीवरील सर्वमानव साक्षात् अथवा परम्परेने एतद्देशप्रसूत अग्रजन्मांपासून आपापलें चरित्र शिकले व शिकतील, ही गोष्ट ऐतिहासिक, सध्यां विसरलेली असली तरी मनु ती सांगण्यास विसरलेला नाहीं.

अग्रजन्मा (प्रथम जन्मलेला) मानव शिक्षक "एतद्देशप्रसूत" असल्याची साक्ष वैदिकांचे पूर्वज भारताबाहेरून भारतांत आले या अर्वाचीनांच्या प्रसिद्धीची मनूनें पूर्ण अप्रसिद्धी शशशृंगाप्रमाणे वर्तविल्याचें (दिसतें) दर्शवितें.

प्रश्न– शरीरींमधील प्रथम हिरण्यगर्भ " एतद्देशप्रसूत " कसा ?

उत्तर– बहुव्रीहि समास– (एतद्देशः प्रसूतः सृष्टः येन सः) नें आहे. व सप्तर्षिमन्वादि हे ही या देशांत जन्मलेले " एतद्देशप्रसूत " तत्पुरुष समासा (एतद्देशेप्रसूतः सृष्टः एतद्देशप्रसूतः) नें आहेत. अर्थात् ज्या प्रथम जन्मलेल्यापासून साक्षात् अथवा परम्परेनें सर्व जगांतील मानव स्व स्व चरित्र शिकले आणि शिकतील तो प्रथम जन्मलेला शिक्षक " एतद्देशप्रसूत " होता असें मनूचें साक्षी वचन:आहे.

" एतद्देशप्रसूत " असा प्रथम ब्राह्मण " एतद्देशप्रसूत " ब्राह्मणाजवळ शिकला असे सम्भवत नाहीं. कारण पृथ्वीवरील सर्व मानवांत त्या ब्राह्मणाचाही अन्तर्भाव होत असल्यानें तो स्वतःच स्वतःपासून शिकला हें शक्य नाहीं, व नन्तर जन्मलेल्यांपासून शिकला या विषयी कांहीं प्रमाण नाहीं.

" एतद्देश " शब्दाने त्या भूमीचे वर अन्तरिक्षापर्यन्त भाग ग्रहण करावयाचा आहे. कारण या देशीं मेघ, या देशीं विमान असा व्यवहार चालत असतो.

स्व स्व चरित्र–मनुस्मृतीचे वचनांत " स्व स्व चरित्र " असा शब्द आला आहे. त्याचा अर्थ विस्तृत आहे.

मानव चरित्र म्हणजे मानवाचें चरित-जीवनी हें जीवन क्रमरूप आणि पुरुषार्थ विशेष साधनरूप असें दोन प्रकारचें आहे.

माता पित्याकडून वा पालकांकडून (पशू सुद्धां) बाळपणापासून जें शिकले जातें तें जीवन क्रमरूप, पहिल्या प्रकारचें चरित्र होय. हें पृथ्वीवरील सर्व मानवांना सामान्यतः कमी जास्ती एकाच प्रकारचें आहे. या मध्यें खाणें, पिणें, कपडे नेसणें, राहणें. शुचित्वाशुचित्व, बोलणें घेणें, टाकणें, चालणे, बान्धवांशी व्यवहार इत्यादि पालन पोषण होत असतांनाच सर्वत्र, बालकाला माता, पिता वा पालक शिकवितात. भारतीय परम्परेत पालन पोषण हें आयुर्वेदांतील " कौमारभृत्य " याचा विषय आहे, वा होता.

धर्मार्थकाममोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ कसे साधावेत याविषयींचे शिक्षण म्हणजे पुरुषार्थविशेषसाधनरूप दुसऱ्या प्रकारचे चरित्र होय हे शिक्षण सृष्टिकर्त्याकडून प्रवर्तित अशी १८ विद्यास्थाने, आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता, दण्डनीति, ६४ कला वगैरेद्वारा मिळतें.

हें शिक्षण सृष्टिकर्त्यापासून पूर्वोक्त अग्रजन्म्यांनी घेतलें आणि त्याचे पासून साक्षात् अथवा परम्परेने तें मानवांना प्राप्त झालें आहे. या दुसऱ्या प्रकारच्या मानव चरित्रांत उत्तरोत्तर ऱ्हास होत असल्याचें प्रत्यक्ष आहे. ज्याप्रमाणें आद्यशिक्षित देवभाषा संस्कृताचें विकृतीनें व्यवकीर्णतेनें अन्यान्य भाषा बनतात, तसेच पुरुषार्थ विशेष साधनरूप आद्यशिक्षित मानवचरित्रांतही व्यवकीर्णता करून अशक्त लोक या कार्यक्षेत्रातही मूळाला अनपेक्षित लोप व व्यवकीर्ण व्यवहार बनवितात हा ह्रास आहे.

ईश्वरप्राप्त मूळ शिक्षण सर्वत्र यथाधिकार व यथाशास्त्र एकसारखें नियमितच असतें. तें परिपूर्ण सर्वसमन्वयी असल्यानें विकासवाद त्याला लागू नाहीं. कारण मुळांत परिपूर्ण असलेल्याचा विकास कसला ? या परिपूर्णाच्या अशक्तकृत व्यवकीर्णतेतून आलेल्या अनन्तरकल्पित, मूळास अनपेक्षित वा विरुद्धव्यवहारांनाच आधुनिक विकासवाद लागू आहे.

मूळ परिपूर्ण व्यवहारांच्या अशक्तकृत व्यवकीर्णतेनें होणारे व्यवहार त्यांचे करिता भावे प्रमाणेंच यथाशक्ति न्याय्य व्यवहार मानले जातात. कारण मूळाचा अंश ठेवून असणारें व्यवहार कांहीं अंशांत तरी इष्ट व हितसाधक ठरतात. परन्तु मूळाला अनपेक्षित वा तद्विरुद्ध

व्यवहार इष्ट व हितसाधक ठरत नाहींत. ते तसे वाटतात किंवा कांहीं तसें सांगतात ते इष्टाचा अदूरदर्शी आभास झाल्यानें होय. म्हणून ते आभासाचेच साधन सांगतात. असे आभास साधक व्यवहार चिरकालीन शान्तिदायक ठरत नाहींत.

अशाच अभिप्रायाने विल्यम व्ही शॅनॉन म्हणतात.

" It is that meaninglessness which pervades this age of instant grafitication and instant result and permanent dissatistaction "

(Hindu, Madras 20 July 1971)

तसेंच भारताचे माजी शिक्षणमंत्री डॉ. हुमायूं कबीर त्यांच्या " भारतीय शिक्षादर्शन " या ग्रंथांत पृ. ८५ वर म्हणतात,

– " इस प्रकार पहिले आवश्यकताओं और इच्छाओंको बढा देना और फिर उनकी पूर्ति करना संयुक्त राज्य अमरीका और सोवियत संघ दोनोंका समान रूपसे आर्थिक दर्शन बन गया है। स्वच्छासे और जानबूझकर इच्छाओं और आवश्यकताओंको सीमित करना जो तमाम बडे धर्मोका स्वीकृत आदर्श हैं जो आधुनिक संसारके राजदरबारसे निर्वासित कर दिया गया है। मानवीय इच्छा और आवश्यकताओंकी पूर्ति का अन्त संभव नहीं है। इसलिए यह दृष्टिकोण कभी शान्ति या सन्तोष नहीं दे सकता। मनुष्यकी भौतिक सम्पदामें असाधारण वृद्धि हो जानेपर भी आकांक्षा और प्राप्तीका अन्तर लगातार बढ रहा है और युवकोंमें अशान्ति ओर बेचैनी बढ रही है। "

---

प रि शि ष्ट :

# वर्णोद्धारतन्त्र आणि वङ्गाक्षर

वर्णोद्धार तंत्रावर शब्दकल्पद्रुमकारांचे लेखास घेऊन असा आक्षेप येऊं शकतो कीं वर्णोद्धारतंत्र केवळ बंगाली लिपीलाच सांगतें, ' इतर कोणतीही लिपि सांगत नाहीं. कारण शब्दकल्पद्रुमांत प्रत्येक वर्णाचा लक्षणश्लोक सांगताना तत्पूर्वी ' अस्य वङ्गाक्षरे लेखनप्रकारो यथा ' असें वाक्य येतें. पण हें म्हणणें खालील गोष्टींमुळे केवळ वङ्गाक्षरप्रतिपादकत्वास जुळत नाहीं.

१) वर्णोद्धारतंत्र ' ब ' आणि ' व ' या दोघांचे वेगवेगळे लक्षण श्लोक देतें. बंगाली लिपींत ' ब ' आणि ' व ' लिपि एकच आहेत.

२) वर्णोद्धारतंत्र दोन प्रकारचे ' भ सांगते. बंगाली लिपींत ' भ ' एकाच प्रकारचा आहे.

३) वर्णोद्धारतंत्र दोन प्रकारचा ' र ' सांगते बंगाली लिपींत ' र ' एकाच प्रकारचा आहे.

४) वर्णोद्धारतंत्र ' क ' कदम्बगोलकाकार सांगतें तसा ' क ' बंगाली लिपींत नाहीं. बंगालींत तो कोणयुक्त लिहिला जातो.

५) सोळाखडी बनविण्यास ज्या स्वर मात्रा लागतात त्या बंगाली इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ मध्यें जशाच्या तशा दिसत नाहींत. व ओ औ मध्यें मात्रेला ज्ञापक अकाररेषेची जोड दिसत नाहीं, वर्णोद्धारतंत्रोक्त लिपींत असें नाहीं हें सर्वत्र दिसतें.

६) बंगाली ' ग ' मध्ये वर्णोद्धार तंत्र श्लोकांतील–

अधः कुञ्चित रेखा या गाणेशी सा प्रकीर्तिता ।
ततो दक्षगता या तु कमला तत्र संस्थिता ॥
अधोगता ततो या तु तस्यामीशः सदा वसेत् ॥

' अधोगता ' या शब्दाचा शब्दकल्पद्रुमांत ' अधोगता अधोमुखेनगता पुनरूर्ध्वमुखेनागतेत्यर्थः ' असा अर्थ करावा लागला आहे. केवळ ंगाली लिपीच सांगावयाची असती तर ' अधोगताततो या तु ' चे ठिकाणीं ' अधोगत्वा चोर्ध्वंगता ' अशीच रचना केली असती.

तात्पर्य वर्णोद्धारतन्त्र केवळ वङ्गाक्षर प्रतिपादक नाहीं. शब्द कल्पद्रुमांतील वरील वाक्य इतरवारक नाहीं. ःवनागरी प्रतिपादक कसें ते दाखविलेंच आहे.

---

**परिशिष्ट :**

# कन्नड विषयक कांही प्रश्नांचा विचार

'कन्नड लिपिय उगम मत्तु विकास' या पुस्तकांत डॉ. ए. वि. नरसिंहमूर्ति महोदयांनी 'अकारादि कन्नड अक्षरगळ बेळवणिगे' नामक अध्याय ५ मध्यें ( इ. स. पू. ३०० ) पासून सुरुवात करून (इ. स. १८००) पर्यंत लिपीचा प्रकार भेद दाखविला आहे. त्यामध्ये 'अ', 'आ' विषयीं या ग्रंथांत अशोक– लिपीच्या ज्या 'अ' ला घेऊन प्रक्रिया दाखविली आहे, तो 'अ' घेऊन सरळपणें प्रक्रिया जुळते. (पहा– प्र. १ आ. १८) अशोकाच्या इतर 'अ' ला घेऊन संगति लावूं गेल्यास राष्ट्रकूटाचें पुढें एकदम विरूपता व असंगति होते. याचा अर्थ असा आहे कीं बादामि चालुक्यापर्यन्तचे प्रदर्शित राजकीय लेख अशोकाच्या इतर 'अ' काराच्या लेखनानें प्रभावित होत होते. एवढ्यावरून या ग्रंथांत दाखविलेल्या रीतीनें, लोकांत सामान्य तथा अशोकाच्या 'अ' कार लेखनाचा दुसरा प्रकार प्रकरण १ आ. १८ अस्तित्वांतच नव्हता, केवळ डॉ. नरसिंह मूर्तीनीं दिलेला शिलालेखांतील प्रकार तेवढाच होता असें समजतां येणार नाहीं आमचा दर्शित प्रकारसुद्धां पूर्वी होता तोच पुढें राहिला म्हटला पाहिजे. या प्रमाणेंच पुढें 'इ' कारादि अक्षरांबाबतही गंग अथवा बादामि चालुक्य अथवा राष्ट्रकूट वगैरे कांहीं एका काळापर्यंत डॉ. नरसिंहमूर्ति यांनी दिलेल्या राजकीय लेखनावरून अशोकलिपीचा प्रभाव असल्याचें दिसतें. त्यानंतरचे काळातील लिपि प्रकार हें देवनागरीचें साक्षात् घृष्टलेखन असल्याचें प्रत्यक्ष दिसत आहे. इतक्यावरून पूर्वीनंतर पुढे दिसणारे प्रकार सर्व सामान्यतया नव्हतेच असें म्हणावयाचें कारण नाहीं आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, आज ज्यांचे लिखित अवशेष नाहींत त्यांचें पूर्वी अस्तित्वच नव्हतें असा कांहीं नियम नाहीं. डॉ. नरसिंहमूर्ति यांनीं दाखविलेलें राजकीय लेखन त्या काळीं अशोकाच्या प्रभावांत होतें असें म्हणावें लागतें. अशोकाचा प्रभाव नाहींसा झाल्यावर पूर्वीपासून असणारा प्रवाह पुनरपि जोरानें येऊन शिल्लक राहिला एवढेंच सांगावयाचें आहे. याचा विचार पूर्वी केलाच आहे, तो पहावा.

या प्रकाराने न अडखळता संगति शेवटपर्यन्त लागते. आमची डॉ. नरसिंहमूर्ति यांना या विषयाकडे कृपापूर्वक लक्ष देण्याविषयीं प्रार्थना आहे. अन्यथा पृ. ९९ वर 'सातवाहन' व 'होयसळ' या शब्दांतील मुद्रित हकार, त्याच पृष्ठावरील इतर कोणत्याही हकारापासून बनूं शकत नाहीं. तो या ग्रंथांतील प्र. १ आ. ४७ पासून सहजपणें बनतो– आ. ६७ व ६८ या शिवाय ई, उ, ष वगैरे अक्षरे डॉ. नरसिंहमूर्ति यांनीं दाखविल्याप्रमाणें तेलगूतही आहेत. कन्नडमध्यें तीं या ग्रंथांत दाखविल्यानुसार बनत असल्याचें स्पष्ट आहे.

हातानें लिहितांना आजही (आकृतीत पहा.) अशा प्रकारांनीं 'अ' (आकृतीत पहा) अशा प्रकारांनीं 'ई' (आकृतींत पहा.) अशा प्रकारानी 'उ' (आकृतीत पहा) अशा प्रकारांनीं 'ष', आणि (आकृतीत पहा) अशा प्रकारानी 'ह' लिहून घृष्ट-लेखनाने वैलक्षण्य होत असल्याचे दिसून येते. म्हणून अशा वैलक्षण्यावरून काळभेदाचा नियम होऊं शकत नाहीं. बुद्धि व घृष्टलेखन अनन्त असल्यानें अमुक एक प्रकार पूर्वी नव्हता. असें विधान करतां येत नाहीं. उपलब्ध उदाहरणांत जसें आहे तेवढें असल्याचें सिद्ध होतें. पण आणखी कांहीं नव्हते कां कसें याचा विचार एवढ्यानें होत नाहीं. एकाद्या स्थळीं उत्खनन प्राप्त वस्तूंवरून, त्या काळांत, त्या देशांत तेवढ्याचे परिमाणांत त्या वस्तु होत्या, अधिक नव्हत्या असें नियंत्रित करणें, आधुनिक पुरातत्व शास्त्रास तरी मान्य आहे काय ? मान्य असल्यास नव्य न्यायातील योग्यानुपलब्धीचा अभ्यास आधुनिक पुरातत्ववेत्त्यांनीं करून करावा अशी आमची सूचना आहे. क्रमिक विकासाच्या पुष्टचर्थ, घृष्टलेखनाशिवाय कोणतीहीं अन्य उपपत्ति नाहीं व एकाच काळांत अनेक प्रकारचें घृष्टलेखन असणें संभवनीय असल्यानें तेंही क्रमिक विकासाचें उपपादन करूं शकत नाहीं. डॉ. नरसिंहमूर्तीनीं या सर्वांचा विचार करावा अशी प्रार्थना आहे.

---

परिशिष्ट :

# जनमेजयप्रदत्त ताम्रशासन

इंडियन अँटिक्वेरी नोव्हेंबर १८७५ मध्यें पृ. ३३३ व ३३४ वर कर्नाटकांतील तीर्थहळ्ळी जवळ असणाऱ्या भीमनकट्टी मठांत उपलब्ध असणाऱ्या 'जनमेजय' राजानें दिलेल्या ताम्रशासना संबंधीं विवरण मेजर डिक्सनचे संग्रहांतील क्रमांक १० वरून दिलें आहे. या ताम्र शासनाचें भाषाङ्कन खालील प्रमाणें– हें देवनागरी लिपींतच आहे.

श्रीगणाधिपतयेनमः पान्तु वो जलदश्यामाः शार्ङ्गज्याघातकर्कशाः त्रैलोक्यमण्डपस्तम्भाश्चत्वारो, हरिबाहवः स्वस्तीश्री जयाभ्युदये युधिष्ठिरशके प्लवंगाख्ये येकोननवतिवत्सरे सहस्यमासि अमावास्यायां सौम्यवासरे श्रीमन्महाराधिराजपरमेश्वरो वीरप्रतापशाली कुरुकुलोद्भावो वैयग्रणीपादगोत्रजः श्री जनमेजयभूपः किष्किंधानगर्यां सिंहासनस्थः सकलवर्णाश्रमाधर्मप्रतिपालकः पश्चिम-देशस्य सीतापुर वृकोदरक्षेत्रे तत्रायमुनिवृन्दमठस्य गरुडवाहनतीर्थ श्रीमद्शिष्य कैकर्य्यनाथैराराधितं सीतारामस्य पूजार्थं कृतभूदानसाधनं अस्मत्प्रपितामह युधिष्ठिरादिस्थित मुनिवृन्दक्षेत्रेस्य चतुःसीमापरिमितिक्रमः पूर्वभागे उत्तरवाहिन्याः तुंगभद्राया पश्चिमे दक्षिणभागे अगस्त्याश्रम संगमादुत्तरे पश्चिमेपाषाणनद्याः पूर्वं उत्तरभागे भिन्ननद्या दक्षिणे येतन्मध्यस्थितमुनिवृन्दक्षेत्रं भवच्छिष्यपारम्परया आचन्द्रार्कपरियंतं निधिनिक्षेप जलपाषाण अक्षिणीआगामिसिध्दसाध्यतेजसाम्यसहितं स्वबुद्ध्यानुकूलेन अस्मन्मातापितृणां विष्णुलोकप्राप्त्यर्थं हरिहरसन्निधौ उपरागसमय सहिरण्येन तुंगभद्राजलधारापूर्वक क्षेत्रं यतिहस्ते दत्तोस्मि अहं । एतद्धर्मसाधनस्य साक्षिणः आदित्यचन्द्रावनिलानलो च द्यौ भूमिरापो हृदय मनश्च । अहश्च रात्रिश्च उभे च संध्ये धर्मोस्य जानाति नरस्य वृत्ति । (कन्नडाक्षराणि) (परिशिष्टान्ते चित्रविभागे) दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोनुपालनं दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदं स्वदत्ताद्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत् ।। मद्दत्ता पुत्रिका ज्ञेया पितृदत्ता सहोदरा । अन्यदत्ता तु जननी दत्तभूमि परित्यजेत् अन्यैस्तु छर्दितं भुंक्ष्वमिश्च छर्दितं न तु ततः कष्टो ततः नीचः स्वयंदत्तापहारकः । स्वदत्तां परदत्तां वा ब्रह्मवृत्ति हरेत यः । षष्टिर्वर्षसहस्त्राणि विष्टायां जायते कृमी ।।

या ताम्रशासनांत युधिष्ठिर शक ८९ प्लवङ्गनाम संवत्सर सहस्य म्हणजे पौषमास अमावास्या तिथी बुधवार व सूर्यग्रहण यांचा उल्लेख आहे. हे सर्व उल्लेख गणितसिद्ध व योग्य असल्याचें वाराणसेय राजकीय संस्कृत महाविद्यालयांतील ज्योतिष विभागाचे भूतपूर्व प्रधानाध्यापक कै. बापूदेव शास्त्री यांनीं सिद्ध केलें असल्याचें विन्ध्येश्वरीप्रसाद द्विवेदी यांच्या 'न्यायवार्तिकस्य भूमिका' या पुस्तकाच्या पृ. १०१ वरील तळटीपेंत म्हटलें आहे. यांत विवरण दिलें नसल्यानें दृग्सिद्ध सूक्ष्म गणितानुसार-शक्य विवरण देत आहें–

१) सूर्यसिद्धान्त व सिद्धान्तशिरोमणिनुसार कलियुगांतील पहिला शककर्ता इंद्रप्रस्थ येथे धर्मराज युधिष्ठिर असून त्याचा शक ३०४४ वर्ष चालला होता. महाभारत भागवत व विष्णूपुराण यांमध्यें कलियुग केव्हां सुरू झाले हें सांगितले आहे.

यस्मिन् कृष्णो दिवं यातः तस्मिन्नेव तदाहनि ।

प्रतिपन्नं कलियुगमिति प्राहुः पुराविदः ।। (महाभारत)

यदैव भगवद्विष्णोरंशो यातो दिवं द्विज ।

वसुदेवकुलोद्भूतस्तदेव कलिरागतः ।। (विष्णुपुराण ४।२४।५५)

विष्णुर्भगवतो भानुः कृष्णाख्योऽसौ दिवंगतः ।

सदाऽऽविशत्कलिर्लोक पापेर्यद्रमते जनः ।। (भागवत १२।२।२९)

हा कलियुगारंभ दिवस १८ फेब्रुवारी इ. स. पूर्व ३१०२ आहे. हा ग्रेगरियन कॅलेंडर मानानें होय. म्हणून सूर्यसिद्धान्तोक्त सन १९७६ मध्यें आरंभ होणाऱ्या शालिवाहन शकारंभीं गतकलि ५०७७ बरोबर आहे. शकवर्षांत ३१७९ मिळविल्यावर गतकलि येतो. कलियुगारंभी युधिष्ठिर शक सुरू झाला. कृष्णनिर्याणाचे वेळी अमावास्या व सूर्यग्रहण आलें असावे ही अमान्तमासात माघी अमावास्या होती. असा तर्क करावयास हरकत नाहीं. स्थूलमानाने सूर्यग्रहणें ३६ वर्षें २१ दिवस २६ तासांचें अंतरानें होत असल्याने हें संभवनीय आहे. महाभारत स्त्री पर्वांत–

त्वमप्युपस्थिते वर्षे षट्त्रिंशे मधुसूदन ।

हतज्ञातिर्हतामात्यो हतराज्यं वने चरन् ।

कुत्सितेनाप्युपायेन निधनं समवाप्यसि ।।

असा कृष्णाला झालेला गांधारीचा शाप आहे, पुढें मौसलपर्वात–

त्रयोदशी पंचदशी कृतैका राहुणा पुनः ।

प्राप्ते वै भारते युद्धे प्राप्ता चाद्य क्षयाय नः ।।

असे यादवीचे वेळी कृष्णाचे उद्गार आहेत. यावरून विश्वघस्रपक्ष पुनरपि आला असावा असे दिसतें

२) महाभारत सभापर्व अध्याय ७९ मध्यें पांडव वनवासाला निघाले असताना सूर्यग्रहण झाल्याचा उल्लेख मिळतो.

राहुरग्रसदादित्यमपर्वणि विशांपते ।।

युद्धापूर्वी धृतराष्ट्राला व्यासांनी केलेल्या उपदेशात–

अलक्ष्यः प्रभया हीनः पौर्णमासीं च कार्तिकीम् ।

चन्द्रोभूदग्निवर्णश्च पद्मवर्णे नभस्तले ।। (भीष्मपर्व अ. २)

तसेच भीष्मपर्व अध्याय ३ श्लोक ३२ मध्ये–

चतुर्दशीं पंचदशीं भूतपूर्वां तू षोडशीम् ।

इमां तु नाभिजानेहममावास्यां त्रयोदशीम् ।।

चन्द्रसूर्याविभौ ग्रस्तावेकमासीं त्रयोदशीम् ।।

असे आहे म्हणजे युद्धापूर्वी चन्द्रग्रहण व युद्धारंभी सूर्यग्रहण झाल्याचे दिसते या पुढील गदापर्वात दुर्योधनवधाचें वेळी उल्लेखिलेलें सूर्यग्रहण आधुनिक गणितानें सिद्ध होत नसल्याने सोडले आहे.

हे श्लोक शकुन विषय सांगणारे आहेत असे पं. गणपतीशास्त्री हेब्बार यांचे मत आहे.

महाभारतीय युद्धाचे वेळीं शुभकृन्नाम संवत्सर होतें यावरून कृष्णाचे आयुष्य १२५ वर्षे होतें व युद्धाचे वेळीं कृष्णार्जुन ९० वर्षांचे होते. यावरून कृष्ण निधनाचे वेळीं बहुधान्यनाम संवत्सर असावें असें वाटतें. या हिशेबाने ताम्रशासनोल्लिखित प्लवंगनाम–संवत्सर बरोबर आहे.

३) महाभारतीय युद्ध १५ आक्टोबर इ. स. पू. ३१३८ या दिवशीं कार्तिक कृष्ण ३० मंगळवारीं सुरू झालें. महाभारतीय युद्धारंभी चन्द्र मंगल निरयन वृश्चिकेंत, गुरु निरयन मकरेंत केतु निरयन मेषेंत, शनि निरयन वृषभेत, शुक्र निरयन कन्येंत व रवि, राहु, बुध निरयन तूळेत होतें. हें श्रीकोटा व्यंकटाचलम् ज्योतिषि व प्राच्यविद्यातज्ज्ञ यांचें मत आम्हांस मान्य आहे. युधिष्ठिर राज्याभिषेक, अश्वमेध यज्ञदीक्षा अश्वमेधारंभ, दिग्विजयी अर्जुनाचें आगमन, गांधारी शाप, परीक्षित राज्याभिषेक या सर्वांस हें जुळतें. यांवेळी राहु निरयन तूळेंत १ अंश असावा. त्या वरून ताम्रशासनोल्लिखित काळीं राहु कर्केस व केतु मकरेस असावा. म्हणून उक्त काळीं सूर्यग्रहण जानेवारीचे दुसऱ्या वा तिसऱ्या आठवड्यात संभवनीय आहे. हें इ. स. पू. ३०१४ हें असावे.

४) १५ आक्टोबर ३१३८ या दिवशी मंगळवार होता. ३१३८ ला २८ ने भागल्यास बाकी २ उरते व ३०१४ ला २८ ने भागल्या बाकी १८ उरते, यावरून बुधवार असावा हें बरोबर आहे. या प्रमाणें ताम्रशासनोल्लिखित उल्लेख प्रामाणिक असल्यानें ताम्रशासन खरें आहे

–संपादक

या ताम्रशासनाविषयी इंडियन अँटिक्वेरीमधील लेखकाचा अभिप्राय येणें प्रमाणें–

" This is form no. 10 of the photographs of copper plate inscriptions at the end of Major Dikson's collection. The original belongs to the Bhimankatti Math near Tirthhalli in Mysore. I publish this inscription chiefly as a curiosity for it is manifestly a forgery."

या प्रमाणें परस्पर विरुद्ध अशी मतें नोंदविलीं आहेत, त्याविषयीं खालील प्रमाणे विचार आहे–

"Manifestly forgery " या मताला घेऊनच आम्हीं विचार करणार आहोंत. या विचाराचा निष्कर्ष शेवटीं दिलाच आहे– हा विचार असा–

लिपीचें संदर्भात या ताम्रशासनाची साक्ष महत्वाची ठरते. कारण Forgery करणारा, विवाद उत्पन्न झाल्यास अथवा न्यायालयांत गेल्यास लिपीमुळें प्रामाणिकपणाविषयीं संशय उत्पन्न होणार नाहीं अशाच रीतीनें आपलें कृत्य करीत असतो. अर्थात् Manifestly forgery म्हणण्यानेंच याचे लिपिविषयक प्रामाणिकत्व सिद्ध होतें–

या वरून असेंही दिसून येते कीं forgery करणाऱ्याचे वेळीं निर्माता ( = forgery करणारा), जनता आणि न्यायालय यांची ताम्रशासनांत उल्लेखिलेल्या युधिष्ठिर शक ८९ मध्यें देवनागरी लिपींत निश्चितपणें लेखन होत होतें अशी धारणा होती आणि तीच लिपि ताम्रशासनांत दिसून येतें.

या ताम्रशासनांत चार कानडी अक्षरें दिसून येतात तीं येथें असंबद्ध पडलीं आहेत. त्यांचे संदर्भात दोन प्रकारानें विचार होऊं शकतो.

१) महाभारत सांगणाऱ्या व्यासांचें अपेक्षेनुसार साक्षात् श्री गणेशानें महाभारताचें लेखन केलें. श्री गणेशास गणेश सहस्र नामांत " अष्टादशलिपिव्यष्टिसमष्टिज्ञानकोविदः " असें म्हटलें आहे, त्या नुसार अष्टादशव्यष्टि लिपींत समाविष्ट असणाऱ्या नागरी लिपीचा एक घृष्टलेखन प्रकार म्हणून या पुस्तकात दाखविल्याप्रमाणें कानडी लिपीही श्री गणेशास व त्या वेळच्या लोकांस ज्ञात होती अशी निर्माता, जनता व न्यायाधिकरण यांची धारणा होतीं. असें म्हणावें लागतें. घृष्टलेखन ही आजच्या लोकांची संवय अथवा शोध आहे असें कसें म्हणतां येईल ? या प्रमाणें तत्कालीन धारणेवर आधारित असा हा पहिला विचार. या विषयीं आणखी एक विचार करता येईल.

२) कीं हीं चार कानडी अक्षरें मागाहून घुसडलीं अर्थात् प्रक्षिप्त समजावीत ग्रंथालयांतील जुन्या पुस्तकांवर ग्रंथालयाचा शिक्का असतो. तो त्या पुस्तकाचे मुळांतील नव्हें असेंच समजावें.

या प्रमाणे कोणत्याही प्रकारें विचार केला तरी Forgery मानून देखील तत्कालीन लोकधारणा पत्करावीच लागते. आजही हे सर्वांना मान्य आहे कीं आधुनिक लिपिसमालोचकांचे ' अशोकलिपी पूर्वी नागरी नव्हती ' हें शाळा कॉलेजांत शिकविण्यांत येणारे मत अठराव्या शतकानंतर प्रचारांत आलेलें आहे. या पूर्वी जगांत कोठेंही हें मत प्रचारांत नव्हतें. लिपिविषयक आधुनिक मत प्रचारांत येण्यापूर्वी भारतीयांची लिपिविषयीं वर उल्लेखिल्या प्रमाणेंच धारणा होती. याविषयीं साक्ष देणारें. हें ताम्रशासन सुद्धां लिपिविषयक आधुनिक मत जन्माला येण्यापूर्वीचें आहे. त्यामुळें आधुनिक मताचें निराकरण करण्यासःठीं ही Forgery केली गेली असेंही म्हणता येणार नाहीं. म्हणून तत्कालीन लोक धारणेचें यथार्थ दिग्दर्शन करणारें वा त्या धारणेविषयीं पुरावा म्हणून तें ताम्रशासन सर्वांना पत्करावेंच लागेल.

या प्रमाणें ही धारणा पत्करूनही आधुनिक तिला अंधश्रद्धा म्हणतील तरी तत्कालीन जनता व न्यायाधिकरण यांना कोणत्याही प्रकारानें लिपिविषयीं कसलाही संशय येऊं नये. एवढ्या काळजीपूर्वक व कसोशीनें Forgery करणाऱ्यानें सर्व संमत अशा रीतीनें ती केली असली पाहिजे म्हणून ती करणाऱ्यानें तावून सुलाखून पत्करलेली धारणा आधुनिक मताचे उदयापूर्वी सार्वत्रिकपणें मान्य अशी पुरःसिद्ध असल्याचें पत्करावें लागतेच ही धारणा कांहीं Forgery करणाऱ्यानें निर्माण केलेली नाहीं. त्यानें केवळ ती आहे असें निरीक्षण करून स्वतःचे कार्यार्थ तिचा वापर करून घेतला. Forgery करणाऱ्यांचें निरीक्षण, सावधानता व पद्धति सर्व काळांत सारखीच असतें हें आजही अनुभवास येते.

अशा सार्वत्रिक धारणेस कोणताही पुरावा न देतां अंधश्रद्धा म्हणणें अयोग्य आहे. 'अशोकलिपिपूर्वी देवनागरी नव्हती.' या आधुनिकांच म्हणण्यासही शिलालेखादि मिळत नाहीं.. या अयोग्यानुपलब्धी वांचून दुसरे प्रमाण नाहीं. ही देखील एक अंधश्रद्धाच म्हणावी लागेल.

उत्खननाने प्राप्त झाले तर अंधश्रद्धा होत नसते काय ? म्हणून कारण नसेल तर अंधश्रद्धा म्हणता येत नाहीं. अशोकाचे शिलालेख त्याचे पूर्वी देवनागरी नव्हती असें सांगत नाहींत. होती असेंही सांगत नाहींत. म्हणून अशा अनिश्चितावर आधारलेली आधुनिकांची मागाहून पत्करलेली लिपि विषयक धारणा आहे. प्रत्येक लिपीनें वा व्यक्तीनें आपले चिरस्थायी स्वरूपाचे शिलालेखादि स्मारक करून ठेवले पाहिजे असा नियम थोडाच आहे ? असें स्मारक एखाद्या दिवशी केलेंच तर त्यापूर्वी ती लिपि व व्यक्ति नव्हतीच असें त्यावरून म्हणतां येईल काय ? असें पत्करल्यास शिलालेखापूर्वी अशोकलिपि नव्हती या आक्षेपाचें निराकरण होणार नाहीं. शिलालेखाला त्याच काळी लिपि बनली तरी पुरें आहे. म्हणून तिचें पूर्वास्तित्व मानणें अंधश्रद्धा नाहीं कां ?

याप्रमाणें तत्कालीन सार्वत्रिक धारणेविरुद्ध असणारें, प्रमाणावांचून केलेलें, अयोग्य अनुपलब्धीवर आधारलेलें, आधुनिकांचें प्रतिपादन न्याय्य व प्रामाणिक होऊं शकत नाहीं.

म्हणून ताम्रशासनाकडून सिद्ध होणारी वर नमूद केलेली धारणा हें देवनागरीच्या पूर्व आस्तित्वा विषयीं बलवान् असे पुरातत्व-प्रमाण आहे. अशोकलिपि हा नागरीचा एकदेश असल्याचें पूर्वी दाखविलेंच आहे. त्यावरून अशोकलिपि हेंच नागरीचें पूर्व आस्तित्वाविषयीं आणखी एक प्रमाण आहे.

म्हणून देवनागरीलिपि आणि वर्णोद्धारतन्त्र अशोकलिपीपूर्वी असणें अनिवार्य आहे. न्याय्य आहे.

---

# अष्टादश लिपींना स्वतंत्रत्व किम् ?

श्री गणेश सहस्रनाम स्तोत्रस्य खद्योत नामके भाष्ये–

" नागरद्राविडान्ध्राद्याः स्वतंत्रा लिपयो भुवि ।
अष्टादश तदंशोत्था अवान्तर-भिदा अपि ।।
देशभेदेन बहवः तज्ज्ञाने त्वं विचक्षणः ।
अष्टादशलिपिव्यष्टिसमष्टिज्ञानकोविदः ।। इति श्री भास्कररायः ।

अत्रोक्तं स्वतन्त्रत्वं किमिति प्रश्ने लिपीनां रेखारूपाणां-जडत्वात्स्वतन्त्रः कर्तेत्यादावुक्तं स्वातन्त्र्यं न सम्भवति । अतः तदंशोथत्वं समष्टित्वं यदुक्तं तदभावः व्यष्टिलिपीनामष्टादशानां स्वातन्त्र्यमिति पक्षश्चेदाश्रियते तर्हि तदपि आन्ध्रलिपिषु न सङ्गच्छेत् । यत आन्ध्रशब्द चिन्तामणिटीकायामप्प कविनोक्तं शुद्धान्ध्रलिपिलेखनक्रमप्रकरणे– अनुस्वार विसर्जनीयौ सकलदेशप्रशस्तनागरलिपित उपादेयाविति । तथाच नागरादुपादानमान्ध्रलिपिष्वनुतमम् । द्राविडप्रभृतिनामपि अगस्त्यः द्राविडीं प्राकृतीं व्यधादिति शम्भुरहस्योक्तेः, लिपिमपि तथेति तमिळ् साहित्योक्तेः दर्शितत्वान्नागरसादृश्याच्च नागरादुपादानमुदाह्रियत एव ।ततश्च नागरांशोत्थत्वाभावः न वक्तुं शक्यते ।—

किञ्च वर्णोद्धारतन्त्रादौ शास्त्रस्थलिपिरूपं यववराहाधिकरणन्यायेन सर्वासां विनियुज्यमान भारतीयलिपीनां साक्षात्परम्परया वा अनिवार्यतया उपादेयमेव । मीमांसान्यायप्राप्तत्वात् ! अन्यथा यन्त्रलेखनादौ विनियोगानर्हत्वात् । वर्णोद्धारतन्त्रोक्तं मौलिकं रूपमेव नागरलिपि-रिति समन्वयो दर्शितः ! अतः तदन्यांशोत्थत्वाभाव एव स्वातन्त्र्यमिति प्रायशो वक्तव्यम् । तेनैव सामञ्जस्यम् ।' अशोकलिपिः नागरलिपेः साम्प्रदायिकविशेषरूपैवेति भास्करेणैवोक्तं दर्शितमेव । अतः ततः क्वचिदंशमादाय प्रवृत्तानां कन्नड वङ्गाक्षरविशेषादीनां यदि व्यष्टिलिपित्वं तर्हि तत्र किञ्चिद्बाधकम् । बौद्धानां ललितविस्तरे यथा प्राचीनलिपिमालामुदाहृतपाठे यदुक्तं वङ्गलिपिः द्राविडलिपि कनारिलिपिरित्यादि तत्तासां लिपीनामास्तित्वे प्रमाणं चेदिष्टं यदि चाष्टादशसु तासां प्रवेशश्चेदिष्टस्तर्हि नागरादंशग्रहणं न बाधकमिति वक्तव्यमेवेति । अतः परं का व्यष्टिः का समष्टिरिति विद्वांसः प्रमाणम् । कनारिशब्दश्चात्र ' कनाडी ' इत्यर्थे युज्यते दक्षिण कनरा उत्तरकनरेत्यादि व्यवहारात् ।

किञ्च 'धात्राक्षराणि सृष्टानि ' इति बृहस्पतिः ' नाकरिष्यद्यदि ब्रह्मा लिखितं चक्षुरुत्तमम् ' तर्हि 'नाभविष्यच्छुभागतिः' इति नारदश्च अक्षरलिपीनां प्रथमं ब्रह्मसृष्टत्वमाहतुः । तत्प्रमाणं भास्कररायमखिनोऽपि ! किं ब्रह्मा अष्टादशापि स्वयमादौ सृष्टवान् ? एकया सृष्टया तव एवान्यासां सम्भवे किं प्रमाणमष्टादशलिपीनां प्रथमसृष्टत्वे ? अतः प्रथम सृष्टाया एकस्या लिपेः सकाशाद्घृष्टलेखनप्रक्रियांशोपादानं नासामष्टादशानां स्वातन्त्र्यापहारकमिति वक्तव्यमेव । घृष्टलिखितानां वस्तुतोऽनन्यत्वात् । तथाच अष्टदशातिरिक्ता अष्टादशानामंशोत्थाः समष्टि–लिपयो बहुधा प्रोक्ताः सन्तु । कथमपि अष्टदाशानां–स्वातन्त्र्यमुक्तं तथा परिष्कर्तव्यं यथा नागरादंशग्रहणे न व्याहन्यतेति ।

---

